


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

वर्ष ३ – अं. २
जुलै १९३०
पा. क्र. १०७ ते

# वेदपूर्व समाज

( लेखकः – वा. दा. तळवलकर )

पृथ्वीवरील सर्व वाङ्मयांत वैदिक वाङ्मय फार फार प्राचीन असें समजतात. त्या वैदिक वाङ्मयानें फार मोठा काल व्यापलेला आहे. आमच्यांतील बऱ्याच प्राचीन कल्पनांप्रमाणें वेद हे अपौरुषेय, साक्षात् ब्रह्मदेवाचे मुखांतून निघालेले किंवा त्याचें निःश्वसितच ! पण या 'अपौरुषेय' शब्दाचा मूळचा अर्थ अगदीं भिन्न आहे असें पौराणिक वाङ्मयावरून दिसून येतें. ऋषींचे अनेक वर्ग असून त्यांतील ब्रह्मर्षि किंवा 'अपुरुष' या पदवीस पोंचलेल्या ऋषींनीं उत्पन्न केलेलें हें वाङ्मय आहे म्हणून तें अपौरुषेय म्हणावयाचें असा पुराणांवरून अर्थ दिसतो. (मत्स्यपुराणांतील ऋषींचे वर्ग पहा). परंतु हा अर्थ सुटून साक्षात् 'ब्रह्मयाचें निःश्वसित' इत्यादि काव्यमय अर्थ त्या वाङ्मयास पुढें आला. अर्वाचीन कल्पनांप्रमाणें घेतलें तरी वैदिक कालासंबंधानें अनेक अनुमानें काढण्यांत आलेलीं आहेत. अविनाशचंद्र दास यांच्या मताप्रमाणें वेद ३०।३५००० वर्षांपूर्वींचे, लोकमान्यांच्या मताप्रमाणें त्यांतील कांहीं ऋचा तरी १०००० वर्षांच्या आणि पाश्चिमात्यांच्या मताप्रमाणें ऋग्वेद खि. पू. २४०० किंवा अद्यपूर्व ४।५००० वर्षांपूर्वींचा. पाश्चिमात्यांचें हें मत त्यांस बदलावयास लावणारीं अनेक प्रमाणें दिवसानुदिवस उपलब्ध होत आहेत. या वेदांतून आपल्यास वेदपूर्वकालीन समाजाचीं चित्रें पहावयास मिळतातच. पण चमत्कार असा कीं त्या वेदपूर्वकालीन समाजाची रूपरेखा वेदापेक्षांहि आमच्या पौराणिक वाङ्मयांतच अधिक सांठविलेली दिसते. बहुधा कै. काळे यांनीं दाखविल्याप्रमाणें वेदपूर्व असें एक 'पुराण' असावें. आजच्या अनेक पुराणांतून 'एक सर्वसामान्य' असें पुराण संशोधून काढतां येण्यासारखें आहे. अर्थात् व्यासांनीं एका पुराणाचींच अष्टादश पुराणें बनविलीं ही कथा खोटी नव्हेच. तेव्हां पुराणांतून 'वेदपूर्व पुराणा'चा भाग राखून ठेवण्यांत आला आहे असें समजलों तर वेदपूर्व समाजाचीहि माहिती या पुराणांतून आढळते या म्हणण्याची सत्यता वाचकांस समजून येईल. पुराणांचा असा ऐतिहासिक रितीनें अभ्यास होणें जरूर आहे. पण पुराणें म्हणजे शिमगा ही कल्पना सोडून दिल्याखेरीज असा अभ्यास होणें शक्य नाहीं. असो. पौराणिक कथांचा कांहीं भाग महाभारतांतहि सांठविलेला आहे. **अशा या पुराणरूपी व वेदरूपी 'ऐतिहासिक साधनां'तून** आपण वेदपूर्वकालीन समाजाचा शोध करूं.

## वेदपूर्व रानटी, प्राकृत किंवा आसुर समाज.

वैदिक लोक आपल्यास 'आर्य' म्हणवितात. 'आर्य' या शब्दाच्या अर्थाचा अद्याप निश्चित उलगडा व्हावयाचा आहे. आर्य हें संस्कृतिदर्शक नांव असून असंस्कृत किंवा प्राकृत किंवा आसुर समाजापासून भिन्नता दर्शविण्याकरितांच तें धारण केलेलें दिसत आहे. प्राकृत भाषेहून संस्कृत भाषा जशी उच्च दर्जाची तसाच प्राकृत समाजापेक्षां आर्यसमाज अधिक संस्कृत व उच्च. 'संस्कृति' हा शब्दच उच्चत्वाचा बोधक आहे. तसाच आर्यशब्दहि उच्चत्वाचा बोधक आहे. सुधारलेल्या समाजाच्या द्योतक अशा ज्या आर्यांच्या गोष्टी पुराणांतून व वेदांतून आढळून येतात त्यांत (१) दीर्घतमा–विद्वेषी, (२) श्वेतकेतु उद्दालक यांच्या गोष्टी, (३) यमयमीसंवाद आणि (४) विवाहसूक्त यांची गणना होण्यासारखी आहे. संस्कृतीच्या इतिहासांत या गोष्टी 'मैलांच्या धोंड्याप्रमाणें' दिसून येणाऱ्या आहेत. करितां त्यांचा विचार करण्याचें एथें योजिलें आहे.

## मामतेय दीर्घतमा व विद्वेषी

दीर्घतमा हा एक फार प्राचीन वैदिक ऋषि आहे. हा उचथ्य आणि ममता यांचा मुलगा. तथापि

त्याची प्रत्यक्ष माहिती वेदांत फारच थोडी मिळते. तो अंधळा होता असें त्याचें 'दीर्घतमस्' हें नांवच यौगिकार्थानें सांगतें. (वैदिक नांवें कादंबऱ्यांतून - दिलेल्या नावाप्रमाणें गुणदोषदर्शक असतात). या ऋषीच्या कांहीं गूढ सूक्तांवरून किंवा ऋचांवरून दीर्घतमा हा स्वतः आंधळा असण्यापेक्षां दीर्घरात्रीचा द्योतक असावा अशी लोकमान्यांनीं कल्पना केली आहे ती सयुक्तिक आहे. पण या शब्दाचे अर्थ अनेक असावेत असें दिसून येणार आहे. बृहद्देवतेंतील कथेप्रमाणें दीर्घतमा हा जन्मांध असून त्यास मागाहून ईशकृपेनें दृष्टी प्राप्त झाली. परंतु पौराणिक कथेप्रमाणें त्याला बहुत वर्षें अंधत्वच भोगावें लागलें. महाभारतावरून (त्यांतील अद्भुत भाग सोडल्यास) असें दिसून येतें कीं (आदिपर्व अ. १०४) याचें बापाचें नांव उचथ्य. ऋग्वेदांत यास क्वचित् औचिथ्य असें म्हटलेलेंहि आहे. उचथ्य हा बृहस्पतीचा भाऊ. उचथ्याच्या बायकोचें व दीर्घतम्याच्या आईचें नांव ममता. ममता उचथ्यापासून गरोदर होती. तरी पण बृहस्पति तिच्याशीं संग करूं लागला. यावरून ममता ही बृहस्पति व उचथ्य या दोघांचीहिं बायको असून दोघा भावांत एक बायको असणें ही त्या वेळीं समाजांत रूढि असावी असें उघड दिसतें. कारण, बृहस्पतीनें भोग मागितला असतां ममता नाखुषी दर्शविते ती पातिव्रत्यभंगाकरितां नसून केवळ गरोदर असल्यामुळेंच. दोन भावांची एक बायको असें दुसरें उदाहरण नासत्य म्हणजे अश्विनीकुमार यांचें आहे. मरुत् ४९ पण त्यांची बायको एक असेंहि तिसरें एक उदाहरण आहे. या गोष्टींच्या रूपकात्मक अर्थाशीं तूर्त कांहीं कर्तव्य नाहीं. अशा गोष्टी प्राचीन समाजांत इतरत्र आढळून येतात तशाच वेदपूर्व समाजांत आढळून येतात व येणें स्वाभाविक आहे. या स्थितींत प्रथम आर्यांनीं सुधारणा घडवून आणली हेंच या समाजाचें वैशिष्ट्य. असो. ममतेच्या मर्जीविरुद्ध बृहस्पतीनें तिच्याशीं संग केला. त्यावेळीं नैतिक कल्पनाहि आजच्यापेक्षां भिन्न होत्या. त्यामुळें बृहस्पतीच्या या कृत्याला तो ममतेचा पति नसल्यास दोष द्यावयाचा कीं नाहीं हा प्रश्न वेगळा. पण त्याचा तूर्त विचार कर्तव्य नाहीं. ममतेच्या निषेधामुळें बृहस्पतीनें एक गोष्ट केली. त्यानें वीर्योत्सर्ग केला नाहीं. तरी पण त्या संगाचा परिणाम दीर्घतमा हा जन्मांध होण्यांत झाला असाहि या कथेचा कदाचित् अभिप्राय असूं शकेल ! असो. दीर्घतमा हा उचथ्याचा मुलगा व म्हणून 'औचथ्य'. तरी पण तो 'मामतेय' या नांवानें अधिक प्रसिद्ध आहे. मामतेय असें आईवरून नांव कां पडलें ? बापाचें नांव माहीत नसल्यास आईवरून नांव पडतें असें उपनिषदांतील जाबालिकथेवरून दिसतें व तसें उपनिषदांत म्हटलेंहि आहे. वंशब्राह्मणांत अशी अनेक नांवें आलेलीं आहेत. पण एथें **बापाचें नांव माहीत आहे.** त्या अर्थी हें नांव पडण्याचें कारण दुसरें कांहीं तरी असलें पाहिजे यांत शंका नाहीं. ममता ही उचथ्य व बृहस्पति या बंधुद्वयाची एकाच काळीं बायको असल्यास मुलाचें नांव कोणत्या बापावरून व कसें ठरवावें ? असा प्रश्न उत्पन्न होईल. बापावरून किंवा आजावरून जीं गोत्रें किंवा कुलनामें किंवा आडनांवें पडलीं तीं अनेक व्यक्तींची एकच स्त्री समकालीन पत्नी असतांना पडणें शक्यच नाहीं. मग त्या व्यक्ती सख्ये भाऊ असोत किंवा दुसऱ्या कोणी असोत. अशा वेळीं बापाची निश्चिति करतां येत नाहीं म्हणून आईवरून नांव पडणें हेंच साहजिक आहे. पण याशिवाय आणखी ही एक कारण संभवतें. त्याकालीं समाज

**मातृसत्ताप्रधान (matri-archical)**

होता. स्त्रियांचें प्राबल्य होते. स्त्रिया या खरोखरी 'गृहिणी' होत्या. गृहिणी म्हणजे स्वतः **'गृहधनिणी'** किंवा गृह चालविणाऱ्या होत्या. खुद्द 'स्त्री' शब्दच या गृहिणी पदाचा सूचक आहे. गृहधन्याची बायको ती गृहधनीण अशा आजच्या अर्थानें त्या केवळ नाममात्र किंवा नामधारी गृहधनिणी नव्हत्या. कै. वि. का. राजवाडे यांनीं आपल्या 'संस्कृत भाषेचा उलगडा' या ग्रंथांत स्त्रीशब्दाची पूर्वपीठिका संशोधिली आहे. हा शब्द 'स्त्यै संघातीकरणे' या धातूपासून व्युत्पादिलेला असून त्याचा अर्थ 'घर करून राहणारी' असा आहे. वैदिक समाज अथ पूर्वी ५००० वर्षांचा जुना मानल्यास स्त्री हा शब्द 'गृह करून

राहणारी' या अर्थी तत्पूर्वी आणखी ५००० वर्षांपूर्वीचा असला पाहिजे असें स्त्री शब्दाच्या या पूर्वपीठिकेवरून कै. राजवाडे यांनीं अनुमान केलें आहे. वैदिक समाज दहा हजार वर्षांचा मानल्यास

**'स्त्रिया' या १५००० वर्षांपूर्वी 'गृहधनिणी'**

होत्या असें मानावयास हरकत नाहीं. 'पति' आणि 'स्त्री' या व्यक्ति भिन्न भिन्न आहेत. 'पति' म्हणजे 'गृह करून राहणारा पुरुष'. 'स्त्री' ही 'घर करून राहणारी स्त्री.' जंपती, जायापति, दंपति असा 'स्त्रीपति' असा सामासिक शब्द आढळत नाहीं. संस्कृत भाषेंत असे भिन्नव्यक्तिदर्शक शब्द आढळून येतात. सारांश, तत्कालीन मातृसत्तादर्शक व मातृकुलपरंपरादर्शक 'मामतेय' हें नांव असावें. 'मामतेय' या नांवांत हा इतका इतिहास सांठविलेला आहे. या कालीं स्त्रियांना अत्यंत स्वातंत्र्य होतें हें सांगावयास नकोच हें या दीर्घतमा–प्रद्वेषी या कथेवरूनहि आपल्यास आढळून येणारें आहे. प्रद्वेषी हें दीर्घतमा या ऋषींच्या बायकोचें नांव ? प्रद्वेषी हें नांव कोणी ठेवलें ? आईबाप असें नांव जन्मतः ठेवतील ? पती ठेवील ? ठेवणार नाहीं. अर्थात् हें नांव मागाहून पडलें असलें पाहिजे किंवा ग्रंथकर्त्यानें गुणदोषदर्शक म्हणून दिलें असावें. प्रद्वेषी ही पुरुषसमाजाचा किंवा पुरुषाचा द्वेष करी किंवा फक्त नवऱ्याचाच करी ? निदान नवऱ्याचा तरी करी असा अभिप्राय. नवरा अंधळा. त्यांतून या जोडप्याला मुलेंहि बरीच झालेली. त्या सर्व अवजड कुटुंबाच्या पोषणाचा भार सर्वस्वी तिजवर पडलेला ! जात्या द्वाड आणि त्यांतून कुटुंबपोषणाचा भार तिजवरच केवळ पडलेला. व त्यामुळें त्रासलेली ! साक्रेटिसाची बायको झांटिपी हिनें साक्रेटिसावर ऊन पाण्याचा हंडाच केवळ ओतला ! तुकारामावर व तुकारामाच्या देवावर नुसतीच शिव्यांची लाखोली जिजाबाईनें वाहिली ! पण झांटिपी किंवा जिजाबाईसारखी ही नव्हती. प्रद्वेषीनें **नवऱ्याला ठार मारण्याचाहि प्रयत्न केला !** नवऱ्याला सोडून जाण्याचा तिनें प्रथम प्रयत्न केला, तो फसला ! नवरा जिवंत असतांनाच–'मृते भर्तरि' नव्हे,-तिनें या दीर्घतमा ऋषीस सोडून देऊन 'पुनर्विवाह' करण्याचा विचार केला होता ! पण बातमी फुटली ! दीर्घतमा ऋषीनें या गोष्टीचा नुसता इन्कारच केला असें नव्हे; तर कोणत्याहि स्त्रीनें नवरा जिवंत असो असतांना वा पश्चात् असो दुसरा नवरा करतां कामा नये असा सर्वसामान्य नियम करून टाकला.

**एक एव पतिर्नार्याः यावज्जीवपरायणम् ।**
**मृते जीवति वा तस्मिन् नापरं प्राप्नुयात् नरम् ॥** म. भा. अ. १०४

असा हा निषेधात्मक सार्वत्रिक दंडक या ऋषीला कसा घालतां आला हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. त्याचा पुढें विचार करूं. त्याच्या या निषेधामुळें प्रद्वेषी कदाचित् अधिकच चवताळली असेल व त्यामुळें तिनें त्याला मारण्याचे अनेक प्रयत्न केले असतील ! कसेंहि असो. तिनें कांहीं **दासांच्या मदतीनें** मामतेयाला दोरीनें बांधून नदींत उलटा टाकला ! ( ऋ. १-१५८-५ ) अशाकरितां कीं त्याला अगतिक मरण यावें. परंतु तो मेला नाहीं. तो जिवंतपणीं सुटला व उलट त्या दासाचें मात्र डोकें उडालें ! दुसऱ्या एका प्रसंगीं तो नदींतून वाहून गेला व एका राजानें त्याला बाहेर काढलें त्याजपासून पुढें राजपत्नीला अंगवंगकलिंग या पुत्रांची प्राप्ति झाली व त्या पुत्रांस पुढें अंग, वंग, कलिंग या देशांची प्राप्ति झाली अशी महाभारती कथा आहे. असो ऋग्वेदी कथेंत

**प्रद्वेषीनें दासांची मदत**

घेतली असें दर्शविलें आहे. हा काय चमत्कार आहे ? प्रद्वेषी ही दास समाजांतील होती कीं दुष्ट हृदय होती ? किंवा आनंदीबाईनें जशी गारद्यांची मदत घेतली तशी प्रद्वेषीनें या आर्येतर दासांची मदत घेतली ? दास हा शब्द जातिवाचक आहे किंवा संस्कृतिदर्शक आहे किंवा दुर्गुणदर्शक आहे ! असे अनेक प्रश्न येथें उत्पन्न होतात. महाभारती कथा ऋग्वेदांतील कथेची पुनरुक्ति मानली तर प्रद्वेषीजवळ **दास नोकर** होते किंवा आनंदीबाईप्रमाणें तिनें दासांची मदत घेतली होती असें कोणाला वाटेल.–

पण ऋग्वेदीय नावें गुणदोषदर्शक आहेत असें मानावें लागतें. त्याअर्थी प्रद्वेषीप्रमाणेंच तिचे साथीदार दास हे दुष्टहृदयी होते. दास वर्णाचे नव्हते असें मानणें भाग आहे. दास म्हणजे शत्रु तसेच दास म्हणजे दुष्टहृदयी लोक असा अर्थ केला पाहिजे. तो जाति अगर वर्णदर्शक शब्द नाहीं. आर्य व दास हे शब्द सहसा ऋग्वेदांत वर्णदर्शक नाहींत असें ज्ञानकोशकारांनीं ऋग्वेदांतील या शब्दांचीं सर्व अवतरणें घेऊन दर्शविलें आहे तेंच मान्य केलें पाहिजे. 'दास' हा शब्द फार प्राचीन असून त्याचा मूलगृहाशीं किंवा मूलगृहापासून संबंध येतो. दास हे हिंदुस्थानांतील मूळचे लोक ही कल्पना तर सर्वस्वीं चुकीची ! दही किंवा दर्सी नामक देशावरून ते कधीं काळीं एका देशाचे असूं शकतील. परंतु देव, असुर इत्यादि शब्दांचें जसें मूळचें स्वरूप व अर्थ बदलून गेले तसेच दास शब्दाचेहि मूळचे अर्थ बदलून गेले. **दास म्हणजे शत्रू, अधार्मिक, अयाजक, दुष्ट हृदयाचे, प्रजापीडक लोक, असा ऋग्वेदांत व पुराणांतून अर्थ आहे.** याच अर्थानें दुर्योधनास हा शब्द भारतांत लावलेला आहे ( उद्योगपर्व ). भागवतांत, अज्ञांना वेदाचा अर्थ समजावून देण्याकरितां भारत लिहिलें गेलें असें म्हटलें आहे. तें खरें मानल्यास 'दास' या शब्दाचा 'प्रजापीडक' असा अर्थ परंपरागत आहे असें मानावें लागतें. तोच अर्थ येथें घेतला पाहिजे. जशी प्रद्वेषी तसेच किंवा तिच्याहूनहि अधिक दुष्ट असे हे तिचे नोकर अथवा दास लोक. त्यांची तिनें मदत घेऊन हा प्रयत्न केला ! प्रद्वेषी अगर ममता दोघीहि 'दास वर्णाच' नव्हते. प्रद्वेषी दास वर्णाची मानण्यास कांहींच साधन नाहीं. ती दासहृदया होती हें तिचें वर्तनच घोषणेनें सांगत आहे. दास वर्णाच्या किंवा 'दही' स्थानीय स्त्रिया आर्य लोक करीत होते किंवा दास वर्णाचे शत्रुस्थानीय लोक अत्यंत प्राचीन काळीं ते नोकर ठेवीत होते या दोनहि गोष्टीस आधार नाहीं. उलटपक्षीं असें मात्र म्हणतां येईल कीं कांहीं कारणानें

**स्त्रिया या 'पतिघ्नी'**

होऊं लागल्या होत्या व त्याचा बंदोबस्त करण्याची वेळ येऊन ठेपली होती. वर जो निषेधात्मक नियम सांगितला हा त्या बंदोबस्तापैकींच एक भाग होता. त्या काळीं स्त्रियांच्या स्वैर वर्तनाचीं विलक्षण उदाहरणें आपल्या समाजांत व इतरत्रहि दिसून येऊं लागलीं होतीं. पण अशा स्वैर वर्तनास आळा घालण्याची ताकद व तयारी या आर्य समाजानेंच प्रथम दाखविली. दीर्घतमा ऋषी हा कांहीं कोणी राजकारणी व राजसत्ताधारक मनुष्य नव्हता. परंतु समाजांत दिसून येणाऱ्या आततायी वर्तनाचा सर्वसाधारण निषेध या ऋषिवाणांनें निघून तो समाजांत सर्वमान्य होण्याचा काल आला होता. असा या गोष्टींचा अर्थ करतां येण्यासारखा आहे. दीर्घतमा फार फार तर आपल्या एकट्या स्त्रीचा निषेध किंवा बंदोबस्त करूं पाहील. पण समाजांत विचारसंक्रमण झालेलें नसेल व शक्ति नसेल तर तो कोणताच बंदोबस्त करूं शकणार नाहीं. दीर्घतमा ऋषीचा निषेध प्रभावी होण्यास

**दीर्घतमा ऋषीच्या अर्थात् पुरुषसमाजाच्या हातीं सत्ता**

येण्याचा तो संक्रमण काळ होता असें मानण्यावाचून गत्यंतर नाहीं. दीर्घतमा ऋषीचें दुहेरी नांव देखील या संक्रमणकाळाचा एक दुवा किंवा पुरावाच म्हणण्यास हरकत नाहीं. दीर्घतमा ऋषीच्या प्राचीन काळासंबंधानें अनुमान काढण्यास आणखी एक सबळ प्रमाण असें आहे कीं, हा ऋषी स्वस्त्रीशीं

**दिवसा सर्व लोकांसमक्ष निःशंकपणें 'गोरति'युद्ध**

करी. हें गोरतियुद्ध तो कामधेनूपासून शिकला असें म्हटलें आहे. तो अंधळा असल्यामुळें त्यानें हें गोरतियुद्ध देखील डोळ्यानें पाहणें किंवा कामधेनूपासून प्रत्यक्ष शिकणें शक्यच नव्हतें. तो अंधळा असल्यामुळें त्याला रात्र आणि दिवस आणि एकांत किंवा 'लोकांत' यांत फारसा फरक वाटत नसेल. पण समोंवतालचे ऋषींस त्याची ही पद्धति अमान्यच होती. यावरून देखील

या पूर्वीचा काल अत्यंत रानटी असून हा संक्रमणकाळ सुरु

होता हीच गोष्ट निश्चित होते. तत्पूर्वीचा समाज अगदींच रानटी असला पाहिजे. गोरतियुद्ध म्हणजे 'गावःस्थिति'. गावःस्थिति म्हणजे पशूप्रमाणें वैवाहिक बंधन नसलेली स्थिति. यावरून इतकेंच घ्यावयाचें कीं त्यावेळीं स्त्रीपुरुषामध्यें विवाहाचें बंधन असें नसून नीतिअनीतीच्या कल्पना किंवा लाजलज्जाहि फारशी उत्पन्न झालेली नव्हती. संक्रमणावस्था मात्र सुरु होत होती. पुरूरवस् व उर्वशी यांच्या विवाह-संबंधांत उर्वशी 'रतिप्रसंगाशिवाय तूं नग्न दिसतां कामा नये, दिसल्यास मी तत्काळ चालती होईन' असा करार करते. यावरून गंधर्वाप्सरस् समाजांत लाजलज्जेची कल्पना आर्यांपेक्षां वाढली होती असेंच म्हणावें लागतें. तसेंच या करारावरून स्त्रियांचा वरचष्माहि दिसून येतो. याच शर्तीप्रमाणें ती अखेर पुरूरव्यास सोडूनहि गेली.' दीर्घतमाऋषिकालीं बंधन असें स्त्रियांवर हें प्रथमच सुरु झालें. स्त्रीसत्ताक समाजांतून पुरुषसत्ताक समाज नुकताच उत्पन्न होऊं लागला होता. यावरून असें म्हणतां येईल कीं

दीर्घतमा हें नांव तत्पूर्वीच्या Dark Ages तमोयुगाचें दर्शक

आहे. 'तो दहाव्या युगांत म्हातारा झाला' ही गोष्ट देखील पूर्वीच्या तमोयुगाची विलक्षण मर्यादा दर्शविते. त्या Dark Ages चें स्वरूप आतापर्यंत आलें आहे तें संकलित रीतीनें असें मांडतां येईल:–

(१) स्त्रीसत्ताकसमाज मालमिळकत स्त्रियांची. वारसा स्त्रियांमार्फत. स्त्री हा शब्द सार्थ, चालता बोलता. आजच्या ब्रह्मी (ब्रह्मदेशीय) समाजाप्रमाणें किंवा त्याहून अधिकच.

(२) घराण्यांचीं नांवें स्त्रियांवरून म्हणजे मातेवरून चालत.

(३) स्त्रियांना पति अनेक असूं शकत. शिवाय कोणत्याहि वेळीं एक पति सोडून दुसरा करतां येत असे. मैथुनसंबंध जनांत दिवसा पशूप्रमाणें किंवा बंधनविरहित असा असे. यास गोरति युद्ध किंवा 'गावःस्थिति' असें पौराणिक संबोधितात.

(४) स्त्रीस्वातंत्र्य सडकून. स्त्रिया पुरुषांचा द्वेषहि करीत. 'पतिघ्नी' देखील होत.

(५) दास म्हणजे कृष्ण वर्णाचे येथील मूळ लोक नसून कृष्ण हृदयाचे दुष्ट राक्षसी लोक. त्या वेळीं असे बरेच लोक होते व केव्हांहि असणार. अशा स्थितींत दीर्घतमाऋषिमुखानें खालील

एक एव पतिर्नार्याः यावज्जीवपरायणम् ।
मृते जीवति वा तस्मिन् नापरं प्राप्नुयान्नरम् ॥

असा निर्बंध घातला गेला. हा निर्बंध स्त्रियांचा पुनर्विवाह बंद करण्यापेक्षां त्या पुनर्विवाहाच्या अनावर स्वातंत्र्याचा परिणाम जो पतिहत्या किंवा पुरुषहत्या ती बंद करण्याचा असला पाहिजे. या काळीं स्त्रियांकडून पुरुषहत्येचे अनेक प्रकार घडत असत हें पुढें दिसून येणारच आहे. पुनर्विवाह कायमचा व सर्वस्वीं सर्व समाजांत बंद असा केव्हांच होऊं शकला नाहीं. कदाचित् 'मृते जीवति वा' या अतीव निर्बंधाच्या उलट प्रतिक्रिया ही सुरु झाली असावी व अखेर त्या बाबतींत 'सुवर्णमध्य' असा कांहीं तरी उत्पन्न होऊन 'मृते पत्यौ' पुनर्विवाह करण्यास मोकळीक मिळाली असावी. पुनर्विवाहापेक्षां

एक एव पतिर्नार्याः ( वैवाहिक बंधन )

असा निर्बंध प्रथम सुरू झाला असावा. हा निर्बंध देखील त्या युगीं फार जड वाटला असला पाहिजे. तथापि हिंदी आर्यांनीं अत्यंत निश्चयानें आणि निर्धारानें ही सुधारणा घडवून आणली. वेदकालपूर्व ही गोष्ट घडून आलेली होती. कारण

वेदकालीं एक एव पतिर्नार्याः

अशीच स्थिति भारतीय आर्यांत दिसून येते असें युरोपीय देखील कबूल करतात. पतिमरणानंतर स्त्री सरणावर चढते आणि अखेर, आजच्या समावर्तनप्रसंगीं काशीला जाण्यास निघालेल्या बटूप्रमाणें,

पतीचा भाऊ अगर दुसरा कोणी तिला सरणावरून उठवितो असें ऋ. १०. १८. ८ या सूक्तांत दिसून येते. **उदीर्ष्व नारि अभिजीवलोकं गतासुमेतमुपशेष एहि** ॥ हे स्त्रिये ऊठ. मेलेल्या पतीच्या समीप शयन केलं आहेस. हा जीवलोक पाहून इकडे ये.

हस्तग्राहस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभिसंबभूय ॥ (करग्रहण इच्छिणाऱ्या या पतीच्या भार्यात्वाप्रत तयार हो). **वेदपूर्व दीर्घतमःकालचें स्वातंत्र्य आणि वेदोत्तरकालीं सती जाण्याची ही तयारी** यांत खरोखरीच दोन ध्रुवटोंकाइतकें अंतर दिसून येतें. इतकी सुधारणा होण्यास पुष्कळच मोठा काळ लागला असला पाहिजे. किंबहुना समाजांतील सर्व थरांतून ही अतीव सुधारणा घडून येणें शक्य नव्हतें व झाली ही नाहीं. पुढारलेल्या समाजानें निर्धारानें ही सुधारणा घडवून आणली व बाकीचा एकेक समाज त्याचें अनुकरण करूं लागला. तथापि एकंदर समाजांत स्त्रियांच्या वृत्तींत अत्यंत फरक पडला. आज आपल्याला पूर्वी एकाकाळीं स्त्रियांना इतकें स्वातंत्र्य असेल अशी कल्पनाहि होत नाहीं. कारण 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' अशाच काळांत आपण वाढलेलों आहों. असो. स्त्रियांच्या पारतंत्र्याचा परीघ कसकसा वाढत गेला हें आपल्यास पहावयाचें आहे. त्याकरितां महाभारतांतील, या गोरतियुद्ध पशुसमान दीर्घतमःकालांतील ( Dark ages) दुसरी गोष्ट जी

## श्वेतकेतु उद्दालकाची

त्या कथेकडे आतां आपण वळूं. श्वेतकेतु उद्दालक हा स्त्रियांच्या व्यभिचाराला किंवा 'गावःस्थिती'ला आळा घालणारा म्हणून प्रसिद्ध आहे. त्याची कथा महाभारतांत आदिपर्व अ. १२२ यांत दिलेली आहे. या श्वेतकेतु उद्दालकाला 'अवर' किंवा अलीकडचा ऋषि असें म्हटलें आहे व त्यावरून तो अलीकडचा म्हणजे पंडूत्तर असें कोणी समजतात. पण स्त्रीस्वातंत्र्याला आळा घालणारा हा ऋषि पांडवानंतरचा श्वेतकेतु उद्दालक असूं शकणार नाहीं. बहुधा श्वेतकेतु उद्दालक या नांवाचे जनमेजयाप्रमाणें दोन किंवा अधिकहि ऋषि असावेत. हा ऋषि दीर्घतमा ऋषींच्या मानानें 'अवर' होय. पंडूत्तर कालच्या ऋषीचा दाखला पंडूच्याच तोंडांत घालण्याइतका सौति मूर्ख नसावा. असो. पंडू कुंतीस म्हणतो:

**अनावृताः किल स्त्रिया पुरा आसन् वरानने ।**
**प्रमाणदृष्टो धर्मोऽयं कुरुष्वद्यापि पूज्यते** ॥ महाभारत आदिपर्व १२२

स्त्रिया पूर्वकालीं अगदींच 'अनावृत' म्हणजे स्वतंत्र व मोकळ्या होत्या. पतींच्या बाबतींत त्यांस कोणताच निर्बंध असा नव्हता. श्वेतकेतूची गोष्ट ऐका:

**श्वेतकेतोः किल पुरा समक्षं मातरं पितुः ॥**
**जग्राह ब्राह्मणः पाणौ 'गच्छाव' इति चाब्रवीत्** ॥ किंवा

त्याच्या आईचा हात, त्याच्या बापासमक्ष, एका पुरुषानें धरला व 'चल, आपण जाऊं या' असें म्हणूं लागला. श्वेतकेतूला या गोष्टीचा फार राग आला. पण बापाला त्या गोष्टीचें कांहीं वाटलें नाहीं ! दोन पिढ्यांमध्यें विचारक्रांति फारच झाली होती असें दिसतें. श्वेतकेतूच्या बापानें श्वेतकेतूची ही स्थिति पाहून तो त्यास म्हणाला:—

**यथा गावः स्थितिस्तात स्वे स्वे वर्णे तथा स्त्रियः** ॥ किंवा

बाबा, प्रत्येक वर्णांत स्त्रियांची स्थिति अशीच आहे. त्या अनावृत, कामचारविहारिणी व स्वतंत्र आहेत. पशूंमध्यें ज्याप्रमाणें मादी कोणत्याहि विशिष्ट नराला बिलगून नसते त्याप्रमाणें स्त्रिया या कोणत्याहि पुरुषास बांधलेल्या नाहींत !! बैलांना जशी मायबहीण नाहीं तशीच बायांनाहि बापलेक नाहीं. मग इतरांची काय कथा ? श्वेतकेतूला बापाचा हा शांतपणा पटला नाहीं. त्यानें नवीनच दंडक सुरू केला:—

तदाप्रभृति मर्यादा स्थितेयमिति नः श्रुतम्।
व्युच्चरन्त्याः पतिं नार्या अद्यप्रभृति पातकम्॥
भार्यां तथा व्युच्चरतः कौमारब्रह्मचारिणीम्।
पतिव्रतामेतदेव भविता पातकं भुवि॥

किंवा (१२२–२८ भारत उपसंहार पा. २०४).

यापुढें स्त्रीनें नवऱ्याला किंवा पतिव्रता स्त्रीला नवऱ्यानें टाकतां कामा नये. टाकल्यास पातक लागेल. हा निर्बंध दुहेरी आहे. यावरूनच तो दीर्घतमा ऋषीच्या एकतर्फी निर्बंधानंतर पुष्कळ वर्षांनीं घातला गेला असला पाहिजे हें उघड आहे. दीर्घतमा पुनर्विवाह करावयाचा नाहीं असें म्हणतो तर श्वेतकेतू नवऱ्याला सोडावयाचें नाहीं म्हणतो. श्वेतकेतूचा नियम व्यवहारतः तरी Divorce घटस्फोटाविरुद्ध दिसतो आणि दीर्घतमा ऋषीचा त्या पुढील Remarriage पुनर्विवाहाविरुद्ध दिसतो. Divorce च बंद म्हटलें म्हणजे नवऱ्याचे हयातींत पुनर्विवाहाचा प्रश्न उरत नाहीं. तथापि 'यथा गावः' ही उपमा दीर्घतमाकालीन, 'गोरतिमुद्रा'ची आठवण करून देते. दोहींमध्यें स्त्रीस्वातंत्र्याला 'कामाचारविहारा'ला किंवा 'यथागावः' या पद्धतीला आळा घातला जावा असाच मुख्यतः उद्देश आहे. समाजांत स्त्रियांचें वर्तनासंबंधानें किंवा त्यांचे निमित्तानें होणाऱ्या पतिघात,[1] मातृघात[1], पुत्रघात[1] वगैरेमुळें संताप व तिटकारा (Revulsion of feeling) उत्पन्न होऊन त्यांचा बंदोबस्त करण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली होती; व ती श्वेतकेतू उद्दालकाच्या मुखानें बाहेर पडली इतकेंच. राजसत्ता हातीं नसलेला एकटा श्वेतकेतू असा निर्बंध कसा घालूं शकणार ? व तो कोण मानणार ? परंतु समाजाच्याच मनांत आल्यावर कांहीं तरी बंदोबस्त झालाच पाहिजे. पुरुषसत्ता प्रस्थापित होऊं लागली होती व त्या सत्तेचा उपयोग होण्याचा काल आला होता. तथापि दुहेरी निर्बंध घालण्यांत समाजांत पुरुषाविरुद्धहि प्रतिक्रिया सुरु झाली होती हें स्पष्ट दिसून येतें. वर सांगितल्याप्रमाणें वैदिक कालाच्या अव्वल भागांतहि इतक्या अनावर –पशूंचें अनुकरण करणाऱ्या– स्त्रिया दिसत नाहींत. उलट त्या पतीची मार्गप्रतीक्षा करणाऱ्या **जायेव पत्युरुशती सुवासाः** पतीची उत्सुकतेनें वाट पाहणाऱ्या अशा दिसतात. अर्थात् हे दोनहि निर्बंध वेदपूर्वकालीनच असले पाहिजेत. सुवासिनी ( सुवासाः ) हा शब्द इतका प्राचीन आहे हें पाहून आश्चर्य वाटतें. पतिनिधनानंतर स्त्रियांचा पोशाख भिन्न होता असें यावरून स्पष्ट दिसतें. स्त्रियांची स्वैरवृत्ति चालू राहती तर ' जायेव पत्युरुशती सुवासाः' अशी स्त्रियांची शिफारस वारंवार येतीना ! व हें उपमान होऊन बसतेना ! ऋक्प्राक्कालीन असे स्त्रियांसंबंधानें उल्लेख वेदांत फारच क्वचित् दिसून येतात. आणि त्यांतून ऋक्कालीं स्त्रियांचा नैतिक अधःपात क्वचितच दिसतो. अर्थात् वरील दोनहि उदाहरणें ऋक्प्राक्कालीनच म्हटलीं पाहिजेत. वरील श्वेतकेतूच्या बापाच्या धंड उद्गारांत

**'कुरुषु अद्यापि पूज्यते।'**

असें एक वाक्य आहे. हा कुरुदेश म्हणजे इंद्रप्रस्थ खास नव्हे. तो उत्तर कुरुदेश आहे. उत्तर कुरुदेश तरी कोणता ? ध्रुवसिद्धांत खरा मानल्यास उत्तर कुरु म्हणजे ध्रुवप्रदेश असें वाटण्याचा संभव आहे. पण ध्रुवप्रदेशांत जाणें भारतकालीं देखील अशक्य होतें. महाप्रास्थानिक किंवा स्वर्गारोहण पर्वांत पांडव उत्तर कुरूकडे गेल्याचें वर्णन आहे. परंतु सभा पर्वांतील अश्वमेधप्रसंगीं उत्तर कुरूंत जाणें शक्य नव्हतें असेंहि वर्णन आहे. एथें तर 'अद्यापि' असें पंडूचे तोंडीं घातलें आहे. उलटपक्षीं हिमालयांत स्त्रियांना अनेक पति आज देखील करतां येतात असें दिसून येतें. ब्रह्मदेशांत स्त्रियांना आज देखील बहुत स्वातंत्र्य आहे. अर्थात् पंडूचा उल्लेख या हिमालयांतील म्हणजे पामीरकडील लोकांविषयीं असावा. कदाचित् उत्तर ध्रुवाकडून आलेला देवसमाज या पामीरखिंडींत प्रथम आला असावा. तेथेंच त्याची वसती बहुत

१ पुढें याविषयीं अधिक माहिती येणार आहे.

काल असावी व त्यांनीं प्रथम आल्याबरोबर उत्तरकुरु वगैरे ध्रुवप्रदेशी नांवें इकडील प्रांतास दिलेलीं असावींत. मानवाचें एक वर्ष तो देवांचा एक दिवस असें वर्णन वेदांत व अवेस्त्यांत दोहोंकडे आहे. तेव्हां देवसमाज मूळ उत्तर ध्रुवावर असावा व नंतर तो पामीरकडे येऊन त्यांनीं तेथील प्रदेशास उत्तर-कुरू वगैरे नावें दिलीं अशीच कल्पना केली पाहिजे. उलटपक्षीं कुरुच्या मागाहून 'उत्तरकुरू'कडे वसती झाली असावी असेंहि 'उत्तर' या शब्दावरून म्हणतां येण्यासारखें आहे. उत्तर म्हणजे उत्तरेकडील किंवा मागाहूनचें असे दोन अर्थ होऊं शकतील व त्या त्या अर्थाचे अभिमानी दोन अर्थ व दोन क्रिया दाखवूं शकतील. सारांश, या कुरुदेशाबद्दल थोडा संशय असला तरी बहुंशानें तरी उत्तरकुरू म्हणजे हिमालया-तील पामीरखिंडच असावी. कारण तेथील समाज बहुपतीक असा प्राचीन काळापासून आज तागायत आढळतो; शिवाय आर्तिकांतर्गत उत्तर कुरू त्याकाळीं प्रवेशनीय नव्हता असो. कदाचित् गंधर्वअप्सरसादि लोक त्यावेळीं हिमालयांतील उत्तरकुरूंत राहात असावे व त्या गंधर्वाप्सरसादि लोकांत स्त्रियांना स्वातंत्र्य व कामचारविहारत्व फार होतें ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. तेव्हां या लोकांचाहि एथें निर्देश असेल. उत्तरकुरूंत राहणाऱ्या देवांत स्त्रियांना स्वातंत्र्य किती होतें हें आपल्यास माहीत नाहीं. तथापि अप्सरांचा व देवांचा संबंध सुप्रसिद्धच आहे. शिवाय

## देव म्हणजे कोण ?

याचा विचार केल्यास देवांचे अनेक प्रकार दिसून येतात. देवांत स्वर्गीय, आंतरिक्ष, व भूमिगत किंवा पार्थिव असे तीन प्रकार प्रथमदर्शनींच दिसतात. पार्थिव देवांतहि अनेक प्रकार आहेत. पूर्वदेव, शिश्न-देव, मूरदेव, शूरदेव, वरेण्यदेव, साध्य, ऋभू वगैरे मानवांचेच मागाहून बनलेले देव असे अनेक प्रकार दिसतात. देव म्हणजे केवळ स्वर्गीय व दिव्य लोक असा अर्थ अर्थात् सर्वत्र नाहीं. देव हा शब्द लोकदर्शक किंवा संस्कृतिदर्शक असा दोन प्रकारचा आहे. जे नक्षत्रासारखे तेजस्वी ते देव. तसेच जे संस्कृत ते देव म्हणजे **मूळ प्राकृत** किंवा **असंस्कृत** असा **असुरसमाज**; त्यानंतर कांहीं विशिष्ट ध्येय वा धोरण मानून त्याप्रमाणें आचरण करून दाखविणारे जे ते **संस्कृत** लोक किंवा तो **संस्कृत** किंवा **देव**समाज असें म्हणतां येईल. ' पूर्वदेव ' असें ज्यांस वैदिक म्हणतात ते पूर्वीचे ( पूर्वकालीन ) किंवा पूर्वेचे ( स्थलवाचक देव असावे. ) पूर्वकालीन देव व उत्तरकालीन देव असे समाजांत दोन भाग झाले. **वास्तविक नवीन सुधा[illegible]प्रवण लोकांनीं आपल्यास 'देव' हें नांव धारण केलें. त्यापूर्वी ते देव नव्हतेच.** त्यापूर्वी सर्व समाज 'आसुर' हेंच नांव धारण करून होता. त्यांत 'देवसमाज' म्हणून स्वतःस म्हणवून घेणारा संस्कृत समाज उत्पन्न झाल्यावर पूर्वीच्या आसुर समाजाला 'पूर्वदेव' असें नांव दोन अर्थांनीं पडलें. (१) कालदृष्ट्या देवांच्या पूर्वीचे (२) हलक्या दर्जाचे लोक म्हणून. उलटपक्षीं हे पूर्वदेव आपल्यास जुने व श्रेष्ठ समजून देवांना कनिष्ठ व हलके असें म्हणूं लागले. सुधारक, मवाळ, कट्टर वगैरे शब्दांचे भिन्नभिन्न अर्थ झालेले आपण आजहि पहातों. तीच स्थिति पूर्वी असुर व देव, पूर्वदेव व देव वगैरे शब्दांची झाली. **'मूर'** देव किंवा **'मूल'** देव म्हणजे पूर्व देवच. पण उर्वशी, पुरूरव्याला, 'मूरदेव' 'हलकट' अशा अर्थानें तो शब्द एखाद्या शिवीसारखा उपयोजिते. शिश्नदेव या शब्दाचाहि अर्थ असा शिवीसारखाच होतो. शिश्न म्हणजे लिंग. तत्पूजक ते शिश्नदेव असा अर्थ नसून शिश्न हा '**भोगवाचक**' शब्द आहे. **'शिश्नदेव' म्हणजे 'देहभोगी' लोक असा अर्थ यजन किंवा देवप्रेमी लोकांनीं करून** तो शिवीसारखा किंवा हीनस्थितिदर्शक असा वापरला. सारांश, संस्कृत किंवा Civilised असें म्हणविणाऱ्या लोकांनीं प्राकृत किंवा मूळ किंवा प्रतिगामी (orthodox किंवा uncivilised) लोकांना मूरदेव, शिश्नदेव वगैरे शब्दांनीं संबोधलें व त्यांनीं ( प्रतिगामी लोकांनीं ) स्वतःस असुर किंवा बलिष्ठ, पूर्वदेव किंवा देवपूर्व, अशीं नावें धारण केलीं. असुर हे ज्येष्ठ आणि देव हे कनिष्ठ असाहि अर्थ साह-

जिकच निघतो. व तो उपनिषदांत स्पष्टपणें सांगितलाहि आहे. आसुर समाज ( Persian म्हणा ) हा बहुधा एके काळीं हिंदी आर्यांच्या पूर्व दिशेस रहात असावा. मूळ शकस्थान पूर्वेस असावें असेंच उल्लेख आमच्या पुराणांतून आढळतात.[१] शरयू नदीतीरीं ( हरयू-पर्शियन ) किंवा सरस्वतीनदीतीरीं ( हरह्वती-पर्शियन ) किंवा कीकट देशांत हे हिंदुस्थानांत रहात असत त्या वेळीं हिंदी आर्य त्यांच्या पश्चिमेसच सप्तसिंधूंत रहात असावे. पर्शियन आर्यहि पुढें सप्तसिंधूंत व नंतर पर्शियांत राहण्यास गेले असें वेंदिदाद ग्रंथांत म्हटलें आहे. हे पर्शियन आर्य हेच पूर्वदेव किंवा मूरदेव किंवा प्राकृत, uncivilised किंवा orthodox लोक. यांच्यांत आर्यांच्या जुन्या चालीरीति फार काळपर्यंत आढळून येतात. त्यांच्यांत श्वेतकेतूनें वर्णन केलेली स्त्रियांची पशुसमानस्थिति फार काळपर्यंत आढळून येते. उत्तरकुरूंत हे पर्शियन लोकहि राहत असतीलच. तथापि भारतकालीं तेथें पर्शियन् आसुर राहत असतील असें म्हणवत नाहीं. तथापि पर्शियन आसुरांसारखे रानटी समाज तेथें त्या काळीं व आजहि राहतात ही गोष्ट सिद्ध असल्यानें 'कुरुष्वद्यापि दृश्यते' हें पंडुवचन अगदीं सार्थ आहे यांत शंका नाहीं ! उत्तरकुरु म्हणजे ध्रुवप्रदेश असा अर्थ मात्र भारतकालींच्या श्लोकांत धरतां येत नाहीं. कारण तो प्रदेश त्या कालीं आजच्या इतकाच 'अगम्य' होता. 'ध्रुवप्रदेश' असा अर्थ मानावयाचाच तर कवीनें पौराणिक कथांना ( traditions ) आजचें रूपक दिलें असा ओढाताणीचा अर्थ करावा लागेल. असो. वेदपूर्व प्राक्कालीन स्त्रीसत्ताक व स्त्रीप्रमुख समाजांत दीर्घतमाप्रद्वेषी कथेंत आल्याप्रमाणें किंवा श्वेतकेतुउद्दालक कथेंत वर्णिलेल्या स्वैरवर्तिनी स्त्रिया होत्या. त्यांना आळा घालण्याचे वर दर्शविलेले दोन प्रयत्न झाले तसाच एक तिसरा प्रयत्न

**यमयमीसंवादांत ( ऋग्वेद १०-१० )**

दिसून येतो. त्या कथेकडे आतां आपण वळूं. यम व यमी हीं सख्खीं जुळीं भावंडें. तरी पण यमी ही यमास आपला दोघांचा विवाहित स्त्री-पुरुषाप्रमाणें शरीरसंबंध व्हावा म्हणून परोपरीनें व कळवळ्यानें विनवीत असून यम हा तिची विनंती तितक्याच निष्ठुरपणानें झिडकारीत आहे व हें पाहून यमी आश्चर्यचकित होत आहे आणि अखेर यमावर परस्त्रीप्रेमाचाहि आरोप करीत आहे ! यमयमी ही विवस्वान् सूर्याचीच संतति असें दर्शविलें आहे खरें. तथापि ख्रिस्तीधर्मांतर्गत आदम व ईव् ( आदिमनु किंवा आदिम व इडा ) यांच्याप्रमाणें जगांत त्या संवादाच्या कालीं एकच स्त्रीपुरुषाचें जोडपें होतें असें दिसत नाहीं ! दुसरे पुरुष व दुसऱ्या स्त्रिया त्या वेळीं होत्या एवढेंच नव्हे तर दुसरे समाजहि अस्तित्वांत होते. अर्थात् मनुष्यांतला पहिला मर्त्य मनुष्य व पितृलोकांतला राजा असें वर्णन असलेला जो तो हा यम असें कसें म्हणतां येईल ? वेदपूर्वकालीन अर्थात् अत्यंत प्राचीन चित्र रेखाटण्याच्या दृष्टीनें यम-यमी हीं कल्पित नावें सूत्रकर्त्यानें घेतलीं असें म्हणणें भाग पडतें. यम-यमी संवाद अशा प्राक्कालांतील आहे कीं, ज्या काळीं आर्यांत

**पूर्वी चालू असलेले सख्ख्या बहिणभावंडांतील विवाह निषिद्ध**

ठरविले गेले ! यमी ही स्त्री. स्त्रिया प्रायः जुन्या समजुतींना चिकटून राहणाऱ्या, पुराणमताभिमानी व भावनात्मक असतात. असेंच चित्र कवीनें येथें रंगविलें आहे. यम हा विचारी, सुधारणानुकूल, इष्ट सुधारणा निश्चयानें घडवून आणणारा निग्रही पुरुष असा रंगविला आहे. या संवादांतील या दृष्टीनें मुख्य असा भाग येथें उतरून घेतों.

---

१ असीरिया किंवा वस्तुतः असूरिया किंवा आसुरीय देश हा देखील सीरिया = सूरिया = सूरीय देशाच्या पूर्वेस आहे. या देशांतील लोक अनुक्रमें असुर व सुर असे आपल्यास म्हणवीत असल्यास असुर = पूर्व ( स्थलवाचक ) देव असाहि अर्थ होऊं शकेल. पण हे समाज निराळे होते असें तूर्त धरून चालूं.

यमः- आ घा ता गच्छानुत्तरा युगानि यत्र जामयः कृणवन्नजामि।
उप बर्बृहि वृषभाय बाहुमन्यमिच्छस्व सुभगे पतिं मत् ॥१०,१०.

अर्थः-जेव्हां भाऊ बहिणींशीं लग्न करीत नाहींत असा आतां पुढील काल (उत्तरा युगानि) येत आहे. म्हणून हे सुंदर स्त्रिये, माझ्याशिवाय दुसऱ्या मनुष्याची तूं इच्छा कर आणि त्याचा हात उशास घे.

यमः-न वा उते तन्वा तन्वं सं पपृच्यां पापमाहुर्यः स्वसारं निगच्छात् ॥
अन्येन मत्प्रमुदः कल्पयस्व न ते भ्राता सुभगे वष्ट्येतत् ॥ १०-१२

अर्थः-मी तुझ्या शरीराशीं संलग्न होणार नाहीं. जो बहिणीशीं संबंध करतो तो पापी होतो असें म्हणतात. हे सुंदर स्त्रिये, माझ्याशिवाय इतराशीं तूं आनंदाची कल्पना कर. तुझा भ्राता हें करूं इच्छित नाहीं.

यमीः-उशन्ति घा ते अमृतास एतदेकस्य चित्त्यजसं मर्त्यस्य।
नि ते मनो मनसि धाय्यस्मे जन्युः पतिस्तन्वमा विविश्याः ॥३॥

अर्थः-अमर असे जे देव तेहि एकाचा मर्त्याला त्याज्य वाटणारें हें कृत्य करतात. म्हणून तुझें मन माझ्या मनाशीं जुळो. उत्पन्नकर्त्या प्रजापतीप्रमाणें तूं माझ्या शरीरांत प्रवेश कर.

यमः-न यत्पुरा चकमा कद्ध नूनमृता वदन्तो अनृतं रपेम ॥

अर्थः-जें पूर्वी झालें तें आम्ही करणार नाहीं. ऋत (सत्य) बोलणारे आम्ही अनृत (असत्य) कसें बोलूं ? (मराठी भाषांतर चित्रावांचें)

या संवादावरून असें दिसून येतें कीं **देवांच्या समाजांमध्यें असे बहीणभावंडांचे विवाह होत. तसे होत असले तरी देखील आर्य मानवांनीं ते निषिद्ध ठरविले !** 'न देवचरितं चरेत्'। असा पुढें दंडकच पडून गेला ! पण असें कां ? वास्तविक 'देव' सर्व तऱ्हेनें पूज्य व अमर, आणि त्यांच्यासारखें आपण बनावें (देवच व्हावें) अशी मानवांची महत्वाकांक्षा ! तरी पण या बाबतीत देवांपेक्षां आर्यांनीं भिन्न मार्ग पत्करला ! याचें कारण तितकेंच बलवत्तर असलें पाहिजे. किंवा असें कां म्हणूं नये कीं एरवीं 'अमर' **अशी कीर्ति असलेल्या देवांत** म्हणजे एका प्राक्कालीन समाजांत किंवा तत्पूर्व श्रेष्ठ अशा प्राकृत समाजांत हे बहिणभावंडांचे विवाह मान्य असले तरी त्याचे अनिष्ट परिणाम पाहून

**एतत्कालीन संस्कृत म्हणविणाऱ्या आर्यांनीं ते निषिद्ध ठरविले !**

ही विवाहसंबंधांत तिसरी सुधारणा हिंदी आर्यांनीं घडवून आणली व एकप्रकारें आपण देवांपेक्षांहि श्रेष्ठ आहोंत असें त्यांनीं मानलें. मात्र अशा या प्राक्कालीन आर्यांच्या दृष्टीनें आपण मर्त्य आहोंत असें मानलें. एक तर स्वर्गीय अमर देवांच्या अशा काहीं कथा तत्काळीं उपलब्ध असाव्या. किंवा रात्रि व दिन अशा रूपकात्मक युग्मांवरूनच त्यांनीं हें उदाहरण घेतलें असावें. अर्थात् रूपकात्मक गोष्टीचें कथानक प्रत्यक्ष व्यवहारांत ग्राह्य व नीति-कारण म्हणवत नाहीं. म्हणूनच 'न देवचरितं चरेत्' हा सिद्धांत. रात्रंदिनाचें युग्म हें अमर अशा सख्ख्या बहिणभावंडांसारखें आहे. पण त्यांत विवाह कधींच होऊं शकत नाहीं हें या रूपकाचे दृष्टीनें कमीपणाचें आहे. उलटपक्षीं अमर (म्हणजे पूर्वकालीन) समाज असा अर्थ घेतला तर असें म्हणतां येईल कीं, प्राक्कालीन समाजानें ही गोष्ट ग्राह्य मानली तरी अनिष्टपणा अनुभवास आल्यामुळें ती गोष्ट एतत्कालीन आम्ही आजचे (मर्त्य) लोक मानीत नाहीं. विकासदृष्टीनें मागील गोष्ट ही त्याज्य व नवीन गोष्ट अधिक ग्राह्य ठरते.

११६

संस्कृतीचा इतिहास या दृष्टीनें हा यमयमीसंवाद बहुमोल आहे. संस्कृतीच्या विश्वेतिहासांतील 'मैलांचे धोंडे' या दृष्टीनें या तिसऱ्या गोष्टीचें किंबहुना या तीनहि गोष्टींचें फारच महत्व आहे. पुराणें व वैदिक वाङ्मय यांत असे हे मैलधोंडे आढळून यावे ही खरोखरच सुदैवाची गोष्ट आहे. दुसऱ्या कोणत्या समाजांत असा हा प्राक्कालीन इतिहास सांठवलेला आहे ? असा हा गोष्टीरूप आणि मनोरंजक इतिहास राखून ठेवल्याबद्दल आपण ब्राह्मणांना जितके धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. त्यांनीं कालदर्शक इतिहास ठेवला असता तर ते स्तुतीस अधिकच पात्र झाले असते. पण इतिहासाचा उपयोग 'मागच्यास ठेंच व पुढचा शहाणा' हाच असेल तर कालदर्शी इतिहासापेक्षां अनुभवदर्शी

## सांस्कृतिक 'इति ह आस'

अधिक उपयोगाचा आहे. त्यांत इतिहासाचें सर्व मर्म व तत्व आढळून येतें. कालदर्शी असून अनुभवदर्शी असा सांस्कृतिक इतिहास यापेक्षां अधिक उपयुक्त ठरेल यांत शंका नाहीं. पण इतिहासाचा उपयोग खऱ्या इतिहासापेक्षां खोटा लिहिण्याकडे व खरा इतिहास लपविण्याकडे होत असतो आणि रूपकात्मक इतिहास निर्भय रीतीनें खरेंखुरें सत्य राखून ठेवतो व तो चिरस्थायी होऊं शकतो, हें पाहिलें म्हणजे रूपकात्मक इतिहासाचें महत्त्व समजून येतें. असो; महाभारतकारांना यमयमीकथानक उतरून घेण्याची इच्छा झाली नाहीं. यावरून आर्य समाजांत असल्या या विवाहाचा अवशेष त्यांस कोठेंच आढळून आला नाहीं व त्याची चिकित्सा करण्याचेंहि कारण त्यांस वाटलं नाहीं इतकाच अर्थ. असो.

यमयमीसंवाद असें दर्शवितो कीं आर्यांना आपण एक अपूर्व पण इष्ट अशी सुधारणा घडवून आणली अशाबद्दल अभिमान वाटत आहे. या सुधारणेच्या दृष्टीनें हा 'देवसमाज'— मग तो प्राक्कालीन पार्थिव माना किंवा स्वर्गीय माना—

## 'असंस्कृत' होता

असें मानलें पाहिजे. तो स्वर्गीय मानला तर त्यांना या अनिष्ट विवाहाचे वाईट परिणाम दिसून येणें शक्य नव्हतें व त्याला मग त्यांचें दृष्टीनें असंस्कृत म्हणण्याचें कारण नाहीं. परंतु पार्थिव समाजांना देवांसारख्या संस्कृत पण स्वर्गीय समाजांच्या चाली काय उपयोगी ? असें समजून मानवांना त्या टाकून दिल्या व इतर मानव समाजांपेक्षां ते आपल्यास संस्कृत मानूं लागले. बहिण-भावंडांचे विवाह आज पारशी समाजाशिवाय इतरत्र नाहींत अगर मान्य नाहींत असें समजून आहे. पण तें खरें नाहीं. आणि प्राक्कालीन समाजांत तर ही चाल पूर्वकालीं होती याबद्दलच अनेक ऐतिहासिक पुरावे आज मिळूंहि शकतात आज सरणा बहिण-भावंडांचे विवाह सुधारलेल्या समाजांतून इतके क्वचित् आहेत की हे विवाह कधीं काळीं आपल्यांत होते ही जाणीवहि त्यांस राहिली नाहीं उपरिनिर्दिष्ट देव व इतर समाज कोणते याविषयीं कौतुकास्पद शंका येणें साहजिक आहे म्हणून इतर देशांचे इतिहास पाहूं या. हा निषेध पुकारीपर्यंत देवांच्याच काय पण आर्य समाजांतहि ही चाल होती याबद्दल शंका नाहींच. हा निषेध पुकारून स्वतःस आर्य किंवा ब्राह्म म्हणणारा समाज हीं संस्कृतिदर्शक नांवें घेऊन तदतर्गत अभिमानानें आपल्यास इतरांपेक्षां श्रेष्ठ समजूं लागला यांत नवल नाहीं. आज पारशी किंवा आसुर समाजांतहि अशी विलक्षण चाल होती असें म्हटल्यास त्यांस राग येतो ! जगांत इतरत्र सुधारलेल्या म्हणविणाऱ्या कोणत्याहि समाजांस अशक्य वाटणाऱ्या मद्यमांसनिवृत्तीच्या चाली आर्यांपैकीं ब्राह्म समाजानें आज कित्येक सहस्र वर्षांपासून प्रत्यक्ष अवलंबून आपल्या अपूर्व व अत्युच्च संस्कृतीची साक्ष जगास पटविली आहे. पण जगांतल्याप्रमाणें एथेंहि असंस्कृत असा मोठा समाज बाहेर राहिल्यानें व परत्र समाजाशीं टक्कर देतांना किंवा अंतर्गत कलहानें हा समाज एकीकडे व अन्य पडून सर्व समाज पराजित झाल्यानें आज त्या श्रेष्ठ समाजाची केवळ अवहेलना होत आहे. तथापि असा भरवसा वाटतो कीं पाश्चिमात्य शास्त्रीय किंवा तत्ववेत्या लोकांना हिंदी आर्य समाजाचीं हीं धोरणें दिवसानुदिवस मान्य होत आहेत. तिशेची पुस्तकें त्या

किंवा National Welfare & National Decay या माल्कीं पुस्तकें घ्या किंवा सुप्रजाजननशास्त्रज्ञांचीं पुस्तकें घ्या. त्यांतून या ब्राह्मसमाजाची व त्यांच्या 'मानवधर्म'शास्त्राची स्तुतीच दिसून येते व यावी यांत नवल नाहीं. अशा शास्त्रज्ञांना आर्यांच्या या सुधारणा आजहि उचलून धरलेल्या पाहून

एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥ मनु. २·२०

ही मानवोक्ति अद्यापहि सार्थ होत असल्याबद्दल कोणास अभिमान वाटणार नाहीं ? असो; यमयमीसंवादांतर्गत बाहिणभावंडांचे विवाह इतरत्र कोठकोठें होते तें आतां पाहूं या.

(१) ज्या अर्थी देवांत ही चाल होती त्या अर्थी **असुर समाजांत** ही चाल असलीच पाहिजे. पार्थिव देवसमाजाला अवशेष कांहीं आहे असें सांगवत नाहीं. देवसमाजांतून उत्क्रांत झालेला जो हा मानव आर्य समाज त्याच्यांत ही ब्राह्मणभावंडांचा विवाह संबंधी लोप झालेला असून या यमयमीसंवादांत तो केवळ स्मारकरूप होऊन राहिला आहे. असुर समाजाचे अवशेष असे जे शक, पार्शियन, असूरियन, इजिप्शियन्, आफ्रिकन्, ग्रीक इत्यादि समाज त्यांच्यांत ही चाल आज जरी नाहीं तरी पूर्वकालीं सांपडलीच पाहिजे. या ठिकाणीं आसुर आणि देव समाज यांचा अर्थ येथें आम्हीं काय समजतों याचा फिरून थोडासा उलगडा करणें जरूर आहे. कारण या आसुर समाजांतले कित्येक समाज आर्य आहेत अशी अर्वाचीनांची भावना आहे. आसुर व देव हे दोनहि मिळून पूर्वी एकच समाज होता. त्यास आसुर समाज असें नांव होतें. त्यांनीं सर्व पृथ्वी व्यापलेली होती असें आमचीं पुराणें सांगतात.

**या आसुर समाजांतूनच पार्थिव देव समाज उत्पन्न झाला**

तो कांहीं विशिष्ट तत्वग्रहणानें व तत्वाचरणानें झाला. बहुधा मूळची सर्वतोपरी एका विवाहापुरतीच नव्हे तर इतर दृष्टीनें ही-'गावःस्थिति' सोडून तो समाज बाहेर पडला व आपल्यास देव किंवा संस्कृत म्हणूं लागला. अर्थात्

आसुर हे ज्येष्ठ व ज्येष्ठपणानें श्रेष्ठ आणि
देव हे कनिष्ठ ( वयानें ) पण आचरणानें श्रेष्ठ

असे समाज हे समाज एकमेकांपासून जे एकदां दूरावले ते कायमचे दूरावले. एकेक नवीन तत्व देवांनीं ग्रहण करून आपल्यांत सुधारणा घडवून आणली व तेच पुढें ब्राह्म बनलें. आसुरांनीं तीं मागाहून कांहीं कालानें अंशतः ग्रहण केलीं व कांहीं केलीं नाहींत. देव असुरांस मागसलेले व आचारहीन म्हणूं लागले तर असुर देवांना नांवें ठेवूं लागले व शिव्या देऊं लागले. देवासुरांत अशी ही बोलाचालीच काय पण जगताच्या आधिपत्याविषयींहि सांस्कृतिक व प्रत्यक्ष तंटे व युद्धें सुरू झालीं व केव्हां केव्हां एकमेकांनीं एकमेकांचे देश ही सोडले अगर त्यांस सोडावे लागले. आसुर समाज हा **प्राकृत समाज** आणि

---

**टीपः**—आर्यांनीं समुद्रोल्लंघन करूं नये असा जो निर्बंध घातला त्याचीं कारणें अनेक असतील. पण आर्य व असुर यांतील तंटे व देशत्याग हें एक त्याचें प्रामुख्यानें कारण आहे. दुसरें कारणहि फार बलवत्तर आहे. परदेशीय समाज संस्कृतीनें हीन पण आचारसुलभ ! एथील मनुष्य तिकडे गेला तर तिकडील हीन पण आचारसुलभ संस्कृति चांगली मानील व इकडील चांगली पण आचरण्यास कठीण संस्कृति सोडून देईल. आज मात्र असा उलट पेंच येऊन पडला आहे कीं या हीन संस्कृतीच्या व सुलभ आचाराच्या लोकांचा आमच्या दारांत प्रवेश होऊन ते राजे झाले आहेत. त्यामुळें जें दाराशीं नको होतें तें घरातच येऊन बसलें. आतां दोघांच्या आचारविचारांची प्रत्यक्ष झुंज होऊन सुलभ अशा पाश्चात्यांच्या आचारांची सरशी होत आहे. तथापि अशी उमेद आहे कीं अखेर आमचेच आचार संस्कृत व श्रेष्ठ दर्जाचे व म्हणून शाश्वत असे ठरतील.



अनुक्रमणिका

देव समाज हा सर्व तऱ्हेनें **संस्कृत समाज**. संस्कृत समाजांत नवीन नवीन तत्वांमुळें आपआपसांत हेवे अधिक तर असुरसमाजांत तें कमी. त्यामुळें असुरसमाज युद्धांत प्रथम यशस्वी व्हावयाचा तर देव-समाज अखेर सरस ठरावयाचा. ही जी पौराणिक कथा आहे ती वस्तुतः खरी व यापुढेंहि खरीच होणारी आहे. सारांश **वरील सर्व समाज म्हटले तर एक, म्हटले तर भिन्न** असे आहेत. मूलतः एक असले तरी मागाहून भिन्न झाले. अर्थात् देवांनीं टाकलेल्या सर्व गोष्टी आपल्यास असुरांत आढळल्याच पाहिजेत. म्हणून वर सांगितलेल्या आसुर समाजांतील इतिहास काय सांगतो हें आतां पाहूं. (१) प्राचीन इजिप्शियन, आफ्रिकन व ग्रीक लोकांत हे बंधुभगिनीविवाह सुरु होते व निषेध मानीत नव्हते. पहाः–

The views of the *Egyptians* about marriage closely resemble those held by many *African* tribes; for *they married their sisters* and nieces and sometimes indulged in poligamy... According to an ancient legend Asiris married his sister Isis who became by him the mother of Horus, and he was also the father of Anubis by his other sister Nephthys.

A guide to the Egyptian Collections in the British Museum 1909, भाग ४ पृ. ७६.

दुसऱ्या वाक्यांतील कथा ही केवळ पौराणिक असली तरी त्याप्रमाणें त्यांचे आचार होते हें अव-तरणांतील पहिल्या वाक्यांत सांगितलें आहे. बहिणभावंडांतील विवाहाचा आणि मातृप्रधान स्त्रीसत्ताक समाजाचा अगदीं कायमचा समवायसंबंध नसला तरी पूर्वकालीं तो होता यांत शंका नाहीं. आतां इजिप्शियन व आफ्रिकन समाजांतील स्त्रीसत्ताक समाजांतील अवशेष पहाः —

(1) The *Egyptians like many African* tribes *traced their descent thro' their mothers*.

(2) The legitimate wife of a man is called *"the lady of the house"* and she might of-course be "his beloved sister"; frequently however the latter title is euphemious for "mistress" or concubine. *To divorce or eject "the lady of the house" was a very difficult matter* and it was probably the fear of *possible pecuniary complications* which caused the Egyptian in so many cases to marry his sister or woman he called by that name. Moreover *it was thus easier to keep the property in the husband's family (?)*. ( प्रश्नचिन्ह व इटालिक आमचें )

(3) The legal *wife* was the *freest woman in the world*. She went about the house and outside it at will and unlike the modern Egyptian woman, wore no veil. If she pleased she could converse with men in the village or market, and *she suffered from none of the restrictions* which are placed upon women in the east in modern times.

(4) On scores of stones in the Egyptian galleries, *the names of the mother of the deceased is given whilst that of the father is not mentioned* ( इटालिक आमचें ).– कित्ता

(५) चिनी लोकांचा मूळ राजा फुहि ( खि. पू. २८५२-२७३८ ). त्याच्यापूर्वी चिनी लोक जंगलांत पशूंप्रमाणें राहात. तेव्हां त्यांच्यांत कौटुंबिक जीवनक्रम अस्तित्वांत आला नव्हता. **मुलें फक्त आपल्या आईलाच ओळखीत. त्यांना आपला बाप कोण हे ठाऊक नसे.** अशा स्थितींत असतांना फुहीनें विवाहसंस्था अंमलांत आणून **पतिपत्नीपैकीं पतीकडे समाजाचें धुरीणत्व दिलें.** (बुद्धपूर्वजग–ज्ञानकोश).

या उतान्यावरून **स्त्रियांचें** अनावृत स्वातंत्र्य, **त्यांचें** गृह, त्यांची मातृकुलपरंपरा, मुलींकडील वारसा, मुलींची संपत्ती, वगैरे गोष्टी आपणांस कळून येतात. एवढेंच नव्हे तर यांचें परस्परावलंबित्वहि दिसून येतें.

(६) The Ptolemies married their sisters and nieces like the Egyptians ( कित्ता ) टॉलेमी हे ग्रीक. अर्थात् प्राचीन ग्रीक लोकांत ही चाल होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

(७) बौद्ध जातकांत रामसीताकथानक आहे. परंतु सीता व राम हीं दोघें बहिणभावंडें असेंच त्या कथानकांत मानलेलें आहे. खुद्द बुद्धाचें लग्न त्याचे बहिणीशींच झालें होतें. बुद्ध हा शाक, किंवा पर्शियन किंवा सिथियन. अर्थात् शक लोकांत ही चाल होतीच.

(८) ब्रह्मदेशचा राजा थिबा बौद्धच. हा थोड्या दिवसांपूर्वी रत्नागिरीस वारला. त्याचें लग्न त्याचे बहिणीशींच झालें होतें. त्या ब्रह्मी लोकांत स्त्रियांना फारच स्वातंत्र्य असून मातृकुलपरंपरा आहे हे प्रसिद्धच आहे.

(९) कुरूंत म्हणजे उत्तरकुरूंत ही चाल होती असें म्हणतात. हिमालयांतील पहाडी लोकांत स्त्रीस्वातंत्र्य, बहुपतिकत्व वगैरे गोष्टी आहेत हें प्रसिद्ध आहे. तसेंच मद्रासकडील नायर लोकांत मातृकुलपरंपरा आहे त्यामुळें तिकडेहि ही चाल असण्याचा संभव आहे.

(१०) प्राचीन इराणी लोकांत विवाहमर्यादा बिलकुल नव्हती. अत्यंत अंतर्गत विवाह होत असत असें रा. करंदीकर आपल्या Hindu Exogamy या ग्रंथांत म्हणतात. ( पान ५)

As far as the ancient Iranians are concerned, fortunately we have sufficient evidences to arrive at definite conclusions. In the Zenda Avesta and Palhavi texts we find no trace of exogamy; on tho other hand *in-breeding of the most intense type* was practised by the Iranians. Next of kin marriage under which *father and daughter*, *mother and son*, *brother and sister* were mated together is very highly spoken of by Parsi Scriptures (S.B. E. XVIII. pp. 393, 395, 397, 404) (इटालिक आमचें). या लोकांत मायपुत्रांत विवाह होत असत ही माहिती बृहस्पतिस्मृतिकारासहि होती. (बृह० स्मृति १७-२१ S. B. E. XVIII p. 389) पार्शी लोकांत वरील विवाहांचे बाबतींत मतभेद दिसून येतो. कित्येकांचे मतानें पाश्चिमात्यांनीं चुकीचें भाषांतर करून निष्कारण गैरसमज करून घेतला आहे. पण 'झरतुष्ट्र in the गाथा' या पुस्तकांचा कर्ता आपल्या ग्रंथाच्या परिशिष्टांत म्हणतो कीं After reading the Parsi Scriptures one cannt help thinking that the ancient Parsis not only did allow marriages between very near relations but looked upon it as an act of the highest merit (H. Exogamy p. 5). आजच्या पार्शी लोकांना यांत वाईट वाटण्याचें कारण नाहीं. परंतु मनुष्यस्वभावच असा आहे. आमच्यांत देखील ही चाल एका अत्यंत प्राचीन काळीं होती हें निःसंशय आहे. पारस्कर हा 'सगोत्र विवाह कलिवर्ज्यांत' घालतो याचा अर्थ ते पूर्वकालीं चालू होते, हीच गोष्ट खरी. शिवाय हा यमयमीसंवाद बहिण-भावंडांच्या विवाहाच्या बाबतींत तेंच स्पष्ट सांगत आहे. हीच

अत्यंत प्राचीन काळची गोष्ट कै० राजवाडे यांनीं चित्रमयजगतांत दर्शविली होती. परंतु त्याबद्दल कित्येक लोकांना संताप आला ही गोष्ट प्रसिद्ध आहे. वास्तविक पांच दहा हजार वर्षांपूर्वी किंवा कदाचित् त्याहिपेक्षां अत्यंत प्राचीनकाळीं अमुक एक चाल होती किंवा अमुक एक गोष्ट झाली असें दिसून आलें म्हणून **संतापण्याचें कांहींच कारण नाहीं. फारफार प्राचीन काळीं सर्वांचे आधींच या गोष्टीचा आम्ही निषेध केला, या गोष्टीचें महत्व अधिक आहे.** सर्व जग रानटी अवस्थेंत व वाईट चालींत खितपत असतां आम्हीं सूक्ष्म अवलोकन करून सर्वांत अगोदर या अनिष्ट चालींचा त्याग केला ही गोष्ट आमच्या बुद्धिमत्तेस, सदाचरणास किंवा नीतीचीं बंधनें घालून घेणाऱ्या आमच्या शहाणपणास अधिक साजेशी नव्हे काय ? देवांपेक्षांहि आम्ही अधिक बंधनें घालून घेतलीं व तत्वें प्रत्यक्ष आचरणांत आणण्यास अत्यंत महत्व दिलें. यांत आमचें श्रेष्ठत्व आहे.

**आचारः परमो धर्मः श्रुत्युक्तः स्मार्त एव च ॥** मनु. १–१०८

**एवमाचारतो दृष्ट्वा धर्मस्य मुनयो गतिम् ।**

**सर्वस्य तपसो मूलं आचारं जगृहुः परम् ॥** मनु. १-११०

यांत आमचा श्रेष्ठपणा नजरेस येतो. ही गोष्ट अशा संतापणाऱ्यांनीं लक्षांत ठेवणें अवश्य आहे.

सारांश यमयमीसंवादांत '**लोक बहिणभावंडांचा विवाह करीत असले,** कोणी आमच्या दुष्कृत्याकडे पहात नसले, तरी आम्ही या गोष्टी यापुढें करणार नाहीं असा जो निष्ठुरपणानें आणि निर्धारानें यमानें यमीस जबाब दिला आहे तो सांस्कृतिक इतिहासदृष्टीनें अगदीं अक्षरशः खरा आहे. वैदिक युगाच्या कोणत्या काळांत हा निर्बंध घातला गेला एवढा प्रश्न शिल्लक रहातो. वेदांतील वर दिलेल्या उताऱ्यावरून ( 'जायेव पत्युरुशती सुवासाः' किंवा 'एक एव पतिर्नार्याः' ) व दुसऱ्याहि अनेक उल्लेखांवरून वेदाच्याहि प्राचीन युगांत या निर्बंधांचा प्रश्न निघाला हें उघड आहे. पर्शियन, पँट, ( इजिप्शियन), आसुर, ग्रीक इत्यादि लोकांनीं आमच्यानंतर शेकडों वर्षांनीं पण आजच्यापूर्वी कित्येक शतकें हा निर्बंध अखेर घालून घेतला. तरी आम्ही त्यानंतर दुसरे सगोत्र किंवा सपिंड विवाहाचे जे निर्बंध घालून घेतले ते त्यांनीं अद्याप घालून घेतले नाहींतच. त्यांच्यांत व इतर आसुर समाजांत अद्याप आतेबहीण व मामेभाऊ, (२) चुलत बहिणभावंडें (३) मावसभावंडें यांमधील विवाह सम्मान्य मानले जातातच. रा. करंदीकर म्हणतात कीं स्वधर्मीयांच्या अल्पसंख्येमुळें त्यांच्यांत असले अंतर्गत विवाह होतात. पण याला प्रमाण काय ? पार्श्यांशिवाय इतर समाजांत ते बहुसंख्य असूनहि असे विवाह होतात ते कशामुळें ? रा. करंदीकरांनीं या गोष्टीचा तलास लावला नाहीं व आर्यांतील विवाहमर्यादांची वाढ लक्षांत घेतली नाहीं व त्याचें कारण व कार्य रा. करंदीकरांस समजलेंच नाहीं. हिंदी आर्यांनीं यमयमीसंवादांतर्गत बंधनानंतर आणखीहि सगोत्र व सपिंड विवाहनिषेध केला. पण पार्शी व इतर समाजांनीं मागाहून सख्या भावाबहिणींचा तेवढा निषेध घेतला व तेथेंच ते थांबले. हिंदी आर्यांनीं हे निर्बंध वास्तविक कां घालून घेतले हें इतर समाजासहि कळलेंच नाहीं. आजच्या हिंदी आर्यांना तरी, ते पूर्वजांनीं कां घालून घेतले हें कोठें माहीत आहे ? पाश्चिमात्यांच्या नवीन शोधांमुळें त्या निर्बंधांची कारणमीमांसा आतां कोठें थोडथोडी कळूं लागली आहे. निर्बंधांची वाढ पाहिली, त्यांचा ऐतिहासिक रीतीनें अभ्यास केला म्हणजे त्यामध्यें हेतु आहे याबद्दल शंका उरत नाहीं. पण विधिनियम कायम केल्यानंतर त्यासंबंधानें अधिक चौकशी, त्यांची अधिक मीमांसा बंद करण्यांत आली असें दिसून येतें. मनु म्हणतो.

**श्रुतिं योऽवमन्येत हेतुशास्त्राश्रयो द्विजः**

**स साधुभिर्बहिष्कार्यः नास्तिको वेदनिंदकः ॥** मनु.

**अर्थः**-हेतुशास्त्राच्या आधारावर जो श्रुतिस्मृतींचा अवमान करतो तो नास्तिक, वेदनिंदक व बहिष्कार घालण्यास योग्य होय.

श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः ॥
ते सर्वार्थेषु अमीमांस्ये ताभ्यां धर्मो हि निर्बभौ ॥ मनु. २.१०

कोणत्याहि गोष्टीसंबंधाने श्रुतिस्मृतींवर शंका घेऊं नये असा हा दंडकच पाडला गेला! अर्थात् अशी मीमांसा बंद केल्यामुळें त्यांच्या हेतूचें वास्तविक ज्ञानहि लुप्त झालें. आपलीहि टीका बंद झाली व इतरांचीहि बंद झाली. परसमाजांत हे निर्बंध नसल्यामुळें त्यांच्या आचारांचे परिणाम व आपल्या आचारांचे परिणाम यांतील तफावत पाहून अथवा आपल्या आचारांची श्रेष्ठता पाहणारास दिसुन येण्यासारखी आहे यांत शंका नाहीं व तसा अभ्यास अलीकडे पाश्चिमात्य देशांतून व क्वचित् इकडेहि चालू आहे. त्यावरून या निर्बंधांचें स्वरूप व महत्व दिवसानुदिवस कळून येणार आहे. परंतु ही दृष्टि सामान्य माणसास नसते. तो आचाराच्या कठिणपणाकडे पाहतो व त्यास त्यांतील तत्व न समजल्यामुळें 'बंधनाच्या पलीकडे' जाण्याची त्यास बुद्धि होते. असो. रा. करंदीकर यांची मीमांसा चुकीची आहे, एवढेंच एथें दर्शविण्याचा हेतु असलेमुळें यापेक्षां अधिक विवरणाची एथें अवश्यकता नाहीं. प्राचीन पर्शियन लोकांसंबंधानें वर जें अवतरण घेतलें आहे त्यांत (१) पिता आणि कन्या (२) पुत्र आणि माता असेहि विवाह त्या लोकांत होत असत असें म्हटलें आहे. असे विवाह हिंदी आर्यांत ही होत होते कीं नाहीं? असा एक प्रश्न उत्पन्न होतो. हौगसाहेबांनीं असें अनुमान ऐतरेय ब्राह्मणांतील हरिश्चंद्र आख्यानांतील कांहीं श्लोकावरून काढलें आहे असें रा. करंदीकर म्हणतात. पण हौगसाहेबापर्यंत लांब जाण्याचें कारणच नाहीं. प्राचीन पर्शियन हे हिंदी आर्यांचे बांधवच. तेव्हां दोघांच्याहि पौराणिक कथांत असले उल्लेख निघूं शकतील किंवा ओढून ताणून काढतां येतील. परंतु प्रश्न एवढाच कीं वैदिक कालांत असे विवाह होत होते किंवा मान्य होते कीं काय? आमच्या समजुतीनें वैदिक कालांत केव्हांहि ते मान्य नव्हते. तत्पूर्वकालींहि हिंदू आर्यांत ते मान्य असे कधींच झालेले दिसत नाहींत. मनुष्यसमाजाच्या उत्पत्तीकालीं असे विवाह झाल्याच्या कथा या केवळ कल्पना होत. त्यांचा इतिहास तर कोणी लिहून ठेवणें शक्यच नव्हतें. अर्थात् अशा कादंबरीमय कल्पनांना (theories) किती किंमत द्यावी हें सुज्ञांनींच ठरवावें. वेदांत देखील अशा कल्पनामय कथा आहेत हें आम्ही प्रांजलपणें कबूल करतों. उ. प्रजापतीची गोष्ट घ्या. प्रजापतीनें आपल्या कन्येशीं गमन केल्याचें किंवा ब्रह्मदेवानें सरस्वतीशीं गमन केल्याचें वर्णन कोठेकोठें आढळतें. परंतु त्याबरोबरच प्रजापतीच्या या पापाचा देवसभेंत निवाडा होऊन त्याबद्दल त्यास तात्काल शिक्षा केल्याचें वर्णनहि आढळतें. अर्थात् हा संबंध देवांनीं देखील तावडतोब अमान्य व पापयुक्त असाच ठरविला! पण कोणी म्हणतील कीं देवांनीं मागाहून तो दंड्य ठरविला असला तरी प्रजापतीनें तरी तो अपराध करावा ही गोष्ट काय दर्शविते! त्याचें उत्तर इतकेंच कीं प्रजापतीचा हा अपराध

केवळ कविकल्पनांचा खेळ[1]

असून वास्तविक प्रकार नव्हे. सूर्याचे उदयानेंच पण उदयपूर्वी उत्पन्न होणारी उषा ही सूर्याचे उदयाबरोबर नाहींशी होते. या स्वाभाविक गोष्टीचें कवींनीं असें रूपकात्मक कथानक बनविलें कीं सूर्यापासून उत्पन्न झालेली उषा ही सूर्यकन्याच होय. उषेच्या पाठोपाठ सूर्योदय होत असतो म्हणजे सूर्यकन्या पुढें पळत असते व तिच्यामागें सूर्य लागलेला असतो आणि अखेर तिच्याशीं त्याचा संबंध होतो तेव्हांच सूर्य थांबतो! झालें एवढ्यावरून सूर्य स्वकन्येचा जार बनला! सारांश, यांत एका सृष्टिचमत्काराचें,

१ अशा अनेक कथा शतपथ ब्राह्मणांत व इतर ब्राह्मणांत आलेल्या आहेत. यावरूनच त्या केवळ कल्पनामय आहेत हें उघड आहे. अशा एकंदर ५१७ कथा आहेत (ज्ञानकोश, प्रस्तावनाखंड, भाग २ वेदविद्या पा. १६२।१६३ पहा.)

कामुक दृष्टीनें केलेल्या वर्णनापलीकडे कांहींच नाहीं ! प्राकृत मनुष्यानें त्याची एक अश्लील कथा बनविली असेंच म्हणावयाचें. यावरून सामाजिक दृश्य किंवा अनुमान निघूं शकत नाहीं असें कित्येक पाश्चात्य ग्रंथकारांनींहि कबूल केलें आहे. आतां यापेक्षां किंचित् निराळी अशी पौराणिक कथा घेऊं.

प्रजापतीनें स्वदेहापासून एक कन्या

उत्पन्न केली व तिच्याशीं तो कामुक झाला व त्यापासून पुढें मानवोत्पत्ति झाली किंवा प्रजापतीच्या तपश्चर्येतील घर्मापासून जो अर्णव झाला त्यांत त्यानें आपलें प्रतिबिंब पाहून त्या प्रतिबिंबरूपी स्त्रीशींच तो रत झाला किंवा

द्विधाकृतात्मनो देहं अर्धेन पुरुषोऽभवत् ।
अर्धेन नारी तस्यां स विराजमसृजत्प्रभुः ॥१.३२॥ मनु.

ब्रह्मदेवानें आपल्या शरीराचे दोन भाग केले. अर्ध्यानें तो पुरुष बनला, अर्ध्यानें स्त्री झाला व त्या स्त्रीचे ठिकाणीं त्यानें विराट् उत्पन्न केला ! किंवा मनूनें इडा उत्पन्न केली आणि त्या इडेपासून त्यास पुढें बुध झाला. किंवा ब्रह्मदेवानें आपली कन्या जी सरस्वती तिचा अभिलाष केला ( अर्थात् वाक्पति झाला ). किंवा अडॅमनें ( आदिमानें ) ईव् ( इडा ) आपल्या बरगडीपासून उत्पन्न केली व तीच आपली पत्नी ठरविली ! या सर्वच कथा एक स्वरूपाच्या असून ब्रह्मदेव-सरस्वती-कथेशिवाय इतर कथांचा मानवोत्पत्तिविषयक कल्पना (theory) सांगण्याचाच केवळ कवीचा हेतु दिसतो. त्यापासून ऐतिहासिक सत्य काढण्याची कल्पना करणें म्हणजे आपल्या वेडेपणाचें प्रदर्शन करणें होय. तथापि ऐतिहासिक सत्य काढण्याच्या प्रयत्नांत तरी काय निघेल ? जगांत दुसरा प्राणीच नव्हता अशा वेळीं प्रजापतीनें मानस प्रजोत्पत्तीनंतर दुसऱ्या पद्धतीनें प्रजोत्पत्ति साधण्याचे हेतूनें कोठून तरी एक स्त्री उत्पन्न केली. अशा य स्त्रीचें व प्रजापतीचें नातें काय ? पितापुत्रीचें कीं पतिपत्नीचें ? कोणतेंहि नातें मानलें तरी अर्थ एकच त्या अनुमानापासून फलनिष्पत्ति अशी कांहींच होऊं शकत नाहीं. याचें उलट मायलेकांचे लग्नाची कल्पना सुद्धां आमच्या ग्रंथांत कोणास आढळून येत नाहीं. पार्शी ग्रंथांतून तीहि दिसून येते. इतकाच फरक. आपण अशीही कल्पना करूं कीं प्राचीनतम असा जो प्राकृत ( uncivilised ) आसुर (देवासुर म्हणा पाहिजे तर) वन्य समाज त्यांत क्वचित् एकदा वेळीं बापलेकींचे किंवा मायलेकांचे विवाह होत. त्यास आमचे पूर्वज 'पशुसमान' किंवा 'गावःस्थितिः' असें म्हणत. परंतु हिंदी आर्यांत तर त्या अश्लील कल्पनेचा तावडतोब देवसभा भरून निषेध करण्यांत आला. व पिता वधाई ठरविला गेला ! इतरत्र ( पार्शी किंवा इजिप्शियन असुरांत ) इतकाहि निषेध झाला नाहीं. यावरून हिंदी आर्यसमाज व इतर म्हणजे पर्शियन किंवा पांड्य आसुर किंवा आर्य म्हणविणोर समाज यांतील फरक आणि श्रेष्ठता तावडतोब नजरेस येते. प्रजापति हा एक श्रेष्ठ देव असला तरी तो पापाधिकारी व दंडय होऊं शकतो ही कल्पना किती उदात्त आहे बरें ? 'थोर असो वा लहान असो, राजा असो वा रंक असो जो पापी तो दंडयच' ही गोष्ट आमच्या थोरपणाचेंच लक्षण नव्हे काय ? देवांनाहि अनाचाराबद्दल शिक्षाच ठोठावणारा दुसरा धर्म पृथ्वीचे पाठीवर मिळणार नाहीं ! ही एक आर्यसंस्कृतीच्या उदात्तपणाची साक्ष समजून आम्ही आपली पाठ थोपटून घेतां येण्यासारखी नव्हे काय ? सख्या बहिणभावंडांच्या अश्लील संबंधासंबंधानें इतर जगानें त्यांचें केवळ अनुकरण केलें आहे हें उघड दिसून येत आहे. असे शाश्वत –नियम संशोधून त्या नियमांप्रमाणें प्रत्यक्ष आचरण करून दाखविण्याऱ्या आर्यांची धन्य आहे ! आचरणाचें हें श्रेष्ठत्व जाणूनच

आचारः प्रथमो धर्मः किंवा आचारः परमो धर्मः ।

अशी त्यांनीं व्याख्या केली. असो.—

वेदपूर्व अत्यंत प्राचीन समाज १०–२०००० वर्षांपूर्वीचा किंवा प्राचीन मताप्रमाणें लाखो वर्षांपूर्वींचा स्त्रीसत्ताक, मातृकुलपरंपरेचा, नीतिनियम, विधिनिषेध, किंबहुना लाजलज्जा वगैरे न जाणणारा गाव-स्थितीचा ( पशुसमान ) असा होता किंवा असावा असें एथवर दाखविलें. स्त्रीसत्ताक समाज व मातृकुलपरंपरा यांचा अन्योन्यसंबंध असतो असेंहि दर्शविलें. मातृकुलाचें हें कारण मान्य केल्यास अशा प्राचीन समाजाची आणखीहि उदाहरणें आपल्या पुराणांतून आढळून येतात. उ.

[1]आदित्य, दैत्य, दानव, मानव, ऐल वगैरे

हे सर्व शब्द मातृकुलपरंपराच दर्शविणारे आहेत असें मान्य करावें लागेल. हे शब्द अदिति, दिति, दनु, मनु या स्त्रीनामांपासून व्युत्पादितात हें प्रसिद्धच आहे. हीं सर्व कश्यपाच्या स्त्रियांचीं नांवें आहेत असेंहि पुराणांतून सांगितलें आहे. हे सर्व समाज जर कश्यपोत्पन्न आहेत तर सर्वांना एकच 'काश्यप' असें नांव न पडतां भिन्नभिन्न आदित्य, दैत्य, दानव, मानव, अशीं कश्यपस्त्रियांचीं नांवें कां पडलीं किंवा देण्यांत आलीं ? आपण सर्व 'एकाच प्रजापतीचीं लेंकुरें व समान बांधव' असें असतां सदोदित 'यादवी' दर्शविणारे सावत्र 'भाऊबंद' अशी हीं आपलीं नांवें कशाचीं दर्शक आहेत ? या सर्व समाजांतील मूळ मातृकुलपरंपरा किंवा स्त्रीसत्ताक किंवा भिन्न वंश, या गोष्टी हे शब्द प्रथम दर्शनीं दर्शवितात. संस्कृतिभिन्नत्वामुळें किंवा पौर्वापर्यामुळें यांच्यांत यादवी उत्पन्न झाली असेंच दिसून येतें. यांतील मानव शब्दाशिवाय इतर शब्द सर्वांच्या परिचयाचे आहेत. मानव शब्द 'मनोरपत्यं' असाच सर्व व्युत्पादितात. परंतु बहुतेकांची कल्पना अशी कीं

[2]मनु = वैवस्वतमनु (पुरुष) व त्याची संतति ते मानव.

वास्तविक **मनु = कश्यपस्त्री ( स्त्री ) व तिची संतति ते मानव**

असा अर्थ आहे. दिति व दनु तशी **मनु ही एक कश्यपस्त्री होती** व तिची प्रजा ती मानवप्रजा. वैवस्वत मनूची प्रजा या अर्थानें मानव शब्द वेदांत सहसा येत नाहीं. पुराणांतून दोनहि व्युत्पत्त्या येतात. दोन व्युत्पत्त्या या एकाच शब्दाबद्दल देण्यांतला मतलब इतकाच असावा कीं इतरांपेक्षां मानवांची भिन्नता व श्रेष्ठता ठरवावी. एका व्युत्पत्तीनंतर दुसरी आली; पण मूळची किंवा पूर्वकालीन व्युत्पत्ति जवळ जवळ लुप्तच झाली ! ती क्वचित् शिल्लक आहे हीच मेहेरबानगी म्हणावयाची. एकच कश्यप प्रजापति पण भिन्नभिन्न माता ही कल्पना खरोखरच उत्तम आहे. भिन्न मातांमुळें **भिन्न वंश** दर्शवावे हाच प्रमुख हेतु दिसतो. 'मानव' ही वैवस्वत मनूची संतति कल्पिल्यामुळें हा हेतु बदलतो.[3] पहिल्या कल्पनेंत सर्व मानव हे एका प्रजापतीची संतति आहे असें दर्शविलें जातें तर दुसऱ्या व्युत्पत्तींत मानव हे इतरांपेक्षां सर्वस्वीं भिन्न असे मानले जातात. हिंदी आर्यांपैकीं कांहीं आपल्यास वैवस्वतमनुवंशीय व इतरांपेक्षां श्रेष्ठ समजतात. असा यांत अहंभाव आहे. आपण celestial people–स्वर्गीय प्रजा–आहों असें चिनी लोक समजतात. आपण chosen ईश्वराचे

१ हे शब्द भिन्न मातांचे अर्थात् भिन्नवंशदर्शक आहेत असें एथें दाखविलेंच आहे. पण हे भिन्नभिन्न मातृभूमीचे पुत्र असा अर्थ असण्याचाहि संभव आहे.

२ ब्राह्मणांमधून आणखी एक कथा नजरेस येते. ती अशी कीं पुरुष हा प्रजापतीच्या 'मना'पासून उत्पन्न झाला. (ज्ञानकोश किंवा पा. १६३). ही कथा दैत्य, दानव इत्यादि सदृश जो 'मानव' त्याची नव्हे. एकंदर मानव समाजोत्पत्तीची आहे. सबब ती एथें ग्राह्य नाहीं. मनुः=मन अशी कल्पना करून या पुरुष किंवा स्त्रीवाचक मनूची वासलात लावतां येणार नाहीं.

३ वास्तविक सर्व मानव मनूचीच संतति अशीहि पौराणिकांची समजूत नाहीं. फक्त क्षत्रिय किंबहुना त्यांपैकीं कांहीं ( सूर्यवंशीय ) आपल्यास मनुवंशीय म्हणवितात. तथापि वेदांत ही व्युत्पत्ति मान्य आहे असें म्हटलें व मनुवंशीय ते सर्वच मानव असें म्हटलें तरी वेदांतच ( पुरुषसूक्तांत ) दुसरीच कल्पना आढळून येतें हें विसरतां येत नाहीं.



अनुक्रमणिका

लाडके असें ख्रिस्ती समजतात. तसेंच आपण श्रेष्ठ असें हिंदी आर्य अगर त्यांपैकीं कांहीं क्षत्रिय समजतात. त्यांची श्रेष्ठता त्यांच्या आचारांत व निरनिराळ्या निर्बंधांत (विधिनिषेधांत) आहे ही गोष्ट खोटी नाहीं व ती दिवसानुदिवस मान्य होण्यासारखी आहे. आपण श्रेष्ठ तेव्हां आपली पीठिकाहि भिन्न असावी अशा कल्पनेनें वैवस्वतमनोरपत्यं मानवं अशी नवीन पीठिका उत्पन्न करण्यांत आली असावी असो.

मातृप्रधान कुलपरंपरा मूळची सर्वांचीच होती व तशीच ती 'मानवांचीहि होती' असें वर दर्शविलें आहे. मातृसत्ताक परंपरेमुळें मातृतः नांवें पडतात. संपत्तीची मालकी स्त्रियांकडे असते. कारभार स्त्रियांमार्फत चालतो व स्त्रिया अत्यंत स्वतंत्र बनतात. त्याचे परिणाम अखेर फार घातक होतात असा सर्वत्र अनुभव आहे. इजिप्तमध्यें स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा असा अनुभव आला अशाबद्दल दाखले आहेत. पहाः—

The Egyptians tolerated incest and could defend it by the example of the Gods. Asiris had married his sister; Khem was "The bull of his mother" ...... Licentiousness prevailed in the palace and *members of the royal harem intrigued with those who sought the life of the King* (Story of Nations Series., Egypt, p.43)

रोमन लोकांच्या स्त्रियांची स्थिति पहा.

Women of the higher classes were so lascivious, depraved and *dangerous* that one could not be compelled to contract matrimony with them. Marriage was displaced by concubinage; even virgins were guilty of inconceivable immodesties ......... Their depravity impelled to such wicked practices as cannot be named in a modern book.

Intellectual Developement of Europe, by Druper, Vol. I, p. 233

इजिप्तमधील व रोममधील हे अनुभव अलीकडचे व पितृकुलें किंवा पुरुषसत्ताक समाज असतांचे आहेत. स्त्रीसत्ताक समाजांतील उदाहरणें यापेक्षां घोर असलीं पाहिजेत. प्रद्वेषीनें मामतेयाचा प्राण घेण्याचे अनेक प्रयत्न दासहृदयी नोकरांचे साहाय्यानें केले असें वर दिसून आलेंच आहे. मामतेयाचें एकच उदाहरण नमूद असले तरी अशी कित्येक उदाहरणें त्यांतच समाविष्ट झालेलीं आहेत असें मानणें भाग आहे. संस्कृतीच्या इतिहासांत सर्वच उदाहरणें देण्याची अवश्यकता वेदांस किंवा पुराणिकांस वाटली नाहीं. वेदांत अशा स्त्रियांची सर्वसामान्य उदाहरणें निराळ्याच प्रकरणांत व शब्दांत आलेली आहेत. ऋग्वेदीय व तैत्तिरीय विवाहसूक्तांत आपल्यास खालील वाक्यें आढळतात.

अघोरचक्षुरपतिघ्न्येधि (१०-८५-४४ ऋ अथर्व- १४-२-१७)
अदेवृघ्नी अपतिघ्नीहैधि ॥ अथर्व० १४-२-१८
अभ्रातृघ्नीं वरुणापतिघ्नीं बृहस्पते ।
इन्द्रा पुत्रघ्नीं लक्ष्म्यं १ तामस्मै सवितस्सुव ॥ आपस्तंब पाठ १-५
इदमहं या त्वयि पतिघ्न्यलक्ष्मिस्तां निर्दिशामि ॥ आपस्तंब १.१-५
या अस्यां पतिघ्नी तनूः प्रजाघ्नी तनूः प्रजाघ्नी पशुघ्नी लक्ष्मिघ्नी'
जारघ्नीमस्यैतां कृणोमि ॥ आपस्तंब १०-३ व ६

या सूक्तांत आलेले 'अपतिघ्नी, अभ्रातृघ्नी, अपुत्रघ्नी,' किंवा 'पतिघ्नी, प्रजाघ्नी, जारघ्नी,

'देवृघ्नी' हे शब्द अनुभवाचेच द्योतक 'असले पाहिजेत. मग हे अनुभव स्वतःच्या समाजांत येवोत किंवा शेजारच्या समाजांत येवोत.

इंद्रश्चिद्घा तदब्रवीत् स्त्रिया अशास्यं मनः ॥ ऋ. ८.३-१७

स्त्रियांचें मन ताब्यांत राहूं शकत नाहीं. स्वैर राहतें. असें इंद्र म्हणतो. मनु स्त्रियांविषयीं काय म्हणतो हें सुप्रसिद्ध आहे. त्याची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. मनूनें लिहिलें हें तत्कालीन स्थितीचें द्योतक असलें पाहिजे किंवा सर्वसामान्य असलें पाहिजे.

विवाहाच्या मंगलप्रसंगीं आपण हें सूक्त आज म्हणतों. आज त्याच्या अर्थाकडे लक्ष न देतां आपण केवल वैदिक सूक्त म्हणूनच उच्चारतों. पण पूर्वकालीं त्याची सार्थकताच पूर्ण जाणिवली गेली असली पाहिजे व ते शब्द सहेतुक तेथें घातले असले पाहिजेत यांत शंका नाहीं. मामतेयानें त्या जाणिवेनेंच विवाहमर्यादा घातली यांत शंकाच नाहीं. अर्थात् मामतेय या शब्दानें तत्कालीन समाजाचाच बोध धावयाचा आहे. स्त्रीसत्ताक व स्त्रीस्वातंत्र्यपूर्ण समाजांतून स्त्रीपारतंत्र्यपूर्ण समाजांत आपलें संक्रमण झालें तें अशाच प्रकारच्या अनुभवांमुळें. स्त्रीस्वातंत्र्याचें मूळ कारण स्त्रीसत्ताक समाज. स्त्रीसत्ताक समाजाचें मूळ कारण स्वाभाविक परिस्थिति. मुलें व तदुत्पन्न गृह उभारण्याचा व संभाळण्याचा भार प्रथमतः स्त्रियांवरच पडला होता. आजच्यापेक्षां समाजासमाजांत पूर्वकालीं कलह फार. तेव्हां भिन्नभिन्न समाजांतील कलहांची जबाबदारी पुरुषांवर पडून गृह व मुलें संभाळण्याची जबाबदारी स्त्रियांवर पडली असली पाहिजे. स्त्रिया घरें तर संभाळीतच परंतु स्त्रिया युद्धांत प्रत्यक्ष भाग घेत असल्याचींहि उदाहरणें आहेत. कैकेयीप्रमाणें विश्पलेनें नवऱ्यास मदत केल्यामुळें तिचा पाय तुटून त्याऐवजीं लोखंडाचा पाय बसवावा लागला. मुद्गल ऋषीच्या बायकोनेंहि त्यास मदत केल्याचें प्रसिद्ध असून स्त्रीसैन्य लढाईत गेल्याचाहि एके ठिकाणीं दाखला आहे. स्त्रियांना पुष्कळच स्वातंत्र्य असल्याखेरीज अशी स्थिति उत्पन्न होणें शक्य नाहीं. साहजिकच स्त्रियांना स्वातंत्र्यविशेष व विवाहबंधनें किंवा नीतिकल्पना यांचा उदयच तत्कालीं झालेला नव्हता. विवाह ही संस्थाच उत्पन्न झाली नव्हती. आजहि भिल्ल समाजांत पाहिलें तरी विवाह प्रथम होत नाहीं. स्त्रिया कोणाजवळ तरी राहतात व पुढें मुलें वगैरे झाल्यावर कित्येक वर्षांनीं त्याचें विवाहांत रूपांतर होतें. हीच स्थिति पूर्वकालीं स्त्रीसत्ताक समाजांतहि असली पाहिजे. मानवमूल जन्मतः जीवनसमर्थ नसतें. पशूंची भिन्न स्थिति आहे. पाशवी प्रजा फार लवकर स्वजीवनसमर्थ होतात. मानवी मुलांना कित्येक वर्षेपर्यंत संभाळणें अवश्य असतें. व त्याकरतां घराची अवश्यकता उत्पन्न होते. स्त्रीशब्दच स्त्रियांनीं गृहसंस्था निर्माण केल्याची साक्ष देतो हें वर दर्शविलेंच आहे. या शब्दांत फार मोठा इतिहास साठविला आहे. स्त्री हें क्षेत्र असें मानलें गेलें आहे. क्षेत्राचा मालक तो क्षेत्रोत्पन्न धान्याचा मालक. तसेंच 'बीजाचा मालक तोच **स्त्रीपुत्रांचा मालक'** असा आपल्या समाजांत पुढें म्हणजे पुरुषसत्ता उत्पन्न झाल्यावर देखील नियम झाला, याचें कारण हेंच. असो. अशा तऱ्हेनें स्त्रिया मूळ गृहिणी म्हणजे गृहधनिणी असल्यामुळें व त्यांना स्वातंत्र्यहि अति असल्यामुळें त्या स्वातंत्र्याचे परिणाम स्वैर वृत्तींत फार भयंकर होऊं लागले व त्यामुळें पुरुष जसजसा या गोष्टीचा विचार करण्यास मोकळा झाला तसतसा स्त्रीस्वातंत्र्यावर व स्त्रीसत्तेवर त्यांनीं हल्ले करण्यास सुरवात केली व अखेर 'न स्त्रीस्वातंत्र्यमर्हति' असा काल व समाज उत्पन्न झाला. पशुसमान 'गावःस्थिति' होती तो काळ अतीव स्त्रीस्वातंत्र्याचा. त्यांतून वरील अनुभवानंतर स्थिति पालटली. प्रथम विवाह बंधुभगिनींत होत असत. त्यामुळेंच 'भ्रातृघ्नी' व 'पतिघ्नी'

१ पुरूरवम् उर्वशीला न वै स्त्रैणानि सख्यानि संति सालावृकाणां हृदयान्येता ॥ १०-९५-१५ असें म्हणत आहे. स्त्रिया लांडग्याच्या हृदयाच्या असतात असें एथें तो विषण्ण हृदयानें म्हणत आहे हें खरें. तरी पण तो तें स्वानुभवानेंच म्हणत असून ती जवळजवळ एक म्हण असावी अशासारखी उपमा दिसते.

शब्दांची उत्पत्ति झाली. पतिरूपी बंधु किंवा बंधुरूपी पति याला टाकून दुसरा पति करण्याचा प्रसंग आला म्हणजे तेथें घातावाचून बात नव्हती असा याचा अर्थ होतो. बंधुभगिनीविवाह बंद होण्याचें हें एक कारण असलें पाहिजे. ते बंद होण्याचीं दुसरींहि कारणें कदाचित् दिसून येतील. कारण बंधुभगिनी-विवाहामुळें प्रजेंत दोष दिसून येऊं लागले ते टाळण्याकरितांहि ते टाकणें अवश्य होतेंच. परंतु त्याचें मूळ कारण भ्रातृघात, भर्तृघात, प्रजाघात हेंच. सर्वच स्त्रिया अशा दुष्ट स्वभावाच्या किंवा दुर्वर्तनी निघाल्या असतील असा म्हणण्याचा आशय नाहीं. परंतु एकाची कृति दहाला जाचक होते. त्याप्रमाणें काहीं एका प्रमाणाबाहेर परिणाम दिसूं लागले म्हणजे तेथें बंदोबस्त करण्याचा प्रसंग प्राप्त होत असतो. प्रद्वेषी, श्वेतकेतूची आई वगैरे उदाहरणें मासल्याकरितां राखून ठेवलीं गेलीं आहेत. इजिप्त, रोम वगैरे देशांत जो प्रकार पुढें दिसून आला तोच प्रकार आमचेकडे प्राक्कालीं दिसून आला असल्यास नवल नाहीं. तिकडेहि स्त्रीस्वातंत्र्याला आळा घालावा लागलाच. आजचें पाश्चिमात्य देशांतील स्त्रीस्वातंत्र्य अलीकडचें आहे हें सर्वश्रुतच आहे. आमचेकडे तर स्त्रीपारतंत्र्याचा कळस झाला. स्त्रिया स्वातंत्र्यास बिलकुल पात्र नाहींत असेंच ठरविण्यांत आलें.

उक्तो वा सर्व वर्णानां स्त्रीणां धर्मान्निबोधत ॥ मनु. ५·१४६
बालया वा युवत्या वा वृद्धया वापि योषिता ।
न स्वातंत्र्येण कर्तव्यं किंचित्कार्यं गृहेष्वपि ॥ ५·१४७
बाल्ये पितृवशे तिष्ठेत् पाणिग्राहस्य यौवने ॥
पुत्राणां भर्तरि प्रेते न भजेत् स्त्री स्वतंत्रताम् ५-१४८
पित्रा भर्त्रा सुतैर्वापि नेच्छेद्विरहमात्मनः ॥
एषां हि विरहेण स्त्री गर्ह्ये कुर्यादुभे कुले ५-१४९

कोणीकडे तें अनावृत स्वातंत्र्य व कोणीकडे ही पारतंत्र्यपराकाष्ठा ! ! समाजाच्या घटीयंत्राचा लंबक एका टोंकाहून दुसऱ्या टोंकापर्यंत जाण्यास तशींच काहीं तरी विशेष कारणें घडून आलीं असलीं पाहिजेत यांत शंकाच नाहीं. बहुधा स्वातंत्र्याचे परिणाम स्वैरवृत्तींत व त्यांतून पुढें आपल्या भावना-आड येणारांचे प्राण घेण्यापर्यंत मजल आली असावी. मग तो पति असो, भ्राता असो, दीर असो कीं, पुत्र असो किंवा जार असो, त्यांत कोणी बारीक चिकित्सा करीत बसत नाहीं. अशा स्थितींत कोणाच्या पायाची आग मस्तकाला जाऊन भिडल्यास नवल नाहीं. व साहजिकच एका टोंकापासून दुसऱ्या टोंका-पर्यंत लंबक गेला ! अशी कांहीं कल्पना केल्याखेरीज या दोन ध्रुवटोंकांइतक्या फरकाची उपपत्ति लावतां येत नाहीं. या दरम्यान कालहि फार मोठा गेला असला पाहिजे. विशेषतः विचारांचीं बरींच आंदोलनें दरम्यान झालीं असलीं पाहिजेत. समाज कांहीं केल्या जागचा हालत नाहीं हें आपण नेहमीं पहातों. एकदां पारतंत्र्यांत खितपत पडल्यावर हें पारतंत्र्यच बरें असें पुष्कळदां वाटूं लागतें. आजच पहाना ? एकदां पारतंत्र्य आल्यावर तें घालविण्यास आज कमींत कमी पांच हजार वर्षे कांहीं पुरी पडली नाहींत ! असाच भला मोठा काळ स्त्रीस्वातंत्र्य व स्त्रीपारतंत्र्य यांतहि गेला असावा. अर्थात वेदपूर्व कांहीं हजार वर्षांपूर्वींचा हा समाज असून त्या समाजांतील फार थोडथा हालचाली वरील गोष्टींमुळें आपल्यांस दिसून येत आहेत.

स्त्रीसत्ता व स्वातंत्र्य कमी होण्याचे किंवा विवाहनिर्बंध वाढण्याचें हें एकच कारण होतें असेंहि नव्हे. Indogamy म्ह. आंतर विवाह किंवा सपिंड विवाह हे पुष्कळ वेळां प्रजेंत बहिरे-मुके-पणासारखीं व्यंगें किंवा वेड उत्पन्न करतात असें विवाहशास्त्रज्ञ हल्लीं म्हणूं लागले आहेत. (Marriage of first cousins by E. M. Elderton – Eugenics laboratory lecture series No. IV पहा.) किंवा टाइम्स ऑफ इंडियांतील १९२९ डॉ. मुन्सिफ यांचे व्याख्यानाचा सारांश पहा.) असे

अनुभव पूर्वकालीं आले नसतील किंवा नमूद केले गेले नसतील असें म्हणवत नाहीं. स्मृतींतून सपिंड विवाहाचे परिणाम 'प्रजानाश' म्हणून दिलेले आढळतातच. वर विवाहसूक्तांत 'पुत्रघ्नी' असें पद आलें आहे. त्यांत प्रत्यक्ष 'पुत्रनाशा'प्रमाणेंच अप्रत्यक्ष 'प्रजानाशा'चाहि समावेश असूं शकेल. परंतु यापेक्षां या प्रश्नाचा एथें अधिक विचार करणें अप्रस्तुत आहे. विवाहाच्या मर्यादा हळुहळु वाढत्या गेल्या आहेत. ही गोष्ट ज्यास पटेल त्यास त्या मर्यादा वाढण्याचीं कांहीं विशेष कारणें घडून आलेलीं असलीं पाहिजेत हें मान्य झालेंच पाहिजे. इतकें मान्य होऊन तो 'श्रुतिस्मृतिपुराणें' चाळूं लागेल आणि अलीकडील पाश्चिमात्यांचें एतद्विषयक संशोधन पाहील तर त्यास त्या कारणांचा शोध लागेल. असो. वेदपूर्व समाजाची ओळख करून घेतांना आपल्यास अशा अनेक गोष्टींचा वरील ग्रंथांतून तपास लागेल अशी आमची समजूत आहे. विवाहाच्या बाबतींतील आणखी एका गोष्टीचा निर्देश करून या विषयाची तूर्त रजा घेणार आहे. विवाहसूक्तांत विवाहाचे बाबतींत आर्यांचें ध्येय काय होतें तें दिसून येतें. त्या ध्येयावरून आर्यांनीं 'सुप्रजाजनन' शास्त्राकडे विशेष लक्ष दिलेलें होतें हें उघड आहे. 'सुप्रजा' या शब्दाचे त्यांनीं शक्य तितके अर्थ मानलेले दिसतात. (विवाहसूक्त पहा) परंतु त्या अर्थाशीं तूर्त आपल्यास फारसें कर्तव्य नाहीं. तथापि त्या सूक्तांतील दोन ऋचांकडे लक्ष पुरविणें जरूर आहे.

प्रेतो मुंचामि नामुतः सुबद्धाममुतस्करम् ।
यथेयमिन्द्रमीढ्वः सुपुत्रा सुभगा सति ॥ ऋ. १०-८५-२५
वीरसूर्देवकामास्योना शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥ किंवा ४४
दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि ॥ ४५ किंवा

यांपैकीं २५ व्या ऋचेंत 'या पितृकुलांतून (इतः) तुला मुक्त करतों परंतु या भर्तृकुलांतून मुक्त करीत नाहीं; तेथें 'सुबद्ध' करून टाकतों; हे इंद्रा हिला 'सुपुत्रा' कर." असें म्हटलें आहे. 'पितृकुलांतून मुक्त करून पतिकुलांत सुबद्ध करतों' असा म्हणणाराचा आशय उघड आहे. यावरून असें अनुमान निघतें कीं त्यापूर्वीं असा एक काल होऊन गेला असला पाहिजे कीं ज्यावेळीं पितृगृहाची कल्पना नसेल ( मातृसत्ताक गृहस्थितींत ) व पितृगृह उत्पन्न झाल्यावरहि कांहीं कालपर्यंत त्या घरांतून मुक्तता नसेल. तथापि ही केवळ स्वभावोक्ति नसेल कशावरून? असें कोणी म्हणूं शकेल. म्हणून सांगणें अवश्य दिसतें कीं एथवर या कल्पनेची जी अगोदरच स्वतंत्रपणें उभारणी केली आहे तिचा विचार करतां वरील अनुमानच तर्कशुद्ध आहे असें म्हणावें लागतें. 'सुबद्ध' = पूर्ण किंवा कायम बद्ध करतों या शब्दांचें देखील पूर्वेतिहासानें मर्म लक्षांत येतें. ही ऋचा मामतेय, श्वेतकेतु व यम यांनीं घातलेल्या बंधनानंतरची असली पाहिजे. एरवीं 'अमुतः न मुंचामि यथेयं सुबद्धासति (तथा कुरु हे इंद्र)' असें म्हणण्यांत कांहींच औचित्य दिसत नाहीं.

**'वीरसूर्देवकामा भव'** असें ४४ व्या सूक्तांत म्हटलें आहे. 'तूं वीरमाता हो' तुझे पुत्र 'वीर' असे उपजोत असें म्हणण्यांतील मतलब कांहीं निराळा नाहीं. पण तूं 'देवकामा' हो असें ऋषि म्हणत आहे तें मात्र विशेषतः लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या उक्तींत आर्यांचें वैशिष्ट्य दिसून येतें. 'वीरसू' व 'देवकामा' यांच्या सान्निध्यांतहि विशेष मतलब दिसून येतो. आर्य म्हणजे 'देवकाम' आणि आर्येतर म्हणजे 'भोगकाम' किंवा 'देहकाम' होय. महाभारतांत 'देवकाम आणि भोगकाम' असे मनुष्याचे द्विविध प्रकार वर्णिलें आहेत. भगवद्गीतेंतहि 'दैवी संपत्' आणि 'आसुरी संपत्' वर्णन केलेली आहे व असें म्हटलें आहे कीं

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च**

मनुष्यांचे स्वाभाविक किंवा निसर्गसिद्ध असे हे दोन भाग पडतात. एक 'दैव' आणि दुसरे 'आसुर'

एकाचे ठिकाणीं 'दया भूतेपु' असते तर दुसरे 'क्षयाय जगतोऽहिताः' जगाच्या क्षयाला प्रवृत्त व 'कामोपभोगपरम' असतात. पूर्वी आर्य आणि दास या शब्दांचें विवेचन करून असें ठरविलें कीं आर्य हे परित्राण करणारे तर दास हे प्रजापीडक आहेत; हे दोन वर्ण नव्हेत. दास कृष्ण वर्णाचे म्हणजे कृष्ण कातडीचे म्हणून कोणी वर्णन करीत असतील. परंतु वास्तविक ते 'कृष्णहृदय' होत. वेदांत जिकडे तिकडे आर्येतर 'दास' 'अदेव' 'अयजक, अभक्त' अशा लोकांवर शस्त्र उपसलेलें आहे. ते आर्येतर म्हणून कोणी विशिष्ट जातीचे, वर्णाचे, देशाचे लोक असे नसून आपल्या देशांतील वा परदेशांतील, आपल्या धर्मांतील वा परधर्मांतील, आपले बांधव वा अबांधव पण प्रजापीडक लोक असा वेदाचा, भगवंताचा आणि भारतकारांचा तरी अभिप्राय दिसतो. आणि भागवतकारांनीं म्हटल्याप्रमाणें भारत हे वेदार्थ समजावून देण्याकरितां, आपल्या संस्कृतीचें व परंपरेचें यथार्थ ज्ञान करून देण्याकरितां लिहिलें गेलें असेल तर या अर्थात परंपरेचा भाग असला पाहिजे. अर्थात विवाहित स्त्रीला 'देवकामा' हो असें सांगण्यातील हेतु 'देहकामा' न होण्याचें आर्यांचें व्रत तूं धारण कर; तूं कामोपभोगपरमा किंवा देहकामा किंवा भोगकामा होऊं नको असा आहे. आर्यांचा हा कटाक्ष आहे व तो अत्यंत प्राचीन आहे. आर्यांच्या ह्या कटाक्षाविरुद्ध आसुरांची प्रवृत्ति होती. एक 'प्रवृत्तिं च निवृत्तिं च न विदुः' असे तर एक 'निवृत्तीकडे' झुकलेले. एक पशुसमान तर एक देवसमान होत. हें आर्यांचें वैशिष्टय किंवा ध्येय किंवा धर्मच. यांत आर्यांची तेजस्विता आहे. आर्यांचें हें वैशिष्टय कळल्याशिवाय आर्यांच्या ग्रंथांचा अर्थ व मतलब कळणार नाहीं. आर्य किंवा आर्यांचे देव ज्या मूळ पशुसमान आसुर समाजांतून विकास पावले त्या आर्यपूर्व किंवा आसुर समाजाचें हें ध्येय नव्हतें. देव हे कनिष्ठ, देव हे तेजस्वी, देव हे थोडे, देवासुरांचें सदोदित युद्ध, त्यांत देव प्रथम पराभव पावतात, परंतु मागाहून त्यांच्यातील व असुरांतील भिन्नत्व जसजसें लोकांना समजतें तसतसे देव विजयी होतात. या सर्व कथांचा या कल्पनेनें जसा उलगडा होतो तसा इतर कल्पनांनीं होत नाहीं अशी माझी समजूत असल्याकारणानें एथवर कांहींसा पुनरुक्तीचा दोष पदरांत घेऊनहि हें विवेचन केलें आहे. 'निर्बंध' हा 'आर्यधर्माचा' प्राण आहे.

**न मांसभक्षणे दोषः न मद्ये न च मैथुने। प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला।**

या मानवोक्तींतहि हाच तथ्यांश आहे. आपण पशुकोटींतून देवकोटींत जावें अशी आर्यांची महत्त्वाकांक्षा आहे. त्या महत्त्वाकांक्षेचें शिक्षण या विवाहसूक्तांत मुलीला देत आहेत असा भास होतो. अशा या स्त्रीला 'दहा पुत्र होवोत', 'पतीसह ती अकरावी होवो' असें ४५ व्या सूक्तांत म्हटलें आहे. आर्यांना सुपुत्र पाहिजेत, ते वीर पाहिजेत, ते बहु पाहिजेत, व ते देवकाम म्हणजे स्वसंस्कृतिसंपन्न पाहिजेत. असा एथें संकल्प आहे. आर्य 'अष्ट' नव्हे तर 'दश' पुत्र मागत, ते Birth-control किंवा संतति नियमनाचे भोक्ते नव्हते. आणि उघडच आहे, सामान्यतः मनुष्य हा पशुसमान भोगकामी होय. अशा मनुष्याला पुष्कळ संतति होतच असते. अशा अखेर 'क्षयाय जगतः' प्रवृत्त होणाऱ्या असुरांवर ते अल्पसंख्येनें आपला वरचष्मा कसा बसवूं शकतील ? कित्येक लोक असें समजतात कीं हिंदुस्थानासारख्या नवीन ओसाड व परक्या देशांत आल्यामुळें तेथील मूळच्या लोकांना पादाक्रांत करण्याकरितां व सबंध देशभर वसती करण्याकरतां त्यांना बहुपुत्रांची अवश्यकता वाटत होती. मला वाटतें कीं जगांत 'देवकाम' अशा सुष्ट लोकांची नेहेमींच अत्यल्पसंख्या असते. ती संख्या वाढावी असा त्यांचा हेतु होता. त्यांना नुसते दशपुत्र नको होते. दशपुत्र वीर व देवकाम असे पाहिजे होते. हिंदुस्थानचे मूळ रहिवासी 'दास' म्हणून कोणी लोक होते, त्यांचा पाडाव करण्याकरितां हे बहुसंख्य वीर पाहिजे होते असा जो कित्येकांचा समज आहे तो फोल आहे. आर्य एथील मूळचे रहिवासी असोत किंवा बाहेरून आलेले असोत. ते कोठलेहि असले तरी त्यांचें ध्येय 'देवकाम' होण्याचें, उच्च दशेला जावयाचें, मानवांहून श्रेष्ठ असे देव होण्याचें. साध्य हे मूळ मानव पण देव झालेले असा इतिहास वेदांत आहे. त्या साध्य देवांचें वसतिस्थान स्वर्ग. त्या

स्वर्गाप्रत देव जाऊं इच्छित, असें यज्ञेन यज्ञमयजंत देवाः ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र साध्याः सन्ति देवाः ॥ १०-९०-१६ ही ऋचा सांगते. देवांनीं यज्ञ केला आणि ते महात्मे साध्य देवांच्या स्थानाला म्हणजे स्वर्गाप्रत पावले असें येथें म्हटलें आहे. हा 'यज्ञ' सृष्ट्युत्पत्तीबरोबरच उत्पन्न झाला व तो 'इष्टकामधुक्' व्हावा अशी प्रजापतीची इच्छा होती असें भगवान् श्रीकृष्ण म्हणतात. यज्ञ किंवा त्याग किंवा निवृत्ति हा या देवांचा विशेष असें या ठिकाणीं प्रतिपादन केलें असून तेंच ध्येय देवकाम अशा आर्य मानवांनीं मानलें व हेंच नवयुवतीला गृहप्रवेशारंभीं सांगितलें अशी माझी समजूत आहे. असा इतिहास व असें हें तत्व या 'देवकाम' शब्दांत सांठविलेलें आहे. वेदांचा व पुराणांचा अभ्यास होईल तसतसा आपल्या धर्माचा उज्ज्वल इतिहास व संस्कृतीची महति सर्वांसच अधिकाधिक प्रतीत होईल असा भरंवसा वाटतो.

---

# वागर्थविहार

( लेखकः—गो. कृ. मोडक. )

## पाहिजे

१ **व्युत्पत्ति**—'पाहिजे' हें रूप मराठींतील 'पाह' या धातूचें कर्मणि वर्तमानकाळ, तृ॰पु॰ ए॰ वचनाचें दिसतें. याची व्युत्पत्ति प्रार्थ् किंवा प्राह् अशा संस्कृत धातूंशींहि जोडितात. अशाप्रकारें पाह–प्रार्थ्–प्राह्–अशा तीन धातूंचें कर्मणि रूप म्हणून निरनिराळ्या लोकांकडून हें मानण्यांत येतें. पैकीं रूपतः विचार करितां यांचा क्रम पाह–प्राह्–प्रार्थ् असा ठरतो. अर्थतः विचार करितां, याचा क्रम ठरतो तो प्रार्थ्–पाह–प्राह् असा. अशा रीतीनें रूपार्थतः विचार केल्यास प्राह् त्याज्य ठरतो, तर पाह–प्रार्थ् हे तुल्यबलप्राय वाटतात. तरी पण पाहिजे हें रूप पाह–वरून प्रत्यक्षच बनत असल्यानें, म्हणजेच 'पाहिजे' हें रूप पाह–च्या कर्मणि रूपाशीं अभिन्नच असल्यानें, पाह या मराठी धातूपासूनच पाहिजे हें रूप साधणें सापेक्षतया प्रशस्ततर दिसतें. त्यांत गुजराथी भाषेंत तपास करितां, ही व्युत्पत्ति संशयातीतच ठरते. गुजराथी 'जो' धातूचा अर्थ पाहणें (नेत्र व्यापार) असा असून जोइ-ये या कर्मणि रूपाचा अर्थ बरोबर मराठींतील पाहिजे-शीं समान होतो. म्हणजे पाहणें एतदर्थक धातूचे कर्मणिरूपाचा प्रयोग 'अपेक्ष्यते,' 'जरूरीचा आहे,' अशा अर्थी होणें या मराठींतील स्थितीस गुजराथीचा दाखला मिळतो. तेव्हां पाहिजे हें रूप मराठी 'पाह' धातूचें कर्मणि रूप होय, हें सिद्ध होतें. देख देखिजे, राह राहिजे, इत्यादि जुन्या कर्मणि प्रयोगाचीं उदाहरणें भाषेंत क्वचित् आढळतात. त्यांच्याच धर्तीवर पाहिजे हें रूप बनलेलें आहे.

२ **पदसंमर्श**—( अथवा Parsing ) ( क ) मला स्वातंत्र्य पाहिजे. या वाक्यांतील पदांचा संमर्श कसा करावा ? पाहिजे हें रूप आपण स्वयंसिद्ध म्हणूनच मानणार. णें–तां–ऊन–ला–ईल–वा इत्यादि प्रत्ययान्त रूपें पाहिजे यांतील धातूचीं ( अर्थाचा विचार करितां ) बनलेलीं भाषेंत नाहींत. पाहिजे हें एकाकीच रूप भाषेंत आहे. त्यांत फक्त पुरुषवचनानुरूप फरक होतो. पाहिजेस, पाहिजेत इ॰ रूपांत पुरुषवचनानुरोधें रूपविकार झालेला आढळतो. पुरुषवचनावांचून बाकीचे धर्म स्थिर आहेत. अर्थात् संमर्शामध्यें ते सांगण्याचें कारण नाहीं. पाहिजेचा अर्थ इष्ट, अवश्यक असणें असा केला म्हणजे पाहिजे हें रूप कर्तरि ठरून स्वातंत्र्य इ. प्रथमान्त शब्द कर्ते ठरतात. तेव्हां प्रस्तुत वाक्याचा संमर्श ठरतो तो असा. **मला** मी प्र. पु. सर्वनाम, पुं. ए. चतुर्थी, अधिकरण पाहिजे--चें. पाहिजे--नें अपेक्षा, इच्छा, जरूरी इत्यादि धर्म बोधित होतात; या सर्वांचें अधिकरण येथें मी ही व्यक्ति आहे. करितां येथील चतुर्थी अधिकरणार्थी ठरते. **स्वातंत्र्य**–स्वातंत्र्य, भाववाचक नाम, न.ए. प्र., अर्थ कर्ता पाहिजे-चा. **पाहिजे** स्वयंसिद्ध क्रियापद (अकर्मक, करणरूप, स्वार्थ, वर्तमानकाळ, सामान्यलिंग, कर्तरि) तृ. पु. ए. याचा नायक स्वातंत्र्य.

३ (ख) मला गेलें पाहिजे, येथें पूर्ववत् मला ही अधिकरणार्थी चतुर्थी आहे. पाहिजे–चा संमर्शहि पूर्वीप्रमाणेंच. गेलें हें धातुसाधित विशेषण, नामासारखें प्रयुक्त, ए. व. प्रथमा, अर्थ कर्ता पाहिजे-चा.

शंका—**गेलें** हें विशेषण कसें ? **समाधान**–मला वृक्ष तोडिले पाहिजेत. या वाक्यांत तोड धातू सकर्मक असल्यानें त्याचें ल-साधित कर्मणि झालें असून वृक्ष-शीं सधर्म आहे. तेथें 'तोडिले' पुं. ब. व. कां ? याचें उत्तर, वृक्ष हा शब्द पुं. ब. व आहे म्हणून, हें होय. सारांश येथें हें ल-साधित विशेषण आहे. ल-साधित स्वभावतःच कर्मणि असतें. तेव्हां सकर्मक धातूत्पन्न असल्यास तें कर्मगामी असणारच. धातूस कर्मच नसल्यास, अगतिक होऊन, तें कर्तरि किंवा भावे बनतें. येथें गेलें कर्तरि नाहीं, तसें असतें





अनुक्रमणिका

तर तें पुं. झालें असतें. तेव्हां न. लिं. असल्यानें तें भावे आहे. यामुळेंच असलें अकर्मक धातुज ल-साधित नित्य न. लिं. ए. वचनीच असतें. धातुसाधित भावे आहे असें म्हणणें काय, किंवा तें विशेष्याभावीं नाम व तत्प्रयुक्त आहे असें म्हणणें काय एकच. सारांश मुळचें विशेषण असल्यानें **ल-साधित** नामाचें कार्य (जसें, कर्ता होणें) स्वतां न पतकरितां, तें आपल्या विशेष्याकडे देतें. विशेष्याच्या अभावीं मात्र, त्यास नामासारखें वागावें लागून कर्ता वगैरे व्हावें लागतें, हा नियम धातुसाधितासंबंधीं लक्षणीय आहे. **स्वतांच्या जातीस न झेपणारें कार्य, धातुसाधित यावच्छक्य टाळितें** अशा रीतीनें हें धातुसाधित मुळचें विशेषण असून प्रस्तुत ठिकाणीं नामवत् प्रयुक्त होऊन कर्ता बनलें आहे.

४ (ग) मला वृक्ष तोडिले पाहिजेत. मला पूर्ववत् अधिकरणे चतुर्थी. वृक्ष कर्ता पाहिजेत- चा. तोडिले ल-धातुसाधित विधेयांग विशेषण. याचें विशेष्य वृक्ष. 'गेलें पाहिजे' व 'तोडिले पाहिजेत' या दोन्ही ठिकाणीं अपेक्षित काय आहे याचा खोल विचार केल्यास, पूर्वत्र जाणें, व उत्तरत्र तोडणें हींच उत्तरें येतील. गेलें पाहिजे व तोडिले पाहिजेत या दोन्ही ठिकाणीं क्रिया नामानें उक्त न होतां, विशेषणानें उक्त आहेत. विशेष्य सापडल्यानें, तोडिले-नें त्यास कर्ता केलें, व स्वतां विशेषण म्हणून राहिलें. विशेष्याचे अभावीं गेलें-स स्वतांच कर्तृपद स्वीकारावें लागलें, व तदर्थ नामकार्य करावें लागलें. म्हणूनच त्यास नामवत् प्रयुक्त असें आपण म्हटलें आहे.

५ (घ) पाऊस पडला पाहिजे, मुलांना,-मुलांनीं लवकर उठलें पाहिजे. **पाऊस** कर्ता पाहिजे-चा. **पडला** विधेयांग विशेषण, याचें विशेष्य पाऊस. **मुलांना** चतुर्थी, अधिकरण, पाहिजे-चें. **उठलें** ल-धातुसाधित, नामवत् प्रयुक्त, पाहिजेचा कर्ता. **मुलांनीं** तृतीया, कर्तरि उठलेंचा कर्ता.

(६) (च) मला आलें पाहिजे, येथें **आलें** (सुंठीची प्रकृती) हें द्रव्यनाम, न. लिं. ए. व. प्रथमा, कर्ता पाहिजे चा.

**सारांश**—अशा रीतीनें आपण पाहिलें कीं, (१) पाहिजे हें पाह्-चें कर्मणि रूप आहे; अर्थात् कांहींसा बदल झाला आहे. पाहणें-चा 'अपेक्षा करणें हा लाक्षणिक अर्थ येथें आढळतो. गुजराथी भाषेंतहि असाच प्रकार आहे. (२) पाहिजे बरोबर येणारें ल-धातुसाधित सकर्मक धातुज असल्यास, कर्मणि विशेषण असतें. अन्यथा तें नामवत् प्रयुक्त होतें. अगतिक म्हणुन नामवत् प्रयुक्त होणारें, हें विशेषण भावेनाम बनतें, त्यामुळें न. लिं. ए. व. हे धर्म तें कधींच सोडीत नाहीं.

## हरिहरांचें ऐक्य

१ आपल्या पुराणांतून शिव व विष्णु हे मुख्य दोघे देव म्हणून वर्णिले आहेत. त्यांमध्यें भेद नसून, ते एकरूपच आहेत असेंहि मानण्यांत येतें. हें एकत्र सिद्ध करण्याचे प्रयत्न अनेक रीतींनीं करितात. भाषेची सरणी सुद्धां हें ऐक्यपोषणाचें काम करिते, असें दिसतें. हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

२ एखाद्या मुलाचें नांव **हरी** असें ठेवण्यांत येतें. मोठेपणीं तो गृहस्थ बनल्यावर त्यास हरिपंत म्हणतात. पण तोच जर भिक्षुक झाला, तर त्यास हरभट असें म्हणतात. यावरून हरी तोच हर हें सिद्ध होतें. शिवाय यांत उदरवृत्तीचे गुणानुरूपच हा नांवांतील फरक पडतो, असें दिसतें. विष्णूची राहणी गृहस्थी बाण्याची, तर शंकराची राहणी भिक्षुकी बाण्याची हें सर्वसंमतच आहे.

३ वरील ऐक्य हरी व हर या दोन नांवापुरतेंच न राहतां, तें महादेव व माधव यांतहि दिसून येतें. महादेव गृहस्थ झाल्यावर त्यास माधवराव, उलट माधव भिक्षुक झाल्यास त्यास महादेव भट असें म्हणतात. यावरून महादेवाचा माधव, व माधवाचा महादेव बनतांना आढळतो. अर्थात् असा फरक ऐक्यमूलकच असणार.

यावरून हरिहरांचें ऐक्य आपल्या भाषेच्या सरणीनेंहि सिद्ध होतें. करितां आपण मराठी भाषा बोलणाऱ्यांनीं शैव व वैष्णव या भेदास थारा देतां कामा नये, हें उघडच आहे.



अनुक्रमणिका

## अनुस्वार, विसर्ग व अनुनासिक यांचीं वर्णमालेंतील स्थानें.

**१ अननुनासिक व अनुनासिक**—दांत ( तोंडांतील ) व दांत ( इंद्रियदमनशील ) या दोन शब्दांस पौर्वापर्य कसें करावें ? अगोदर कोण व नंतर कोण ? आ हा स्वर दोहोंत आहे; पण एकांत तो अनुनासिक आहे, तर दुसऱ्यांत अननुनासिक आहे. अर्थात् या दोहोंचा विचार करितां अननुनासिक स्वर अगोदर, व अनुनासिक नंतर, हें उघड आहे. यावरून असें ठरतें कीं, ( अननुनासिक किंवा ) साधा स्वर ज्यांत आहे असे शब्द झाल्यानंतर अनुनासिक स्वर असलेले शब्द लिहावे. या तत्वानुसार क्रम ठरतो तो दांत ( मनोनिग्रही ), नंतर दांत ( तोंडांतील ).

**२ व्यंजनें व अनुस्वार**— अनुस्वार व विसर्ग यांस कौमुदींत शषस-यांचेबरोबर गणिलें आहे. ते व्यंजनें आहेत, हें तर उघडच आहे; कारण स्वराचे मदतीशिवाय त्यांचा उच्चारच शक्य नाहीं. स्वतः उच्चारास अक्षम असणें, पराधीनोच्चारता, हें व्यंजनाचें लक्षणच आहे. करितां अनुस्वार व विसर्ग हीं व्यंजनें खरीं, पण व्यंजनांत त्यांचीं ठिकाणें कोणतीं ? याचें कौमुदींतील उत्तर दिलेंच आहे,-शषस यांचेबरोबर. व्यवहारदृष्टीनें यांत थोडा फरक करून, शषसहळ यांचेनंतर म्हणजे व्यंजनांमध्यें अगदीं शेवटीं त्यांस स्थानें द्यावीं, असें प्राप्त होतें. म्हणजे कपाळ, कळवणें, कंगाल, कंस, कःपदार्थ, इत्यादि क्रम ठरला.

**३ अनुस्वार व परसवर्ण अनुनासिक**—संगम व सङ्गम या शब्दांत पहिल्यांत अनुस्वार, व दुसऱ्यांत परसवर्णानुनासिक, मानण्यांत व लिहिण्यांत आला तरी, या दोहोंचा उच्चार सारखाच होतो. निदान हल्लींतरी अनुस्वार व परसवर्णानुनासिक यांत उच्चारभेद मानण्यांत येत नाहीं. करितां लेखनसुलभतेसाठीं परसवर्णानुनासिकाचे स्थानीं सर्वत्र ( यावच्छक्य ) अनुस्वारच आदरणें योग्य दिसतें. असा अनुस्वार आदरिला म्हणजे अनुस्वारयुक्त शब्दांचा क्रम लागणार तो केवळ पुढील व्यंजनानुसार हेंहि उघड आहे. करितां क यांतील अकारापुढें प्रथम क्–ळ् हीं व्यंजनें, नंतर अनुस्वार हें साहजिक दिसतें. तेव्हां क्रम ठरतो तो असा कच,कट,कपि,कमळ,कर, कळ, कंक, कंठ, कंप, कंस इत्यादि

**४ सारांश**--शब्दांचा क्रम लावितांना पुढील धोरण आदरणीय ठरतें. ( १ ) कादिशब्दांचा विचार करितांना प्रथम क नें आरंभ पावणारे शब्द पुढील व्यंजनाचे क्रमानें (२) नंतर कं. असे सानुस्वार कनें आरंभ पावणारे शब्द पुढील व्यंजनाचे क्रमानें (३) नंतर कःनें आरंभ पावणारे शब्द व (४) शेवटीं कँ म्हणजे अनुनासिक -क ने आरंभ पावणारे शब्द. अर्थात् पुढील व्यंजनाचे क्रमानें ध्यानांत ठेवण्याचें तें हें कीं-क, कं , कः कँ अशा क्रमानें शब्द प्रथम लावून. नंतर प्रत्येक समुदायाचे पोटांतील शब्द पुढील व्यंजनाचे क्रमानें लावावे. अननुनासिक, सानुस्वार, सविसर्ग, अनुनासिक असा क्रम ठरतो. येथें कँ यांतील ँ हें चिन्ह अनुनासिकाचें दर्शक आहे, हें लक्ष्यांत येईलच. या संबंधांत 'शुद्धश्च सानुस्वारश्च सविसर्गोऽनुनासिकः' ही पंक्ति लक्ष्यांत ठेवावी.

## यरलव कीं यवरल ? यवरल हा क्रम प्रशस्त दिसतो.

**१ आपली वर्णमाला**:— आपली वर्णमाला विशिष्टतत्त्वानुसार रचिलेली आहे; इंग्रजीसारखी तिची मांडणी स्वैर नाहीं. a, b, c, d, e, इ० मध्यें पहिला स्वर आहे, तर दुसरें ओष्ठ्य व्यंजन, तिसरें कंठ्य किंवा दन्त्य, चवथें मूर्धन्य, पांचवा स्वर इ० यांत कोणताहि क्रम विवक्षित नाहीं. अशी स्थिति आपल्या वर्णमालेची नाहीं. वर्ण उच्चारले जातांना जिभेचा स्पर्श मुखांतील भिन्न भिन्न ठिकाणीं होत असतो- कांहीं ठिकाणीं जिभेचें मूळ लागतें, कांहीं ठिकाणीं मध्य, तर कांहीं ठिकाणीं अग्र. जिभेच्या या निरनिराळ्या भागांनीं स्पर्शिल्या जाणाऱ्या मुखांतील स्थानांचा आरंभ कंठापासून होतो. त्यांतील ओठ हें शेवटलें स्थान होय. ही क्रमवार स्थानें म्हणजे कंठ, तालु, मूर्धन्, दांत, ओठ. याच क्रमास अनुसरून व्यंजनांपैकीं स्पर्शांची रचना आहे. स्पर्श म्हणजे क-पासून म-पर्यंत व्यंजनें. कवर्ग कंठस्थानचा,

चवर्ग तालुस्थानचा, इ०. ही स्पर्शांची व्यवस्था स्थानक्रमानुसार असली तरी, स्वरांची व्यवस्था तशी नाहीं. कंठ्य अकारानंतर तालव्य इई प्राप्त आहेत. त्यांचेनंतर दन्त्य लृ व पुढें ओष्ठ्य उऊ. परंतु हा क्रम मोडून, उऊ हे इईनंतर घेतले आहेत. याचें कारण काय ? इईचे बरोबरीनें उएचा प्रचार, महत्त्व व विकारसादृश्य आहे. जसें ऋ-लृ यांमध्यें विकारसादृश्य आहे, तसें इ-उ मध्यें. यामुळें इ-उ, ऋ-लृ अशा जोड्या पडतात. या जोड्यांची पर्वा केल्यानें स्वरव्यवस्थेंत स्वाभाविक स्थानक्रम बदलावा लागला. स्पर्श स्वर यांचेनंतर अन्तस्थ व उष्मवर्ण इ०चा विचार करूं.

**२ सांनिध्य कीं व्यवहार ?**—यवरल हे चार अंतस्थ किंवा अर्धस्वर यांचें ग्रथन करितांना दोन मार्ग आढळतात. एक स्वाभाविक मुखस्थानक्रम व दुसरा स्वरानुसारी. स्वाभाविक तोच स्पर्शानुसारी क्रम होय. स्पर्शास अनुसरावें तर, यरलव, चटतप या वर्गांचे अनुरूप अर्धस्वर यरलव; इउऋलृ या स्वरांचे अनुरूप यवरल होतात. अशा स्थितींत अर्धस्वरांनीं कोणता क्रम स्वीकारावा ? सांनिध्य पाहिल्यास स्पर्शांचें, आदेशद्वारा नातें पाहिल्यास स्वरांचें आढळतें. स्वरांनंतर स्पर्श, स्पर्शानंतर अर्धस्वर. तेव्हां स्पर्श जवळचे. पण वारंवार अर्धस्वरांची स्वतांच्या जागेची देवघेव होणार ती स्वरांशीं. गाय-गाई, देऊळ-देवळांत इ० ठिकाणीं स्वर व अर्धस्वर यांमध्यें जागेची देवघेव होते. तेव्हां सांनिध्य व नातें किंवा व्यवहार यांमध्यें तेढ उत्पन्न झाली. अशा स्थितींत आपण व्यवहारालाच जास्त महत्त्व देतों. या महत्त्वास अनुसरून आपण यवरल असा क्रम स्वीकारिला पाहिजे.

**३ आधारान्वेषण**— यावरील व्यवहाराधिष्ठित क्रमास आधार पाहूं जातां, दोन ठिकाणीं आढळतात. कौमुदींतील 'य र ल वा अन्तस्थाः' हा भट्टोजीदीक्षितांचा पाठ, व 'हयवरट्लण्' हा माहेश्वर सूत्रांतील पाणिनीचा पाठ. पैकीं कोणताच आपणांस पोषक ठरत नाहीं . (१) य र ल व हा तर उघड उघड विरुद्ध आहे. (२) यवरट् लण् अनुकूल दिसला तरी तसा तो मानितां येत नाहीं. कारण या माहेश्वरसूत्रांतील रचना मुखस्थानाच्या स्वाभाविक क्रमास अनुसरून मुळींच नाहीं. अष्टाध्यायींत पदोपदीं लागणाऱ्या प्रत्याहारांची रचना होईल तितकी सोपी व संक्षिप्त करितां यावी, हेंच माहेश्वर सूत्रांतील वर्णक्रमाचें धोरण आहे. 'इको यणचि' इत्यादि सूत्रांस क्रमवार आदेश व्हावे एतदर्थ ही रचना आहे. या रचनेंत आपला क्रम जरी आदरिलेला दिसला, तरी तसा तो इतरत्र नाहीं. ञमङणनम् यांत हे ञम् अगोदर घेतले आहेत, ते केवळ ञम् हा प्रत्याहार (ञम्वर्जे) साधावा म्हणून. हीच दृष्टी इतरत्रहि सर्वत्र आढळते. तेव्हां तीच हयवरट्लण् या ठिकाणीं प्रभावी मानली पाहिजे. सारांश माहेश्वर सूत्रांतील क्रम आपणास अनुकूल वाटत असला तरी, तो तसा घेतां येत नाहीं. त्याचें क्रमतत्त्व अगदींच भिन्न आहे. (३) वहिवाट पाहतां ती यरलव अशी आहे; तीहि आपले क्रमाविरुद्धच आहे. सारांश यवरल या आपण व्यावहारिक ठरविलेल्या क्रमास भट्टोजीदीक्षित व वहिवाट हे दोन आधार विरुद्ध आहेत, भगवान् पाणिनी उदासीन आहेत, तर व्यवहारसौकर्य मात्र अनुकूल आहे.

## गुण व वृद्धि या संज्ञा.

रामेश्वर शब्द राम + ईश्वर असा बनला आहे. यांत अ+ई = ए झाला आहे. म्हणजे ए-चे घटक अ व ई किंवा इ हे ठरतात. दोरीहि प्रायः दोन पेडांची बनलेली असते. पेड हे दोरीचे घटक. दोरीला गुण अशी संज्ञा आहे. तेव्हां असें दिसतें कीं ए-सारख्या स्वरांचें साम्य दोरीशीं कल्पून तीस तदर्थक गुण शब्द लावण्यांत आला असावा. सूर्य + उदय = सूर्योदय. देव + ऋषि = देवर्षि. अशा रीतीनें संस्कृतांत ए, ओ, अर् यांस गुण संज्ञा देण्यांत आली आहे. अर्-चे साम्यानें अल् यास हीच संज्ञा प्राप्त झाली आहे. आतां दोन पेडांचें दोरीची (जाडीची) वृद्धी तिसऱ्या पेडानें होते. अ + ए = ऐ असें होतें. दुपेडी दोरीची तिसऱ्या पेडानें (जाडींत) वृद्धी होते. तिपेडी दोरी ही दुपेडीची वाढच होय. द्विस्वरघटित ए या स्वरामध्यें अ या तिसऱ्या स्वराची भर पडल्यानें ऐ हा स्वर सिद्ध होतो. ए-ला जर साधी दोरी असें म्हटलें तर ऐ-ला वाढलेली दोरी अशी संज्ञा क्रमप्राप्त होते. यांतील 'वाढलेली' या कल्पनेला अनुलक्षून ऐ-ला वृद्धी ही संज्ञा लावण्यांत आलेली दिसते. जल + ओघ = जलौघ. ऐऔचे धर्तीवर आर् व आल् यांनाहि वृद्धी हीच संज्ञा देण्यांत आली आहे. अशा रीतीनें व्याकरणांतील संज्ञा गुण = (दुपेडी दोरी) व वृद्धी ( = जिची जाडी वाढली आहे अशी दोरी) ए, ओ, ऐ, औ अशा संयुक्त स्वरांस लावण्यांत आलेल्या दिसतात.

# पारिभाषिक शब्दकोश

## प्रकाश–प्रकरण

महाराष्ट्र-शास्त्रीय-परिभाषामंडळाकडून वास्तव शास्त्रांतील परिभाषेच्या चर्चेकरितां जें उपमंडळ नेमलें गेलें त्या उपमंडळाच्या सभांमध्यें बराच ऊहापोह होऊन प्रकाश-प्रकरणांतील ज्या पारिभाषिक संज्ञा मान्य झाल्या त्यांपैकीं एक यादी पुढें दिली आहे. खरोखर पाहतां पारिभाषिक संज्ञा त्यांच्या व्याख्यांसह जितक्या दिल्या जातील तितक्या चांगल्या; परंतु ही पाहिरी गाठण्याच्या अगोदरची पाहिरी म्हणून विद्वज्जनांच्या अभिप्रायार्थ सध्यांची यादी नुसती इंग्लिश प्रतिशब्दांसह दिली आहे. पुढील प्रकरणें क्रमशः प्रसिद्ध करण्याचा बेत आहे; तरी या विषयांत लक्ष घालून विद्वज्जनांनीं आपल्या सूचना व अभिप्राय कृपा करून मंडळाकडे पाठवावे अशी विनंती आहे.

ता. १३।५।१९३०
शनवारवाड्याजवळ
विनीवाले यांचा वाडा

चिटणीस
म. शा. परिभाषामंडळ
पुणें

Luminous object = भास्वत् पदार्थ
Rectilinear Propagation = सरलमार्गित्व
Geometrical optics = किरणात्मक प्रकाश-विचार
Physical optics = वास्तव प्रकाश-विचार
Ray = किरण
Parallel Beam = किरण-शलाका
Cone of Rays = किरण-शंकु
Convergent = अभिसारी, एकाग्र
Divergent = विसारी, व्यग्र
Shadow or Umbra = छाया
Penumbra = उपच्छाया, छायाकल्प
Object, Image = रूप, प्रतिरूप
Well-defined = स्पष्ट, सुरेख
Ill defined or Confused = अस्पष्ट, संकुल
Inverted, Erect = पर्यस्त, ऋजु ( अपर्यस्त )
Magnified, Diminished = वर्धित, क्षपित
Reflection = परावर्तन
Diffused Reflection = विकिरण
Diffused Light = विकीर्ण प्रकाश
Returning on itself ( Ray ) = निवर्तन, प्रत्यावर्तन

Total Internal Reflection = व्यावर्तन
Angle of Incidence = आगम–(कोन)
Angle of Reflection = परागम–(कोन)
Surface, Normal = पृष्ठ, काष्ठा
Interface = भेदक पृष्ठ
Reflector, Mirror = परावर्तक, आरसा
Reflectors, Shades = परावर्तक, प्रावारक
Plane (Mirror) = सतल, सपाट (आरसा)
Concave, Convex = खमध्य, उन्मध्य ( खोलगट, फुगट )
Rotation (of mirror) = परिवलन
Pole (of a mirrorr or Lens) = मध्य
Centre of Curvature = नाभि
Radius of Curvature = अरित्र
Conjugate Focii = केंद्र–प्रतिकेंद्र, युगल [ केंद्र–प्रतिकेंद्रभाव, युगलत्व ]
Reversibility of Rays = समावर्तनीयता
Principal focus = मुख्य केंद्र, प्रकेंद्र
Axis = अक्ष
Principal axis = प्राक्ष
Principal section = प्रच्छेद
Focal Length = आयमन

Refraction = परिवर्तन ( वक्रीभवन )
Angle of Refraction = परिगम (कोन), ( परिवर्त-कोन )
Index of Refraction = परिवर्तन गुण
Refractive Index = परिवर्तनाङ्क
Optically dense or rare = प्रकाशदृष्ट्या घन, विरल [घन–विरलभाव ]
Angle of Emergance = निर्गम-(कोन)
Angle of Deviation = अपगम-(कोन)
Lateral ( Parallel ) Displacement = सदिश मार्गांतर
Prism = लोलक ( परशु)
Edge of Prism = लोलकधारा ( परशुधारा )
Minimum Deviation = अल्पिष्ठ अपगम
Dispersion = वर्णभङ्ग
Appearance, Disappearance of colour = वर्णव्यक्ति, वर्णलोप
Recomposition of colour = वर्णसंधान, पुन:संधान
Spectrum of colours = वर्णपट, वर्णाली; वर्णावळ ( वर्णावलि)
Continuous spectrum = अखंड वर्णाली
Band Spectrum = खंडित वर्णाळी
Line spectrum = रेखांकित वर्णाली
Dark Lines (Fraunhofer lines) = कृष्णरेखा
Lens = यावक ( भिंग ) यु = जुळणें, जुळविणें
Converging, Diverging Lens = अभियावक, वियावक ( फुगट, खोलगट )
Plano-Concave, Plano-Convex = सतल-निम्न, सतलोन्नत (खोलगट-सपाट, फुगट-सपाट)
Double Concave, Double Convex = द्विधानिम्न, द्विधोन्नत ( दुहेरी खोलगट, दुहेरी फुगट)
Diverging Meniscus = वियावक निम्नोन्नत (चंद्रकोर)
Converging Meniscus = अभियावक निम्नोन्नत (चंद्रकोर)

Optical centre of Lens = (यावक) गर्भ
Power of Lens = (यावक-)प्रभाव
Magnification = वर्धन
Illuminating power = दीप्ति
Source of Illumination, Lamp = दीप्तिस्थान, दीपक
Photometry = दीप्तिमापन
Luminous Flux = प्रभा
Illumination (Intensity of Illumination) = प्रभास
Inverse square Law = व्यस्तवर्गनियम
Brightness of surface = भास्वरता
Photometer = दीप्तिमापक
Illuminometer = प्रभासमापक
Emission Theory ( Corpuscular Theory) = रज:किरण–कल्पना
Undulatory Theory, Wave Theory = तरंग – कल्पना
Aberration of Light = प्रच्यवन
Spherical aberration = अनुगोलच्यवन
Chromatic aberration = अनुवर्णच्यवन
Achromatic Lens = अच्युत यावक
Periodic Motion = आवृत्त गति
Simple Harmonic Motion = सरलावृत्त गति
Uniform Motion = एकजव गति; सजव गति
Circular Motion = वृत्तगति [ व्यासगति, वृत्तचर; व्यासचर ]
Reference circle = निदेशवृत्त
Displacement = प्रसर
Vector = सशर ( राशि ) ( दिङ्मानविशिष्ट )
Scalar = अशर (राशि) ( केवल मानविशिष्ट)
Vector addition = सशर-योग, समसन ( व्यसपद्धति )
Composition, Resolution = समसन, विग्रहण
Resolving into Components at right angles to each other = अवयुति

Components = पद, पद-समूह, पदद्वय
Resolved parts = अवयव
Resultant motion = समास-गति
Resultant Displacement = समास-प्रसर
Resultant Velocity = समास-वेग इ०
Speed = जव
Velocity = वेग
Acceleration = प्रवेग; प्रजवन ( क्रिया )
Period = पर्यय-काल, आवृत्तिकाल, आवृत्ति
Phase, Phase angle, Phase-difference = अय, अयमान, अयांश
Phase difference of 90° = त्रिभान्तर (भ = ३०°)
Phase difference of 180° = षड्भान्तर
Cycle of changes = पर्यय
Frequency, cycles per unit of time = क्षिप्रता
Amplitude = उन्मेष; त्रिज्या
Wave = तरंग
Ripple = वीचि
Wave Train = तरंगावलि
Wave front = तरंगरेखा, पृष्ठ
Plane wave = सरल तरंग
Spherical wave = गोल तरंग,
Oscillation = आन्दोलन, दोलन
Medium = वहित्र

Particles of Medium = वहित्रकण
Longitudinal wave = अनुतरंग (नाम व विशेषण)
Transverse wave = अवतरंग (नाम व विशेषण)
Pulsation = उत्सेध; उदयन
Alternation = अग्रायण, अयन
Interference = निग्रहण
Reinforcement = संग्रहण
Node = विष्टम्भ (– स्थान), संस्तम्भ(–स्थान)
Antinode, Loop = विक्षोभ(–स्थान), संक्षोभ (– स्थान)
Of the same period = समावृत्तिक
Of the same amplitude = समत्रिज्य; समोन्मेषिक
Of the same phase = समायिक
Stationary Waves (State) = स्थिरतरंग; तरंगबद्ध (बद्धतरंग) अवस्था
Forced and Free Vibration = परान्दोलन, निजान्दोलन
Free period, (Forced period) = निजावृत्ति, (परावृत्ति)
Producing forced Vibrations = अनुनादन
Resonance = निनाद, निनादन
Synchronism = सनादता, समावृत्तिकता, आवृत्तिसाम्य

# स्त्रियांच्या म्हणी.

( मागील अंकावरून पुढें चालू )

(१९७) दुहेरी बोलाची, कवडीचे मोलाची.
(१९८) साऱ्या रात्र जागली, शेंगा वांगी रांधली.
(१९९) उधळमाधळ घाल गोंधळ.
(२००) याचें दार त्याचें दार, ऊठ मेल्या खेटरं मार.
(२०१) नकटं नाक मारतं झाक, सरळ नाक कापून टाक.
(२०२) वेळ ना वारी, गोंधळ दारीं.
(२०३) माकड मारलें अन् पाला हगलें.
(२०४) राजाचे शिरीं ते पराटिणीच्या टिरीं.
(२०५) रीण फिटेल पण हीण फिटणार नाहीं.
(२०६) फुकटचा गाल केला लाल.
(२०७) हागोबापुढें वाघोबाची भीति नाहीं.
(२०८) ऐदीनें खाणें मैदानीं निजणें.
(२०९) देवांनीं घडला नूर, तो कधीं नाहीं होणार दूर.
(२१०) सोंग गेलं सजून, दिवटी गेली विझून.
(२११) माझं सोवळं बारा बोटं, खुंटी कोठें रोवूं, आकाशपाताळ एक झालं सोवळं कुठं ठेवूं ?
(२१२) महार मेला, विटाळ फिटला.
(२१३) मोठेमोठे गेले गोते खात, झुंझुरड म्हणतें माझी काय वाट ?
(२१४) श्रीमंताचें जळूं नये घर, व गरिबाची मरूं नये बायको.
(२१५) पोरचेष्टा कां माकडचेष्टा ?
(२१६) दरबारीं मान विड्याचें पान.
(२१७) सोवळं झालं दाट, खाटकाच्या घरावरनं वाट.

नीलकंठ शंकर नवरे, सोलापूर

# शंका, चर्चा, इ.

## 'गोमन्तक'

( लेखकः— पांडुरंग वामन काणे ).

'गोमन्तका' संबन्धाने हल्लीं बरीच चर्चा चालली आहे. रा. वर्दे यांनी 'वसणूक' लिहिली, त्याचे परीक्षण रा. प्रियोळकर यांनी 'विविधज्ञानविस्तारांत' केलें, त्या परीक्षणाचें परीक्षण रा. वर्दे यांनीं विस्ताराच्या १९३० एप्रील–मे अंकांत केलें आहे. तेव्हा सत्यान्वेषणाचे दृष्टीने कांहीं लिहावें असें मनांत येऊन हा लेख लिहिला आहे. रा. वर्दे यांस गोमन्तक ही 'एकमेवाद्वितीय जन्मभूमि, मायभूमि, वाग्भूमि, पुण्यभूमि व मोक्षभूमि अखिल विश्वाच्या मस्तकावर सहस्रकिरणांच्या रत्नाप्रमाणें शोभण्याच्या योग्यतेची' वाटते. त्यांचें हें प्रेम हृदयस्पर्शी व अत्यंत आदरणीय आहे. रा. प्रियोळकरही त्याच एकमेवाद्वितीय भूमींतील आहेत. त्यांचा दोघांचा बऱ्याच बाबतींत मतभेद आहे. गोमन्तकाबद्दल मायभूमि म्हणून जें अतुल प्रेम त्या दोघांना वाटतें त्यापेक्षांही सत्याबद्दलचें त्यांचें प्रेम सहस्रपट जास्त असलें पाहिजे असें मला वाटतें. अशा दोन एकाच भूमींतील वाङ्मयभक्तांच्या मतांत अन्तर पडलें असतांना तिऱ्हाइताने केवळ सत्यान्वेषणबुद्धीने काय वाटतें इतकेंच लिहावयाचें असतें. अन्धगजन्यायाने एकाला जें सत्य वाटतें तसेंच तें दुसऱ्याला भासेल असें नाहीं ही गोष्ट निराळी.

'गोमन्तक' याचें 'गोमान्तक' असें जें रूप आहे तें मुख्य धरून त्याची व्युत्पत्ति गोम + अन्तक अशी रा. राजवाडे वगैरे कांहीं विद्वान करितात, परंतु ती मान्य होण्यासारखी नाहीं व मला मान्य नाहीं. इतकें मात्र खरें कीं गोम' व 'माच' ह्या नांवाचे दोन वीर पुरुष भाऊ होते व ते दोघेही लढाईंत कामास आले ह्याचा उल्लेख एफिग्राफिआ इन्दिका, व्हाल्यूम ५, पान २६४ येथे सन १२१९ च्या एका ताम्रपटांत आहे.

महाभारतांतील सभापर्वाच्या १४ व्या अध्यायांत 'गोमन्त' नांवाच्या पर्वतशिखराचा उल्लेख आला आहे. त्या अध्यायाचा बारकाईने अभ्यास केला पाहिजे. जरासंधाचे मित्र हंस व डिंभक यांना कपटाने मारल्यामुळे जरासन्ध उद्विग्न होऊन आपल्या नगरीला गेला व तो परत फिरल्यावर आम्ही आनन्दित होऊन मथुरेंत राहूं लागलों असें ४५ व्या श्लोकांत श्रीकृष्णाने सांगितलें आहे (ततो वयममित्रघ्न तस्मिन्प्रतिगते नृपे। पुनरानन्दिनः सर्वे मथुरायां वसामहे ॥). कंसाची बायको ही जरासन्धाची मुलगी होती; तिनें आपल्या पतीच्या वधाचा सूड घेण्यासाठी जरासंधाला उद्युक्त केल्यामुळे भीतीनें आम्ही पश्चिम दिशेकडे पळालों व रैवतपर्वताने शोभिवंत झालेल्या कुशस्थलीपुरींत ( द्वारकेंत ) निवेश केला व तेथे देवांना सुद्धां दुर्गम असा



अनुक्रमणिका

कोट बनवून त्यांत आम्ही राहात आहों असे श्लोक ४५-५२ ह्यांत वर्णन आहे. ५३व्या श्लोकांत 'अशा रीतीने जरासन्धापासून अपाय होईल म्हणून गोमन्ताचा आश्रय केला आहे ' असें म्हटलें आहे ( एवं वयं जरासन्धादभितः कृतकिल्बिषाः । सामर्थ्यवन्तः संबन्धाद्गोमन्तं समुपाश्रिताः ॥ ). पुढें ६७ व्या श्लोकांत पुनः सांगितलें आहे कीं जरासन्धाच्या भीतीने मथुरा सोडून आम्ही द्वारवती नगरींत गेलों.

ह्या वर्णनावरून स्पष्ट होतें कीं सभापर्व ज्या काळीं लिहिलें गेलें तेव्हां गोमन्त हें एक द्वारकेजवळील दुर्गम असें पर्वतशिखर होतें. काठेवाड व गुजराथ ह्या प्रांतांत प्राचीनकाळीं गोधन विपुल होतें व हल्लीही आहे म्हणून पर्वताला सार्थ असें गोमन्त हें नांव पडलें असेल. किंवा गो म्हणजे सूर्यकिरण ते त्या तुङ्ग गिरिशिखरावर सर्वांचे आधीं पडून फार सुन्दर शोभा प्रभातीं दिसत असेल म्हणून त्याला गोमन्त म्हणूं लागले असतील. व्युत्पत्ति कांहींही असो, सभापर्वांत तरी ' गोमन्त ' हें गिरिशिखर आहे, ' देश ' नाहीं, व गोमन्त द्वारकेजवळ होता इतकें निश्चित आहे.

भीष्मपर्वाच्या १२ व्या अध्यायांत क्रौञ्चद्वीपाचें वर्णन करितांना त्यांत गोमन्त नांवाचा पर्वत आहे व त्यावर नित्य विष्णु निवास करितो असें वर्णन आहे ( गोमन्तः पर्वतो राजन् सुमहान् सर्वधातुकः । यत्र नित्यं निवसति श्रीमान् कमललोचनः ॥१८ ). पृथ्वींत सात द्वीपें आहेत, त्यांतील एक जम्बूद्वीप आहे अशी प्राचीन भूगोलाची स्थिति असल्यामुळें क्रौञ्चद्वीप हें जम्बूद्वीपाहून निराळें व त्यांतील गोमन्त पर्वत हाही भरतवर्षांतील नव्हे तर दुसराच असला पाहिजे; म्हणजे या ठिकाणीं गोमन्त पर्वत द्वारकेजवळचाही नव्हे व हल्लीच्या गोमन्तकांतीलही नव्हे असें निष्पन्न होतें.

भीष्मपर्वाच्याच ९ व्या अध्यायांत (कुन्तयोवन्तयश्चैव तथैवापरकुन्तयः । गोमन्ता मन्दकाः सण्डा विदर्भा रूपवाहिकाः ॥ ४३ ) ' गोमन्ताः ' असें एका देशाचें किंवा लोकांचें नांव आहे. पण त्या देशाचें स्थान निश्चित करितां येत नाहीं. शिवाय कलकत्ता प्रतींत ' गोमन्ताः ' ह्या ठिकाणीं 'गोघ्नताः' असा पाठ आहे.

सहाव्या शतकांत झालेल्या वराहमिहिराने आपल्या बृहत्संहिता ह्या ग्रन्थांत ' गोमन्त ' ह्याचा उल्लेख तीनदा केला आहे. 'शनि ग्रस्त झाला असतां मारवाडांतील लोक, पुष्कर ( अजमीरजवळ ) येथील लोक, सुराष्ट्रांतील लोक, धातु (सोनें चांदी), अर्बुद ( अबूचा पहाड ) पर्वतावर राहणारे लोक, निकृष्ट जातींचे लोक, गोमन्त व पारियात्र यांचा आश्रय करून राहाणारे लोक त्वरित नाश पावतात ' ( सौरे मरुभवपुष्करसौराष्ट्रिकधातवोर्बुदान्त्यजनाः । गोमन्तपारियात्राश्रिताश्च नाशं व्रजन्त्याशु ॥ ५·६८ ). ह्या ठिकाणीं प्राचीन टीकाकार भट्टोत्पल याने ' गोमन्त ' म्हणजे 'गोमिनः' (गाई बाळगणारे लोक) असा अर्थ केला आहे व ' गोमन्त ' ह्याबद्दल ' गोनन्द ' असाही पाठ आहे असें सांगितलें आहे. ' मथुरेचा पूर्वार्ध, हिमवत्, गोमन्त व चित्रकूट ह्या पर्वतांवर रहाणारे लोक, ह्यांचा बुध स्वामी आहे ' ( मथुरायाः पूर्वार्धं हिमवद्गो-

मन्तचित्रकूटस्थाः । सौराष्ट्रसेतुजलमार्गपण्यविलपर्वताश्रयिणः ॥ १६··१६ ). ह्या ठिकाणीं भट्टोत्पलाने ' गोमन्तो गोमिन्ः पर्वतो वा ' असें स्पष्टीकरण केलें आहे. दोन्ही श्लोकांत साहचर्यावरून जर अनुमान काढिलें तर गोमन्त हा पर्वत असून तो नर्मदोत्तर कोठें तरी असावा असें दिसतें. हिमवत् प्रसिद्धच आहे. चित्रकूट बुन्देलखण्डांत आहे. साहचर्यावरूनच अनुमान काढिलें पाहिजे असें नाहीं. व तें नेहमी बरोबर असतेंच असें नाहीं हें मी जाणून आहें. परंतु महाभारतांत सभापर्वांत द्वारकेजवळ जो गिरिराज वर्णन केला तोच बहुधा वराहमिहिराला अभिप्रेत आहे असें म्हणण्याला प्रत्यवाय नाहीं. बृहत्संहिता अ. ९ श्लोक १३ (अन्येनात्राक्रान्ते म्लेच्छाटविकाश्वजीविगोमन्तान् । गोनर्दनीचशूद्रान् वैदेहांश्चानयः स्पृशति) येथें गोमन्त शब्द आला आहे. त्याचा भट्टोत्पलाने 'विद्यमानगावः' असा अर्थ केला आहे. विष्णु, वायु, वगैरे प्राचीन पुराणांत गोमन्ताचा उल्लेख फारसा येत नाहीं. वरील तिन्ही ठिकाणच्या टीकांवरून उत्पलाला गोमन्तकाची (देशाची) माहिती नव्हती असें दिसतें. श्रीकृष्णचरित्र ज्यांत अत्यन्त भक्तिभावाने घोळून घोळून सांगितलें आहे त्या भागवतपुराणांत श्रीकृष्णचरित्राशीं निगडित झालेल्या गोमन्ताचा मागमूस नाहीं. सर्व पुराणांचे सर्वच भाग मीं काळजीपूर्वक वाचले आहेत असें नाहीं. फक्त मार्कण्डेयपुराणांत मला खालीं दिलेला उल्लेख सांपडला ( पुष्पो गिरिर्दुर्जयन्तो रैवतोर्बुद एव च । ऋष्यमूकः सगोमन्तः कूटशैलः कृतस्मर : ॥ मार्कण्डेय ५४·१४ )· ह्यांत रैवत व अर्बुद हे काठेवाड-गुजराथमधील आहेत व ऋष्यमूक दक्षिणेकडील पर्वत आहे. त्याच्याशीं साहचर्य असल्यामुळे गोमन्त हा दक्षिणेकडीलच मानिला पाहिजे इतकें फार तर म्हणतां येईल. ऋष्यमूक हा पर्वत हल्लीच्या हंपीजवळ होता असें रामायणावरून अनुमान होतें. वायुपुराणाच्या ४५ व्या अध्यायांत दाक्षिणात्य, अपरान्त वगैरे नांवें आहेत परंतु गोमन्तक देश नाहीं. त्याचप्रमाणें ४८ व्या अध्यायांत गोकर्णाचा उल्लेख आहे पण गोमन्तकाचा नाहीं.

बृहत्संहितेच्या १४ व्या अध्यायांत ( श्लोक ११-१६ ) यांत दक्षिणेकडील देशांचीं नांवें अनेक आलीं आहेत. त्याचप्रमाणें त्यावरील भट्टोत्पलाचे टीकेंत त्याच विषयावरील पराशराचे ग्रन्थांतून एक मोठा उतारा दिला आहे. त्यांत गोमन्तक देशाचा उल्लेख येत नाहीं. यांतील १३ वा श्लोक असा आहे 'कर्णाटमहाटविचित्रकूटनासिक्यकोल्लगिरिचोलाः । क्रौञ्चद्वीपजटाधरकावेर्यो रिष्यमूकश्च ॥'. १२ व्या श्लोकांत गोनर्द व केरल व कोंकण यांचा उल्लेख आहे. यावरून माझें इतकेंच म्हणणें आहे कीं ५।६ व्या शतकांत गोमन्तक असें देशाचें नांव प्रसिद्ध नव्हतें.

रा. वर्दे यांचा मुख्य भर हरिवंशावर आहे. ' हरिवंशांत गोमन्ताचें वर्णन असें दिलें आहे कीं तो पर्वत सह्याद्रीच्या ओळींत असून त्याच्या शिखरावरून धवधव्याचे लोट वाहतात व तेथून पश्चिमेकडील समुद्र व त्यांतील पुष्कळ बेटें दृष्टीस पडतात. हें वर्णन गोमांतकांतील हेमाडबारशें महालांतल्या कुवेशी घांटाला तंतोतंत कसें लागू पडतें तें मीं माझ्या पुस्तकांत दाखविलें आहे.' ( 'वि. ज्ञा. विस्तार' १९३० एप्रिल-मे,

पान १२१ वें 'वसणूक' पान ३-४ येथें पहा ). रा. वर्दे यांनी धवधवा म्हणून दूध-सागराचा उल्लेख केला आहे व तीसवाडी, कुंभारजुवें वगैरे १८ वेटें गोव्यांत आहेत त्यांचेकडे बोट दाखविलें आहे. हरिवंशातील विष्णुपर्व अध्याय ३९-४२ ह्यांची चांगली छाननी केल्याशिवाय सत्य सांपडणार नाहीं. ३७ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं श्रीकृष्ण मथुरेंत असतां 'विकद्रु' याने श्रीकृष्णाला त्याच्या वंशाबद्दल माहिती सांगितली. ३९ व्या अध्यायांत श्रीकृष्ण म्हणतात, 'सह्याचलाने युक्त अशा दक्षिणापथांत मी माझ्या ज्येष्ठ बंधूबरोबर प्रवेश करीन; आम्ही करवीरपुर व क्रौञ्चपुर पाहूं व नगराज गोमन्तहि पाहूं' ( ततः सह्याचलयुतं सहार्येणाहमक्षयम् । आत्मद्वितीयः श्रीमन्तं प्रवेक्ष्ये दक्षिणापथम् ॥ करवीरपुरं चैव रम्यं क्रौञ्चपुरं तथा । द्रक्ष्यावस्तत्र सहितौ गोमन्तं च नगोत्तमम् ॥ १०–११ ). मग बलराम व कृष्ण सह्याचलाने विभूषित झालेल्या करवीरपुराला आले व तेथे वेणानदीच्या तीरावर त्यांना न्यग्रोधवृक्ष दिसला व त्याखालीं भार्गवराम बसलेला आढळला. येथे भार्गवरामाच्या पराक्रमांचें वर्णन देतांना बाण मारून त्याने शूर्पारक नगर वसविलें असा उल्लेख आहे ( २९ श्लोक ). भार्गवराम म्हणाला कीं मी अपरान्तांतून ( म्हणजे उत्तरकोंकण किंवा शूर्पारक असा अर्थ ह्या ठिकाणीं संदर्भाने घेतला पाहिजे ) नुकताच आलों आहें ( ४५ श्लोक ). परशुराम आणखी म्हणाला 'हें करवीरपुर व करवीर राष्ट्र तुझ्या पूर्वजांनी ( म्हणजे यादवांनी ) वसविलें आहे परंतु येथला हल्लीचा राजा शृगाल वासुदेव दुष्ट आहे म्हणून आपण आजचे आज वेणा नदी पोहून जाऊं व ह्या देशाचे टोंकावर दुर्गम पर्वतावर निवासासाठी जाऊं. सह्याद्रीच्या पोटांतील एक यज्ञगिरि नांवाचें शिखर मांसभक्षक चोरांचें निवासस्थान आहे तेथे एक रात्र राहूं व नंतर ' खट्वांगा ' नांवाची नदी तरून जाऊं. ह्या नदींत कसोटीचे दगड भूषणाप्रमाणे आहेत व तिचा धवधवा गङ्गाप्रपाताप्रमाणे आहे आणि ती मोठ्या गिरीवरून पडत आहे [ प्रोष्ये तत्र निशामेकां खट्वाङ्गां नाम निम्नगाम् ॥ भद्रं ते संतरिष्यामो निकषोपलभूषणाम् । गङ्गाप्रपातप्रतिमां भ्रष्टां च महतो गिरिः ( गिरेः ? ) । तस्याः प्रपातं द्रक्ष्यामस्तापसारण्यभूषणम् । ५८-६० ]. नंतर आपण क्रौञ्चपुराला जाऊं त्याचा राजा **वनवास्य**देशाचा स्वामी महाकपि नांवाचा आहे (रम्यं क्रौञ्चपुरं नाम गमिष्यामः पुरोत्तमम् । महाकपिरिति ख्यातो वनवास्यजनाधिपः ॥६०-६२). नंतर आपण आनडुह तीर्थावर जाऊं व तेथून सह्य पर्वताच्या रांगेंतील अनेक शृंगें असणाऱ्या गोमन्त पर्वतावर जाऊं ( ततश्च्युता गमिष्यामः सह्यस्य विवरे गिरिम् । गोमन्तमिति विख्यातं नैकशृङ्गविभूषितम् ॥ ६४ ). ह्या ठिकाणीं इतक्या गोष्टींचा विचार केला पाहिजे कीं, करवीरपूर सह्यगिरीजवळ होतें, तेथेंच वेणानदी होती, जवळच यज्ञगिरि होता. खट्वांगा नांवाच्या नदीचा मोठा धवधवा होता व त्या नदींत गुळगुळीत कसोटीचे दगड होते, तेथून पुढे क्रौञ्चपुर ही वनवास्यदेशाची राजधानी व त्याचेपलीकडे गोमन्तगिरि, असें हें वर्णन आहे. वनवास्य म्हणजे प्राचीनकाळीं ज्याला संस्कृतांत वनवासि व कानडींत ' बनवसे ' म्हणतात तो प्रदेश होय. तो प्रदेश हल्लींच्या

कारवारजिल्ह्यांतील शिर्सीजवळचा होय. वराहमिहिराने ( ९·१५ ) ' वनवासि ' असा देशाचा उल्लेख केला आहे. सभापर्वांत ( ३१· ६९–७० ) वनवासी व त्याची राजधानी जयन्तीपुर ह्या दोहोंचाही उल्लेख आहे. ह्या सर्व वर्णनाला जुळण्यासाठी खट्वांगानदी व तिचा धवधवा म्हणजे गेरसप्पाचा धवधवा मानिला पाहिजे. ह्या धवधव्या-पलीकडे क्रौञ्चपुर येथें वनवास्य देशाचा स्वामी होता व त्याचेहि पुढें गोमन्तशिखर होतें. म्हणजे हें वर्णन दुधसागराबद्दल असणें शक्य नाहीं. वनवासीच्या दक्षिणेकडे जवळ गोमन्तगिरि होता हें वरील वर्णनावरून दिसतें. म्हणजे दुधसागराच्या वराच दक्षिणेस (सुमारें १०० मैल तरी)गोमन्त असला पाहिजे.दुधसागर हा एखाद्या शरावतीप्रमाणें मोठ्या नदीचा धवधवा नाहीं. गेरसप्पा हा मोठया नदीचा धवधवा आहे. हें वर्णन झाल्यानंतर 'ऊर्मिमन्तं समुद्रं च अपारद्वीपभूषणम्। प्रेक्षमाणौ सुखं तत्र नगाग्रे विचरिष्यथ ॥ ६८ हा श्लोक येतो.ह्या श्लोकाचा सरळ अर्थ 'लाटांनी युक्त व विस्तृत (किंवा अफाट) द्वीपाला एखाद्या भूषणाप्रमाणे शोभणारा असा समुद्र पहात तुम्ही सुखाने त्या पर्वतशिखरावर फिरा,' असा आहे. 'अपारद्वीपभूषणम् ' हें समुद्राचें विशेषण आहे त्याचा रा. वर्दे यांनी केलेला अर्थ बरोबर नाहीं. ' अपार ' म्हणजे ' असंख्य ' नव्हे तर अतिविस्तृत, अफाट ( bound-less ). अतिविस्तृत अशा तुंगगिरियुक्त भूप्रदेशाचे पायथ्याशीं असणारा समुद्र हा त्या विस्तृत देशाचें भूषण दिसतो. 'अपारद्वीपभूषण ' हा बहुव्रीहि न घेतां तत्पुरुष घ्यावा. अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहीपेक्षां तत्पुरुष घेणें जास्त चांगलें; विशेष कारण असेल तर गोष्ट निराळी.अपार म्हणजे अनेक असा चुकीचा अर्थ घेऊन गोव्यांतील १८ बेटांचा उल्लेख या शब्दांत आहे. असें रा. वर्दे म्हणतात. पण अपार याचा अनेक असा अर्थ नाहीं. द्वीप म्हणजे नेहमी बेटच असा अर्थ नाहीं. द्वीप म्हणजे मोठा भू-भाग. म्हणूनच रघुवंशांत 'अष्टादशद्वीपनिखातयूपः ' असें कार्तवीर्याचें वर्णन केलें आहे. गोमन्त याला हल्लीच्या गोमान्तकांत ओढून घेण्याला ' अपारद्वीपभूषणम् ' ह्याचा रा. वर्दे यांनी जो अर्थ केला आहे तो कारणीभूत होतो. पण तो अर्थ बरोबर नाहीं आणि इतर वर्णन वनवासीपलीकडील पर्वताला लागू पडणारें असल्यामुळें गोमन्त म्हणजे हल्लीच्या गोमन्तकांतील शिखर नव्हे तर कारवार जिल्ह्यांतील गेरसप्पाच्या धवधव्याच्या जवळचें शिखर असलें पाहिजे असें सिद्ध होतें. ४० व्या अध्यायांत ह्या शिखराचें सुन्दर वर्णन केलें आहे त्यांत गोमन्ताचल हा तमाल व वेलची ह्यांच्या वनानें युत आहे असें म्हटलें आहे. ' अपारद्वीपभूषणम् ' हा शब्द बहुव्रीहिसमास धरिला तरी रा. वर्दे यांना इष्ट आहे तो अर्थ त्यांतून निघत नाहीं. मग असा अर्थ होईल कीं अफाट भूभाग किंवा द्वीप ज्याचें भूषण आहे असा सागर आपण पाहूं. या अर्थांतही गोव्यांतील बारीक बारीक अशा १८ द्वीपांच्या उल्लेखाचा मागमूस नाहीं.

सभापर्वांत गोमन्त द्वारकेजवळ येतो व हरिवंशांत कारवार जिल्ह्यांत येतो ह्या-प्रमाणें ह्या दोन्ही ग्रंथांत विरोध आहे. हरिवंश हा ग्रंथ खिलस्वरूपाचा असून त्याला

बाकीच्या महाभारताइतकें प्रामाण्य देतां येणार नाहीं. म्हणून सभापर्वांतील वर्णन मूळ खरें व हरिवंशांतील कारवार जिल्ह्यांतील गोमन्तगिरीशीं श्रीकृष्णाच्या अवतारकृत्याचा संबंध आणणारें वर्णन पाठीमागचें असें धरिलें पाहिजे. ज्याने हरिवंशांत हें वर्णन दिलें त्याने अज्ञानाने किंवा स्थानिक अभिमानाने असा घोंटाळा केला असेल असा संभव आहे.

आतांपर्यंत सह्याद्रिखण्डांतील वर्णनाचा उल्लेख केला नाहीं. कारण सह्याद्रिखण्ड हा ग्रंथ प्राचीन नसून त्याला महाभारत, बृहत्संहिता इत्यादि ग्रंथांप्रमाणे प्रमाण मानणें शक्य नाहीं. त्यांतील (उत्तरार्ध १. ५२-५३ आनीता भार्गवेणैव गोमान्ताख्ये च पर्वते। मांगिरीशो महादेवो महालक्ष्मीश्च म्हालसा। शान्तादुर्गा च नागेशः सप्तकोटीश्वरः शुभः ॥) वर्णनावरून हल्ली मंगेशादि देवस्थानें ज्या भागांत आहेत तो गोमाञ्चल होय असें ठरतें. ह्याच सह्याद्रिखण्डांत (उत्तरार्ध अध्याय ३.२) मांगिरीश नांवाचा पर्वत त्रिहोत्रांतसुद्धां होता असें वर्णन आहे. सह्याद्रिखण्डांतील भाषा व वर्णन यांवरून तें अलीकडच्या पांचचारशें वर्षांत कोणीतरी बनविलें असावें व मग स्कंदपुराणांत घुसडून दिलें असें दिसतें.

सह्याद्रिखण्डाच्या अर्वाचीनत्वाचीं एकदोन प्रमाणें येथें देण्यास हरकत नाहीं. उत्तरार्ध अध्याय ६.५७ येथे वर्षाशन (वर्षासन) शब्द आला आहे. उत्तरार्ध अ. ४-४९ येथें 'केचित्तु गुरुभक्ताश्च नवीना नामधारिणः' असा गुरुचरित्र वाचणारे व कदाचित् शीख लोक यांचा उल्लेख आहे.

वर हरिवंशांतील गोमन्तासंबंधीच्या उल्लेखावद्दल केलेलें विवरण बरोबर असेल तर हरिवंश व सह्याद्रिखण्ड यांमध्येंहि विरोध येतो. हरिवंशाप्रमाणें गोमन्तपर्वत वनवासिदेशाची राजधानी क्रौञ्चपुर त्याचेहि पलीकडे कांहीं अन्तरावर होता, तर सह्याद्रिखण्डाप्रमाणें तो मांगिरीशादि देवस्थानें ज्या ठिकाणीं आहेत तेथें होता. महाराष्ट्रांत नाशिक, कार्लें, भाजें वगैरे ठिकाणीं जीं कोरीव लेणीं आहेत तीं सर्व पांडवकृत्यें आहेत असा सामान्य भाविक जनांचा समज आहे पण ऐतिहासिक दृष्टीने हीं कोरीव लेणीं भिन्न काळीं भिन्नभिन्नधर्मीय व्यक्तींनी तयार करविलीं असें सत्य दिसतें. त्याचप्रमाणें गोमन्तक हें नांव एकाद्या प्रदेशाला दिलेलें आढळलें, गोमन्त पर्वताचा श्रीकृष्णचरित्राशीं सभापर्व वगैरे ठिकाणीं संबंध आणिलेला आहे, त्या परमपावन चरित्राशीं आपल्या जन्मभूमीचा संबंध जर सहज जोडून देतां येण्यासारखा असेल तर अनेक भाविक लोक तसें करण्यास तयार होतील. ह्या भावनेनेच हरिवंशांत सभापर्वाचे विरुद्ध व सह्याद्रिखण्डांत ह्या दोघांचेहि विरुद्ध त्या त्या देशांतील गोमन्तगिरीचा संबंध श्रीकृष्णाशीं जोडण्यांत आला असावा असें मला वाटतें. रा. वर्दे यांनी पुढें आणलेलीं प्रमाणें, हल्लीच्या गोमन्तकांतील मंगेशादि देवस्थानांजवळ श्रीकृष्णचरित्राशीं संबंध असलेला गोमन्त पर्वत होता, हल्लींच्या गोमन्तक देशाला प्राचीन काळीं किंवा इ. स. ५११ या शतकांतहि गोमन्तक म्हणत, असें सिद्ध करण्याला अगदीं अपुरीं आहेत किंबहुना अशीं भरींव प्रमाणें त्यांनी कांहींच दिलीं नाहींत असें कष्टाने म्हणावें लागतें.

१४४

———

## ज्ञानेश्वरींतील एक शंका.

ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायांत गणपतिस्तवनांत ज्ञानोबांनी पुढील ओंव्या घातलेल्या आढळतातः—

देखा षड्दर्शनें म्हणिपति । तेचि भुजांची आकृति ।
म्हणवूनि विसंवादें धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥
मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं ।
बोधमदामृत मुखी । अलीं सेविती ॥ १६ ॥

यांतलि पहिल्या ओवींत षड्दर्शनें हेच गणपतीचे सहा हात होत असें दर्शविलें आहे. षड्दर्शनांत पूर्वमीमांसा म्हणजे कर्मकांडात्मक वेदमीमांसा आणि उत्तर-मीमांसा म्हणजे ज्ञानकांडात्मक वेदमीमांसा अथवा वेदान्त यांचा अंतर्भाव होतो असें सामान्यतः समजतात. पण नंतरच्या ओवींत पुनः या दोन्ही मीमांसांचा पृथक् उल्लेख करून त्यांना गणेशाचे कान म्हटलें आहे. तरी हा विरोध आहे कीं उपरोक्त ओव्यांचा दुसरा कांहीं अर्थ असून त्याने अविरोधप्राप्ति होते याचें स्पष्टीकरण झालें पाहिजे.

के. ल. ओगले

## अभिप्राय

**भारत–धर्म–प्रकाश**—( लेखक व मूल्य पुस्तकावर दिलेलीं नाहींत. ) भारत-धर्म-मंडळाच्याद्वारा हें लहानसें ९८ पानांचें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें असून त्याला मंडळाचे कार्यवाह रा. मोहोळकर यांची उद्देश-स्वरूपदर्शक प्रस्तावना जोडिली आहे. त्या प्रस्तावनेवरून पाहतां विचाररूप अगदी खालच्या पायरीपासून मनाला वर नेत नेत त्याला तेजोरूप उच्च अवस्थेंत न्यावयाचें व तेथे त्याला स्थिर करावयाचें आणि तेणेकरून आपला सांसारिक व पारमार्थिक उत्कर्ष साधून घ्यावयाचा हें ध्येय कसें साधावें हें या पुस्तकांत सांगितलें आहे. पुस्तकाचे किरण नांवाचे सात भाग असून पहिल्यांत ही विद्या प्रत्येक मनुष्याला साध्य करून घेतां येण्यासारखी आहे असें प्रतिपादिलें आहे. दुसऱ्यांत या विद्येची तात्त्विक मांडणी म्हणजे उपपत्ति सांगितली असून तिसऱ्यांत अभ्यासाला आरंभ कसा करावा याचें दिग्दर्शन केलें आहे. चवथ्यांत ध्येयप्राप्तीच्या मार्गांतील विघ्नें व तीं नष्ट करण्याचे उपाय सांगून पांचव्यांत या अभ्यासाची अपूर्वता व सहाव्यांत फलश्रुति दाखविली आहे. शेवटच्या किरणांत या विद्येविषयीं लोकांमध्यें कळकळ उत्पन्न करून तिचा प्रसार करणें सांप्रत स्थितींत कसें अवश्य आहे हें सांगून उपसंहार केला आहे.

पुस्तकाची मांडणी संवादरूप केली असून ती वाचतांना चटकदार लागते. रावजीकाका म्हणून कोणी गृहस्थ या विद्येचे आचार्य कल्पिले असून ते ही विद्या जो जसा अशिक्षित, सुशिक्षित, कुशिक्षित कसा भेटेल त्याला त्याच्या भाषेंत व त्याच्या परिस्थितीला जुळतील अशा रीतीचीं उदाहरणें घेऊन समजावून देण्याच्या कामीं पटाईत असे दाखविले आहेत. धार्मिक म्हणून म्हटल्या जाणाऱ्या कित्येक कल्पनांची या संवादांत टर उडवून दिली असून खऱ्या धर्माची कल्पना देण्याचा यत्न केलेला आहे. खरा धर्म म्हणजे विशुद्ध आचरण व तसेंच विशुद्ध अंतःकरण यांवर अवलंबून असतो. त्याला बाह्योपचारांची गरज नाहीं, बाह्योपचारामुळें नसता दांभिकपणा उत्पन्न होऊन खऱ्या मार्गावरून मनुष्य चळतो. अंतःकरणाला स्वाधीन करून त्याला उत्तरोत्तर उच्चावस्थेंत नेण्याचा योग्य विहितमार्ग जो यांत दाखविला आहे, तो अर्थात् पुस्तकी आहे. त्याचें प्रत्यंतर घेऊन पुढील पायऱ्या गांठण्याच्या कामीं कोणी वाचक सिद्ध होईल तर त्याला ध्येयाकडे घेऊन जाण्याला मंडळ साह्य करणार असल्यामुळें पुस्तकांत प्रतिपादितां न येणाऱ्या गोष्टी वाचकांनी प्रत्यक्ष मंडळांत जाऊनच शिकल्या पाहिजेत. पण इतका प्रयास न झाला तरी एकवार पुस्तक शांतपणें वाचून त्यांतील इंद्रियदमनाचा व ध्यानयोगाचा मार्ग झेपेल तसा आक्रमित गेल्यास कांही तरी कार्य होईल. पण इतकेंहि न झालें तरी विचारजागृतीचें फळ तरी या पुस्तकवाचनाने निःसंशय मिळेल, म्हणजे धर्माचारांतील दांभिकपणा ओळखून सद्वर्तन व सद्विचार यांच्या साह्यानेच मनुष्याची उन्नति होऊं शकते हा धडा मनावर बिंबेल.

के. ल. ओगले

**वामन मल्हार जोशी**— ( संक्षिप्त चरित्र-ले. रा. प्र. कानिटकर एम्. ए. किं. १२ आणे ) हें प्रभाकर आणि मंडळीचें चौथें पुस्तक आहे. साहित्यसेवकांचीं अशीं त्रोटक चरित्रें असणें जरूर आहे. या पुस्तकाची "भूमिका" बोजड आहे. पुस्तकांत सामान्य माहिती संग्रहित केली आहे. घाईमुळे अशुद्धें फार राहिलीं आहेत. किंमत थोडी जास्त दिसते.

**प्रफुल्ल पद्माकर** — ( कवी—दत्तात्रय बापूराव पद्माकर किं. १ रु. ) पद्माकर कवीचा हा कवितासंग्रह आहे. गद्यग्रंथाचे प्रस्तावनाकार श्री. न. चिं. केळकर हे ठरलेले आहेत त्याप्रमाणें पद्यपुस्तकांना प्रस्तावना लिहिणारे प्रो. श्री. नि. चापेकर हे असावयाचे हेंहि ठरल्यासारखेंच आहे. प्रस्तावनेंत अथवा परागपरिमळांत काव्याचें गुण-दोषविवेचन आहेच. श्री. अनंततनयांनी म्हटल्याप्रमाणें पद्माकरांच्या कविता सुबोध, रसाळ व प्रसादयुक्त आहेत. श्री. न. चिं. केळकर यांना कविता विशेष आवडल्या त्याच आम्हांलाहि पसंत झाल्या. त्यांच्या यादींत 'शिशुहास्य' या कवितेची आणखी भर घालावी असें आम्हांस वाटतें. सुगृहिणी कविता वाचल्यावर स्त्रियांसंबंधी जुन्या समजुती कायम ठेवून स्त्रीपुरुष संबंधविषयक नितांतसुंदर काव्य निर्माण करतां येईल काय असा एक प्रश्न सुचतो. असो. कविता वाचनीय आहेत.

# पुस्तकपरीक्षण

( ना. गो. चापेकर )

## सिंहाला शह — ले. श्री. रा. टिकेकर. ( किं. २ रुपये. )

रा टिकेकर हे एक अलौकिक वृत्तीचे गृहस्थ असावेत. इतरांनी मळवटलेला मार्गच आपण आक्रमण करावा ही वृत्ति सामान्य माणसांची असते. परंतु स्वतंत्र विचारांच्या माणसांना अशा प्रकारच्या कृतीने कधींच समाधान होत नाहीं. मार्गभिन्नत्वांतच त्यांच्या बुद्धीचें वैशिष्ट्य असतें. अशा लोकांपैकीच रा. टिकेकर हे एक होत. रा. टिकेकर यांचें सर्वच कांहीं निराळें दिसतें. त्यांची भाषापद्धति ज्याप्रमाणें निराळी, त्याप्रमाणे त्यांची इच्छाहि सामान्य जनांहून निराळीच दिसते. प्रत्येक ग्रंथकर्त्याला समालोचनकर्त्यानें आपल्या ग्रंथाला प्रशंसापत्र द्यावें असेंच अंतर्बाह्य वाटत असतें. परंतु रा. टिकेकर हे आपल्या टीकाकारांकडून प्रशंसेची अपेक्षा न करितां दोषदर्शनाचीच अपेक्षा करीत आहेत. होतकरू लेखकांनी या बाबतींत रा. टिकेकरांचें अनुकरण करणें अवश्य आहे.

रा. नरसोपंत केळकर यांनी म्हटल्याप्रमाणे मराठी ग्रंथमंदिरांत रा. टिकेकरांनी एक नवीन दालन उघडलें आहे यांत शंका नाहीं. एका देशासंबंधाने इतक्या माहितीने भरलेलें व चिकित्सक बुद्धीनें लिहिलेलें दुसरें पुस्तक मराठींत आढळणार नाहीं. आणि म्हणून यांतसुद्धा रा. टिकेकरांचें असामान्यत्व व्यक्त होतें. पण त्यामुळे हा ग्रंथ मात्र अपूर्व आहे असें मानण्याचें कारण नाहीं. रा. टिकेकर यांना इराण व मेसापोटेमिया या प्रांतांत एका मराठी वर्तमानपत्राचे वातमीदार म्हणून फिरण्याचा अपूर्व मान मिळाला होता. म्हणून अफगाणिस्थानाच्या आधी या दोन देशांवर जर त्यांनी स्वतः मिळवलेल्या माहितीचा उपयोग करून स्वतंत्र ग्रंथरचना केली असती तर ती मात्र असामान्य अथवा अपूर्व म्हणतां आली असती. इराण व मेसापोटेमिया बाजूस सारून अफगाणिस्थानच त्यांनी अगोदर कां घेतला याचें कारण आम्हांला तरी अद्यापि पटत नाहीं. अफगाणिस्थानांत पाऊल न ठेवतां इंग्लिश भाषेंत लिहिलेले ग्रंथ वाचून त्यांवरून मराठींत लिहिलेलें पुस्तक कितीहि चांगलें असलें तरी त्या चांगलेपणाला मर्यादा आहेच. स्वतः परदेशांत हिंडून तेथील वस्तुस्थिति प्रत्यक्ष पाहून त्या देशाविषयीं मराठींत लिहिणें शक्य आहे ही कल्पनाच मराठी वाचकांच्या मनांत रा. टिकेकरांनी उत्पन्न केली आहे हें मात्र मोठ्या आनंदाने सांगणें अवश्य आहे. दुसऱ्या कोणींहि अशा प्रकारची ग्रंथरचना केली असती तर आम्हीं त्याचें मनोभावानें गोडवेच गाइले असते यांत संशय नाहीं. परंतु आमच्या कल्पनेचें क्षेत्र रा. टिकेकरांनीच विस्तृत केल्यामुळे रा. टिकेकरांच्या विद्यमान कृतीने वाचकांचें समाधान झालें नाहीं, तर तो दोष टीकाकारांचा नसून टिकेकरांचा समजला पाहिजे.

प्रस्तुत ग्रंथाचें "सिंहाला शह" असें नामकरण करण्यांत ग्रंथकर्त्याचा काय उद्देश आहे हें चटकन ध्यानांत येत नाहीं. अफगाणिस्थानामुळें ब्रिटिश सरकारला शह बसणार (लागला आहे असें नाहीं) असा रा. टिकेकर यांचा अभिप्राय दिसतो. परंतु आमच्या मतें इंग्लिश सरकारला सिंहाची उपमा देण्यांत रा. टिकेकरांनी वस्तु-स्थितीचा विपर्यास केला आहे. सिंह हा क्रूर असतो तसाच तो कृतज्ञ आणि उदारहि असतो. यांपैकी कोणत्या गुणाचें अस्तित्व ब्रिटिश सरकारच्या ठिकाणीं रा. टिकेकर यांस दिसून आलें तें कळण्यास मार्ग नाहीं. अफगाणिस्थानाच्या संबंधाने ब्रिटिश सरकारच्या धोरणाचा विचार केल्यास तें धोरण व हिंदुस्थान सरकारचें एकंदर वर्तन अगदीं मूर्खपणाचें असून इंग्लिशांच्या मुत्सद्देगिरीस न शोभण्यासारखेंच आहे.

ब्रिटिश सरकारने रशियासंबंधाने इतका भ्याडपणा दाखविला ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. अफगाणिस्थानाच्या बाबतींतहि सरकार जें धोरण निश्चित करणार त्याला कारण नुसती रशियाची भीति एवढेंच पुरें होणार नाहीं. महायुद्धापूर्वी रशियाशीं तह झाला होता व त्यामुळे रशियाची भीति बाळगण्याचें कारण मुळींच उरलें नाहीं. अशा निर्धास्त स्थितींत अफगाणसंबंधाने हिं. सरकारने कसें वागावें याचाहि निश्चय झाला पाहिजे. अफगाण देश ब्रि. सरकारने घेतला तर रशियाबरोबर उघड्या मैदानांत लढाई देण्याचा प्रसंग ब्रिटिशांवर येईल. अशा वेळीं त्यांच्या आरमाराचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं व हिंदुस्थान असंतुष्ट असल्यास या देशांतून सैन्य नेणेंहि धोक्याचें होईल असा पेंच ब्रि. सरकारला पडल्यावांचून राहणार नाहीं. अर्थातच अफगाणिस्थान-सारख्या डोंगराळ व हिमाच्छादित प्रदेशांतून अडखळत व ठेचाळत आलेल्या रशियन फौजेस खैबरघाटासारख्या अरुंद जागीं गांठणें सोयीचें होईल अशा समजुतीने अमीराला जावयासारखें वागवणें ब्रिटिश सरकारला भाग पडत आहे. अफगाण सरकार, स्वतंत्र टोळ्या व डोंगराळ मुलुख यांचें कुंपण आपण सरहद्दीवर घातलें आहे अशी हिं. सर-कारची समजूत आहे. पण एवढ्याकरतां अमीराला व स्वतंत्र टोळ्यांना हिंदुस्थानावर किती काल चरूं द्यावयाचें याचा विचार कोणी करावयाचा ? हिंदुस्थान इंग्लंडकरतां आहे. तेव्हां रशियाच्या ताब्यांत तें जाऊं नये याकरतां होणारा खर्च इंग्लंडनेच सोसावयास पाहिजे. बरें तो खर्च हिंदुस्थानावर लादलाच तर हिंदी लोकांच्या मतानेच हिं. सरकारने आपलें धोरण ठरवणें योग्य नाहीं काय ? असो. हा अन्याय क्षणभर बाजूस ठेवला तरी अफगाणिस्थानावर किती पैसे खर्च करावयाचे व कोठपर्यंत हा प्रश्न राहतोच. निरनिराळ्या टोळ्यांना शस्त्रास्त्रें पुरवा व पैशाच्या थैल्या पोचवा हा लाजिरवाणा प्रकार किती दिवस चालावयाचा ? आपल्या स्वतःच्या प्रजेला निःशस्त्र करून रानटी, अविश्वासु व खुनी अशा परकी लोकांना शस्त्रें पुरविणें ही ब्रि. सरकारला मोठ्या अभि-मानाची गोष्ट वाटते काय ? बर्मिंगहॅमच्या बंदुका आफ्रिडी लोकांना कशा मिळतात ? पण सरकार आपण होऊनच जर लढाईचीं हत्यारें या "निरस्त्र" लोकांना देतें तर अन्य मार्गाने तीं त्यांना न मिळूं देण्याचें सरकारच्या मनांत येईल तरी कसें ? या

स्वतंत्र लोकांच्या प्रदेशांत सडका करा, शाळा उघडा, इमारती बांधा, आगगाड्या न्या आणि हिंदुस्थानांत हीं कामें करण्यास पैसा नाहीं म्हणून रडा ही कोणत्या गांवची राजनीति ? हिंदुस्थानच्या संरक्षणाकरतां हें करावें लागतें असें शिष्टपणाचें म्हणणें म्हणतां येतें हें खरें पण संरक्षणांत संरक्ष्याचा प्राणच जाईल त्याची वाट काय ? बरें इतकेंहि करून अमीर अथवा टोळ्या कृतज्ञ राहतील अशी खात्री देतां येईल काय ? इंग्लिशांचे पैसे खाऊन सुद्धां एकहि अमीर मनापासून इंग्लिशांवर फिदा असलेला दिसत नाहीं. त्याचा कल रशियाकडेच झुकलेला. हा अनुभव घेतल्यावर तरी हिं. सरकारने उमजूं नये काय ? दुसऱ्याच्या हद्दींत आपला पैसा ओतून सुधारणा करणें अत्यंत आत्मघातकीपणाचें आहे. तुमच्या सडकांचा, आगगाड्यांचा उपयोग तुमच्या विरुद्ध होणार नाहीं अशी काय हमी आहे ? आयत्या वेळीं अमीर व सरहद्दीवरील टोळ्या रशियास मिळाल्या तर तुमच्या सडकांचा उपयोग कोण करणार हें आपणांस समजत नाहीं काय ? सरहद्दीवरील लोक स्वातंत्र्यप्रिय आहेत म्हणून त्यांस बंदुका, दारुगोळा वगैरे पुरवा आणि ते दरिद्री आहेत म्हणून त्यांस खावयास द्या हा उपाय इंग्लंडचे पैसे खर्च होते तर हिं. सरकारने योजला असता काय ? हिंदुस्थानच्या हद्दींत तुम्ही उत्तम बंदोबस्त ठेवा, लूट करण्यास आले म्हणजे त्या लोकांना पकडा. त्यांचीं शस्त्रें घ्या व त्यांस ब्रम्हदेशांत पाठवून द्या. त्यांचा हत्यारांचा पुरवठा बंद करा. त्यांच्या टोळ्या फोडा. हिंदुस्थानांतील भेदनीति अफगाणिस्थानांत कां अमलांत आणीत नाहीं ? सध्यांच्या वर्तनावरून हिं. सरकार अफगाण टोळ्यांना भिऊन वागतें असेंच कोणी म्हणेल. त्यांची सुधारणा करतों अशी फुशारकी मारूं नका. सुधारणा करण्याचें पुण्य मिळविण्यास हिंदुस्थानांत ३३ कोटी लोक नाहींत काय? अफगाणिस्थानच्या जमिनीवर लढाई देण्याची धमक असल्यास पुरोगामी धोरण एकवेळ खपेल. पण तसें नसल्यास आपली हद्द संभाळून राहणें हेंच शहाणपण होय. रशियाबरोबर झालेला तह अमिराने मान्य केल्यावर अमलांत यावयाचा होता. पण अमिराने संमति न देऊन रशिया व इंग्लंड या दोनहि प्रबल राष्ट्रांस धाब्यावर बसविलें आणि आतां इंग्लंडला अमिराने आपली मान्यता दिली नाहीं तरी आम्ही सर्वजण त्या तहाबरहुकूम वागत आहों असें म्हणून आपलें समाधान करून घ्यावें लागत आहे ना ? यावरून कोणाशीं प्रसंग आहे हें हिं. सरकारने ओळखावयास पाहिजे होतें. सरहद्दीवरील टोळ्यांच्या स्वातंत्र्याचा घोष करण्यांत हिं. सरकारचा फायदा आहे म्हणूनच त्यांच्या स्वातंत्र्याचा गाजावाजा इतका होत आहे. कारण या टोळ्यांच्या योगाने खुद्द अमिरालाहि प्रसंगोपात्त शह देतां येण्यासारखा आहे. जगामध्यें अशा स्वतंत्र टोळ्या दुसऱ्या आहेत कीं नाहींत हें आम्हांस ठाऊक नाहीं. पण बहुधा नसाव्या असें वाटतें. या टोळ्यांचें नांवाचें कां होईना, स्वामित्व खरें म्हटलें तर अमिराकडे जावयास पाहिजे होतें. पण डयुरांड साहेबांच्या कावेबाजपणामुळें सरहद्दीवरील टोळ्यांना स्वतंत्र अस्तित्व मिळालें. अफगाण लोकांपासून आम्ही तुमचें संरक्षण करतों असें मात्र यामुळे इंग्लिश लोकांना हिंदी लोकांस सांगावयास मिळतें. पण अफगाण स्वारीची गोष्ट अशक्यप्राय आहे हें आता असेंब्लींतील

बुद्धया सभासदांस समजत नसलें तरी रा. टिकेकरांसारख्या तरुणांच्या ध्यानांत येत चाललें आहे ही आनंदाची गोष्ट आहे. या बाबतींत रा. टिकेकरांची चर्चा योग्य असून समर्पक आहे. त्यांच्या सूचना विधायक कशा नाहींत हें आम्हांस समजत नाहीं. टिकेकरांची याबद्दल स्तुति करणें अवश्य आहे.

अफगाणिस्थानांत आजपर्यंत जे अमीर झाले त्या सर्वांचा धूर्तपणा धोरणी इंग्लिशांना लाजविण्यासारखा आहे हें जरी खरें असलें तरी अफगाणिस्थानचे अमीर किंवा अफगाणसरकार यांना हिंदुस्थान सरकारला शह देतां आला अथवा ते शह देऊं शकतील असें आम्हांस वाटत नाहीं. आमच्या मतें हिंदुस्थान सरकारनें मूर्खपणानें आपल्याला शह लावून घेतला आहे. हिंदुस्थानच्या तिजोरींतून कोट्यावधि रुपये अफगाणिस्थानांत ओतणाऱ्या मुत्सद्यांची तारीफ कोण करणार? हिंदुस्थानाकडून अफगाणिस्थानला आजपर्यंत किती रक्कम मिळाली याचा आंकडा रा. टिकेकर यांनी बाचयास पाहिजे होता. तो न दिल्यामुळे अर्धवट अनुमानें करण्यास जागा राहिली आहे. निरनिराळ्या वेळीं दिलेल्या खंडण्यांच्या व तनख्यांच्या रकमांची बेरीज करण्याचा प्रयत्न आम्हीं केला परन्तु तें दुःसाध्य कर्म म्हणून सोडून द्यावें लागलें. उदाहरणार्थ, झमानाला वर्षाचे १८ हजार रुपये कंपनी सरकार देत असे. परन्तु कोणत्या सालापर्यंत हिंदुस्थानावर हा बोजा पडला हें समजण्यास या पुस्तकांत कांहीं साधन नाहीं. झमान अमूक सालीं मेला हें कळलें असतें तर त्यानें किती रुपये खाल्ले याचा अदमास करतां आला असता. असाच प्रकार इतर तनख्यांसंबंधाने असल्यामुळे ही एक महत्त्वाची बाब मोठ्या निरुपायाने तशीच सोडून द्यावी लागत आहे.

यानंतर प्रश्न असा उत्पन्न होतो कीं हिंदुस्थानची तिजोरी रिती करून अमिराचें बळ वाढविण्याचा प्रयत्न हिंदुस्थान सरकारने केला त्याऐवजीं एकदाच लागेल तो पैसा उधळून अफगाण देश हिंदुस्थानांत सामील करण्यांत कांहीं गैरशिस्त झालें असतें काय? आमच्या मतें परकी सत्तेच्या ऐवजीं हिंदुस्थानांत जर सामर्थ्यवान् असें हिंदू राज्य असतें, तर तें हिंदू सरकार अफगाण देश हिंदुस्थानांत सामील केल्याशिवाय कधींहि राहतें ना. तो देश डोंगराळ आहे, सुपीक नाहीं, इत्यादि विचारांनी हिंदूसरकार निरुत्साह झालें नसतें. अफगाणिस्थानांत पूर्वी हिंदूंचेंच राज्य होतें. महमद गझनीच्या स्वारीपूर्वी काबूलचें ब्राह्मणी राज्य लय पावून फार काळ लोटला नव्हता. तसेंच अफगाणिस्थानांत त्यावेळीं शेकडा ६० वर हिंदु होते. गझनी येथें पुष्कळ हिंदु पंडित, हिंदू सरदार व हिंदू वाणीउदमी रहात होते (अल्बेरुणीची गीता). हिंदू संस्कृतीचे अवशेष तेथें अद्यापि दृष्टोत्पत्तीस येण्यासारखे आहेत, कौरवांचें मातुलस्थान म्हणूनहि त्या देशासंबंधाने आत्मीयत्वाची भावना मनांत प्रकट होते, या कारणांमुळें संधी मिळाली असतां हिंदुस्थानची सरहद्द इराणपर्यंत नेऊन भिडविण्यास कोणाहि हिंदू राजाने मागेपुढे पाहिलें नसतें. हें करणें मोठें अशक्य होतें असेंहि नाहीं. या देशांत सुप्रतिष्ठित असा कोणाचाच अम्मल नव्हता. व संस्कृतिशून्य, आडदांड, अविचारी

आणि बेशिस्त अशा लोकांना जिंकण्यास, आधुनिक तऱ्हेची युद्धसामुग्री जय्यत असलेल्या इंग्लिश फौजेला मुळींच प्रयास पडले नसते. परन्तु रशियाच्या पोकळ भीतीने इंग्लिश सरकारने हिंदुस्थानची तिजोरी अफगाणिस्थानांत नेऊन ओतली हें त्यांचें करणें कोणत्याहि दृष्टीने शहाणपणाचें म्हणतां येणार नाहीं. आज हिंदुस्थान आणि अफगाणिस्थान यांच्या दरम्यान् जशा स्वतंत्र टोळ्या आहेत, तशाच रशिया आणि अफगाणिस्थान यांच्या दरम्यान् निर्माण करतां आल्या असत्या. रशियन लोकांच्या राजधानीपासून अफगाणिस्थान फार अंतरावर असल्यामुळे व इंग्रजी राज्याची शिस्त रशियन राज्यपद्धतींत नसल्यामुळे अचानक रीतीने रशिया हिंदुस्थानावर झडप घालील असें मानणें वेडेपणाचें आहे. अफगाणिस्थानांत आजहि शीख आदिकरून हिंदू लोक आहेत; तसेंच त्या देशाच्या निशाणावर चन्द्राच्या ऐवजीं सूर्य असतो, शिवाय हिंदूकुश पर्वत, कंदाहार, हरीरूद इत्यादि नांवें प्राचीन आर्यसंस्कृतीचा व आर्यकर्तृत्वाची स्मृति करून देणारीं असल्यामुळे अफगाणिस्थान हा आपलाच देश आहे अथवा असावा असें प्रत्येक हिंदूस वाटणें स्वाभाविक आहे. अफगाणिस्थान असें न लिहितां अफगाणिस्तान असें लिहिण्यांत रा. टिकेकरांच्या आत्मीयत्वाचा लोप झालेला उघड उघड दिसतो. स्थान शब्द वाचून सामान्य माणसाच्याही हा देश आमचाच होता असें मनांत आल्यावांचून रहात नाहीं.

हें पुस्तक वरवर वाचणारासहि असें दिसून येईल कीं, रा. टिकेकर यांना अमानुल्लाविषयीं निश्चित मत बनवितां आलें नाहीं. अमानुल्लाला त्यांनी आरंभीं आरंभीं बराचसा चढवून अखेरीस अगदी खाली उतरविला आहे. याबद्दल रा. नरसोपंत केळकर यांनी पूर्वग्रहरहित वृत्तीने हें पुस्तक लिहिलें आहे असें म्हणून ग्रंथकर्त्याची तारीफ केली आहे. यावरून या दोघांही सद्गृहस्थांस अमानुल्ला हा अगदीं कुचकामी, दुर्बल व निस्सत्व प्राणी आहे असें वाटतें असें दिसतें. परंतु आमच्या मतें अमानुल्लाविषयींचा हा अभिप्राय बरोबर नाहीं. आमची अशी समजूत आहे कीं अमानुल्लाच्या योग्यतेचीं माणसें युरोप अमेरिका खंडांतहि फार थोडीं सांपडतील. एका अगदीं असंस्कृत समाजांत जन्मास आलेल्या माणसाने स्वयंस्फूर्तीने आपल्या राष्ट्रांत इतक्या सुधारणा करण्याचें मनांत आणावें ही एक अद्भुत गोष्टच मानिली पाहिजे. आम्ही जसें इंग्लिश लोकांचें अनुकरण करतों, त्याप्रमाणें अमानुल्लाच्या सुधारणा म्हणजे नुसतें अनुकरण-बुद्धीचेंच कार्य नव्हतें. अमानुल्लाला कोणत्याहि प्रकारचें शिक्षण मिळालें नव्हतें अथवा केमलपाशाप्रमाणे युरोपियन लोकांशीं त्याचा संबंधहि आलेला नव्हता. तार्झीच्या शिकवणीने सुधारणेचें तारूं समुद्रांत लोटलें असें म्हणून अमानुल्लाची योग्यता कमी करण्याचा प्रयत्न विफलच होणार असें आमचें मत आहे. अमानुल्लामध्यें स्वतः विचार करण्याची जर पात्रता नसती तर सासऱ्याच्या शिकवणुकीची शिदोरी जांवयास कोठपर्यंत पुरली असती याचा विचार करावा. युरोपची सफर करण्याची कल्पनाच अमानुल्लाची श्रेष्ठता स्थापित करण्यास पुरेशी आहे. त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं त्याने जीं भाषणें केलीं

तीं नांवाजलेल्या मुत्सद्यांना शोभतील अशाच प्रकारचीं होतीं. तसेंच रशियाला भेट देण्यांत त्याने जें मनोधैर्य प्रकट केलें तेंहि वर्णनीय नाहीं असें कोण म्हणेल ? हा मुल्लांच्या राज्यांत जन्मास आलेला मुसलमान धर्माच्या खुळया कल्पनांपासून अलिप्त राहतो, ही एकच गोष्ट अमानुल्लाची असामान्य योग्यता ठरविण्यास पुरेशी होईल असें आम्हांस वाटतें. "अफगणिस्थान सहा महिन्यांच्या आंत युरोपमधील कोणत्याहि राष्ट्राच्या तोंडीला येतें कीं नाहीं तें पहा, इराण मागें राहील; पण अफगाणिस्थान आतां प्रगतीच्या मार्गावर जोराने धांवणार" ही सदिच्छा बाळगणारे किती राजे निघतील बरें ? अमानुल्लाला स्वतंत्र विचारशक्ति नव्हती हें रा. टिकेकर यांचें म्हणणें आम्हांला मुळींच पटत नाहीं. पूर्वीची कांहीं तयारी नसतांना युरोप व इतर खंडांतील स्वतंत्र राष्ट्रांमध्यें अफगाणिस्थानचे वकील नेमण्याजोगे अधिकारी अमानुल्लाने तयार केले, आंतरराष्ट्रीय उलाढालींत लक्ष घालण्यास त्याने आपल्या मुत्सद्यांना शिकविलें, वर्तमानपत्रांची आवड जनतेंत उत्पन्न केली, लष्करी व बौद्धिक शिक्षणाची आधुनिक व्यवस्था अमानुल्लाने आपल्या प्रजेस उपलब्ध करून दिली, इत्यादि गोष्टी रा. टिकेकरांनीच कबूल केल्या आहेत. असें असून अपात्रतेचा शिक्का अमानुल्लावर त्यांनी मारावा, हें आम्हांस जरा चमत्कारिक वाटतें. पण या बाबतींत रा. टिकेकरांची धरसोड व त्यांची झालेली तारांबळ हीं कोणालाहि दिसून येण्यासारखीं आहेत. अमानुल्लाला बंडाचा प्रतिकार करतां आला नाहीं आणि त्यास राज्यत्याग करावा लागला, या एका गोष्टीमुळे त्याच्या अनेक गुणांवर हरताळ कसा फासला जातो हें आम्हांस समजत नाहीं. राज्यासन स्थिर करतां आलें म्हणजेच शहाणपण असतें असें का मानावयाचें ? दोन वर्षें राज्याच्या बाहेर असून बंडखोरांनी बंड उभारलें नाहीं यावरून प्रवासास बाहेर पडतेवेळीं आमूलाग्र सुधारणा राज्यांत करणारा अमानुल्ला आपल्या प्रजेला अप्रिय झाला होता असें दिसत नाहीं. अफगाणिस्थानांतलें बंड कोणाच्या प्रेरणेने झालें हें अद्यापि उजेडांत यावयाचें आहे. पुष्कळ गोष्टी अजून गुलदस्तांत असून तशाच त्या आणखी कांहीं वर्षें राहतील हें उघड आहे. म्हणून अमानुल्लाच्या आरोपित पळपुटेपणाबद्दल अखेरचा निर्णय देण्याची वेळ अद्यापि आली नाहीं. अमानुल्ला हा शांतताप्रिय राजा होता यांत कांहीं शंका नाहीं. युद्ध करून प्राणहानि करणें हें तो पाप समजत असला पाहिजे. अशा वृत्तीच्या राजाने नादिरखानाला सेनापति म्हणून ठेवून घेतला असता तरीसुद्धां या गोष्टीचा पश्चात्ताप करण्याची पाळी अमानुल्लावर बहुधा आली असती, असें मानणें अगदीच अक्षम्य होणार नाहीं. नादिरखान हा धूर्त मनुष्य अमानुल्लाच्या स्वभावाचा दुरुपयोग केल्याशिवाय कधीहि राहता ना असें अमानुल्लाच्या मनांत येणें अगदीं स्वाभाविक होतें. नादिरखानाने स्वतः गादीवर बसावयास नको होतें असेंच आम्हांस वाटतें. त्याच्यांत जर स्वामिभक्ति असती तर अमानुल्लाला परत बोलावून त्याला सिंहासनस्थ करून अंतर्गत बंडाळी मोडण्याचें काम त्याने आपल्या शिरावर घ्यावयास पाहिजे होतें. असें करणें अफगाणिस्थानच्या सध्यांच्या स्थितींत वेडेपणाचें झालें असतें असें आम्हांस

मुळींच वाटत नाहीं. नादिरखानाच्या आताच्या वर्तनावरून अमानुल्लानें नादिरखानाला हातीं धरला नाहीं हें शहाणपणाचेंच कृत्य होतें असें ठरतें. अमानुल्लाविरुद्ध बंड उभारल्यानंतरहि सरकारने तटस्थ वृत्ति कां धरावी हें आम्हांस समजत नाहीं. आम्हांस असें वाटतें की, हिं. सरकारने अमानुल्लाच्या मदतीस जाणें हें त्यांचें कर्तव्य होतें. अमानुल्लाच्या योग्यतेचा राजा अफगाणिस्थानांत कायम राहिला असता तर एक रानटी देश सुधारणेच्या मार्गाला लावण्याचें श्रेय हिं. सरकारास लाभलें असतें. शिवाय अमानुल्लाजवळ बरीच संपत्ती असल्यामुळे हिं. सरकारावर मदतीचा सर्व खर्च पडलाच असता असें नाहीं. आणखी अमानुल्ला हिं. सरकारचा सदैव ऋणी राहता हा एक फायदा झाला असता तो वेगळाच. रशियाची भीति नाहींशी करण्याची ही चालत आलेली संधी हिं. सरकारने गमावली याबद्दल हिं. सरकारास कोणीहि दोषच देईल. आता एवढी मात्र गोष्ट खरी की आपल्याच प्रजेच्या वाढत्या असंतोषामुळे देशांतील सैन्य परदेशांत पाठविण्याचें धाडस हि. सरकारास करतां आलें नसेल. अफगाणिस्थानांत अमानुल्ला जर आज गादीवर असता तर त्याच्या विचारांचा परिणाम हिंदुस्थानांतील धर्मवेडया व अडाणी मुसलमानांवर निःसंशय झाला असता. या दृष्टीने विचार करतां अमानुल्लाच्या राज्यत्यागाने हिंदुस्थानचें फार नुकसान झालें आहे असें म्हणावें लागतें. सुरय्या राणीचे फोटो विमानांतून टाकून लोकांमध्यें पसरविण्यांत कोणाचा काय हेतू असला पाहिजे हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं अचानक रीतीने अमानुल्लाच्या विरुद्ध कोणींतरी मुद्दाम बंड उभारलें आणि त्यामुळें या थोर राजावर आपला देश सोडण्याचा प्रसंग आला. एकंदरींत अमानुल्लाच्या संबंधाने लिहितांना रा. टिकेकरांची जी चलबिचल व धांदल उडाली आहे ती पाहून त्यांजबद्दल सहानुभूति उत्पन्न होते.

रा. टिकेकरांनी नादिरशहाची फारच स्तुति केली आहे. ती थोडी अनाठायीं आहे असें आमचें मत आहे. अमानुल्लाच्या सुधारणा जर नादिरखानाला मान्य होत्या तर त्या सुधारणांचें बीं राष्ट्रांत रुजविण्याकरितां अमानुल्लाला त्याने मनोभावें साह्य केलें काय ? नादिरखानाला सुधारणांपेक्षां राज्यपदच अधिक प्रिय झालें यांत शंका नाहीं. मुल्लांकडे त्याने त्यांचे सर्व अधिकार दिले याबद्दल रा. टिकेकर नादिरखानाची प्रशंसा करीत आहेत, परंतु या "दाढीदीक्षितां"च्या हातून न्यायदानाचें काम यथार्थ होईल, अशी कोण अपेक्षा करील ? आणि ज्या राष्ट्रांत न्यायाचें काम बरोबर चालत नाहीं, त्या राष्ट्राची मी सुधारणा केली अशी घमेंड नादिरखानास मारतां येईल काय ? अफगाणांचा राजा शूर पाहिजे, व त्याप्रमाणे नादिरखान शूर आहे यांत कांहीं संशय नाहीं. तसाच तो मुत्सद्दी आहे व विद्यासंपन्न असून चतुर आहे. पण स्वार्थत्याग आणि देशसेवा हे गुण मात्र त्याच्यावर लादण्यास आम्ही तयार नाहीं. एकंदरींत आमच्या मतें टिकेकरांच्या प्रकृतीला सात्विकवृत्ति रुचत नाहीं. कावेबाजपणा, कुटिलता, विश्वासघात इत्यादि गुण मुत्सद्दयामध्यें क्षम्य आहेत एवढेंच नव्हे तर ते अवश्यक आहेत, अशी एका जुन्या काळीं असलेली समजूत रा. टिकेकरांनी अद्यापि सोडलेली नाहीं,

त्यामुळे अमानुल्लापेक्षां नादिरखानाचाच गौरव त्यांनी अधिक केला आहे. इस्लाह वर्तमानपत्र काढून जनतेला आपली बाजू कळलेली असावी या हेतूबद्दल जर नादिरखानाची वाहवा करावयाची तर नादिरखानाचें इस्लाह पत्र ज्याच्या दूरदर्शी धोरणामुळे लोक वाचूं शकले त्या अमानुल्लाला या प्रसंगीं विसरून कसें चालेल ? तसेंच नाना फडणीसाबरोबर नादिरखानाची तुलना करून नादिरखान नाना फडणीसाच्या दुप्पट शहाणा आहे, असा जो शेरा ग्रंथकर्त्यानें मारला आहे, तोहि आमच्या मतें अगदी अयोग्य आहे. नादिरखान आपण स्वतः गादीवर बसला परंतु नाना फडणीसानें स्वामिनिष्ठ राहून फक्त मराठेशाही कायम राहण्याची शिकस्त केली. त्यानें स्वतः राज्यलोभ धरला नाहीं. अमानुल्लाला गादीवर बसवून नादिरखानानें जर त्याचें राज्य चालविलें असतें, तरच त्याची नाना फडणीसाशीं तुलना करणें बाबगें झालें नसतें.

असो. आतां हें राजकारण अथवा लोककारण सोडून आपण दुसऱ्या गोष्टींचा विचार करूं.

अफगाण लोकांच्या कित्येक चालीरीती मनन करण्यासारख्या आहेत. रा. टिकेकरांपेक्षा कांहीं बाबतींत ज्ञानकोशकारांनी अधिक माहिती दिलेली आढळते. मुलीचें नांव न सांगणें, तसेंच नामजादबाजी इत्यादि किरकोळ चालीरीती जरी विशेष महत्त्वाच्या कोणास वाटल्या नाहींत, तथापि भावजयीशीं लग्न करण्याची अफगाण लोकांची रीत संशोधकाला विचार करण्यास लावण्याइतकी महत्त्वाची आहे. टिकेकर लिहितात— भावजय विधवा झाली कीं तिजवर हक्क तिच्या दिराचा असल्यानें तिला दुसऱ्या लग्नाच्या वेळींही कांहीं आवडनिवड दर्शवितां येत नाहीं. ही चाल वाचल्यावर आम्हांस ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील एका ऋचेचें स्मरण होतें आणि ही ऋचा उपरोक्त चालीला उद्देशून तर लिहिली नसेलना असा संशय येतो. ती ऋचा येणेंप्रमाणे—

उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं गतासुमेतमुप शेष एहि ।
हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभि संबभूव ॥

या ऋचेचें चिंतामणशास्त्र्यांनीं भाषांतर केलें आहे तें येणेंप्रमाणे—

"हे स्त्रिये, या तूं मेलेल्या पतीच्या समीप शयन केलें आहेस, तर हा जिवंत लोकांचा समुदाय पाहून प्रेताजवळून ऊठ आणि इकडे ये व पुनर्विवाह करूं इच्छिणाऱ्या पाणिग्रहण करणाऱ्या या पतीच्या भार्यात्वाप्रत मुख्यत्वेंकरून तयार हो."

पुनर्विवाहाला अनुकूल प्रमाण म्हणून या ऋचेचा उपयोग आजपर्यंत पुष्कळांनी केला आहे. परंतु ऋचेच्या नुसत्या अर्थानें कोणत्याहि पूर्वग्रहानें अलिप्त असलेल्या माणसाचें समाधान होण्याजोगें नव्हतें. जिचा पती नुकताच कालवश झाला आहे त्या स्त्रीला उद्देशून स्मशानांतच आपल्या पतीच्या सरणाजवळ ती बसली असतां तिऱ्हाईत मनुष्य पुनर्विवाहाची गोष्ट काढील हें शक्य नाहीं. पण दिराचा हक्कच त्या विधवेवर असेल तर त्यानें मात्र वरीलप्रमाणे बोलणें असंभवनीय वाटत नाहीं. म्हणून या दृष्टीनें वरील मंत्राचा अर्थ लावणें जरूर आहे असें आम्हांस वाटतें.

लेखनाची कला ही रा. टिकेकर यांची वडिलार्जित तर आहेच पण या नुसत्या वडिलार्जित भांडवलाचीच शेखी न मिरवितां त्यांनी त्यांत स्वतःच्या भांडवलाची भर टाकली आहे. रा. टिकेकरांनी प्रथम वर्तमानपत्रांत लिहिण्यास आरंभ केल्यामुळे वर्तमानपत्री भाषेची छाप त्यांच्या ग्रांथिक भाषेवर बसल्याचें उघड दिसून येतें. त्रुटित व प्रश्नांकित वाक्यें वर्तमानपत्रांत जितकीं खुलतात तितकीं भारदस्त ग्रंथांत खुलत नाहींत. बाकी त्यांच्या इतर गुणांप्रमाणेच त्यांची भाषाशैलीहि विशिष्ट प्रकारची असून ती कोणत्याहि कसलेल्या लेखकाच्या भाषेशीं स्पर्धा करूं शकेल, अशा योग्यतेची आहे यांत शंका नाहीं. या पुस्तकाचीं मुद्रितें तपासण्याची फारच खबरदारी घेतली असावी, असें वाटतें. इतकें शुद्ध लिहिलेलें व छापलेलें पुस्तक दुसरें आमच्या पाहण्यांत नाहीं. पहिल्या अडीचशें पानांपुरतें तरी वरील म्हणणें अक्षरशः खरें आहे. याच्यापुढें मात्र मुद्रितें तपासण्यांत हयगय झालेली दिसते. पुस्तकावर इतके परिश्रम केले असून किंमत अतिशय माफक ठेविली आहे. हीहि कांहीं कमी महत्त्वाची गोष्ट नाहीं. रा. टिकेकरांच्या श्रमांचें चीज जर महाराष्ट्राला करतां आलें नाहीं, तर मराठी ग्रंथांसंबंधानें आधींच रुजलेला निराशेचा अंकूर अधिकच फोफावेल यांत संदेह नाहीं. रा. टिकेकरांनी आशिया खंडांतील सर्व देशांत प्रवास करून स्वतः निरीक्षणपूर्वक माहिती मिळवून ती ग्रंथद्वारा प्रसिद्ध करावी आणि मराठी वाङ्मयांत स्वतंत्र ग्रंथरचना निर्माण करावी अशी आमची त्यांस आग्रहाची विनंति आहे. कारण अशा प्रकारची कामगिरी करण्याची पात्रता त्यांनी सिद्ध केली आहे. मात्र इंग्रेजी भाषेंत ग्रंथरचना करण्याचा मोह त्यांनी धरूं नये. आणि या बाबतींत रा. नरसोपंत केळकर यांनी त्यांस केलेला उपदेश त्यांनी बाजूस सारावा असें आमचें निश्चित मत आहे. होतकरू मराठी लेखक इंग्रेजींत ग्रंथरचना करूं लागल्यास ते मराठीच्या दृष्टीने बाटलेच असें समजण्यास हरकत नाहीं. हिंदू मनुष्य ख्रिस्ती झाला असतां त्याला जसा हिंदूसमाज मुकतो तद्वतच आपण इंग्रेजी भाषेंत लिहिण्याने होणार आहे. इंग्लिश भाषेचा प्रसार अधिक आहे, म्हणून जर्मन किंवा फ्रेंच ग्रंथकार इंग्लिश भाषेंत ग्रंथरचना करण्याचें कधी मनांत आणतात काय याचा विचार करावा. ही अस्वाभाविक विचित्र खेचरी कल्पना मनांत सुद्धां येतां कामा नये असें आम्हांस वाटतें. इंग्रेजींत लिहिलें असतां इंग्लिश लोक मोठ्या उत्सुकतेने अथवा आदराने आपले ग्रंथ वाचतील असें आम्हांस वाटत नाहीं. इंग्लिशमध्यें लिहिणें म्हणजे तितकी मराठीमधें कमी ग्रंथरचना करणें होय, अर्थात् मराठीच्या ऐवजीं इंग्लिशमध्यें लिहिणें म्हणजे आपण आपल्या घरांतील संपत्ती आपण होऊन दुसऱ्याच्या स्वाधीन करण्यासारखें आहे म्हणून या फंदांत रा. टिकेकरांसारख्या तरुणांनी कधीहि पडूं नये.

अखेरीस रा. टिकेकरांचा इराण व मेसोपोटेमियावरील ग्रंथ लवकरच वाचावयास मिळेल; तसेंच अफगाणिस्थानांत फेरफटका केल्यावर सुधारून काढलेली प्रस्तुत पुस्तकाची दुसरी आवृत्ति थोड्या अवधींतच वाचकांच्या हातीं पडेल अशी आशा करून हें परीक्षण संपवितों.

---

# अभिप्राय

**सावित्रीचें कथानकः**—( लेखक श्री. विष्णु सखाराम घाटे, एल्. सी. ई. मूल्य ४ आणे ). श्री. घाटे यांनी 'कीर्तन वाङ्मया'च्या मागे लागून त्याचा जो पुरस्कार आरंभिला आहे, त्याला जोड म्हणून पुराणांतील गोष्टी नवीन पद्धतीने, पण त्यांनी 'कीर्तनवाङ्मय' या आपल्या निबंधांत प्रतिपादिलेल्या तत्त्वानुरूप, लिहिण्याचें ठरविलें असून **भस्मासुर** आणि **सावित्री** यांचीं कथानकें तशीं लिहून प्रसिद्ध केलीं ही गोष्ट यथाक्रमच झाली आहे. सावित्रीच्या कथानकाचा आधार धरून आधुनिक काळीं स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार करण्याचा व योग्य तें शिक्षण स्त्रियांना दिल्यास त्याला गोड फळेंच येतील हा सिद्धान्त स्थापित करण्याचा यत्न लेखकाने केला आहे. पण ज्याला ऐतिहासिक असें चिकित्सक दृष्टीने म्हणतां येणें कठीण अशा प्रकारचें कितीही गोंडस भाषेंत वर्णन केलें तरी, त्यांना वास्तविकत्व येऊन आजच्या चिकित्सक काळांत त्यांचा ध्येय म्हणून कितीसा उपयोग होईल याची शंका वाटते. सावित्री व यम यांचा संवाद खरोखरीची घडलेली ऐतिहासिक गोष्ट होय असें थिआसॉफिस्ट वाङ्मयाच्या आधारावर ( पान ३७ ) वाचकांना अनुमान काढावयास सुचविलें, तरी आज त्यावर श्रद्धा ठेवणारीं माणसें फारशीं असणें शक्य वाटत नाहीं. यास्तव त्या संवादाचें रूपकात्मक स्वरूप उलगडून दाखविण्याचा प्रयत्न केला असता तर बरें झालें असतें. सावित्री आपल्या पतीसाठी यमाशीं शब्दांनी झगडली व तिला यश येऊन यमराजाचा पराभव झाला, हें उघड उघड रूपक होय. पतीच्या प्राणरक्षणासाठी अत्यंत बिकट परिस्थितींत सावित्रीने जिवापाड श्रम केले व निराश न होतां प्रयत्न केला व त्या प्रयत्नाला ईश्वरकृपेने यश आलें, एवढ्या वर्णनाने आजकाल जो परिणाम होईल, तो प्रस्तुत पुस्तकांत पुराणोक्त विधीने केलेल्या वर्णनाने होईल असें वाटत नाही. पण हा मतभेद सोडून दिला तर लेखकाने आपलें कार्य चांगलें केलें आहे असें म्हणावें लागतें.

हें कथानक लिहितांना हरिदासी पद्धतीला अनुसरून त्यांत प्रसंगोपात्त मूळ भारतांतील संस्कृत वचनें, स्वकृत प्राकृत पदें, मुक्तेश्वर मोरोपंतादि महाराष्ट्रकवींच्या ओंव्या, आर्या इत्यादि पद्यें, तशींच कालिदास, भवभूति, भर्तृहरि, भारवि इत्यादि कवींचीं सुभाषितवर्गांतील संस्कृत पद्यें घातलेलीं असल्यामुळे कीर्तनप्रसंगीं त्यांचा चांगला उपयोग होईल. पण हीं पद्यें घालतांना वडाची साल पिंपळाला चिकटविणें नीट दिसत नाही. सामान्य विवेचन करितांना एखाद्या सुभाषिताचा आधार घेणें निराळें. पण 'व्यतिकरितदिगन्ताः' इत्यादि भवभूतीच्या मालतीमाधवांतील श्लोक यमराज सावित्रीला म्हणाले असें अवतरण करून उद्धृत करणें आम्हांला ठीक वाटत नाही.(पान ४८ पहा).

कर्मसिद्धान्ताचें उद्घाटन सावित्रीदेवीच्या तसेंच पुढे यमाच्या भाषणांत केलें

आहे, तें समाधानकारक नाहीं. अश्वपतीच्या कर्मांत मुलगा नव्हता कीं अपत्यच नव्हतें ? अपत्यच नसेल तर मुलगी तरी कशी झाली ? व्रताच्या व तपाच्या प्रभावाने ती झाली म्हणावी तर तो नियम पुत्रोत्पत्तीला कां लागू नाहीं ? सत्यवानाच्या कर्मामुळे तो विशिष्ट वेळीं निश्चित मरावयाचाच असें असतांहि सावित्रीच्या पुण्याईमुळे व कर्तृत्वामुळे तो मृत होऊनहि पुनः सजीव झाला यांत कर्माचा सिद्धान्त कोठे राहिला ? असे अनेक प्रश्न या विवेचनावरून पुढे येतात. आजवर हरदासी आख्यानांत तर्कपद्धतीला फांटा देण्यांत आला आहे, तोच क्रम पुढे चालविल्यास ठीक आहे. पण एकदा तर्काला आरंभ केल्यावर कसा प्रसंग येतो हें या प्रश्नांवरून दिसून येईल.

दुसऱ्या प्रकरणांत अपत्योत्पादन व संततिनियमन या संबंधाने विस्तारपूर्वक विवेचन केलें आहे, तें अस्थानी दिसतें. तसेंच सावित्रीच्या शिक्षणाचें वर्णनहि ( पा. १२ ) निष्कारण अतिशयोक्तिमय आहे. त्यांतील ' नित्य नव्या नव्या कल्पनांचीं दुकूलें परिधान करून काव्यगंगेंत तिने अवगाहन करावें ' ह्या वाक्याचें मर्म चांगलेंसें ध्यानांत येत नाहीं. दुकूलें अंगावर घालून जलावगाहन करण्यांत काय मौज ! काव्यगंगेंत उतरून नित्य नव्या नव्या कल्पनाडोहांत तिने बुड्या माराव्या, असें म्हणणें कदाचित् अधिक समर्पक झालें असतें. ' अनादिकालापासून तों अगदी अलीकडचे काळापर्यंत पुरुषांनीच स्त्रियांसाठी मागणी घालण्याचा प्रघात चालत आलेला आहे' ( पा. १२ ). ही गोष्ट मंडपशोभेपुरतीच आज तरी खरी आहे. वस्तुस्थितींत निदान-पांढरपेशा व सुधारलेले म्हणविणाऱ्या वर्गांत ती नष्टच झालेली आहे.

पान ३० वर शकुन्तलापुत्र भरतावरून हिंदुस्थानाला **भारतवर्ष** हें नांव मिळालें असें म्हटलें आहे; पण त्याला आधार काय ? महाभारतांत तसें कांही सांगितलेलें नाहीं. उलट भागवतांत मात्र ऋषभ राजाचा पुत्र जो भरत त्याच्यावरून भारतवर्ष हें नांव चालू झालें असें स्पष्ट सांगितलें आहे. सावित्रीदेवी ही ब्रह्मदेवाची बायको. ती विष्णूसंबंधाने ' विष्णुभावोजी ' ( पा. १० ) म्हणते हें कसें ! ब्रह्मदेव विष्णूचा मुलगा ना ? म्हणजे सावित्रीचा सासरा ना ? मग 'मामंजी' नको का म्हणावयाला ? तसेंच **शंकर** ब्रह्मदेवाचा पुत्र ( भागवत स्कंद ३ ) त्याला सावित्रीने 'चिरंजीव शंकर ' न म्हणता ' शंकर भावोजी ' ( पा. १० ) कसें म्हणावें बरें ? सूर्य हा प्रजापति कश्यपाचा पुत्र, अर्थात् ब्रह्मदेवाचा नातू; मग सावित्रीने त्याला ' माझा पुत्र ' म्हणून कसें जुळेल ? ( पा. १० ).

अलीकडे कर्मकर्तरि प्रयोगाचा अनवश्यक उपयोग कित्येक जण करूं लागले आहेत. ' दिलें गेलेलें शिक्षण ' ( पा. ११ ) ' शिक्षण स्त्रियांना दिलें जावें ' ( पा. ११ ) ' दिलें गेलें असावें ' ( पा. १३ ) ' दिले जाणाऱ्या शिक्षणाचा ' ( पा. १४ ) इत्यादि ठिकाणीं दिलेलें शिक्षण, शिक्षण स्त्रियांना द्यावें, दिलें असावें, देत असलेल्या, असे प्रयोग अधिक चांगले असें वाटतें पण हा प्रश्न मतभेदांत जाईल.

'पर्वत संहार करून टाकिले पाहिजेत' (पा. २४) यांत संहार' न म्हणतां 'नष्ट किंवा नाहींसे म्हणणे बरें पडलें असतें.

अन्यायाचें माप **त्याचे पदरांत** घालून (पा. १), **त्याचे मस्तकांवर** (पा.३६), **त्याचे बलावर** (पा. ४१) या चुका टाळण्यासाठी **त्याच्या पदरांत, त्याच्या मस्तकावर, त्याच्या बलावर** असा आकारान्त प्रयोग करणें इष्ट होईल.

सुरू व चालू असे कां? (पा. १०, २१, ३६, ४०), पद्धत आहे; पण ती चूक आहे. चालू क्रियाविशेषण असेल (उदाहरण पा. २५) तर ठीक आहे. पण सुरूला तसा संभवच नाही.

रहाण्याची (पा. ६), राहणें (पा. ११), राहाणें (पा. २७), रहात (पा. २९) राहणी (पा. ३०), राहाणार (पा. ४०) राहणारे (४१) अशीं विविध रूपें एकाच पुस्तकांत येणें इष्ट नाहीं; एक कांही तरी नियम पाहिजे.

कर्मणि व कर्तरि प्रयोगांचें मिश्रण करून कर्तरि प्रयोगांतील कर्ता गाळणें व पहिल्या तृतीयान्तील कर्त्यांतून प्रथमान्त कर्ता अध्याहृत करणें बरें नव्हें. राजाने आपलें मनोगत देवीस सांगितलें व म्हणाला (पा. ८), आपला पराभव त्यांनी जवळ जवळ कबूल केला व म्हणाले (पा. ४५) यांत म्हणाला व म्हणाले यांच्यापूर्वी अनुक्रमें **तो** व **ते** असे कर्ते पाहिजेत. अश्वपतिला (पा. २२), पतिच्या (पा. ३०, ३७, ४४) पतिबरोबर (पा. ३३ तीन वेळीं) पतिची (पा. ३३), पतिचें (पा.३५), यांत **ती** दीर्घ पाहिजे. असो याप्रमाणे हे व इतर मतभेदाचे प्रकार या पुस्तकांत आढळत असले तरी एकंदरींत पुस्तक वाचनीय झालें असून, नव्या धर्तीच्या मांडणी-मुळे अनुकरणीयहि झालें आहे. रा. घाटे यांनी आपला प्रयत्न असाच पुढे चालविल्यास त्यांच्याहातून कीर्तनवाङ्मयांत चांगली भर पडेल. **के. ल. ओगले**

**प्रयत्नांतीं परमेश्वरः**—(ले. पि. डी. चुरी) प्रस्तुत पुस्तक म्हणजे एका खटपटी (most pushing) माणसाच्या सफल झालेल्या खटपटींचा इतिहास आहे. डॉ. नवले यांचें आत्मचरित्र म्हणून जरी लेखकाने लिहिलें नसलें तरी त्यांच्या चरित्राचा एक महत्त्वाचा भाग यांत वर्णिला असल्यामुळे यास अर्धचरित्र म्हणतां येईल. संपत्ति, विद्यार्जन, वग-वशिला हीं पुढे येण्याचीं नेहमीचीं साधनें होत. पण या साधनांचीं अनुकूलता नसूनहि डॉ. नवले यांनी संपत्ति व लौकिक संपादन केला. हा प्रकार कसा घडला हें या पुस्तकांत दाखविलें असल्यामुळे तरूण माणसांस या पुस्तकाच्या वाचनाने प्रोत्साहन मिळेल.

Most pushing (अतिशय खटपटी) चळवळे हा मँटेग्यु यांचा चरित्रकारासंबंधींचा अभिप्राय अगदी योग्य आहे. कोणत्याहि प्रकारचें पद्धतशीर शिक्षण मिळालें नसतांना डॉ. नवले यांनी सांप्रत जी योग्यता प्राप्त करून घेतली ती त्यांच्या वरील स्वभावामुळेच होय. प्रत्यक्ष हें चरित्र म्हणजे त्यांची जाहिरातच आहे असा अनेक

वेळां भास होतो. एकीपुढे दुसरी अशा दोन गोष्टी, कीं ज्यांच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचा कार्यकारणभाव नाहीं, अशा निवेदन करून त्यांत कार्यकारणभाव आहे असें ध्वनित करणें, आणि त्यामुळे आपणांस न मागतांहि मोठेपणा मिळवणें असा प्रकार या पुस्तकांत वारंवार झालेला दिसून येतो. उदाहरणार्थ पान २८४ पहा. कै. गोणेहल्ली यांनी आपलें नांव बदलून नाईक असें नांव धारण केलें. ही नांव बदलण्याची कल्पना त्यांनी प्रथम डॉ. नवले यांजपासून घेतली, त्यांना अगोदर सुचली नव्हती काय ? तशी जर खरोखरी वस्तुस्थिति नसेल, तर भलताच इतिहास लिहिण्याचें पाप चरित्रकारांना जडेल अशी भीति वाटते

डॉ. नवले यांनी युरोप-अमेरिकेचा प्रवासखर्च कसा केला हें लोकांना असलेलें गूढ उकलून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण आमचें तरी त्याने समाधान झालें नाहीं. हुंडणावळीच्या भावाने प्रवास खर्च निघाला असेल. नाहीं कोणीं म्हणावें ? पण पौंड विकत घेण्यासाठी प्रथम रुपये कोठून आले हा प्रश्न अनुत्तरच राहतो.

कांही गोष्टी अस्पष्ट शब्दांत लिहून विपरीत ध्वनि उमटविला आहे. उदा. पान २७५ पहा. अमेरिकेस युद्धांत पाडण्याला इंग्लिशांनी ज्या निरनिराळ्या युक्त्या केल्या त्यांपैकीच इंग्लिशांनी मजूर पुढाऱ्यांना सरकारी खर्चाने अमेरिकेंत पाठवून जर्मनीच्या राक्षसी कृत्यांचें वर्णन करून तेथील मजूर पुढाऱ्यांना अनुकूल करून त्यांच्यामार्फत अमेरिकन सरकारास लढाईस उद्युक्त केलें असें एका प्रख्यात ब्रिटिश मुत्सद्याने भाषणाचे ओघांत खासगी तऱ्हेने सांगितलें. यामध्यें या प्रख्यात ब्रिटिश मुत्सद्याचें कोणाबरोबर खासगी भाषण झालें याबद्दल अवाक्षरही नाहीं. डॉ. नवल्यांबरोबर झालें असें समजावयाचें काय ? Pushing man असें म्हणून मॉंटेग्यूने आपला गौरव केला असें डॉ. नवले यांस वाटतें, तसेंच आपल्या झग्याचा स्पर्श डॉ. नवले यांस झाल्यामुळे लॉर्ड कर्झन यांनी नेहमीच्या सवयीप्रमाणे अथवा इंग्लिश शिष्टाचाराला अनुसरून "क्षमा करा ( Beg your pardon ) असें म्हटल्यानेहि आपल्याकडे फार मोठेपणा आला अशी चरित्रलेखकाने आपली समजूत करून घेतलेली दिसते. पत्रांतील आज्ञाधारक सेवक या मान्याप्रमाणे "क्षमा करा" हे इंग्रजी भाषेंत अर्थवाहक शब्द नाहींत, हें आता लहान मुलांनाहि समजत असतें.

पुष्कळ अस्सल पत्रांचीं छायाचित्रें या पुस्तकांत दिलेलीं आहेत. परंतु तीं देण्यांत निदान त्यांपैकी कांहीं देण्यांत तरी काय उद्देश आहे तें समजत नाहीं. कितीही वाईट स्वभावाचा साहेब असला तरी शिष्टाचार पाळल्याशिवाय तो राहात नाहीं, ही गोष्ट आतां मशहूरच आहे. आमच्या माहितीचे एक श्रीमंत ब्राम्हण गृहस्थ मराठीही फार न शिकलेले आणि इंग्रजीचा तर गंधहि नसलेले परंतु रावबहादूर आणि सी. आय्. ई. व ऑनररी मॅजिस्ट्रेट असलेले, कोणीही मनुष्य त्यांना भेटल्यास आपल्याजवळचीं मोठमोठया हुद्यावर असलेल्या देशीविदेशी साहेबांचीं पत्रें काढून

दाखवीत. त्यांपैकी बहुतेक पत्रें " तुमचीं फळें पोचलीं फार चांगलीं होतीं, पाठविल्या-बद्दल मी आपला फार आभारी आहें, अशा अर्थाचीं असत." तशीच जरी केवळ प्रस्तुत पुस्तकांतील पत्रांची स्थिति नसली तरी दोहोंत विशेष फरक नाहीं असेंच म्हणावें लागेल. चरित्रलेखकानें अधिक तारतम्य वापरलें असतें तर बरें झालें असतें.

हे व अशासारखे कांही दोष वगळले तर एकंदर पुस्तक चटकदार भाषेंत लिहिलें आहे यांत शंका नाहीं. कादंबरीवजा असल्यामुळे पुस्तक वाचतांना कंटाळा येत नाही. पुस्तकांत सुभाषितांची रेलचेल आहे, त्यावरून डॉ. नवले यांचा बहुश्रुतपणा सिद्ध होतो. मात्र व्याकरणदृष्ट्या अशुद्धें पुष्कळच राहिलीं आहेत. असल्या चरित्रांचा Visiting Cards सारखा उपयोग होतो. आपला संबंध ज्या माणसांशीं येतो त्यांच्या चरित्रांतील मोठमोठ्या गोष्टींसुद्धा आपणांस माहीत नसतात व त्यामुळें संबंध आले-ल्या माणसांची खरी योग्यता आपल्यास ठरवितां न आल्यामुळे त्या माणसांशीं आपलें वर्तन जसें असावयास पाहिजे तसें असतेंच असा नियम नसतो. त्यांचें चरित्र वाचल्यावर या गोष्टी आपणांस अगोदर ठाऊक झाल्या असत्या तर बरें झालें असतें असें वाटूं लागतें. म्हणून समाजापुढें येणाऱ्या व्यक्तींचीं साद्यंत चरित्रें एकमेकांस माहित असणें अवश्य आहे. या दृष्टीनेही असलीं चरित्रें उपयुक्तच होतील.

आत्मचरित्र लिहून आपल्या हयातींत प्रसिद्ध करणें जरा धोक्याचें असतें. अनेक हयात व्यक्तींचा कारणपरत्वे निर्देश करावा लागतो. त्याचा परिणाम कोर्ट-कचेऱ्या पहाव्या लागण्यांत व्हावयाचा ! कादंबऱ्यांतील उल्लेखावरून सुद्धां जर आपली नालस्ती केल्याबद्दल लोक तक्रार करतात तर अशा ठिकाणीं कां कमी करतील ?

पुस्तकांत निर्दिष्ट केलेल्या गोष्टी पुष्कळांस माहीत असण्याचा संभव असल्या-मुळे त्यांचा खरेखोटेपणा कोणासहि पडताळून पाहण्यासारखा आहे.

डॉ. नवले यांचे शिक्षणविषयक विचार योग्य आहेत. पुस्तक आशेचें वाता-वरण उत्पन्न करणारें आहे. डॉ. नवल्यांची बुद्धिमत्ता पुष्कळांत असेल. पण त्यांचा स्वभाव अंगीं बाणल्यावांचून त्यांच्याप्रमाणें इतरांस यशःप्राप्ति होईल कीं नाहीं याची शंका वाटते.

**सार्थ ज्ञानेश्वरीसारः**— ( प्रकाशक डॉ. शं. अ. जोशी; सदाशिव पेठ, पुणें. किंमत ८ आणे ) अंतरंगसाधनाशिवाय साक्षात्कार होणार नाही. या सिद्धांताला पोषक असे ज्ञानेश्वरींतले उतारे घेऊन त्यांचा अर्थ केला आहे. अर्थ शब्दशः केला नाहीं हें बरें नव्हे. शब्दशः अर्थ आणि नंतर जरूर तेथे विवरण असें करावयास पाहिजे होतें. श्री. मोहोळकर यांची विचारसरणी तर्कशुद्ध दिसते. तूर्त गीतार्थाचे जे वाभारे निघत आहेत त्यांस श्री. मोहोळकरांच्या प्रयत्नाने आळा बसेल असें वाटतें. " विरक्तांना म्हणजे ' वियति रक्ताः ' 'आकाशतत्वांत गुंगणाऱ्यांना " अशा प्रकारचे अर्थ थिऑसोफिस्टांची आठवण करून देणारे आहेत. यांस जपलें पाहिजे.

**कर्मनिश्चयः**— ( ले. व्यंकटेश रामचन्द्र मोहोळकर वकील, पंढरपूर, किं. ४ आणे ) या पुस्तकांत गीतेंतील कर्म शब्दाचा अर्थ निश्चित केला आहे. गीतेंत कर्म शब्द १५५ वेळां आला आहे. या सर्व ठिकाणीं कर्म शब्द कोणत्या अर्थानें योजिला आहे हें ठरवून त्याचा अर्थ अतींद्रियप्राणस्पंदन ( श्वासांदोलन नव्हे ) असा निश्चित केला आहे. अर्थ लावण्याची ही पद्धति अत्यंत शास्त्रीय आहे यांत शंका नाहीं. हें पुस्तक वाचल्यावर गीतेवर भाराभर पुस्तकें झालीं असूनहि अद्यापि आपण एक पायरी तरी चढलों आहों कीं नाहीं अशी मनांत शंका येते. ग्रंथकारांच्या मतें "आम्ही जें जें करतों........तें तें कर्म नव्हे; कर्म हें गतिरूप असून तें सामान्य जीवांना अज्ञात अशा अवस्थेमध्यें वावरत असतें." 'कर्म ज्यायो ह्यकर्मणः' याचा अर्थ "नियतं कर्म अनियतकर्मणः ज्यायः", कर्म हें क्षरब्रह्मापासून उत्पन्न झालें आहे. 'भूतभावोद्भव-करो विसर्गः कर्मसंज्ञितः' याचा अर्थ 'भूतांचें अस्तित्व प्रकट करणारा जो गतीचा झटका तें कर्म होय'. "अरागद्वेषतः कृतम्' या पदसमुच्चयानें हें कर्म अतींद्रिय आहे असें दाखविलें आहे. कारण रागद्वेषाचें उच्चाटण इंद्रियगोचर प्रांतांत होऊंच शकत नाहीं." "ध्यानात्कर्मफलत्यागः" इत्यादि वचनें रा. मोहोळकरांच्या अर्थाला अनुकूल आहेत. सहजं कर्म याचा अर्थ रा. मोहोळकर प्रारंभीचें कर्म असा करतात. असो. हें लहानसें पुस्तक अत्यंत महत्त्वाचें असून विचारनावीन्यामुळे गीतेवरील प्रवचनकारांना हलवून सोडणारें आहे. या पुस्तकाकडे विद्वानांचें लक्ष्य जाईल अशी आम्ही आशा करतों.

संपादक

**हिरवळ**:— ( कवि म. प्र. सरदेसाई; किंमत ६ आणे. ) या एकूणचाळीस पानांच्या कवितेच्या पुस्तकांत पांच पानांचा परिचय दृढ न वाटतां दीर्घ मात्र वाटतो. तसेंच येवढ्याशा पुस्तकाला तीन पानांचें शुद्धिपत्र आहे.

कवि काव्यक्षेत्रांत नवखाच असल्यामुळे, वृत्तदोष व यतिभंग बरेच झाले आहेत. कवितांना वृत्तें बरीं निवडलीं असलीं तरी भावनोद्रेक नाहीं. कांहीं काव्यांमध्यें कल्पना सुंदर असून सदोष मांडणीमुळे त्यांना उठाव मिळाला नाही एवढेंच नव्हे तर खाण्याच्या पदार्थांत रेतीचे कण पडल्यामुळे जसा खाणाऱ्याचा विरस व्हावा तसा वृत्तदोषामुळे वाचकांचा विरस होतो. 'अश्रू,' 'गूढ कोडें,' 'काव्यस्फूर्ती,' इत्यादि काव्यें बरीं आहेत. कवि होतकरू आहे; पण काव्य छापून प्रसिद्ध करण्याची गडबड करण्यापूर्वी भाषा व वृत्त वगैरेंचे दोष काढून टाकण्याची खटपट केली पाहिजे. प्रयत्न साध्य आहे.

डॉ के. वा. साठे

## हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास

प्रस्तुत पुस्तक रा. सखाराम विनायक ओतुरकर, एम्. ए. हंसराज प्रागजी ठाकरसी कॉलेज, नाशिक, येथील प्रोफेसर यांनी 'प्रबुद्ध विद्यार्थ्यांसाठीं परिश्रमपूर्वक लिहिलें असून पुण्याच्या अनाथ-विद्यार्थिगृहाचें स्वतःचें प्रथमप्रकाशन म्हणून

छापिलें आहे. सव्वापांचशें पृष्ठांचें हें पुस्तक अवघ्या दोन रुपये किंमतीस मिळावयाचें असल्याने छपाई व बांधणी विशेष मोहक नाहीं हें साहजिकच आहे. या पुस्तकांत 'अतिप्राचीन काल', 'प्राचीन काल', 'मध्यकाल' आणि 'अर्वाचीन काल' असे मुख्य चार कालखंड केले असून वेदकालापासून लॉर्ड अर्व्हिनच्या कारकीर्दीपर्यंत सुमारें पंधरा हजार वर्षांचा हिंदुस्थानांतील विशेषतः राजकीय घडामोडींचा इतिहास त्यांत ग्रथित केला आहे. ( विद्यार्थ्यांसाठी म्हणून लिहिलेल्या पुस्तकाचें परीक्षण करण्याचा प्रघात नाहीं. तथापि प्रस्तुत पुस्तक कोणासहि वाचनीय व्हावें अशीच रचना केलेली असल्याने याचें संक्षिप्त परीक्षण करावयाचें आहे. ) या पुस्तकाचा विशेष हा आहे कीं, यांत बहुतेक घडलेल्या कार्यांच्या कारणांची चिकित्सा केलेली आहे. अर्वाचीन कालांतील राजकीय घडामोडी, विशेषतः कर्झनशाहीपासूनच्या, विशद रीतीने लिहिलेल्या आहेत. सनदशीर हक्कांची वाढ, नव्या मनूचीं पहिलीं आठ वर्षें, सामाजिक स्थित्यंतरें, हे भाग मोठे वाचनीय झाले आहेत. राजा राममोहन राय, बाबु केशव चंद्रसेन, न्यायमूर्ति रानडे, डॉ. भांडारकर, महर्षि दयानंद, त्यांचे गुरु विरजानंद, कर्नल ऑलकॉट, मॅडम ब्लॅव्हेटस्की, डॉ. वेझंट, स्वामी रामकृष्ण परमहंस व त्यांचे सच्छिष्य स्वामी विवेकानंद, रामतीर्थ, ह्यूम, सुरेंद्रनाथ व उमेशचंद्र बानर्जी, रावसाहेब तेलंग, सर फिरोजशहा, दादाभाई, कृष्णाजीपंत नूलकर, गोखले, टिळक, लजपतराय, महात्मा गांधी, सीतारामपंत चिपळूणकर, पितापुत्र पंडित नेहरू अशा सर्व राष्ट्रभक्तांची सुंदर यादी त्यांच्या त्यांच्या कार्यांच्या अल्प विवेचनासह या इतिहासांत आलेली फारच उद्बोधक आहे. या यादींत आनंदाचार्लू, सुब्रह्मण्य, कस्तुरीरंग यांपैकीं मद्रासेकडील एकाददुसऱ्या देशभक्ताचें नांव पुढील आवृत्तींत अवश्य घालावें असें आम्हांला वाटतें- एखादा मुसलमान देशभक्तहि आढळल्यास त्यासहि स्थान मिळावें हें योग्य आहे.

या पुस्तकांतील नकाशे चांगले आहेत. त्यांच्या जोडीला वंशवृक्ष द्यावयास पाहिजेत. त्याचप्रमाणे ज्या त्या राजाच्या बायकामुलांची माहिती ज्या त्या राजाच्या कारकीर्दींत द्यावयास पाहिजे. रा. सरदेसाई यांची ही पद्धति अनुकरणीय वाटते. तसेंच पुष्कळ राजपुत्रांचे जन्मसन देणें असून ते कां दिले नाहींत हेंहि कळत नाहीं. पृष्ठ १५ वर महाभारताची ग्रंथसंख्या वीस हजार दिली आहे ती एक लक्ष पाहिजे. पृष्ठ २८ वर गौतमबुद्धाचा जन्मकाल इ. स. पूर्व ६२३ असा असावा. पृष्ठ ३५ वर 'मुरा या नांवावरून मौर्य हें घराण्याचें नांव प्रचलित झालें' असें आजच्या समजुतीला अनुसरून लिहिलें आहे. परंतु ' मुरा ' याचें भाववाचक नाम ' मौर्य ' असें होत नाहीं हें प्रसिद्धच आहे. म्हणून ' मौर्य ' याची व्युत्पत्ति भिन्न असावी असें वाटतें. पृष्ठ ३६, १३८ यांवर रामदासाचा उल्लेख राजकीय साधु या नात्यानें आला आहे. आधुनिक टीकाकारांच्या लेखांनीं हा समज डळमळणारा नाहींना ? पृष्ठ ५२ वर सिद्धांत कौमुदी हा पाणिनीचा ग्रंथ असल्याचें म्हटलें आहे, तें चूक आहे. अष्टाध्यायी हा ग्रंथ

पाणिनीचा असून सिद्धान्त कौमुदीचा कर्ता भट्टोजी दीक्षित हा होय हें प्रसिद्धच आहे. पृष्ठ ६९ वर ' रजपूत हे अग्नीनें पावन करून घेतलेल्या शकहूणांपैकीं असावेत' असें म्हटलें आहे. पण ही कल्पना आतां श्री. वैद्यांच्या मध्ययुगीन भारतावरून त्याज्य ठरते हें रा. ओतुरकरांना ठाऊक नसावें असें वाटतें. पृष्ट.७० वरील रजपूत स्त्रियांच्या ' जोहाराचें ' कारण उलटें दिलें आहे. पतिनिधनापूर्वीच त्या जोहार करीत असत नंतर नव्हे हें पृष्ठ १०७ वरील चितोडच्या जोहारावरूनहि सिद्धच आहे. पृष्ठ ८० वर ज्ञानेश्वराबरोबरच कांहीं महानुभावी कवींचा उल्लेख यावयास पाहिजे. पृष्ठ ९० वर ' काठेवाडची राजधानी अनहिलवाडा ' असें म्हटलें असून पृष्ठ ९४ वर ' गुजरायची राजधानी अनहिलवाडा ' असें म्हटलें आहे. काठेवाडांत सोमनाथाचें देउळ असलेल्या गांवास प्रभासपट्टण हें नांव असून गुजराथच्या प्राचीन राजधानीचें नांव अनहिलवाडापट्टण असें प्रसिद्ध आहे. १७३ वर ' गुजराथ प्रांत सन १७५८ पर्यंत मोंगलांचे ताब्यांत होता ' असें म्हटलें आहे. येथें सन १७२८ असें असावें. पृष्ठ १८३ वर ' आहडी ' याचा अर्थ ' प्रतिष्ठित नागरीक ' असा दिला असून पृष्ठ १९४ वर फक्त ' मुसलमान ' असा दिला आहे. यांपैकीं खरा कोणता ! पृष्ठ १९५ वर जहांगीर विशेष ' मद्यपी ' नव्हता असें सुचविलें आहे. त्याचा जनानखाना ३००-३५० बायकांचा होता. तो अफूहि पुष्कळ सेवित असे. तिच्या जोडीला जहांगिरास दररोज किती मद्य लागत असे याचें वर्णन पुढील प्रमाणें त्यानेंच दिलें आहे.

"At first it (wine) was six cups every evening, each cup being $7\frac{1}{2}$ Tolas. Now I (Jahangir) drink six cups, each of which is six Tolas and three Mashas. ( जहांगीरचें अल्पचरित्र भाग २ रा. )

जहांगीर ज्या काळांत होऊन गेला तो काळच असा होता कीं मोठमोठे सरदार राजपुत्र मनसोक्त मद्यपान करीत असत. मिर्झा महमंद हकीम, मुराद, दानियल व परवीझ हे राजपुत्र, शहानवाजाखान जलालुद्दिन मसाउद ही सर्व प्रख्यात मंडळी अतिरिक्त मद्यप्राशनानेंच मरण पावली. पण असें जरी असलें तरी मद्यप्राशन 'हा गुन्हा क्षम्य होत नाहीं, हें आपण विसरतां कामा नये. या दृष्टीनें जहांगिराच्या चरित्राचा व कारकीर्दीचा आपण विचार केला पाहिजे. असो. बादशाहाच्या बायकामुलांची माहिती न दिल्यानें शहाजहानहि जहांगिराप्रमाणेंच रजपूत मातेच्या उदरीं जन्मलेला होता ही गोष्ट या इतिहासावरून वाचकांस कळत नाहीं. पृष्ठ २०६ वर ' जहानआरा औरंगजेबास आंतून सामील असे ' असें वाक्य आहे. येथें रोषनआरा हें नांव पाहिजे. कारण जहानआरा शहाजहानची पक्षपाती होती. शहाजहान हयात असे पर्यंत तरी तिला औरंगजेबाविषयीं प्रेम असल्याचें दिसत नाहीं. शहाजहानचा व जहानआराचा म्हणजे या पितापुत्रींचा अश्लाघ्य संबंध होता ही त्यावेळची लोकवार्ता समकालीन लेखक बर्नियर यानें सुद्धां ग्रथित करून ठेविली आहे. शिवाजीचा

आजा मालोजी हा राजा होता व निजामशहाचें अदिलशहाशीं लढतांना त्याला आपले मदतीस बोलाविलें ही शिवभारतांतील काव्यात्मक हकीकत इतिहास म्हणून पृष्ठ २३५ वर दिली आहे हें बरोबर नाहीं. मालोजी हा कधींच राजा नव्हता पृष्ठ २३७ वर 'तुकाराम शूद्र वाणी होता' असें म्हटलें आहे, त्याचा अर्थ काय? तुकाराम शूद्र होता कीं वाणी होता? शिवाजीचें चरित्र लिहितांना शिवभारताचा बराच उपयोग केला आहे पण तोहि काळजीपूर्वक केल्याचें दिसत नाहीं. पृष्ठ २३८ वर 'शहाजी १४-१५ वर्षांचा असतांना त्याचें जिजाबाईशीं लग्न झालें असें म्हटलें आहे. परंतु याला आधार नाहीं. शहाजीला दाढी मिश्या आल्यावर व जिजाबाईनें यौवनांत प्रवेश केल्यावर या उभयतांचा विवाह झाला असें शिवभारतांत आहे; परंतु ओतूरकरांना हें वर्णन अशक्य वाटत असावें असें दिसतें. शिवभारतांचा इतिहासाप्रमाणें उपयोग करण्यांत किती अडचणी येतात हें त्यावरून लक्षांत येईल. पृष्ठ २३९ वरील शहाजीची कैद, संभाजीजा मृत्यु, शाहाजीचें वर्तन या संबंधीं लिहिलेली हकीकत अगदी चुकली आहे. तसेंच पृष्ठ २४३ वर शहाजीच्या कैदेचें दिलेलें कारणहि आधुनिक संशोधनानें मिथ्या ठरलें आहे. पृष्ठ २४१ वर शहाजी 'उत्तम संस्कृतज्ञ' होता असें राधामाधवविलासचंपूच्या आधारें म्हटलें आहे. पण सदर चंपू इतिहास नसून कल्पित नाटक आहे असें मद्रासच्या के. व्ही. लक्ष्मणरावांनीं विविधज्ञानविस्तारांत सप्रमाण सिद्ध केलें होतें तें ओतूरकरांच्या वाचनांत नसावें असें वाटतें. या बाबतींत रा. द. वि. अपटयांची शिवभारताच्या प्रस्तावनेंत जी चूक झाली आहे तीच रा. ओतूरकरांनीं प्रस्तुत इतिहासांत केली आहे. पृष्ठ २४० वर निजामशाहीच्या नाशाचा सन १६३७ दिला आहे. तो सन १६३६ पाहिजे. पृष्ठ २४७ शहाजीशिवाजीच्या भेटीचा उल्लेख आहे. ही भेट काल्पनिक असल्याबद्दल सर जदुनाथ सरकार यांनीं सन १९१९ मध्यें प्रसिद्ध केलें होतें तें अलीकडेस महाराष्ट्रीय संशोधकांसहि पटूं लागलें आहे. शाइस्तेखानाची हकीकतहि अशीच पुष्कळ ठिकाणीं चुकली आहे. सिंहगडाच्या हल्लयांत 'गड आला पण सिंह गेला' या कादंबरीच्या अनुवादानें शेलार मामाचें नांव निष्कारण गाळिलें आहे. पृष्ठ २५७ वर शिवाजीस तीन बायका होत्या असें म्हटले आहे. परंतु शिवाजीस आठ बायका होत्या असें आतां इतिहाससंशोधकांच्या प्रयत्नानें सिद्ध झाले आहे. या सबंद शिववर्णनांत मोरोपंत पेशव्याचें नांवहि आलें नाहीं हें आश्चर्य होय. पृष्ठ २९० वर 'चंपतराय बुंदेल्याला औरंगजेबानें गुप्तपणें ठार केलें' असें वाक्य आहे तें चूक असावें असें वाटतें. पृष्ठ ३०१ वर दामाजीच्या सचोटीबद्दल स्तुति केली असून पृष्ठ ३६३ वर गायकवाडांना 'नेहमीं चुकवाचुकवी करणारे' असें म्हटलें आहे. हा विरोध बरोबर नव्हे. 'ध' चा 'मा' आनंदीबाईनेंच केला असें पृष्ठ ३४५ वर विधान आहे; पण तें निराधार आहे असें आतां सिद्ध झालें आहे. पृष्ठ ३०४ वर नजीबखानास पठाण म्हटलें आहे. तो रोहिला असावा असें वाटतें. असो.

## अभिप्राय

पुस्तक साधारणतः चाळून आमच्या दृष्टीस पडलेले दोष आम्ही वरप्रमाणे दाखविले आहेत. लेखनांत दूरान्वय अनेक ठिकाणीं झाले आहेत 'पौर्वात्य' (पृष्ठ १४३, ४१८ इ.) 'सत्यत्व' (पृष्ठ १७३) असे अप्रयोगिहि कांहीं आहेत. पृष्ठ ७९ वर लिंगायतांच्या पूजेचा उल्लेख जितक्या स्पष्ट शब्दांत केला आहे तितक्या स्पष्टतेची अवश्यकता नव्हती. असो. असे कांहीं दोष असले तरी पृष्ठ २१९, २५७, ३२१ यावरील कांहीं विवेचनें फार मार्मिक व लेखकाच्या चौकसबुद्धीचीं निदर्शकें आहेत. प्रस्तुत पुस्तक शाळेंत सुरूं करण्यापूर्वी यांतील सर्व दोषांचें परिश्रमपूर्वक संशोधन करून एक शुद्धिपत्र या पुस्तकास जोडावें अशी आमची सूचना आहे. तिचा योग्य तो विचार रा. ओतूरकर करतीलच. पुस्तक समक्ष देऊन परीक्षण लिहिण्यास आग्रह केल्याबद्दल रा. ओतुरकरांचे अभार मानून रजा घेतों.

**वि. स. वाकसकर**

अनुक्रमणिका

# १५ वें म. सा. संमेलन

हरतऱ्हेच्या अडचणींतून वाट काढीत काढीत शेवटीं यंदाच्या संमेलनाचें अधिवेशन गोवेकरांनी मोठ्या थाटानें आणि यशस्वी रीतीनें पारपडलें ही मोठ्या संतोषाची गोष्ट होय. ता. ३ ४ व ५ मे अशा तीन दिवशीं संमेलनाच्या बैठकी झाल्या. तथापि संमेलनाच्या कार्यक्रमास शुक्रवार ता २ संध्याकाळपासून अध्यक्षांच्या मिरवणुकीने आरंभ झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. संमेलनास सुमारे ५५० स्वागत सभासद, २०० गोमंतका बाहेरील पुरुष प्रतिनिधि व २५ स्त्री प्रतिनिधि, ५० गोमंतकीय प्रतिनिधि, २० वृत्तपत्रांचे बातमीदार, १०० खास निमंत्रित पाहुणे, १०० स्त्री पेक्षक आणि १००० पुरुष व विद्यार्थी प्रेक्षक मिळून दोन हजारांवर लोक समुदाय जमला असून त्यांत हैद्रावाद, धार, देवास, इंदूर, ग्वाल्हेर, सांगली, मिरज, नागपूर, पुणें, मुंबई वगैरेकडील प्रमुख मंडळी होती.

स्वागताध्यक्ष श्री. शांमा कृष्णाजी सूर्यराव सरदेसाई यांनी आपलें भाषण वाचून दाखविलें.[१] अध्यक्ष श्री. वामनराव जोशी यांनींहि आपलें छापील भाषण वाचलें. अध्यक्षांचें भाषण संपल्यावर श्री. श्री. कृ कोल्हाटकर यांच्या हस्तें ग्रंथप्रदर्शनाचा अनावरणविधि झाला. ग्रंथप्रदर्शनाची गोवेकरांची स्वतःची कल्पना आहे. यामध्येंच त्यांचें वैशिष्ट्य दिसून येतें. प्रदर्शनास ७२५ पुस्तकें आलीं होतीं. याशिवाय वृत्तपत्रें व मासिकें होतीं तीं वेगळींच. या खेपेस संमेलनांत निबंध वाचण्यांत आले. संमेलनांत मंजूर झालेले ठराव खालीं दिले आहेत. विषय नियामक कमिटीचा संकोच हा एक गेल्या संमेलनाचा विशेष होय. स्वागत मंडळाची व्यवस्था उत्तम होती. श्री. सांबाराव फार सज्जन गृहस्थ दिसतात. पुढील संमेलन हैद्रावाद ( दक्षिण ) येथें भरणार आहे.

## पास झालेले ठराव.

१ ला—बेळगांवच्या संमेलनानंतर आजतागायत खालीं निर्दिष्ट केलेल्या व इतर साहित्यभक्तांच्या निधनानें महाराष्ट्र वाङ्मयाची फार मोठी हानि झाली असून त्याबद्दल हें संमेलन आपला खेद व्यक्त करीत आहे.

रा. शिवराम महादेव परांजपे.
रा. चिंतामण गं. भानु.
रा. रावजी भवानराव पावगी.
रा. अच्युतराव साठे.
रा. गो. म. चिपळूणकर.
रा. सीतारामपंत फडके.
श्री. रंगूताई वैद्य.
रा. बाळकृष्ण नारायण देव.

१ हें भाषण पुढल्या अंकांत येईल.

रा. दत्तात्रय अनंत आपटे [ अनंततनय. ]

प्रो. पं. का. तेलंग.

रा. गणेश वामन गोगटे. —अध्यक्षांकडून.

**२ रा**—(अ) बेळगांव येथें गेल्या सालीं नेमलेल्या शुद्धलेखन मंडळानें पाठविलेल्या अहवालाच्या प्रती संमेलनाच्या व साहित्य–परिषदेच्या दप्तरीं ठेवण्यांत याव्यात.

(आ) वरील मंडळानें सदर अहवाल परिश्रमपूर्वक तयार केल्याबद्दल हें संमेलन, मंडळाचे अध्यक्ष, कार्यवाह, सभासद व साहाय्यक विद्वान् मंडळी ह्यांचें आभारी आहे.

—अध्यक्षांकडून.

**३ रा**—धार दरबाराने इंटर–कॉलेजिएट (Inter-Collegiate) स्कूल काढून त्याच्या अभ्यासक्रमांत मराठीच्या उत्तेजनासाठीं मराठीच्या अभ्यासाची व्यवस्था केली आहे ह्याबद्दल हें साहित्यसंमेलन दरबाराचें अभिनंदन करीत आहे. ह्या ठरावाची नक्कल दरबाराकडे पाठवून देण्यांत यावी. —अध्यक्षांकडून.

**४ था**—आग्रा विद्यापीठानें बी. ए. साठीं १९३३ पासून मराठी सुरू करण्यांत येणार असल्याचें ठरविलें आहे. इंटरमीजिएटला मराठी सुरू होऊन दोन वर्षे झाल्यानें यंदां इंटरमीजिएटमध्यें मराठी घेऊन पास होणाऱ्या विद्यार्थ्यांना ह्यामुळें यंदांच्या वर्षापुरतेंच मराठी घेतां येत नाहीं. १९३३ ऐवजीं १९३२ पासून मराठी सुरू केल्यास ही गैरसोय दूर होणार आहे. असें न झालें तर मात्र मराठी घेऊन बी. ए. ला बसूं इच्छिणारांची फार कुचंबणा होईल, हें निर्विवाद आहे. तरी आग्रा विद्यापीठानें एवढी गैरसोय दूर करावी अशी हें संमेलन आग्रा विद्यापीठाधिकाऱ्यांस विनंति करीत आहे.

—अध्यक्षांकडून.

**५ वा**—हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विद्यापीठांतून सुरू असलेल्या मराठी भाषेच्या अध्ययनांत एकसूत्रीपणा येणें इष्ट असल्यामुळें मॅट्रिकपासून एम्. ए. पर्यंतच्या परीक्षांचे मराठी विषयाचे अभ्यासक्रम व तदनुसार वाङ्मयांतील ग्रंथांची तपशीलवार विभागणी करण्यासाठीं खालील गृहस्थांचें मंडळ नेमण्यांत यावें:—

अध्यक्ष—श्री. ना. गो. चापेकर.

सभासद—१ श्री. द. वा. पोतदार.

२ ,, वा. म. जोशी.

३ ,, व. ग. खापर्डे.

४ ,, शं. दा. पेंडसे.

५ ,, मा. रा. ओक.

त्याचप्रमाणें मंडळाला अधिक सभासद घेण्याचा अधिकार असावा व शक्य तितका पत्रव्यवहारानें व अवश्य तेव्हां एकत्र जमून ह्या मंडळानें अभ्यासक्रम तयार करावा व निरनिराळ्या विद्यापीठांच्या उपयोगाकरितां तो साहित्यपत्रिकेंत प्रसिद्ध करण्यांत यावा.



—अध्यक्षांकडून.

६ वा—महाराष्ट्र-साहित्य-परिषद एक प्रकारें संमेलनाचे ठराव अंमलांत आणणारें कार्यकारी मंडळ आहे, व ह्या मंडळाला लेखनद्वारा व द्रव्यद्वारा सहाय्य करणें आवश्यक आहे. तरी साहित्यभक्तांनीं साहित्य-परिषदेला हस्तेंपरहस्तें मदत करून ती अधिक कार्यक्षम करावी अशी ह्या संमेलनाची विनंति आहे.

सूचक—ना. गो. चापेकर.

अनुमोदक—द. वा. पोतदार.

य. रा. दाते

७ वा—मुंबई युनिव्हर्सिटीनें मॅट्रिकच्या परीक्षेस मराठी भाषा घेण्याची मुभा ठेविली आहे. परंतु त्यानंतर मराठी भाषेस बी. ए. च्या परीक्षेशिवाय अभ्यासक्रमांत स्थान नाहीं. त्यामुळें मॅट्रिकसाठीं मराठी घेणारांची फारच कुचंबणा होते व मराठीचा अभ्यासही व्हावा तसा होत नाहीं. सबब ही अडचण दूर करण्याबद्दल ह्या संमेलनाची युनिव्हर्सिटीस शिफारस आहे.

सूचक—कु. बाळूबाई खरे.

अनुमोदक—य. रा. दाते.

पुष्टि देणार—प्रो. स. वा. हुदलीकर.

८ वा—ह्या संमेलनाच्या निमित्तानें भरलेल्या प्रदर्शनांत ठेवण्याकरतां जीं छापील पुस्तकें आलेलीं आहेत ती साहित्य-परिषदेच्या पुस्तकालयाला देण्यांत यावींत.

सूचक—श्री. शांबाराव कृ. सरदेसाई.

अनुमोदक—श्री. ना. गो. चापेकर.

९ वा—शुद्धलेखन मंडळाचे निर्णय ह्या संमेलनाच्या मंजूर असून इतरत्र मान्यता मिळविण्यासाठी हे निर्णय वर्तमानपत्रकर्ते, वाङ्मयसंस्था, मुंबई सरकार, मध्यप्रांत सरकार, मराठी भाषेची देशी संस्थानें व लेखकवर्ग ह्या सर्वांस कळवून ज्यांना ते संमत असतील त्यांची संमति मंडळाकडे लेखी कळविण्यास त्यांस विनंति करावी. (२) ह्या निर्णयांवर कोणाकडून कांहीं सूचना किंवा आक्षेप आले तर त्यांचा विचार ह्याच चालू मंडळानें पुढें करून वृत्तांत व **अखेर निर्णय** पुढील संमेलनास सादर करावा.

सूचक—ना. गो. चापेकर.

अनुमोदक—का. न. केळकर.

१० वा—शुद्धलेखन मंडळाकडून निर्णय न केल्या गेलेल्या बाबींचा, त्याचप्रमाणें विरामचिन्हांबद्दलच्या प्रश्नांचा विचार करण्याकरितां खालील गृहस्थांचें मंडळ नेमण्यांत यावें व त्याला अधिक सभासद जोडून घेण्याचा अधिकार असावा. ह्या मंडळाचा रिपोर्ट पुढील संमेलन भरण्यापूर्वी निदान दोन महिने आधीं प्रसिद्ध करण्यांत यावा.

श्री. ना. गो. चापेकर, रा. कृ. पां. कुळकर्णी, रा. बळवंतराव खापर्डे, रा. न. चिं. केळकर, प्रो. वा. म. जोशी (सभा बोलाविणार) प्रो. नारायण दासो बनहट्टी, रा. चिंतामण विनायक वैद्य, रा. राजाराम दामोदर देसाई. —अध्यक्षांकडून.

११ वा —पुणें येथील संमेलनांत रा. न. चिं. केळकर, रा. वामनराव पटवर्धन, रा. सुंदरराव भास्कर वैद्य, रा. यशवंत मोरेश्वर नानल, रा. यशवंत रामकृष्ण दाते यांचें लिपि–सुधारणेचा विचार करण्याकरितां जें मंडळ नेमण्यांत आलें होतें त्या मंडळानें आपला अहवाल पुढील वर्षी भरणाऱ्या संमेलनापूर्वी निदान दोन महिने प्रसिद्ध करून संमेलनापुढें सादर करावा अशी त्याला ह्या संमेलनाची विनंति आहे.

—अध्यक्षांकडून.

१२ वा—शुद्धलेखन मंडळानें केलेला रिपोर्ट व सूचना ह्या संमेलनाला मान्य असल्यावरून त्यांची अंमलबजावणी संमेलनाच्या एकंदर लिखाणांत व मुद्रणांत सुरू करण्यांत यावी अशी ह्या संमेलनाच्या कार्यकारी मंडळांना व साहित्यपरिषदेला सूचना आहे.

सूचक—सु. रा. सामंत
अनुमोदक—जनार्दन विष्णू कामत

१३ वा.—गोमंतकांतील मराठी भाषेच्या उत्तेजनाप्रीत्यर्थ हें साहित्यसंमेलन पोर्तुगीज सरकारास खालील सूचना करीत असून त्या अंमलांत येण्याची तजवीज सरकारमार्फत व्हावी अशी त्या सरकारास विनंति करीत आहे:—

१. गोमंतकांत मराठी प्रकाशकांवर घातले गेलेले निर्बंध मराठी वाङ्मयविकासास प्रतिबंधक असल्यावरून ते दूर करण्याविषयीं पोर्तुगीज सरकारास पुन्हा एकवार विनंति आहे.

२. गोमंतकांतील अर्ध्याअधिक लोकांची मातृभाषा मराठी असल्यावरून त्यांचें प्राथमिक शिक्षण त्याच भाषेंतून होणें इष्ट आहे. प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत असावें असें पोर्तुगीज रिपब्लिकच्या राज्यघटनेंत स्पष्ट कलम आहे. सबब प्राथमिक मराठी शाळा सरकारनें स्थापन कराव्या.

३. सांप्रत चालू असलेल्या सरकारी मराठी शाळांची पुनर्घटना जी ( १९२४ चा क्रमांक १२३ चा दिप्लॉम ) कायद्यान्वयें करण्यांत आली आहे. तिची अंमलबजावणी लवकर करण्यांत यावी.

४. लिसेव नासियॉनांतील मराठीचा कोर्स शिक्षकाच्या अभावीं तूर्त बंद आहे तो फिरून चालू करण्यांत यावा.

५. पूर्वी ज्या ज्या कायद्यान्वयें सरकारी हुद्द्यांस अगर वकिलीच्या परीक्षांस लिसेवांतील मराठी कोर्साचा दाखला घेण्यांत येत होता, तोच दाखला फिरून घेण्यांत यावा.

६. प्रांतिक कायदेमंडळ, म्युनिसिपालट्या इ. मधील सभासदांच्या निवडणुकींत केवळ देशी भाषेचें ज्ञान हें मताधिकाराच्या पात्रतेचें गमक समजण्यांत यावें.

७. सरकारी वाचनालयांत मराठी वाचकांच्या सोयीसाठीं मराठी ग्रंथ, मासिकें व वृत्तपत्रें ठेवण्यांत यावीं.

सूचक—गणपतराव वि. लाड
अनुमोदक—शिवा फटू पै आंगले
पुष्टि देणार—जनार्दन विष्णू कामत

# परिषद्वार्ता

## कार्यकारी मंडळाची बैठक

### ता १७-४-३०

हजर — चापेकर, ओगले, वैद्य, काणे, घारपुरे व अळतेकर.

काम

( १ ) निरुक्ताचा दुसरा अध्याय पत्रिकेंत पुरा करून पुढील भाग इ. करंजी ग्रंथ-मालेंत छापण्यास द्यावा. दोन अध्यायांचीं छापील पृष्ठें श्री. ज. र घारपुरे यांस झालेला खर्च घेऊन द्यावीं

( २ ) पुणें शाखा सभेच्या नियमांस मंजुरी दिली.

( ३ ) गोव्याच्या संमेलनाकरतां प्रतिनिधींची निवड करून तेथील परिषदेच्या बैठकींत मांडावयाचे विषय ठरविण्यांत आले.

साधारण सभा

ता. ५ मे १९३०

काम

१ — नियम दुरुस्ती

१६ व्या नियमाच्या पहिल्या टिपेंत "होतील." आणि " दुसऱ्या" या शब्दांमध्यें "मात्र परिषदेच्या कोणत्याहि कामाकरतां कार्यकारी मंडळीस अवश्य वाटल्यास या रकमा चालू खर्चासाठीं घेण्याचा अधिकार का. मंडळीस आहे असे शब्द घालावे".

सूचक — श्री. पां. वा. काणे

अनुमोदक — श्री. य. रा. दाते

बहुमतानें मंजूर

२ — नियम ३ व २२

सध्याचा नियम ३ रद्द समजून त्याच्या ऐवजीं खालील नियम असावा :—

" परिषदेची कचेरी मुंबईला किंवा परिषदेच्या साधारण सभेंत बहुमतानें ठरेल तेथें राहील "

नियम २८ — "सभेचें " या शब्दापासून तों पांचव्या ओळींतील " पाहिजेत " या शब्दापर्यंतचें वाक्य काढावें

सूचक — सुंदरराव भास्कर वैद्य

अनुमोदक — भास्कर महादेव पंडित

एकमतानें मंजूर

(मलपृष्ठ पान ४ पहा)

# परिषद्वार्ता

## शुद्धलेखन-मंडळाचा वृत्तान्त

इसवी सन १९२८ च्या जानेवारी महिन्यामध्यें एके दिवशीं लोकमान्य टिळकांच्या चरित्राचा उत्तरार्ध प्रसिद्ध होऊन लोकांच्या हातीं पडला. हा ग्रंथ वाचण्याच्या अगोदर त्याकडे नुसत्या अवलोकनानेंच कित्येकांची छाती धडाडूं लागली, तर कित्येकांचीं मनें हर्षभरित झालीं. कारण ह्या ग्रंथांत विद्वान ग्रंथकर्त्यांनीं मोठ्या धडाडीनें अनुस्वारांचें उच्चाटण करून टाकिलें होतें. ज्या लोकांना अनुस्वार ही एक मराठी भाषेंतील अडगळ आहे असें वाटत होतें त्यांना हा निरनुस्वारी ग्रंथ पाहून आनंद होणें स्वाभाविक होतें. उलट इतक्या अलौकिक ग्रंथांत शास्त्र व परंपरा ह्यांना धाब्यावर बसविलेलें पाहून कित्येकांचीं मनें उद्विग्न झालीं ह्यांतहि कांहीं आश्चर्य नाहीं. अर्थातच मराठी वाङ्मयक्षेत्रांत चरित्रकारांनीं जो आपल्या यथायोग्य कर्तृत्वानें लौकिक संपादन केला होता, त्यामुळें ह्या धुमसत राहिलेल्या वादाला तोंड फुटून वर्तमानपत्रांतून व मासिकांतून दोन्ही पक्षांतील विद्वानांनीं आपापल्या मताच्या समर्थनार्थ चर्चा करण्यास सुरवात केली. अशा स्थितींत १९२८ सालचें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन भरविण्याची वेळ आली. अर्थातच ह्या संमेलनांत ह्या वादाकडे दुर्लक्ष करणें शक्य नव्हतें. म्हणून ग्वाल्हेरच्या संमेलनांत शुद्धलेखनाविषयीं एक ठराव होऊन वादग्रस्त मुद्यांचा निर्णय देण्याकरतां एक तज्ज्ञांचें मंडळहि नेमण्यांत आलें. पण कोणत्याहि कारणाकरतां असो, त्या ठरावाला दृश्य फल लाभलें नाहीं. मध्यंतरीं मासिक पुस्तकांतून हा अनुस्वारवाद चालू राहिल्यामुळें लोकांच्या स्मरणांतून तो जाणें शक्य नव्हतें. १९२९ च्या बेळगांवच्या संमेलनानें तो प्रश्न पुनः हातीं घेतला.

आतां हा वाद प्रथमतः अनुस्वारापुरताच उत्पन्न झाला असला तरी मराठी भाषेच्या एकंदर शुद्धलेखनाची अराजक स्थिति बनली होती, याची जाणीव लोकांत उत्पन्न झाली होती. कोणीं कांहीं लिहिलें तरी तें अशुद्ध ठरण्याचा संभवच नव्हता. शाळाखात्यानें मुलांना शुद्धलेखन शिकविण्याचें बहुतेक सोडून दिलें होतें. त्यामुळें असा एक तरुण लेखकवर्ग निर्माण झाला कीं त्याला नुसत्या अनुस्वारांचीच नव्हे तर व्याकरणशास्त्राचीच अडगळ भासूं लागली. म्हणून १९२९ च्या संमेलनांत मराठीच्या एकंदर शुद्धलेखनाचा विचार करण्याकरितां कमिटी नेमण्याची सूचना येऊन ती मान्यहि झाली. बेळगांव येथें भरलेल्या १४ व्या मं. सा. संमेलनांत ह्याविषयीं झालेला ठराव येणेंप्रमाणें:—

### ठराव २१ वा

"शुद्धलेखनासंबंधीं आतांपर्यंत निरनिराळ्या विद्वानांनीं प्रदर्शित केलेले विचार लक्षांत घेऊन व ह्यानंतरहि अनेक विद्वानांचें साहाय्य घेऊन आणखी दोन महिन्यांनीं साहित्य-पत्रिकेंत ह्याविषयींचा आपला निर्णय जाहीर करण्याकरतां खालील गृहस्थांचें मंडळ नेमण्यांत येत आहेः

१ रा. चिंतामणराव वैद्य
२ ,, न. चिं. केळकर
३ ,, ना. दा. बनहट्टी
४ ,, कृ. पां. कुलकर्णी
५ ,, ब. ग. खापर्डे
६ ,, ना. गो. चापेकर
७ ,, रा. दा. देसाई

ह्या ठरावाला अनुसरून मंडळाच्या एकंदर तीन चर्चा-सभा (१ ली ११ — १२ आगस्ट १९२९, दुसरी जानेवारी १२-१३ आणि तिसरी १२-१३-१४ एप्रिल १९३० रोजीं) भरल्या. ह्यांपैकीं दोन सभांना काशीहून श्री. खापर्डे आणि नागपुराहून श्री. बनहट्टी हे येऊन हजर राहिले होते. शेवटच्या सभेस रा. चिंतामणराव वैद्य खेरीज करून बाकीचे सर्व सभासद हजर होते. प्रत्येक सभेच्या वेळीं मंडळाच्या सात सभासदांपैकीं सहा सभासद हजर होते. शिवाय सभेच्या प्रत्येक बैठकीस बाहेरील सद्गृहस्थहि हजर राहून सभासदांना आपला सल्ला देत असत ह्या बद्दल हें मंडळ त्या सर्वांचें आभारी आहे. विशेषतः श्री. गो. पां. पावशे व श्री. गो. कृ. मोडक हे बहुतेक अखेरपर्यंत हजर राहून चर्चेंत भाग घेत असत. अखेरच्या निर्णयाच्या कामीं त्यांचें पुष्कळ साहाय्य झालें आहे. ह्याशिवाय रा. वा. म. जोशी, प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, प्रो. बनहट्टी वगैरे मंडळी अखेरच्या बैठकीस हजर होती. त्यांच्या सल्ल्याचा उपयोगहि ह्या मंडळास फार झाला ही गोष्ट नमूद करणें अवश्य आहे.

कमिटीनें अधिकृत प्रश्नावलि काढून बृहन्महाराष्ट्रांतील निरनिराळ्या वाङ्मयविषयक संस्था, नामांकित ग्रंथकार, वर्तमानपत्रांचे व मासिकांचे संपादक, मराठीचे अध्यापक अशा निरनिराळ्या संस्थांस व गृहस्थांस मिळून सुमारें १५० पत्रें पाठवून प्रश्नांचीं उत्तरें मागविलीं. पाठविलेल्या प्रश्नांना जीं कांहीं उत्तरें आलीं त्यांचा निर्णयाच्या कामीं बराच उपयोग मंडळास करतां आला. शुद्धलेखनांतील ज्या गोष्टींचा विशेषेंकरून मंडळाला विचार करितां आला त्या म्हणजे

(१) अनुस्वार
(२) ऱ्हस्वदीर्घ
(३) शब्दसंयोग व शब्दच्छेद
(४) शब्दांचें सामान्यरूप
(५) कांहीं विशिष्ट वर्णांचे उच्चार व लेखन, उदा. तालव्य व दन्ततालव्य
(६) परकी भाषेंतील शब्द

ह्या होत.

शुद्धलेखनाच्या संबंधानें चर्चा उपस्थित होण्याचा प्रस्तुतचाच कांहीं पहिला प्रसंग नव्हे. ह्याच्या पूर्वी प्रत्यक्ष सरकारी विद्याखात्याच्या मार्फत विद्याधिकारी व बाहेरील विद्वान लोक ह्यांनीं एकत्र जमून सध्यांच्या कमिटीनें जे प्रश्न विचाराकरितां घेतले त्याच प्रश्नांचा ऊहापोह करून निर्णयात्मक मतहि ठरविलें होतें. (मराठी शाळापत्रक आक्टोबर १९०४ अंक पहा.) परंतु विद्याखात्याच्या बाहेरील लोकांच्या प्रयत्नानें त्या निर्णयांना कायमचें यश लाभूं शकलें नाहीं. ह्या सरकारमार्फत १९०४ सालीं झालेल्या प्रयत्नानंतर १९२५ सालापर्यंत ह्या वादासंबंधीं सर्वत्र स्तब्धता दिसून येते. १९२५ सालीं साताऱ्यास शिक्षाविचारमंडळानें हा प्रश्न हातीं घेऊन धसास लावण्याचा बराच प्रयत्न केला. त्यानंतर १९२८ सालीं पुण्यास शारदोपासक मंडळानें संमेलनांत हा विषय चर्चेकरितां प्रामुख्यानें ठेऊन ह्या वादास बरीच चालना दिली. (शा. सं. चा तिसऱ्या अधिवेशनाचा अहवाल पहा.)

१९०४ सालीं झालेल्या वादांत व प्रस्तुतच्या वादांत मुख्य भेद हा दिसतो कीं, पूर्वी सर्व वाद तात्विक स्वरूपाचा होता; कारण कोणत्याहि ग्रंथकारानें आपापल्या विशिष्ट मतानुसार प्रत्यक्ष लेखन सुरू केलें नव्हतें. अमुक प्रकारचें लेखन असावें असें त्यांचें म्हणणें होतें. पण हल्लीं कृति अगोदर आणि वाद पाठीमागून असा प्रकार घडल्यासारखा दिसतो. त्याचप्रकारें दुसराहि एक फरक दिसतो तो हा कीं, पूर्वीच्या वादाची प्रेरणा विद्याखात्यांतील लोकांकडूनच झालेली होती, तर सध्यां ह्या वादाचा उपक्रम विद्याखात्याच्या बाहेरील लोकांकडून झाला आहे. येवढेंच नव्हे तर त्या वादाचें जूं त्यांनीं आपल्या एकट्याच्याच शिरावर घेतलें आहे.

मंडळानें केलेले निर्णय देण्यापूर्वी त्या निर्णयांना आवश्यक अशा ज्या कांहीं मुख्य सामान्य तत्वांचा अंगीकार मंडळानें केला त्या तत्वांचा ऊहापोह प्रथमच, पण संक्षेपतः, करणें इष्ट आहे. प्रथमतः

कोणालाहि हें मान्य करावेंच लागेल कीं, शुद्धलेखन अथवा व्याकरण हीं भाषा बनवीत नसतात. अगोदर भाषा आणि नंतर ती भाषा कोणत्या नियमांनीं घटित झाली हें दाखविण्याकरितां व्याकरणकार पुढें येतात. तसेंच ज्याप्रमाणें आपण बोलतों म्हणजे निरनिराळ्या वर्णांचे उच्चार करतों त्याप्रमाणें आपलें लेखन असावें लागतें. कारण वर्ण हा ध्वनीचें प्रतीक आहे. तोंडानें केलेला उच्चार अथवा ध्वनि बाहेर पडतांच आपलें काम करून कायमचा लय पावतो. परंतु लेखन हें तात्कालिक उपयोगाकरितां नसतें. हें जरी खरें असलें, तथापि उच्चार आणि लेखन ह्यांचें कार्य एकच असल्यामुळें स्वरूपतः दोहों-मध्यें अभिन्नत्व असणें अवश्य आहे. तथापि उच्चारानुसारी लेखन असावें हा जरी सिद्धांत शास्त्रतः खरा असला, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत हा जर सर्वस्वीं पाळण्याचा आग्रह धरिला, तर लेखनामध्यें अनवस्थाप्रसंग ओढवल्यावांचून राहणार नाहीं. कारण निरनिराळ्या व्यक्तींचे उच्चार अनेक कारणांमुळें निरनिराळे होतात ही नेहमींच्या अनुभवाची गोष्ट आहे. आपण कितीहि प्रयत्न केला तरी, भाषेमध्यें फेरबदल होत जाणारच. तसें होणें अगदीं अपरिहार्य आहे. असें नसतें तर आज वैदिक काळची भाषाच आपल्या बोलण्यांत असती. पण ह्याच्या उलट काय स्थिति झाली आहे ती पहा. वैदिक-संस्कृत–पाली–महा-राष्ट्री-अपभ्रंश–मराठी अशीं भाषेचीं स्थित्यंतरें दिसून येतात. हीं स्थित्यंतरें उच्चारभेदामुळेंच झालीं असलीं पाहिजेत असें अनुमान केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. केवळ मराठीकडेच जर पाहिलें, तर तिच्या संबंधींसुद्धां असें दिसून येईल कीं, पूर्वीच्या भाषेइतकेच फरक मराठीमध्यें झाले आहेत. उदाहरणार्थ, यादवकालीन मराठी, बहामनीकालीन मराठी, शिवकालीन मराठी, पेशवेकालीन मराठी, आंग्लकालीन मराठी. ह्या सर्व कालांतील भाषेचें नांव जरी मराठी असलें, तरी तिच्या स्वरूपामध्यें फरक पडलेला उघड दिसून येतो. व असा फरक जेव्हां होतो, तेव्हांच पूर्वीची भाषा दुर्बोध होऊन बसते. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरींतील किंवा शिवकालीन पत्रांतील भाषेचा उलगडा करणें हें वर्तमान मराठी जाणणाऱ्यांच्या आटोक्या-बाहेरचें असून तें एक तज्ज्ञांचें काम होऊन बसलें आहे.

भाषेमध्यें होणारे फरक अपरिहार्य कारणांनीं होत असतात. पण ह्या कारणांचा विचार करण्या-पूर्वी हे फरकहि दोन प्रकारचे असतात हें सांगणें अवश्य आहे. एका फरकानें भाषेची प्रकृति बदलते. दुसरा फरक केवळ बाह्य स्वरूपाचा असतो. पहिल्या प्रकारांत वर्णप्रक्रिया व रूपप्रक्रिया यांनीं भाषेच्या अंतरंगाला बाधा होते, व दुसऱ्या प्रकारानें भाषेचें बाह्यांग केवळ बाधित होतें. पहिला प्रकार भाषेच्या स्वरूपाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे, व प्रस्तुत वादाच्या संबंधानें त्याचा विशेषतः विचार करणें जरूर आहे.

भाषेच्या प्रकृतीमध्यें ज्या अनेक कारणांनीं सारखे परंतु हळूहळू फरक होत असतात त्यांपैकीं कांहीं कारणें ध्यानांत ठेवणें अगत्याचें आहे. पहिलें कारण भौगोलिक स्वरूपाचें असतें. भौगोलिक परिस्थिति मनुष्याच्या उच्चाराला विशिष्ट वळण लावूं शकते असें कित्येक म्हणतात, तर मुखांतील स्नायूंमध्यें फरक झाल्यानेंहि तोच परिणाम घडतो असेंहि पुष्कळांचें मत आहे. भिन्न संस्कृतींचा संयोग हेंहि उच्चारभेदाचें सर्वांत बलवत्तर कारण होय. द्रविडी, फारशी, इंग्रजी, ह्या परकी भाषांतील उच्चारांचा परिणाम मराठीवर घडल्याचीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील. ह्याशिवाय ज्याचे विशेष व्यापक परिणाम होतात असें कारण म्हणजे आपला भाव दुसऱ्यास जितक्या कमी त्रासानें कळेल तितक्या कमी त्रासानें कळवावा, अशा रीतीनें बोलण्याची मनुष्याची सहज प्रवृत्ति हें होय. ह्या प्रवृत्तीमुळें व्यंजनांचें रूपांतर होतें इतकेंच नाहीं, तर कधीं कधीं लोपहि होतो. यास्काचार्यांनीं आपल्या निरुक्तामध्यें आदिलोप, अन्तलोप, उपधालोप, आदिविपर्यय, आद्यन्तविपर्यय, वर्णोपजन इत्यादि जे वर्णप्रक्रियेचे प्रकार सांगितले आहेत ते सर्व ह्या प्रवृत्तीचेच प्रकार आहेत. परंतु आमच्या मतें सर्वांत महत्त्वाचें, विशेषतः अनुस्वाराच्या वादासंबंधानें महत्त्वाचें, असें एक कारण म्हणजे शब्दाच्या आघातस्थानामध्यें फरक होणें हें होय. बोलण्यांत कित्येक शब्दांतील पहिल्या

अक्षरावर, तर कित्येकांत दुसऱ्या अक्षरावर आघात देण्याकडे मराठी भाषेची प्रवृत्ति दिसून येते. तीमुळें अर्थातच बाकीचीं अक्षरें अर्धवट उच्चारिलीं जाऊन अंत्याक्षराचा तर कधीं कधीं लोपहि झाल्याचा भास होतो. तसेंच स्त्रिया, मुलें व अज्ञ लोक भाषा अपभ्रष्ट करण्यास विशेषतः कारणीभूत होतात.

वर सांगितलेल्या कारणांच्या योगानें भाषेमध्यें बदल होत जातात व ते टाळतां येत नाहींत, म्हणूनच भाषाशुद्धीचे प्रसंग मधून मधून उद्भवतात. आतां अशा रितीचे फरक भाषेमध्यें निसर्गतः जरी होत असले, तथापि निसर्गावर जय मिळविण्याची धडपड मनुष्य एकीकडे करीतच असतो; कारण भाषेमध्यें फरक जितके सावकाश व कमी होतील तितके व तसे होणें ह्यावरच समाजाची संस्कृति अवलंबून असते. बोलीपेक्षां ग्रांथिक भाषाच समाजाच्या सांस्कृतिक प्रकर्षाला कारणीभूत होते हें कोणालाहि अमान्य करतां येण्याजोगें नाहीं. ग्रंथाच्या योगानें ज्ञानाची परंपरा राखिली जाते व अधिक ज्ञानाचा पायाहि घातला जातो. आज जगामध्यें जितके ग्रंथ आहेत त्यांपैकीं एकहि ग्रंथ अस्तित्वांत नसता, तर आज जग ज्या संस्कृतीच्या स्थानावर आरूढ झालें आहे त्याहून तें फार खालीं असतें ह्यांत शंका नाहीं. कोणताहि विचारी मनुष्य कोणत्याहि विषयासंबंधानें आजवर विचाराची मजल कोठवर आली आहे ती जमेस धरून त्याच्यावरच विचाराचा पुढला मजला उभारण्याचा यत्न करतो. आपले विचार पूर्वींच्या विचारवन्तांनीं ज्या भाषेंत प्रकट केले त्याच भाषेंत वर्तमानकालीन पिढीचे विचार ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें प्रकट करणें इष्ट असतें. यास्तव ग्रांथिक भाषा आणि बोलण्याची भाषा ह्यांमध्यें फरक पडतो म्हणून हाकाटी करणें उचित होणार नाहीं. बोलीचें स्वरूप चंचल असल्यामुळें त्याचा ग्रंथाच्या कामीं नेहमीं उपयोग करतां येणार नाहीं. कारण ग्रंथाची भाषा स्थिरस्वरूपाची असते. आणि ती तशी कां असली पाहिजे हें वरील विवेचनावरून सहज समजण्यासारखें आहे. बोली आणि ग्रंथभाषा ह्यांतील भेद मराठीपुरताच आहे असें नाहीं, तर तो प्रत्येक भाषेच्या संबंधानें आहे. ग्रंथाची भाषा जर बोलीप्रमाणें नेहमी चंचल व अस्थिर होऊं लागली, तर भाषासातत्य व त्याबरोबर विचारसातत्यहि राहणार नाहीं. एका पिढीचे ग्रंथ दुसऱ्या पिढीस दुर्बोध होतील.

कित्येक लोकांचें म्हणणें असें दिसतें कीं, लेखनाची भाषा कशीहि असो, शब्दाचें स्वरूप शुद्ध असो वा अशुद्ध असो, त्यामुळें अर्थ समजण्यास कोणतीहि अडचण पडत नाहीं. कारण संदर्भावरून लिहिणाऱ्याचा भाव अजमावितां येतो. ह्या युक्तिवादांत फारसें तथ्य नाहीं. लहान मुलांचें बोबडें बोलणेंहि त्यांच्या आईस संदर्भानें कळून त्यामधून ती अर्थ काढूं शकते. त्या बोबड्या बोलण्यास कोणीहि शुद्ध म्हणणार नाहीं. ग्रामिक भाषेचाहि अर्थ संदर्भावरून आपणांस कळतो. तरी पण आपण तिला शुद्ध भाषा म्हणत नाहीं. संदर्भावरून जर अर्थबोधाचें काम भागवून घ्यावयाचें झालें, तर व्याकरण, व्युत्पत्ति, भाषाशास्त्र इत्यादींच्या प्रवृत्तीची जरूरीच उरणार नाहीं. शिवाय बोलीमध्यें थोडी संदिग्धता राहिली, तरी बोलणारे हयात असून जवळच असल्यामुळें आपापल्या संशयाचें निराकरण करून घेणें त्यांना शक्य असतें. उलट ग्रंथाची भाषा संदर्भाच्या दृष्टीनें क्वचित्स्थलीं संदिग्ध असल्यास त्याचें निराकरण करणें दुर्घट होतें. तेव्हां संदर्भामुळें क्वचित्स्थलीं उत्पन्न होणारीं संशयस्थळें जितकीं ग्रंथांत कमी होतील तितकें चांगलें हें उघड आहे. तिसरी गोष्ट, संदर्भावरून अर्थनिष्पत्ति करण्यांत जो एक थोडाबहुत कालक्षेप होतो तो जर शब्दाचें शुद्धस्वरूप लिहिल्यानें टाळतां येत असेल, तर तो कां टाळूं नये हाहि एक प्रश्न आहे. शास्त्रीय दृष्ट्याहि संदर्भाचा युक्तिवाद पटण्यासारखा नाहीं. कारण प्रत्येक शब्दाला अर्थप्रक्रियेचें एक आणि वर्णप्रक्रियेचें एक अशीं दोन स्वतंत्र अंगें असतात. शब्दाचें व्यवहारोपयोगित्व किंवा अर्थवाहकत्व हें वाक्यांत इतर शब्दांशीं तो शब्द अन्वित झाल्यानंतरच सिद्ध होतें, व हें अर्थप्रक्रियेचें कार्य आहे. परंतु व्यस्त शब्दाचें शुद्ध स्वरूप ठरविणें हें वर्णप्रक्रियेचें कार्य आहे. तेथें संदर्भाचा अर्थाअर्थी कांहीं संबंध पोहोंचत नाहीं. प्रत्येक शब्द स्वतंत्ररीत्या अर्थवाहक असला पाहिजे आणि हें अर्थवाहकत्व त्याच्या

गीं ती व्युत्पत्तिदृष्ट्या शास्त्रशुद्ध असल्याशिवाय येणार नाहीं. एखादा शब्द व्युत्पत्तीनें सानुस्वार होत असून जर तो निरनुस्वार लिहिला, तर तो शब्द पहिल्या शब्दाशीं कोणत्याहि नात्यानें संबद्ध न एक नवीन स्वतंत्र शब्द निर्माण झालेला आहे असेंच शास्त्रीय दृष्टीनें मानावें लागेल. सिद्ध दांना अर्थात् हा नियम लागू नाहीं.

निर्णयाच्या कामीं उपयुक्त ठरणाऱ्या कांहीं तत्त्वांचा ऊहापोह केल्यानंतर, मंडळापुढें असलेल्या श्नांपैकीं जो अनुस्वारविषयक मुख्य प्रश्न त्याकडे आपण आतां वळूं. प्रथमतः हें सांगणें अवश्य आहे कीं, संस्कृतांत ङ्, ञ्, ण्, न् व म् हीं नासिक्य उच्चारांचीं प्रतीकें आहेत. म्हणून बहुतेक नासिक्य उच्चार या पंचम वर्णांनें लिहिले जातात. यालाच परसवर्ण ही पारिभाषिक संज्ञा आहे. उ. किङ्कर, घण्टा, दन्त, वगैरे. पण क, च, ट, त, प या पंचवर्गांतील अक्षरांसंबंधानेंच परसवर्ण होऊं शकतो. तदितर जीं य, र, ल, व, श, ष, स, ह अक्षरें, त्याच्या संबंधानें परसवर्ण होऊं शकत नाहीं. अशा ठिकाणीं नासिक्य उच्चार पूर्वाक्षरावर टिंब देऊन व्यक्त करतात. उदाहरणार्थ, सिंह, संशय, संरक्षण, वंश, मांस, वपूंषि. यांतहि आणखी एक भेद आहे: वरील अक्षरांपैकीं य, व, ल यांच्यापूर्वीचा नासिक्य उच्चार यँ, वँ, लँ या अक्षरांनीं व्यक्त करण्यांत येतो. पूर्वी सिंह शब्दाचा उच्चार कसा करण्यांत येत असे याविषयीं निश्चयपूर्वक कांहीं सांगतां येत नाहीं. सध्या मात्र—निदान मराठींत तरी—तिसरा एक व् वर्ण मध्यें घालून हा शब्द उच्चारला जातो. सर्व प्रकारचे नासिक्य उच्चार मराठींत शीर्षबिंदूनें दाखविले जातात.

हे दोन्ही प्रकारचे नासिक्य उच्चार स्पष्ट असल्यामुळें हे गाळण्याचा प्रश्न कोणीहि उत्पन्न केलेला नाहीं.

ह्या दोहोंव्यतिरिक्त मराठीमध्यें तिसरा एक नासिक्य उच्चार प्रचलित आहे. त्याच्यासंबंधानें प्रस्तुत वाद उत्पन्न झाला आहे.

नाँव, घराँत, तेथँ, सँवय साँवळा इत्यादि शब्दांतील नासिक्य उच्चार संस्कृतांतील उच्चाराहून भिन्न आहे. मराठींतील उच्चार, सानुनासिक स्वराच्या स्वरूपाचा आहे, म्हणजे ह्या उच्चाराचा आश्रय संस्कृतांतील उच्चाराप्रमाणें जरी स्वर असला तरी 'व' वर्णयुक्त उच्चार मराठी नासिक्याचा होत नाहीं. संस्कृत शब्दांचा वर्तमानकालीन नासिक्य उच्चार पाठीमागील व पुढील अक्षरांशीं संबद्ध असा असतो, तसा हा मराठींतील नासिक्य उच्चार नाहीं. तो केवळ पूर्वस्वराश्रित आहे. ह्या ह्याच्या स्वभावाचा परिणाम असा झाला आहे कीं, तो उच्चारांतून कधीं कधीं गळला जातो. उदाहरणार्थ, साँवळा हा शब्द साँवळा असा सानुनासिक न उच्चारितां सावळा असा निरनुनासिक उच्चार मुखावाटे निघणें स्वाभाविक आहे. म्हणूनच ह्या प्रकारचे मराठींतील नासिक्य उच्चार उच्चारित आहेत कीं अनुच्चारित आहेत असा संशय येऊन वाद उत्पन्न झाला आहे.

ह्या नासिक्य उच्चाराला मराठीमध्यें स्वतंत्र नांव नाहीं. त्याला अनुस्वार ह्या नांवानेंच संबोधतात. स्पष्ट अनुस्वारापेक्षां हा नासिक्य उच्चार स्वरूपतः व उच्चारतः निराळा आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. व त्या दृष्टीनें ह्यास निराळी संज्ञा देणेंहि योग्य आहे. ह्याला 'ह्रस्वानुनासिक' अशी संज्ञा राजवाडे ह्यांनीं पूर्वी देऊन त्याला दीर्घानुनासिकापासून त्यांनीं भिन्न केला. त्याला 'उपनासिक' म्हणावें अशा तऱ्हेची सूचना श्री. पावशे ह्यांनीं केली आहे. तसेंच हा उच्चार दाखविण्याकरितां पोकळ शून्य हें चिन्ह सुचविण्यांत आलें आहे. परंतु हा लिपीचा प्रश्न असल्यामुळें त्याचा विचार ह्या मंडळानें केला नाहीं.

संस्कृतोद्भव शब्दांतील अनुस्वारांचा लोप करण्याकडे सध्यां प्रवृत्ति होत चालली आहे हें खालीं दिलेल्या उदाहरणांवरून दिसून येईल.

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| चंपक | > | चांफा | > | चाफा | \| | कांस्यकार | > | कांसार | > | कासार |
| गोधूम | > | गहूं | > | गहू | \| | जामात | > | जांवई | > | जावई |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| आम > | ऑंव > | आव | गोस्वामी > | गोसांवी > | गोसावी |
| अमावास्या > | आंवस > | आवस | लोमन् > | लंव > | लव |
| भवंति > | होंति > | होती | विश्राम > | विसांवा > | विसावा |

ह्यासंबंधानें आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे ती ही कीं, मूळ संस्कृतशब्दांत म् अथवा न् असूनहि त्यावरून मराठींत आलेल्या शब्दांत त्यांचा कांहीं अवशेष राहिलेला नाहीं. उ. विंशति–वीस, त्रिंशत्–तीस. ह्यांतील अनुस्वार प्राकृतांतच गळला आहे. त्याचप्रमाणें मूळ संस्कृत शब्दामध्यें नासिक्य उच्चार नसतांना मराठीमध्यें तो आल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| पिप्पल > | पिंपळ | वृश्चिक > | विंचू |
| उच्च > | उंच | उष्ट्र > | उंट |

हीं उदाहरणें फार महत्त्वाचीं असून त्यावरून मराठी भाषा ही ह्या आपाततः अनुस्वार देण्याच्या प्रवृत्तीनें अनुस्वारांकडून एक कांहीं विशिष्ट कार्य करवून घेत असली पाहिजे असें दिसतें. शब्दांतील मात्रांची संख्या दोन्हीमध्यें कायम राखून शब्दाच्या उच्चाराचा तोल ह्या अनुस्वाराच्या योगानें सांभाळिला गेला आहे. हे परसवर्णस्वभावी अनुस्वार नको असें कोणी म्हणत नाहीं.

मराठीमध्यें असे पुष्कळ शब्द आहेत कीं, ज्यांच्या अनुस्वारांला व्युत्पत्तीचा मुळांत आधार नाहीं, अथवा वर सांगितलेल्या तऱ्हेचें विशिष्ट कार्यहि त्यांजकडून केलें जात नाहीं किंवा अर्थभेद दाखविण्याची उपयुक्तताहि त्यांच्यामध्यें नाहीं. उदाहरणार्थ—

| | | | |
|---|---|---|---|
| कर्कटिका > | कांकडी | गुच्छ > | घोंस |
| भ्रू > | भुंवई | चर्चर > | चांचर |
| युगल > | जुंवल | पक्ष > | पांख |
| यावत् > | जों | कच्छप > | कांसव |
| अश्रू > | अंसूं | शिक्की > | शिंकें |
| यूका > | ऊं | हस > | हांस |
| ग्रास > | घांस | अर्चित् > | आंच |

हे अनुस्वार गाळण्यास कोणाचीहि हरकत येण्याचें वस्तुतः कारण नाहीं. ह्या शब्दांवरील अनुस्वारांची उपपत्ति प्राकृताच्या साहाय्यानें करतां येण्यासारखी नाहीं असें नाहीं. कारण प्राकृतांतूनच मराठींत पुष्कळ अनुस्वार आले आहेत. तथापि मराठीच्या प्रकृतीला अनुसरून पाहिलें असतां हा अनुस्वार निष्कारणच म्हणावा लागेल.

ह्या अनुस्वाराचा विचार करतांना दुसरी एक ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, मराठीच्या शब्दाचा शेवट स्वरान्त होतो. संस्कृतांतील व्यंजनान्त शब्द मराठीमध्यें व्यञ्जनान्त कधींच रहात नाहीं. येवढ्यासाठींच भगवान्, विद्वान् इत्यादि नामें मराठीमध्यें स्वरान्तच लिहिण्याची वहिवाट पडली आहे. ही गोष्ट विचारांत घेतां असें दिसून येईल कीं, मराठी शब्दांत अन्तीं येणारे अनुस्वार मराठीच्या ह्याच प्रवृत्तीमुळें उच्चारांतून गळून जातात. कारण मराठींतील नासिक्य उच्चार व्यंजनात्मक आहे असेंहि म्हणतां येण्यासारखें आहे.

तसेंच मराठी भाषेचा आणखी एक स्वभाव साधारण विचार करणाराला दिसून येतो तो हा कीं, पूर्वीच्या व्ययी शब्दांना अव्ययाचें स्वरूप हळू हळू प्राप्त होत चाललें आहे. म्हणजेच प्रत्ययी भाषेचें कालान्तरानें उपसर्जनी भाषेंत रूपान्तर होत जातें. ज्याअर्थी मराठी उपसर्जनी स्वरूपांत येत चालली आहे त्याअर्थी अव्ययांच्या प्रत्ययविकृत अशा पूर्वस्वरूपाकडे लक्ष न देतां, तीं अव्ययें अगदीं स्वतंत्र

मानून त्यांना मराठी भाषेच्या नियमांच्या हुकमतीखालीं आणावें. मराठी भाषेच्या ह्या स्वभावाला अनुसरूनच अव्ययांवरील अनुस्वार काढून टाकण्याचें मंडळानें ठरविलें आहे.

अनुस्वारानंतर दुसरा महत्त्वाचा विषय म्हटला म्हणजे ऱ्हस्व इ-उकारान्त तत्सम शब्द मराठींत ऱ्हस्व किंवा दीर्घ लिहावे ह्यासंबंधीं होय. ह्या प्रश्नासंबंधानें मंडळाचा एकमतानें झालेला निर्णय पुढें दिलाच आहे. परंतु निवळ मराठी किंवा देशी शब्द ज्यांना म्हणतात असे दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त शब्द नेहमीं दीर्घच असतात. म्हणूनच तत्सम ऱ्हस्व इ-उकारान्त शब्द प्रथमेमध्यें दीर्घ उच्चारण्याकडे मराठी बोलणाऱ्यांची प्रवृत्ति असते. ही गोष्ट खरी कीं, संस्कृताच्या परिचयाचा परिणाम ज्यांच्यावर झाला आहे असे लोक त्या शब्दाचा संस्कृताप्रमाणें ऱ्हस्व उच्चार करतात. १९०४ सालीं शुद्धलेखन कमिटीनें ह्यासंबंधीं निर्णय वरील धोरणानें म्हणजे ऱ्हस्व इकारान्त उकारान्त तत्सम शब्द दीर्घ लिहावे असा केला. आणि संस्कृतामधील त्या शब्दाचें प्रथमेचें रूप हेंच मराठींतील त्या शब्दाच्या प्रथमेच्या रूपाच्या मुळाशीं असेल, तर त्या रूपाच्या विपरिणमनाच्या दृष्टीनें सुद्धां विसर्गाचा लोप होऊन त्या स्वराला दीर्घत्व येणें असंभवनीय नाहीं.

मराठीच्या शुद्धलेखनासंबंधीं विचार करितांना त्याच्याशीं संलग्न असे अनेक प्रश्न उद्भवले. त्यांपैकीं महत्त्वाचे म्हटले म्हणजे मराठी लिपी आणि मराठींतील विरामचिन्हें होत. लिपीचा प्रश्न मंडळाच्या अधिकारक्षेत्राबाहेरचा असल्यामुळें त्याचा विचार करणें शक्यच नव्हतें. विरामचिन्हांचाहि प्रश्न वेळेच्या अभावीं विचारांत घेतां आला नाहीं. त्याचप्रमाणें एकच शब्द मराठींत निरनिराळ्या स्वरूपांत लिहिला जातो. तेव्हां त्यासंबंधींसुद्धां लेखनांत निश्चितता आणणें अत्यंत जरूरीचें आहे. ह्या सर्व उर्वरित गोष्टींचा विचार करण्यासाठीं संमेलनानें दुसरें एक मंडळ नेमावें अशी ह्या मंडळाची शिफारस आहे.

ज्या गृहस्थांनीं आपला वेळ मोडून आम्हीं पाठविलेल्या प्रश्नांचा विचार करून उत्तरें पाठविलीं त्यांचे मनापासून आभार मानण्याची संधि हें मंडळ घेत आहे. त्याचप्रमाणें मंडळाच्या चर्चासभांसाठीं पुण्याच्या इतिहास-मंडळानें आपलें सभागृह आम्हांस खुलें ठेवून मदत केली ह्याबद्दल आम्ही मंडळाचे आभारी आहों. ज्या वृत्तपत्रकारांनीं आमचीं पत्रकें वेळोवेळीं प्रसिद्ध केलीं त्यांचेहि आम्हीं आभारी आहों.

बेळगांवच्या संमेलनाच्या आज्ञेप्रमाणें हा वृत्तान्त दोन महिन्यांत सादर करावयास पाहिजे होता. परंतु हें अशक्यप्राय असल्यामुळें करतां न आल्याबद्दल मंडळास दिलगिरी वाटते.

मंडळानें केलेले निर्णय संमेलनास मान्य झाल्यास ते अमलांत आणण्याचे उपाय योजण्याविषयीं संमेलनानें तजवीज करावी अशी मंडळाची विनंती आहे.

( वरील वृत्तान्ताचें शुद्धलेखन प्रचलित पद्धतीप्रमाणेंच लिहिलें आहे. )

---

# शुद्धलेखनमंडळानें एकमतानें केलेले निर्णय*

## सामान्य तत्त्वें

१ केवळ उच्चाराप्रमाणेंच लेखन असावें हें तत्त्व ह्या मंडळास संमत नाहीं.

२ परंपरा, वर्तमानकालीन प्रचार, व्युत्पत्ति, व्याकरण, उपयुक्तता ह्यांचा शुद्धाशुद्धलेखन ठरविण्याच्या कामीं विचार करावा.

## अनुस्वार

१ मराठीमध्यें अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदु द्यावा. अर्थभेद होत असेल तर मात्र परसवर्णच लिहावा. उदाहरणार्थ, तंटा, चिंच, संताप, आंबा; देहांत ( सप्तमी ), देहान्त ( शिक्षा ).

२ संस्कृताप्रमाणें य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह् ह्यांच्या पूर्वी येणाऱ्या अनुस्वाराबद्दल मराठींत केवळ शीर्षबिंदुच द्यावा. उदाहरणार्थ, सिंह, संयम, मांस इत्यादि.

३ नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्यरूपांवर अनुस्वार द्यावा. ( कारण नामांचें अनेकवचनी सामान्यरूप संस्कृतमधील षष्ठीच्या 'आम्' प्रत्ययापासून आलेलें आहे) उदाहरणार्थ, लोकांस, मुलांस, तुम्हांस इत्यादि.

४ नपुंसकलिंगी दीर्घ ईकारान्त, दीर्घ ऊकारान्त व एकारान्त नामाच्या शेवटीं प्रथमा विभक्ति असतां ( एकवचनीं व अनेकवचनीं ) अनुस्वार द्यावा. (कारण नपुंसकलिंगी शब्द संस्कृत प्राकृत वगैरे भाषांत सानुनासिक उच्चारण्याची प्रवृत्ति होती तीच मराठीनें कायम ठेविली आहे. ह्याला अपवाद फक्त मराठींतील अकारान्त शब्द.) उदाहरणार्थ, मोतीं, मोत्यें, वासरूं, वासरें, केळें, केळीं, बोलणें, बोलणीं. इ. अपवाद, पाणी, लोणी, गुळवणी व ह्यासारखे इतर शब्द.

५ लिंगानुसार ज्यांचीं रूपें बदलतात अशा विशेषणांच्या एकवचनी एकारान्त व अनेकवचनी ईकारान्त रूपांवर अनुस्वार द्यावा. उदाहरणार्थ, चांगलें (फळ), चांगलीं (फळें).

६ व्युत्पत्तीनें सिद्ध न होणारे अनुस्वार गाळावे. उदाहरणार्थ, हांस, धांव, केंस, कांच (भिंग).

७ व्युत्पत्तीनें आलेले अनुस्वार अर्थभेदास जरुर असतील तेथेंच कायम ठेवावे. उदाहरणार्थ, नांव ( संज्ञा ), नाव ( नौका ); पांच ( संख्या ), पाच ( रत्नविशेष ).

८ अर्थभेद नसेल तेथें व्युत्पत्तीनें सिद्ध होत असले तरी ते अनुस्वार गाळावे. उदाहरणार्थ, सांवळा, कोंवळा, इत्यादि.

९ मी ह्या सर्वनामाच्या प्रथमेच्या रूपावर अनुस्वार देऊं नये. उदाहरणार्थ, मी जातों. परंतु मी तृतीयाविभक्तींत असतांना अनुस्वार द्यावा. उदाहरणार्थ, मीं केलें.

१० तूं ह्या सर्वनामावर नेहमीं (प्रथमा व तृतीया विभक्तींत) अनुस्वार द्यावा. तूं आहेस, तूं केलें.

११ आम्ही, तुम्ही, ह्यांवर प्रथमाविभक्तींत अनुस्वार देऊं नये. तृतीयाविभक्तींत द्यावा.

| | |
|---|---|
| आम्ही गेलों | आम्हीं केलें |
| तुम्ही गेलां | तुम्हीं पाहिलें |

१२ नपुंसकलिंगी एकारान्त सर्वनामांवर उभयवचनीं अनुस्वार द्यावा. उदाहरणार्थ, हें, हीं; जें, जीं; तें, तीं.

१३ 'कांहीं' ह्या शब्दात कां वर अनुस्वार ठेवून हीं वरील अनुस्वार काढावा. (कारण कांहीं हा शब्द किमपि ह्या शब्दापासून व्युत्पादिला जातो. तेव्हां अपिपासून 'ही' झाल्यामुळें ह्यावर अनुस्वाराचें कारण नाहीं).

---

* गोवें येथें भरलेल्या १५ व्या साहित्यसंमेलनानेंहि हे निर्णय एकमतानें मंजूर केले आहेत.

# कांही म्हणींच्या उत्पत्तीची मीमांसा.

( लेखकः—प्र. धों. कानिटकर )

मराठी भाषेत ज्या असंख्य म्हणी आहेत, त्यांपैकीं कांही संस्कृत काव्यें, नाटकें, स्मृति, पुराणें वगैरे ग्रंथांतील श्लोकांचे चरण असून कांही विकृत स्वरूपांत आढळतात. अशा प्रकारच्या म्हणींचा काल ठरविणें शक्य आहे. अशा म्हणींचा मूळ अर्थ लोपला असून वेगळयाच अर्थानें त्यांचा व्यवहारांत उपयोग करण्यांत येतो. कांही म्हणींच्या मुळाशीं एखादी आख्यायिका — अर्थात् काल्पनिक — असते. वाक्प्रचार व म्हणी हीं दोन भाषेचीं महत्त्वाचीं अंगें आहेत. तेव्हां यासंबंधीं साधार विवेचन झाल्यास तें मनोरंजक होईल असें वाटल्यावरून पुढें दिलेल्या म्हणींचा विचार या लेखांत केला आहे.

## ( १ ) मनःपूतं समाचरेत्।

एखाद्याचें वर्तन स्वैर आहे असें दाखविण्याचा हेतु असतो, तेव्हां या म्हणीचा उपयोग करण्यांत येतो. वास्तविक "मनाला प्रशस्त वाटेल असें आचरण करावें" असा मूळ अर्थ असून प्रचलित व्यवहारांत अर्थ समूळ बदलला आहे. मनुस्मृतींत श्लोक आहे तो असाः—

अग्निपूतं वसेदन्नं वस्त्रपूतं पिबेज्जलम्।
सत्यपूतां वदेद्वाचं मनःपूतं समाचरेत्॥

( वसेत्–सेवेत ).

अर्थः—अग्निसंस्कारानें पावन झालेल्या अन्नाचें सेवन करावें; वस्त्रांतून गाळलेलें पाणी प्यावें; सत्यानें पवित्र झालेलें भाषण करावें व मनाला जो मार्ग अनिंद्य वाटतो तो आचरावा.

मूळ श्लोकांत अन्न, पाणी व भाषण या बाबतींतील नियम सांगितले असून चवथ्या चरणांत वागणुकीचा नियम सांगितला आहे. वास्तविक सदसद्विचारशक्तीसारखा योग्य मार्गदर्शक दुसरा कोणी नाहीं व याच अर्थानें मनूनें हा नियम केला असून हल्ली अर्थाचा विपर्यास झाला आहे.

## ( २ ) पडत्या फळाची आज्ञा.

या म्हणीचें अस्तित्व रामायणकालापासून असावें असें वाटतें. सीताशुद्धीकरितां मारुतिराय अशोक वनांत गेले तेव्हां भुकेनें व्याकुळ झाल्यामुळें त्या वनांतील फळें भक्षण करण्याची त्यांनी सीतादेवीस परवानगी विचारली. परंतु त्या ठिकाणीं सीतादेवींचें स्वत्व नसल्यामुळें तशी परवानगी दिली नाहीं. शेवटीं पडलेलीं फळें खाण्याची मारुतीस आज्ञा मिळाली. नंतर त्यानें वृक्ष उपटून भुईवर आपटावा व खाली पडलेलीं फळें खावीं असें करून क्षुधाशमन केलें व फळें तोडून खाण्याचा दोष टाळला.

एखादी सवलत मिळाली म्हणजे शक्य तोंवर त्या सवलतीप्रमाणें वागून आपला हेतु साध्य करतां येतो व नियमाचें उल्लंघन केल्याचा दोष अंगीं लागत नाही, अशा वेळीं या म्हणीचा उपयोग करितात.

## ( ३ ) शापादपि शरादपि।

एखादा मनुष्य कोणतेंहि काम, आत्मबळ, विद्याबळ, मनुष्यबळ, द्रव्यबळ कोणत्याहि साधनानें करण्यास समर्थ असेल–केवळ एकाच साधनावर अवलंबून नसतो–अशा मनुष्याच्या कर्तृत्वशक्तीसंबंधीं बोलतांना या म्हणीचा उपयोग करितात. हा चरण भारतांतील खालील श्लोकांत आहेः—

अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः।
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि॥

हें वर्णन द्रोणाचार्यांचें असून ब्रह्मतेज किंवा क्षात्रतेज यांपैकीं कोणत्याहि प्रकाराने शत्रूचा निःपात करण्यास द्रोणाचार्य समर्थ होते. त्याप्रमाणे कोणत्याहि साधनाने जो इष्ट कार्य संपादन करण्यास समर्थ असतो त्याला " शापादपि शरादपि " असें म्हणतात.

(४) ऋण काढून सण करूं नये.

या म्हणीचा अर्थ स्पष्ट आहे. यांतील तत्त्व " ऋणं कृत्वा घृतं पिब " या चार्वाक मताविरुद्ध आहे व तें योग्यच आहे. महाभारतांत यक्षप्रश्नांत खालील श्लोक आहे तो पाहिला असतां वरील म्हणीचें महत्त्व लक्षांत येईल.

" को मोदते " ( सुखी कोण ? ) असा प्रश्न यक्षाने धर्मराजास केला त्यावर त्यांनी उत्तर दिलें तें :—

पंचमेऽहनि षष्ठे वा शाकं पचति स्वे गृहे।
अनृणी चाप्रवासी च स वारिचर मोदते॥

अर्थः— पांच सहा दिवसांनी जो आपल्या घरीं नुसती भाजी उकडून खातो, जो अनृणी असतो व ज्याला प्रवास करावा लागत नाहीं तोच, यक्षराज, सुखी म्हणावा.

(५) कर्मणो गहना गतिः।

वर दिलेल्या श्लोकचरणाचें मराठींत रूपांतर " कर्मणो गहनो गतिः " किंवा " कर्मणा गहनो गतिः " असें बोलण्यांत आढळतें. एखाद्यावर एखादी आपत्ति आली किंवा कोणी कुकर्माने आपत्ति ओढवून घेतली तर त्यासंबंधीं बोलतांना प्रायः वरील म्हणीचा विकृत स्वरुपांत हमेश उपयोग करण्यांत येतो. श्रीमद्भगवद्गीतेंत पुढीलप्रमाणे श्लोक आहेः—

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः।
अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः॥ अध्याय ४, १७

या म्हणीची उत्पत्ति गीताकालापासून आहे असें मानण्यास प्रत्यवाय नाही.

(६) कृतकृत्यश्च भारत।

लग्नकार्य, परीक्षा, किंवा अवघड काम यशस्वी रीतीने झालें म्हणजे संबंध असणाऱ्या मनुष्याला इतर लोक " कृतकृत्यश्च भारत " असें म्हणतात. वरील चरण श्री० भ० गीतेच्या १५ व्या अध्यायांत आहेः—

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ।
एतद्बुद्ध्वा बुद्धिमान् स्यात् कृतकृत्यश्च भारत॥ २०॥

(७) समानशीले व्यसनेषु सख्यम्।

गांजेकस, दारूबाज, जुवेबाज वगैरे व्यसनी लोकांसंबंधीं या म्हणीचा उपयोग करण्यांत येतो. मराठींत व्यसन शब्दाचा संस्कृत अर्थ-संकट- नष्ट झाला आहे. अशाच अर्थाची एक इंग्रजी म्हण आहे. Birds of the same feather flock together. वरील म्हण शूद्रककालापासून अस्तित्वांत आली असावी. मृच्छकटिक नाटकांत खालील श्लोक आहेः—

मृगा मृगैः संगमनुव्रजन्ति।
गावश्च गोभिस्तुरगास्तुरंगमैः॥
मूर्खाश्च मूर्खैः सुधियः सुधीभिः।
समानशीले व्यसनेषु सख्यम्॥

मृच्छकटिकाचा काल पहिलें किंवा दुसरें शतक मानतात.

### ( ८ ) चंचुप्रवेशे मुसलप्रवेशः ।

राजदरबारांत किंवा मोठ्या गृहस्थाच्या अगर अंमलदाराच्या घरीं थोडका शिरकाव झाला म्हणजे मनुष्य आपल्या अकलेने पूर्ण शिरकाव करून घेतो; परंतु प्रारंभीं परिचित मनुष्याची मदत लागते. अशा वेळीं या म्हणीचा उपयोग करण्यांत येतो. ही म्हण वात्स्यायनाच्या कामसूत्रांतील एका श्लोकाचा चरण आहे. मूळ श्लोक ग्राम्य असल्यामुळे येथें देतां येत नाहीं. मूळार्थ बदलून प्रचारांत मूळची ग्राम्यता नष्ट झाली आहे. वात्स्यायनाचा काल साधारण इ० सनाचें दुसरें शतक मानण्यांत येतें; व तोच काल या म्हणीचा उत्पत्तिकाल मानण्यास हरकत दिसत नाहीं.

### (९) परदुःख शीतळ

म्हणीचा अर्थ स्पष्ट आहे. कालिदासकाळापासून म्हण प्रचारांत आली असावी. यास आधारः—

महदपि परदुःखं शीतलं सम्यगाहुः ।
प्रणयमगणयित्वा यन्ममापद्‌गतस्य ॥
अधरमिव मदांधा पातुमेषा प्रवृत्ता ॥
फलमभिमुखपाकं राजजंबूद्रुमस्य ॥

विक्रमोर्वशीय अंक ४

कालिदासाचा काल पांचवे किंवा सहावें शतक मानण्यांत येतो.

### ( १० ). हातच्या कांकणाला आरसा कशाला ?

ज्या वस्तूचें अस्तित्व सहज समजतें, त्या ठिकाणीं तें अस्तित्व सिद्ध करण्यास इतर साधनाची अपेक्षा नसते हें या म्हणीचें तत्त्व असून अगदी परिचयाची वस्तु दृष्टान्तादाखल यांत घेतलेली आहे. या म्हणीचा उपयोग राजशेखराच्या "कर्पूरमंजरी" नाटकांत प्राकृत भाषेंत केलेला आहेः—

हत्थकंकणं किं दप्पणेण पेक्खीअदि ।

**छाया.**

हस्तकंकणं किं दर्पणेन दृश्यते

कर्पूरमंजरी—जवनिका ( १ ).

राजशेखराचा काळ इ. स. ८८४ ते ९५९ असा ठरलेला आहे. तेव्हा ही म्हण सुमारें १००० वर्षांची जुनी आहे यांत शंका नाहीं.

### ( ११ ) एको देवा केशवा

भर्तृहरीच्या नीतिशतकांत खालील श्लोक आहेः—

एको देवो केशवो वा शिवो वा
एकं मित्रं भूपतिर्वा यतिर्वा ॥
एको वासः पत्तने वा वने वा ।
एका भार्या सुंदरी वा दरी वा ॥

या श्लोकाच्या पहिल्या चरणांतील पहिले तीन शब्द वरील म्हणींत आहेत. मनुष्याने दोही डगरींवर हात न ठेवतां एकाच मार्गाने वागण्याचा निश्चय केला म्हणजे त्यापासून जरी कधी कधी तोटा झाला तरी शेवटीं फायदाच होतो व आपत्ति आली तरी ठराविक मार्ग न सोडण्याचा ज्याचा निश्चय असतो तो "एको देवा केशवा" या म्हणीचा उपयोग करतो. मराठींतील म्हण विकृत स्वरूपांत आहे. भर्तृहरीचा काळ तेरावें शतक मानण्यांत येतो. तेव्हापासून ही म्हण प्रचारांत आली असावी.

(१२) शिव शिव न हिंदुर्न यवनः ।

वरील श्लोकावरूनच मराठींत " धड हिंदू ना मुसलमान " अशी म्हण प्रचलित झाली आहे. या म्हणीचें कर्तृत्व जगन्नाथपंडितांकडे आहे. जगन्नाथपंडित हे अकबर बादशहाचे जामात होते व त्यांनी भामिनी ऊर्फ लवंगी नांवाच्या अकबराच्या मुलीशीं विवाह केला होता. अकबराने हा विवाह हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें करून कन्येचें सालंकृत कन्यादान केलें. अकबराच्या दरबारांत निरनिराळ्या धर्मांची चर्चा होत असे व यामुळें त्याच्या मनाचा गोंधळ होऊन तो कोणत्याहि एका विशिष्ट धर्माप्रमाणे वागत नव्हता. ही स्थिति जगन्नाथपंडितांनी खालील श्लोकांत वर्णिली आहेः--

न संध्यां संधत्ते नियमितनिमाजं न कुरुते ।
न वा मौंजीबन्धं कलयति न वा सुन्नतविधिम् ॥
न रोजां जानीते व्रतमपि हरेर्नैव कुरुते ।
न काशी मक्का वा शिव शिव न हिंदुर्न यवनः ॥

अर्थः— अकबर बादशहा संध्या करीत नाहीं किंवा निमाज पढत नाहीं; मौंजीबंधन करीत नाहीं किंवा सुंता करीत नाहीं; रोजे पाळीत नाहीं किंवा एकादशीहि करीत नाहीं; मक्केला जात नाहीं किंवा काशीयात्राहि करीत नाहीं; यामुळे याला धड हिंदुहि म्हणतां येत नाहीं किंवा मुसलमानहि म्हणतां येत नाहीं.

ज्या मनुष्याची वागणूक एका विशिष्ट पंथाप्रमाणे नसून दोन परस्परविरुद्ध पंथांतील तत्त्वें तो घेतो, अशा मनुष्यास उद्देशून वरील म्हणीचा उपयोग करण्यांत येतो. जगन्नाथ पंडिताचा जन्म इ. स. १५५० मध्यें झाला. यावरून ही म्हण सोळाव्या शतकांतील ठरते.

(१३) मन जाणे पापा । माय जाणे लेकराच्या बापा.

ही म्हण नित्य प्रचारांतील आहे व अर्थ स्पष्ट आहे. 'पाप' व 'लेकराचा बाप' या दोन गोष्टींचें यथार्थ ज्ञान कोणास असतें तें म्हणींत सांगितलें आहे. त्यांचा क्रमशः विचार करूं.

मन जाणे पापा.

पाप म्हटलें म्हणजे तें निंद्य. अर्थात् चार चौघांसमक्ष तें कोणीहि करणार नाहीं. पापाचा खरा साक्षीदार ज्याचें त्याचें मन. यामुळेच मोठमोठ्या गुन्ह्यांचे बाबतींत पोलिसास जेव्हां मुळींच पुरावा मिळत नाहीं, तेव्हां कबुलीजबाब घेणें किंवा गुन्हेगाराचा साथीदार माफीचा साक्षीदार करणें याशिवाय गत्यंतर नसतें. मनुष्याचीं कर्में पहाणारे कांही साक्षीदार सांगितले आहेत; परंतु त्यांना वागिंद्रिय नसल्याने व्यवहारांत त्यांचा उपयोग होऊं शकत नाहीं:--

आदित्यचंद्रावनिलोऽनलश्च ।
द्यौर्भूमिरापो हृदयं यमश्च ॥
अहश्च रात्रिश्च उभे च संध्ये ।
धर्मोऽपि जानाति नरस्य वृत्तम् ॥

तेव्हां मनाशिवाय पापाचा दुसरा साक्षीदार नाहीं हें उघड आहे.

माय जाणे लेकराच्या बापा.

जगांत मनुष्यें दिसतात तशीं असतीं तर वरील म्हण व्यर्थ भासली असती. परंतु वस्तुस्थिति तशी नसल्याने वरील म्हणीस महत्व आलें आहे. वैवाहिक ग्रंथि कायम आहे तोंपर्यंत पतिपत्नीच्या संततीचें पितृपद पतीकडेच आहे असें कायदा मानतो. परंतु

"शेताआड चोरी व नवऱ्याआड शिंदळकी"

पचत असल्यामुळे विशिष्ट परिस्थितींत "मुलाचा बाप कोण" हा कूटप्रश्न उपस्थित होतो. याच अर्थाची एक इंग्रजींत म्हण आहे:--

The father thinks that the child is his,
But the mother knows whose it is.

या म्हणीवरून या बाबतींत आंग्लसमाजांत सुद्धा कशी स्थिती आहे तें समजतें. वरील बाब नाजूक असली तरी वस्तुस्थिति लक्षांत घेऊनच सुभाषित-कारांनीं खालील सुभाषितें केलीं आहेत.

(१) वृद्धस्य भार्या करदीपिकेव.
(२) मृत्युः शरीरगोप्तारं धनभाजं वसुंधरा ।
दुश्चारिणीव हसति स्वपतिं पुत्रलालनात् ॥
(३) भर्ता यद्यपि नीतिशास्त्रनिपुणो विद्वान् कुलीनो युवा ।
... ... ... ... ... ... ... ...
तं कांतं प्रविहाय सैव तरुणी जारं पतिं वांछति ॥

## (१४) म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं पण काळ सोकावतो.

ही म्हण एका काल्पनिक अख्यायिकेवर बनलेली आहे ती अख्यायिका येणेप्रमाणे:--

एका गृहस्याचें मोठें कुटुंब होतें व त्याची वृद्ध आई होती ती आसन्नमरण झाली असतांना काळ--यम--तिला नेणेकरितां आला, तेव्हां तिला वाचविण्याचे हेतूने त्या कुटुंबांतील मंडळीने काळाची विनवणी केली. काळाने सांगितलें, तिच्या मोबदला मनुष्य मिळाल्यास तिला या खेपेस नेणार नाहीं. तेव्हां कुटुंबांतील मंडळींनीं म्हातारीच्या प्रेमामुळें एक आसन्नमरण मूल मोबदला दिलें. कांही दिवसांनी काळाची फेरी पुन्हा आली तेव्हांहि एक मूल मोबदला दिलें व म्हातारीस वाचविलें. काळ तिसऱ्या खेपेस आला तेव्हां मात्र तिच्या मुलाने कुटुंबांतील मंडळीस सांगितलें कीं आता म्हातारीसच नेऊं द्या. तिला वाचविण्याकरितां दोन बळी दिले व असेंच चाललें तर काळ वरचेवर येईल व कुटुंबहानि फार होईल. तो म्हणाला "म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं पण काळ सोकावतो." तेव्हांपासून ही म्हण अस्तित्वांत आली असावी.

## (१५) ज्या योनींत शिरावं तीच बरी वाटते

या म्हणीचीहि उभारणी एका काल्पनिक गोष्टीवर झालेली आहे:--एका गुरुजवळ एक शिष्य होता. मरणसमयीं गुरूला अंतर्ज्ञानाने पुढील जन्म सूकरयोनींत येणार हें समजलें व त्याने शिष्यास सांगितलें कीं मला सूकरयोनींतून मुक्त कर. त्या योनींत जन्म घेतल्यावर आपल्या कपाळावर विशिष्ट प्रकारची खूण असेल व तसा सूकर पाहिल्यास तूं त्याला ठार मार असें सांगून गुरूने इहलोक सोडला. त्याच्या आज्ञेप्रमाणे शिष्य तपासांत होता. शेवटीं एका शौचकूपाजवळ विशिष्टचिन्हांकित डुकर, त्याची बायको व मुलें यांसह शिष्यास आढळला. तेव्हां तो त्यास मारण्यास उद्युक्त झाला असतां त्या डुकरास वाचा फुटली व तो शिष्यास म्हणाला "मीच तुझा पूर्व जन्मीं गुरु होतों. परंतु मला भार्यापुत्रांच्या संगतींत सौख्य वाटतें; तरी माझ्या सुखाचा भंग करूं नकोस. या अमंगळ योनीचा मला कंटाळा आला नाही." यावरून वरील म्हणीची सार्थता समजून येते. भंग्याचा धंदा ठरलेलाच आहे व पुढें तोच परंपरेने कुटुंबांत चालू राहातो; तथापि त्याला खंत वाटत नाही व मुलाकरितां भंगीसुद्धां नवससायास करीत असतोच. यावरून वरील म्हणीची सार्थता पटते.

---

# ' वागर्थविहार '

( लेः--विष्णु हरी निजसुरे. )

' आजन्म ' योग्य आहे म्हणून ' आजीव ' नको. ' आजन्म ' शब्द ' जीविताावधि म्ह० जिवंत असेपर्यंत ' हा अर्थ दाखविण्यास सर्वथा अक्षम आहे; कारण जन्म म्ह० उत्पत्ति व उत्पत्ति ही एक-क्षणभरच असते असें रा. मोडक म्हणातात. पण या बाबतींत ते अगदी घसरले आहेत. थोड्या विचारानंतर किंवा स्मरणानंतर कोणालाही ' जन्म ' शब्द ' जीविताचा अवधि ' या अर्थी संस्कृत व मराठी अशा दोन्ही भाषांत लेखक व वक्ते वापरतात असें आढळून येईल. पुढील अवतरणें पहा. ( १ ) पूर्वजन्मधनुषा समागतः सोऽतिमात्रलघुदर्शनोऽभवत्-रघु० सर्ग ११ ( २ ) अन्यस्मिञ्जन्मनि न कृतमवदातं कर्म – कादंबरी ( ३ ) मम इहजन्मनि जन्मान्तरेच – कर्मकाण्डांतील कित्येक संकल्प. ( ४ ) परान्नं दुर्लभं लोके प्राणा जन्मनि जन्मनि – सुभाषित. हीं झालीं संस्कृत. अशीं आणखी वाटतील तितकीं देतां येतील. आतां मराठी पहा. ( १ ) याचि जन्में येणेंचि काळें स्वरूपीं होइजे निराळें,– दासबोध ( २ ) नरजन्म पर्वदुर्लभ जाणुनि यावी कशी न येथ उडी,– मोरो० ( ३ ) तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा,–मोरो०. वरील अवतरणांत ' जन्म ' म्हणजे ' आयुष्य ' असाच दीर्घ काळ दाखविणारा जन्म शब्दाचा अर्थ आहे; निवळ उत्पत्ति किंवा उत्पत्तियुक्त क्षण असा नाहीं हें उघड आहे. तेव्हा ' सबंद आयुष्यभर असणारा ' या अर्थी ' आजन्म ' शब्द ' सभासद ' ' सेवक ' वगैरे शब्दांच्यापूर्वी जोडण्यास बिलकूल भिण्याचें कारण नाही व ' आजन्म ' या रूढ व मान्य शब्दाला गचांडी देऊन ' आजीव ' शब्द प्रचारांत आणण्याचें प्रयोजन नाही.

या बाबतींत खरोखरच जी शंका यावयास पाहिजे ती ही कीं, क्षणभर टिकणाऱ्या उत्पत्तिक्रियेचा वाचक असा जन्म शब्द दीर्घकाल दाखविणाऱ्या आयुष्य किंवा जीवन शब्दाच्या अर्थी कसा वापरण्यांत येतो ? याचें उत्तर; लक्षणाव्यापारानें. आतां क्षणिक क्रियेचा वाचक जन्म शब्द दीर्घक्रियेचा वाचक जो जीवन म्ह० जिवंत राहणें हा शब्द त्या अर्थी कसा उपयोगांत आला हें पाहूं.

संस्कृत व्याकरणांत क्रियेची व्याख्या खाली दिल्याप्रमाणे आहेः–

" गुणभूतैरवयवैः समूहः क्रमजन्मनाम् ।
बुद्धया प्रकल्पिताभेदः क्रियेति व्यपदिश्यते ॥"

' स्वभावतः गौण असलेल्या व क्रमानें उत्पन्न होणाऱ्या अनेक व्यापारांना संकलन करणारी बुद्धि समूहरूप मानते; अशा व्यापारांच्या समूहाला क्रिया असें म्हणतात' असा वरील कारिकेचा अर्थ आहे. उदाहरण, पचनक्रिया ( शिजविणें ) म्ह० चुलीवर भांडें ठेवणें, त्यांत पाणी घालणें, तांदूळ वैरणें, विस्तव पेटवून त्याला फुंकर घालणें व अखेरीस तांदूळ शिजल्यावर भांडें खाली उतरणें इतक्या व्यापारांचा अभेदरूपानें कल्पिलेला समूह होय.

आतां जीवनक्रिया म्ह. काय तें पाहूं. जीवन-प्राण धारण करण्याची क्रिया; ( जीव्-प्राणधारणे या धातूपासून) हा धात्वर्थ होय. पण जीवन शब्दानें निवळ श्वासोच्छ्वास करण्यापेक्षां जिवंत राहण्यास आवश्यक अशा अनेक क्रियांचा बोध होतो. इंग्रजींतहि अनेक लहानमोठ्या क्रियांनी बनलेल्या मनुष्याच्या चरित्रास जी धातूशीं समानार्थक अशा to live या धातूपासून बनलेला life हा शब्द लावतात. असो. जीवनक्रियेचे अवयव असलेल्या अनेक क्रिया संक्षेपानें पांच क्रियांत यास्कादिकांनी समाविष्ट केल्या आहेत. त्यांस मृत्यूसह षड्भावविकार म्हणतात; त्यांचीं नांवें– १ जायते (उत्पन्न होतो)

२ अस्ति = स्वरूपधारणं करोति ( स्वतःचें रूप धारण करतो ), ३ वर्धते ( वाढतो ) ४ विपरिणमते ( देहाचें वाईट रूपान्तर होतें. ) ५ अपक्षीयते ( क्षिजत जातो ) व विनश्यति (नाश पावतो). शेवटचा व्यापार अर्थात् जीवनक्रियेंत येत नाही. आता प्रश्न असा कीं, पहिल्या व्यापाराचा वाचक जो जन्म शब्द तो स्वतःच्या अर्थासह इतर चार व्यापारांच्या अर्थाचा बोध कसा करून देतो ? म्हणजेच येथे लक्षणा कशी लागू होते ? याचा खुलासा असा. जन्म झाला तरच अस्तित्व शक्य, अस्तित्वामुळेच वृद्धि शक्य; याप्रमाणे पूर्वपूर्वक्रिया साक्षात् किंवा परम्परेने उत्तरक्रियांचें कारण होय. तेव्हा जन्म हें कारण व उत्तरोत्तर क्रिया हीं कार्यें. तेव्हा कार्य व कारण यांचा अभेद मानून कारणबोधक जन्म शब्द कार्य-दर्शक पुढील क्रियांचाहि दर्शक झाला. हें कार्यकारण यांच्या अभेदासंबंधाने केलेल्या लक्षणेचें उदाहरण होय.

जन्मशब्दाच्या जीवितावधि या लाक्षणिक अर्थाविषयीं वर दिलेल्या उपपत्तीहून थोडी निराळी अशीहि दुसरी उपपत्ति सांगतां येईल. 'प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति' म्ह. समूहांतील प्रधान व्यक्तीचें नांव समुहाला देण्यांत येतें असा एक न्याय संस्कृतांत प्रसिद्ध आहे. उदाहरण मेल गाडींतून उतारू जात असताहि टपालाच्या प्रधानत्वामुळे त्या गाडीला 'मेलगाडी' म्हणतात. वर सांगितलेल्या जन्मादिक्रियांपैकीं जेव्हा अस्तित्वाला आपण महत्त्व देतों तेव्हां अस्तित्व हाच शब्द जीविताचा बोधक होतो. मरणक्रियेलाच प्राधान्य देऊन कालिदास 'मरणं प्रकृतिः शरीरिणां' म्हणतो. एरवीं वृद्धि वगैरे काय पदार्थांचा स्वभाव किंवा प्रकृति नाहीं कीं काय ? त्याचप्रमाणे जन्मास प्राधान्य दिलें असतां जन्म हाच शब्द जीविताचा दर्शक झाला. जन्माचें महत्त्व एका सुभाषितांत मार्मिक रीतीने सांगितलें आहे.

'मृत्योर्बिभेषि किं मूढ भीतं मुञ्चति किं यमः ।
अजातं नैव गृह्णाति कुरु यत्नमजन्मनि ॥

जन्माला आल्यावर मृत्यूचें भय वाटत असेल तर जन्माला न येण्याचाच उपाय करावा. असो. तर याप्रमाणे जन्म म्ह. जीवितावधि या अर्थाची सुंदर उपपत्ति लागत असतांना रा. मोडकांनी एका फटकाऱ्यासरशीं त्याला रद्द ठरविला हें वाचून कोणालाहि आश्चर्य वाटेल. पण वरील उपपत्ति वाचून कोणाहि गृहस्थास एखाद्या संस्थेचा 'आजन्म' समासद होण्यास रा. मोडकांच्या शब्दचिकित्सेस भिण्याचें कारण नाही. त्यांनी नवीन सुचविलेला 'आजीव' हा शब्दहि बरोबर आहेच. पण त्याला जीवन शब्दाची जरूर नाहीं. जीव म्ह. आयुष्य असाहि अर्थ कोशकार देतात.

शब्दाच्या अर्थान्तराची चिकित्सा करणाराला अभिधा, लक्षणा व व्यञ्जना या शब्दांच्या वृत्तींची चांगली ओळख असावयास पाहिजे, या बाबतींतील रा. मोडकांच्या घोटाळ्याचें एकच उदाहरण देतों. ' सकल ' शब्दाच्या विवेचनांत ते एकदा प्राथमिक अर्थाला लाक्षणिक अर्थाचा समय किंवा अट म्हणतात व पुढें लगेच त्या दोनही अर्थांतील संबंधाला अट म्हणतात. यांपैकीं खरें काय ? कीं दोनही खरीं ? लाक्षणिक अर्थाच्या विवेचनाला संस्कृतांतील जुनी परिभाषा पुरी असतांना त्यांनी नवीन परिभाषेचा खटाटोप कशासाठी केला आहे ? कला म्ह० सोळावा अंश या अर्थाप्रमाणे ' कोणताहि अंश ' असा अर्थ कोशकारांनी दिला असल्यामुळे ' सकल ' याचा संपूर्ण हा लाक्षणिक अर्थ म्हणण्याचें कारण नाहीं. लाक्षणिक अर्थामध्यें प्राथमिक अर्थ अजिबात टाकलेला असतो. **प्राथमिक अर्थाची व लाक्षणिक मानलेल्या अर्थाची समव्याप्ति असेल तर दोनही अर्थ प्राथमिकच ठरतील.** उ० चार काटकोन, तीनशें साठ अंश किंवा वर्तुल हे तीनहि शब्द प्राथमिक अर्थच दाखवितात, ' विवक्षित वस्तूला अंश असोत वा नसोत ' ही रा० मोडकांची भाषाच आम्हाला बरोबर लागत नाही. कारण आदिकारणाखेरीज सर्व वस्तु ह्या अंशयुक्तच आहेत. म्हणूनच सकल व संपूर्ण यांनी वाच्यार्थानेच अशेष हा अर्थ दाखविला जातो असें आमच्या बुद्धीस वाटतें.

कानाडोळा करणें म्ह० दुर्लक्ष्य करणें या अर्थाचें सुबोध व प्रसिद्ध परिभाषेंत वर्णन असें. कार्यवाचकाच्या अर्थी कारणवाचक शब्द लक्षणेने उपयोजतात. उ० परीक्षेच्या श्रमांनीं आजारी झालेल्या मुलाला उद्देशून आईबाप म्हणतात 'अहो ही यांची परीक्षा.' येथे परीक्षा हा कारणबोधक शब्द तन्मूलक आजार या अर्थी वापरला आहे. या लक्षणेचें **प्रयोजन** परीक्षांचा दुष्टपणा हा व्यङ्ग्यार्थ हें होय. तसेंच 'कानाडोळा' हा कारणवाचक शब्द 'दुर्लक्ष' या कार्यवाचकाच्या अर्थी लक्षणेने वापरला आहे. असा वापरण्याचें **प्रयोजन** दुर्लक्षाचा हेतुपुरःसरपणा हा व्यङ्ग्यार्थ हें होय.

अशा प्रकारची चर्चा शब्दविवेचकांस पसंत पडल्यास लक्षणाव्यापाराने भाषेंत कशा गमती होतात याचें विस्तृत विवेचन करण्याचा आमचा मानस आहे.

रा० मोडकांनीं लक्षणा कशी होते या विषयीं जें विवेचन केलें आहे त्यावरून संस्कृत ग्रंथांतून या विषयींची जी विस्तृत चर्चा आहे ती त्यांनी आत्मसात् केली आहे असें दिसत नाही; केली असती तर गंगायां घोषः, किंवा आयुः घृतम् किंवा माणवकः सिंहः अशासारखीं सुलभ उदाहरणें त्यांनी घेतलीं असतीं. शिवाय त्यांचें विवेचनही विशद झालें असतें.

---

# स्त्रियांच्या म्हणी

( मागील अंकावरून पुढे चालू )

(२१८) आहेर चोळीचा, गजर वाजंत्र्याचा.
(२१९) जेवणास विकड, भातांत पाकड.
(२२०) अधोपरी जोडलें, पिढीजात तोडलें.
(२२१) दिल्याशिवाय मिळत नाहीं, पेरल्याशिवाय उगवत नाहीं.
(२२२) आलांत पायीं, वसा भुईं, पाट देण्यास सवड नाहीं.
(२२३) सुडकें ठेव दांडीला, हात घाल हांडीला.
(२२४) बापानें कमावलें, मुलानें गमावलें.
(२२५) दाखविलं सोनं अन् हसं मूल तान्हं.
(२२६) हलगो मालगो, दिव्यांत तेल घालगो.
(२२७) बाप पाहुणा आला तरी रेडा दुभत नाहीं.
(२२८) लाडकें लळूं, कोलत्या खेळूं.
(२२९) ठिकाण नाहीं लग्नाला अन् कोण घेईल मुलाला.
(२३०) बापानें मिळविलं नांव मुलानें घालविलं गांव.
(२३१) उपाशी मागतो भाकर शिळी, देव देतो साखरपोळी.
(२३२) राहावें संगतीला, जेवावें पंगतीला.
(२३३) एका नाका वहु शिंका, त्यांचा दोष मानूं नका.
(२३४) अधोपरी आलं राज (राज्य),कोंबडी मागते जानबाज.
(२३५) पाठीवर मार घाव पण पोटाला आग लाव.
(२३६) हौशीनं केली पर, त्याची झाली टर.
(२३७) दुखणें सोसावें पोरानें, भूक सोसावी ढोरानें.

# मराठी शुद्धिभ्रमचर्चा.

( लेखकः--महादेव हरी मोडक. )

शब्द, शुद्ध शब्द, कुलीन, जातिवंत शब्द, व्युत्पन्न शब्द म्हणजे विदग्ध वाङ्मयाचा प्राण असल्याने साहित्यप्रेमी विद्वानांचें लक्ष शुद्ध शब्दाकडे लागणें सहज आहे. तशांत आजकाल पतितपरावर्तन शुद्धि-संघटन, पुराणवस्तुसंशोधन वगैरे संशोधनात्मक प्रयत्न अन्यत्र चालू असल्याने शाब्दिकांस आपल्याहि प्रांतांत संशोधनकार्य चालविण्याची स्फूर्ति होणें स्वाभाविकच आहे. आणि याप्रमाणें साहित्यपत्रिकेंत शब्दसंशोधनाचें कार्य अनेक विद्वान करीत आहेत ही समाधानाची गोष्ट आहे. या शोधनप्रेमी विद्वानांपैकीं रा. गोविंद कृष्ण मोडक हे एक आहेत. यांच्या ह्या संशोधनाच्या व तदंगभूत उत्खननाच्या खणखणाटाने 'निजसुऱ्यां'सहि जागृति येऊन तेहि प्रतिसहकार्यार्थ उभे राहिल्याने प्रेक्षकांस व परीक्षकांस मोठी करमणूक होऊन राहिली आहे. पत्रिकेच्या गतांकांतील '**हातचा मळ**' या वाक्प्रचाराच्या कामीं पक्ष-प्रतिपक्षाचे तर्कवितर्क मनोरंजक व सार्थ आहेत. मात्र माझ्या अल्पमतीप्रमाणे दोघांचेहि यत्न पल्लवग्राहि न्यायाचे झाले आहेत. मोडकांच्या म्हणण्यांतहि अंशतः सत्य आहे. निजसुऱ्यांच्याहि तसेंच आहे. मात्र पूर्ण सत्य दोहोंच्यामध्येच आहे असें मला वाटतें.

'हातचा मळ' हें नादसादृश्यावरून 'हस्तामलक' याचें अपभ्रष्ट रूप असावें, असें मोडक म्हणतात. तर्क खरा आहे. निजसुरे यांस ही कल्पना अंशतः तरी पोटांत पटते, पण ओठांत आणवत नाही. कारण ते म्हणतात, "अपभ्रंश मानूं; पण भ्रंश कोणाचा संभवतो? जो सुप्रतिष्ठित असेल त्याची स्थानच्युति किंवा भ्रंश. पण ह्या न्यायाने पाहतां मूलभूत '**हस्तामलक**' हा शब्द जर संस्कृतांत प्रतिष्ठित नाही तर तो अपभ्रष्ट झाला हें कसें म्हणावें?" **कल्पना** कबूल आहे, पण **शब्द** कबूल नाही. कारण, संस्कृतांत ही कल्पना **करतलामलक** (वदखिलं जगदालोकयतां दिव्येन चक्षुषा इ० **बाणभट्ट-कादंबरी**) या शब्दांनीं रूढ आहे. तथापि चंद्रावरील डागावर कोणी **शशाची**, कोणी **मृगाची** कल्पना बांधितात व या दोन्ही **कल्पना** ग्राह्य मानितात; तसेंच **शशलांछन** तसाच **मृगलांछन** शब्द चंद्रास लावितात. पण **शशावरून** चंद्राला '**शशी**' म्हणण्याचा परिपाठ आहे, तसा 'मृगा' वरून मृगी म्हणण्याचा नाही असें कां? व्याकरण या साधनिकेस विरुद्ध नाही. श्रीहर्ष म्हणतो, लोकमताच्या जबरदस्तीपुढे व्याकरणाचा कायदा मानितो कोण? वैयाकरणांनाहि लोक-मतापुढे हात टेकावे लागतात. बाकी लोकमतालाहि कांही थोडेंफार कारण असतें. 'शशा'पासून 'शशी' हा शब्द लोकांस रुचतो, पण मृगापासून 'मृगी' रुचत नाहीं. याला थोडेसें कारण असें कीं, '**मृगी**' हा शब्द स्त्रीमृग ऊर्फ 'हरिणी' या अर्थाने रूढ असल्याने व तद्वाचक वस्तु ही चंद्राचे तुलनेने अगदी क्षुद्र असल्याने दोघांना सदृशनामधेय बनविणें म्हणजे एक प्रकारें चंद्राला लघुत्व देण्यापैकीच होय. तसा प्रकार '**शशी**' शब्दाचा नाही. 'मृगी' प्रमाणें 'शशी' म्हणजे 'स्त्रीशश' असा शब्द लोकांचे तोंडीं नसल्याने 'शशी' शब्द लोकांस पटला असावा. सारांश, '**निजसुरे**' हे साधार **मोडकांना** असें दाखवितात कीं '**करतलामलक**' व 'हस्तामलक' हे संस्कृत पर्याय जरी एकार्थक असले तरी 'हातांतला आंवळा' या अर्थाने 'करतलामलक' हाच शब्द रूढ आहे; '**हस्तामलक**' हा नाही; **साफ नाहीं**. मूलं नास्ति कुतः शाखा! **निजसुऱ्यांची** कोटी बिन-

तोंड दिसते. आणि मोडकांचा तर्क लटका पडतो. पण तसें नव्हे. उभयतांच्या सुदैवानें एथे एक चोर-वाट किंवा पळवाट आहे. ती वाट अशी. 'हातचा मळ' हा शब्द – यांचें – निजसुऱ्यांच्या म्हणण्याप्रमाणें 'करतलामलक' असें दाखवितां आलें तर उभयपक्षाचा मेळ बसेल. पण मुळांत शब्द 'हस्त' नसून 'कर' आहे. आणि एथे त्याचें प्रतीक हात; ह्याचा मेळ कसा ? तर यांतील युक्ति अशी आहे कीं, 'करतलामलक' हा शब्द आजकाल देखील केवळ प्राकृत म्हणजे ज्याला संस्कृताचें अज्ञान आहे अशांच्या कानीं पडला असतां तो 'करतला' – आणि 'मलक' अशीं दोन पदें असावीं असें मानितो. 'आमलक' हें पद किंवा ह्याचा अर्थ याची त्यास कल्पनाहि नसते. 'कर' व 'तल' हे शब्द जरी संस्कृतच, तरी निव्वळ मराठीस परिचित आहेत तसा 'आमलक' हा नाहीं. त्यामुळें त्याचे जागीं 'मलक' हेंच पद समजतो. व करतल हा शब्द संस्कृत असल्यानें ह्याचा तर्जुमा हाताचा तळवा, तळहात किंवा तळहात असा करितो. 'पादतल' याचाहि तर्जुमा असाच म्हणजे 'पायाचा तळवा' किंवा 'तळपाय' असाच करितात; पायतळ किंवा हस्त-मळ असें शुद्ध मराठींत कोणी म्हणत नाहीं. यामुळें 'करतलामलक' या दोनअवयवी शुद्ध संस्कृताचा तर्जुमा करितांना 'करतल' या अवयवाचे जागीं 'तळहात' शब्द आला व 'आमलक'-पदाची कल्पना नसल्यानें 'मलक' मळ आला. क हा स्वार्थींच पुष्कळदा असणार–बाकी, केवळ प्राकृताला 'क' चा हाही अर्थ कळत नाहीं. पण मलक, मल हे अभिन्न असें मानून तो 'करतलामलक' या जागीं 'तळहात (ता) चा मळ' असा शब्द योजितो. मग लाघवार्थ तळहाताचा याऐवजीं केवळ 'हात' चा किंवा 'हाताचा' एवढाच अवयव घेऊन 'हातचा मळ' असा प्रयोग करितो.* एवंच 'हातचा मळ' म्हणजे कोणतीहि सुखसाध्य, सुलभ, स्वाधीन गोष्ट, अशा अर्थानेंच कर' तलामलक या मूळ संस्कृत कल्पनेला व शब्दाला धरूनच तो प्रयोग करितो. मात्र त्याच्या प्रयोगां-तला हा 'हात' शब्द मूळ 'हस्तामलक' या शब्दांतील 'हस्त' शब्दाचा अपभ्रंश म्हणून आला नसून 'करतल' याचा जो मराठींत रूढ तर्जुमा 'तळहात' म्हणून ठरला त्याचा अवशेष किंवा अंश या नात्यानें येऊन अखेर मोडकांचे कल्पनेला धरून व 'सौलभ्य' याच अर्थानें 'हातचा मळ' हा शब्द मराठींत आला. ही कल्पना निजसुरे यांस पटल्यास उभयपक्षांतील विरोधपरिहार झाला. कारण, 'निजसुरे' यांचा 'मोडकां'चे कल्पनेला विरोध नाही. फक्त 'हस्ता' वरून 'हात' मराठींत सरळच उतरला हें म्हणणें त्यांस मानवत नाहीं. आणि त्यांचें म्हणणें कोणासहि पटणारेंच आहे. पण या तोडीनें उभय पक्षांचा सलोखा होईल असें मला वाटतें.

याहि उपर 'निजसुरे' यांस ही गोष्ट पटतच नसेल (बाकी असें होऊं नये) आणि केवळ मराठीं-तूनच ही म्हण निघाली असली पाहिजे असें मानण्यांत त्यांचें समाधान असेल तर 'मळ' या शब्दानें अत्यंत क्षुल्लक कवडीमोल पदार्थ की जो झाडून टाकण्यांत कोणालाहि श्रम किंवा संकट वाटत नाहीं असें समजावें आणि यावरून अमुक एक गोष्ट अमक्याच्या 'हातचा मळ' आहे असें म्हणणें म्हणजे ती गोष्ट तो अनायासें व तत्काळ झाडून – हातावेगळी करून – टाकील अशा प्रकारची गोष्ट.

माझ्या अल्पमतीला सुचले ते दोन पंथ दाखविले आहेत. येनेष्टं तेन गम्यताम्.

---

* कोणी अर्धवट संस्कृतज्ञ 'करतळामळ' असेंहि म्हणतांना माझ्या ऐकिवांत आहे.

# पारिभाषिक शब्दकोश

## रसायन–प्रकरण.

म. सा. पत्रिकेच्या मागील अंकांत वास्तवशास्त्रांतील प्रकाशप्रकरणीं परिभाषा दिली होती. हेतु हा की विद्वान् व तज्ज्ञ मंडळींनी त्यासंबंधीं विचार करून आपापला अभिप्राय मंडळाकडे कळवावा; म्हणजे पुढील पाहिरी जी व्यवस्थित व्याख्यांसहित कोशरचनेची ती आक्रमण्यास तयारी व्हावी. त्याच हेतूने प्रस्तुत अंकांत रसायनप्रकरणीं परिभाषा दिली आहे. ती रासायनिक उपमंडळांत पुष्कळ चर्चा होऊन ठरलेली आहेच; तथापि कोणास कांही उपयुक्त कल्पना सुचून तींत सुधारणा होणें शक्य आहे. याकरिता वाचकांनी आपला अभिप्राय मुद्दाम मंडळाकडे पाठवावा अशी मनःपूर्वक विनंती आहे.

प्रस्तुत संज्ञासंग्रह देतांना संदर्भानुसार रचना केलेली असून एक एक अर्थसूत्र घेऊन संज्ञांचे गट पाडले आहेत. त्यामुळे तुल्यकल्प संज्ञा अथवा निकट संबंधाच्या संज्ञा बहुतेक जवळजवळ आलेल्या सांपडतील. अशा रीतीने त्यांचे स्थूलसूक्ष्म भेद लक्ष्यांत येतील व त्या त्या कल्पना दर्शविण्याचे कामीं त्यांची योग्यायोग्यता पारखतां येईल अशी आशा आहे.

पुणें; शनवारवाड्याजवळ
बिनीवाले यांचा वाडा

चिटणीस,
म. शा. परिभाषामंडळ.

पदार्थ = a body.
द्रव्य = a substance.
वस्तु (नपुं.) = matter.
वस्तुमान = mass.

---

विक्रिया = Chemical change, action reaction.
धर्म (रासायनिक) = Chemical property.
गुण = Physical property.
मिश्रण = Mixture, Mixing.
मिश्रपदार्थ = Mixture.
संयोग, संयोजन = Combining, (Chemical) Combination.
संयुग = (Chemical) Compound.
घटना = Composition.
घटक = Component.
वियोजन = Decomposition.

---

मौल (मूलद्रव्य) = Element.
संयुग = Compound.
धातु = Metal.
अधातु = Non-metal.
धातुकल्प = Metalloid.
संकर = Alloy.

---

विरघळणें = Dissolve.
विद्रव, विरघळा = Solution.
विद्रावक = Solvent.
विद्रुत = Solute.
विद्राव्य, विरघळणारा = Soluble.
अविद्राव्य = Insoluble.
विद्रुति = Solubility.

---

संहति = Concentration.
संहत = Concentrated.
असंहत, प्रजल, विरल = Dilute.
तृप्त विद्रव, भरघास विरघळा = Saturated solution.
अतृप्त विद्रव, कमघास विरघळा = Unsaturated solution.
अतितृप्त = Super-saturated.

---

रवक, रवा, स्फटिक = Crystal.
रवाळ, स्फटिकरूप = Crystalline.
रवाळणें, रवकबंधन = Crystallize, Crystallization.
बिनरवाळ = Non-crystalline, amorphous.
भुगाळणें, फुलारणें = Effloresce.
भुगाळ, फुलार = Efflorescent.

---

समाकृतित्व = Isomorphism.
द्विविधाकृति = Dimorphous.
अनेकाकृति = Polymorphous.

———

जलसंयुग = Hydrate.
सजल ( द्रव्य ) = Hydrated.
विजल = Anhydrous.
क्लेदन, चिघळणें = Deliquesce.
क्लेद्य, चिघळट = Deliquescent.

———

अम्ल = Acid.
अल्क = Alkali.
अम्लधर्मी = Having acid properties.
अल्कधर्मी = Having alkaline properties.
[नक्रधर्मी = Neutral].
निर्वापण = Neutralization.
निर्वापित = Neutralized.
उदासीन, नक्र = Neutral.
लवण = Salt, Saline Compound.
क्षार ( ना. ) = Caustic.
क्षारक ( वि. ) = Caustic.
दुहेरी लवण = Double salt.
संकृत लवण = Complex salt.
पदधर्मी = Basic, Having basic properties.
पद = Base.
द्विपद, त्रिपद = Dibasic, Tribasic.
समाकलन, समावहन = Titration.
कलनाङ्क = Titre.
अल्कमिति = Alkalimetry.
अम्लमिति = Acidimetry.
व्यंजक, दर्शक ( द्रव्य ) = Indicator
गमक = Reagent.
आप्तविद्रव = Standard solution.
प्रमितविद्रव = Normal Solution.
समानयोगी विद्रव = Equivalent Solution.
निदेशक ( विक्रिया-निदेशक ) = Catalytic agent.

निदेशन ( विक्रिया-निदेशन ) = Catalytic Action.
जलभेदन = Hydrolysis.

———

रूपभेद — Allotropic modification.
अनेकरूपत्व = Allotropy.
समावयवी = Isomer, Isomeric.
प्रभूतावयवी = Polymer, Polymeric.

———

कण = Particle.
रेणु, रेणुक = Molecule.
अणु, अणुक = Atom.
दल = Ion.
विदलन = Ionization.
वीजक = Electron.
धानक = Proton.
खण्ड = Radical.

———

ग्रासमान = Combining weight.
संयोगी गुणोत्तर = Combining Proportions.
अणुभार = Weight of an atom.
रेणुभार = Weight of a molecule.
लवभार = Atomic weight.
लेशभार = Molecular weight; Mole.
खण्डविनिमय = Exchange of Radicals.
उच्चाटन = Displacement.
संश्लेषण = Association.
विश्लेषण = Dissociation.
समकालिक विक्रिया = Concurrent Reactions.
क्रमिक विक्रिया = Consecutive Reactions.
उष्णदायी = Exothermic.
उष्णग्राही = Endothermic.

———

धारणा = Valency.
भुज = Bond.
चिह्न = Symbol.
समास = Formula.

समीकरण = Equation.
वृत्तिवाचक समास, विक्रियादर्शक „, घटनादर्शक „ = Graphic or Reaction formula, constitutional formula.
वर्धन, ऊर्वण = Oxidation.
क्षपण = Reduction.

---

इयत्ताकरण, अ० इयत्ता = Quantitative analysis. Assay.
ईदक्ताकरण, अ० ईदक्ता = Qualitative analysis.
परिच्छेद = Determination, analysis.
( पृथक्करण = Analysis).
अलग किंवा पृथक् करणें = Separate.
पृथक्करण = Separation.
भारतः परिच्छेद = Gravimetric analysis.
आकारतः परिच्छेद = Volumetric analysis.
परीक्षा, पारख, कसोटी, पकड = Test.

---

विलय, विप्लव = Fusion, Ebullition.
[ वितळणें, उकळणें = Melting, Boiling].
विलयबिंदु, विप्लवबिंदु = Melting point, Boiling point.
द्रुति, स्तब्धि ( द्रवणें, गोठणें ) = Condensation, Solidification.
उत्प्लवन, उत्प्लव = Evaporation.
संप्लवन, संप्लव = Sublimation.
वायुसंद्रवण = Liquefaction of gases.
सुप्लव = Volatile.
उत्पातन = Distillation.
उत्पातित = Distilled.
निपातन = Precipitation.
निपातित = Precipitated.
निपात, साका = Precipitate (n.).
गालन = Filtration.
गालित = Filtrate.

---

व्यतिकर, व्यतिकरण = Diffusion.

त्वग्भेदन = Dialysis.
तर्षण = Osmosis.
ज्वलन = Combustion.
दहन = Incineration.
भस्मीकरण = Calcination.
निष्कर्षण = Extraction.
चतुर्थांशमीलन = Quartation.
विरंजन, रंगहरण = Bleaching.
रंगबन्धन = Mordanting.
रंगबंधक, बंधक = Mordant.
जस्ताळणें = Galvanizing.
रुपेरणें = Silvering.
फसफसणें = Effervesce.
आंबणें, आंबविणें = Fermenting.
किलाटन = Coagulation.
कलिल = Colloid.
कलिलवत्, सरसाळ = Colloidal.
विधारण = Suspension.
विधारित = Suspended.
शोषण = Absorption.
उपशोषण = Adsorption.
पायसित = Emulsified.
पायस्य = Emulsion.

---

नियतप्रमाणनियम = Law of Constant Proportions.
गुणितप्रमाण नियम = Law of Multiple Proportions.
कलानियम = Phase Rule.
आवृत्तिनियम = Periodic Law.
अष्टक = Octave.

---

परिकल्प, कल्पना = Hypothesis.
उपपत्ति, शास्त्र = Theory,
शास्त्रतः, उपपत्तिदृष्ट्या = Theoretically.
उपपत्ति = Reasons.
उपपादन = Reasoning.

# शब्दसंग्रह

## गवतांचे प्रकार

(संग्राहकः-- प्र. धों. कानिटकर)

साधारणतः गाय, म्हैस, घोडा वगैरे ग्राम्य पशूंचें जें खाद्य त्यास गवत ही संज्ञा आहे. गवत शब्दांत हरळीसदृश सर्व तृणांचा व केवळ गुरें खातात म्हणून ज्यांस गवत म्हणण्याचा परिपाठ आहे अशा लहान वनस्पतींचा अंतर्भाव होतो. याच अर्थानें मराठे लोक 'गवत' शब्द वापरतात. साधारणपणें वाई प्रांतांतील गवतांचीं नांवें खालीं दिलीं आहेत. तसेंच शक्य तेथे 'निघंटशिरोमणि' नामक वैद्यक-कोशांतील गवतांचीं संस्कृत नांवें दिलीं आहेत.

### हरळीसदृश तृण

| मराठी | संस्कृत |
|---|---|
| (१) मारवेल | मंथानक |
| (२) पवना | मज्जरः (मज्जरः पवनः प्रोक्तः) |
| (३) घेडा | पत्राढ्यं, तृणाढ्यं |
| (४) बोंगरट | |
| (५) करड (कुसळी गवत) | |
| (६) गोंडवेल | |
| (७) शिपी | शिल्पिका |
| (८) हरळी | |
| (९) पाकडी | |
| (१०) फिरका (डोंगरावरील गवत) | |
| (११) तुरडा | |
| (१२) कुंदा | कुंदरुः; कुंदरः |
| (१३) कांर्जान | |
| (१४) लव्हाळा | त्रिधारकः दीर्घकाण्डम्। |
| (१५) बुरलही | |
| (१६) वाळा | |
| (१७) दर्भ | दर्भः |
| (१८) रोशें | रोहिषं तृणम्, रोहिषकम् । |
| (१९) मोळ | बल्वजा |
| (२०) दूर्वा | दूर्वा (नील-श्वेत-गंड-वाड्डि दूर्वा) |
| (२१) पंदे-धे | पण्यंधः पण्यंधा, पणधा |
| (२२) बोंडवेल (तांबडें गवत) | |
| (२३) कोलाडा | |
| (२४) कंधूर (नाचणीप्रमाणें) | |
| (२५) करवेल | |
| (२६) भोस (बोरूचें गवत) | |
| (२७) तवसा | |
| (२८) बर्का | |
| (२९) चिचणी | |
| (३०) कुंथा | |

टीपः— कुंदा व हरळी हे दोन पिकाचे शत्रू आहेत.

### वनस्पति (गवताप्रमाणेच गुरें खातात.)

(१) बरबडा (२) केना (३) चिचका (४) शेवरा (५) कुड्डु (६) भूल (७) माका (८) गोधड (९) पात्री (१०) टारपुल (११) करमोडी (१२) सापवी (१३) धोयटा (१४) तरवड (१५) अघाडा (१६) लांडगा (१७) चेतई (१८) बेलघाटा (१९) दुधी (२०) पाढरफळी.

येथवर दिलेले दोन्ही प्रकार—तृण, वनस्पति—मराठ्यांच्या माहितीप्रमाणे दिले आहेत.

शिपी, कुंदा, रोशें आणि पंधे हीं चार नांवें मूळ संस्कृत शब्दांचीं प्राकृत रूपें आहेत.

निघंटशिरोमणिकोशांत केवळ तृणाचे प्रकार दिले आहेत व त्यांचे गुणदोष सांगितले असून दुभत्या जनावरांस कोणतें गवत मानवतें तेंहि सांगितलें आहे. तसेंच कफवातपित्तादि दोषांचें वर्धन अगर निरसन कोणत्या तृणापासून होतें व त्याची चव काय असते तें सविस्तर सांगितलें आहे. जिज्ञासूंनी कोशांतील "शाल्मल्यादि" वर्ग ६ पहावा.

# माशांचीं नांवें

(संग्राहक " चिकित्सक " बी. ए. [ केंब्रिज् ])

पत्रिकेच्या मार्चच्या अंकांत महाराष्ट्रशब्दकोशाचे संपादक श्री. कर्वे यांनी माशांची एक यादी दिली आहे. पुणेरी ब्राह्मणास माशांचा शब्दसंग्रह मिळविण्याचें काम केव्हांही कठीणच वाटेल. " याचें मुख्य कारण माशांशीं निकट संबंध असणाऱ्या माणसांची गांठ पडत नाहीं. " परंतु यंदाच्या साहित्य-संमेलनांत कोशकारांस माशांशीं निकट संबंध असणारीं बरींच माणसें भेटलीं असतील. कारण, गोमंतक हा खरा ' मत्स्यदेश ' आहे. गोव्यांतील कुलवंत शेणव्यास भगवंताच्या अनंत नामांतून उत्तम अशीं संध्येंतील चोवीस नामें कदाचित् अवगत नसतील; पण मत्स्यसहस्रनाम त्याच्या केवळ जिव्हाग्रीं वसत असतें. असो; या अपूर्व संधींचा कोशकारांनी फायदा घेतला असेलच. तथापि " देवानांप्रियः प्रियमत्स्यः " अशा मजसारख्या सारस्वताने जी खालील अल्प माहिती दिली आहे ती त्यांस मान्य होईल अशी आशा बाळगितों.

[ टीपः— नांवें सारीं एकवचनी दिलीं आहेत. ओकारान्त कोंकणी शब्दांचें आकारान्त मराठी रूपान्तर केलें आहे. ल. = लहान. मो. = मोठा; मो. को. = मोल्स्वर्थचा कोश. (१८५७).

पु. = पुल्लिंग, स्त्री. = स्त्रीलिंग, न. = नपुंसकलिंग.

१. आडि = यास खर्बा बांगडा असेंही म्हणतात. ( ल. ) (स्त्री.)
२. इणंग = याला कांटे फार असतात. (ल.) (न.)
३. कचा = ठिपकेदार मासा ( ल. ) (पु.)
४. कडंब = सागटासारखा. ( ल. ) (पु.)
५. करकरा = ( ल. ) (पु.)
६. कर्ली = ( मो. ) याचे कांटे फार लांब असतात (स्त्री.)
७. कानकात्रा = ( ल. ) पाण्याच्या वरच फिरतो (पु.)
८. काल्लु = [ मो. को. ] Oyster. (न.)
९. काळुंदर = रंग काळा ( ल. ) (न.)
१०. कुर्ली = खेंकडा (स्त्री.)
११. कुवती = हिरव्या रंगाचा. ( ल.)(स्त्री.)
१२. केरी = विहीरींतील मासा. (स्त्री.)
१३. कोंकारा = (ल. ) (पु.)
१४. कोंगा = ( ल. ) (पु.)
१५. खर्बा बांगडा — ( ल. ) (पु.)
१६. खर्चा = डेंवुकासारखा मासा. (स्त्री.)
१७. खाप = ( ल. ) चपटा कांटेदार. (स्त्री.)
१८. खुबा (पु.)
१९. गरंगाटा = पट्टेवाला, करकऱ्यासारखा. (पु.)
२०. गोवरा [ मो. ] (पु.)
२१. गुंज्या = मुडदशीच्या जातींचा; लालट रंग. (पु.)
२२. घुल = ( मो. को — घुला ). (स्त्री.)
२३. घोळ = (मो. ) (स्त्री.)
२४. चणक = (मो.)(स्त्री.)
२५. टोळी अथवा टोंकी = याच्या मस्तकांतून एक टोक पुढे आलेलें असतें ( ल ).(स्त्री.)
२६. डायण = पातळ, पिवळा. ( मो. ) (न.)
२७. तामोशी = (मो.). तांबसर रंगाचा .(स्त्री.)
२८. तार्ली = ( ल. ). [ मो. को. संस्कृतांत यास अच्युत म्हणतात ] (स्त्री.)
२९. तारसुळी = तार्लीच्या जातीची. पण गुब-गुबीत (स्त्री.)

३०. भिणोशी = खारी व गोड्या पाण्यांतील अथवा सावी (स्त्री.)
३१. धोडकारा = (ल) याच्या मस्तकांत तीन दगड असतात अशी प्रथा आहे. "धोडकाराच्या कपाळांत तीन गुंडे (दगड)" ही कोंकणी म्हण "पळसास पानें तीन" या अर्थाने वापरली जाते. (पु.)
३२. नहिराखणा = नदींत राहणारा. (ल.) (पु.)
३३. पात्स्याळें = (ल.) (न.)
३४. पापलेट = (मो को. पापलिप्ट) (न.)
३५ पालू = [मो. को. खाडींतील लहान मासा असें मोलस्वर्थने याचें वर्णन दिलें आहे. पण हा मासा मोठा असतो, (पु.)
३६. पेडवा = (ल.) (पु.)
३७. पेळा = (ल.) (पु.)
३८. पोटगा = सुगंटासारखा मोठ्या पोटाचा. (पु.)
३९. फडकें = (मो.) यास दोन मोठे पंख असतात. (न.)
४०. बांगडा = (मो. को.) (पु.)
४१. बुरयांटा = (ल.) (पु.)
४२. बोकडा = (ल.) (पु.)
४३. बोंबील = (मो. को.) (पु.)
४४. भुंयार = खर्चीसारखी व रेतीच्या रंगाची. (स्त्री.)
४५. मरळ = (मो. को.) (पु.)
४६. मांडळी = (ल.) (स्त्री.)
४७. माणकी = (ल.) (स्त्री.)
४८. मानमोडा = (ल.) (पु.)
४९. मुडदशी = (ल) (स्त्री.)
५०. मुत्रा = एक वीत लांब; ठिपकेवाला; याचा कांटा फार वाईट असतो. (पु.)
५१. मोतीयाळें = (ल.) (न.)
५२. मोरी = (मो. को.). मुंबईत या माशास मुशी म्हणतात. (स्त्री.)
५३. रांवस = (मो.). (मो. को.) (पु.)
५४. लेप = (ल.) (मो. को.) (स्त्री.)
५५. वणंग = (ल.) (न.)
५६. वाघयी = मोठें सुंगट (स्त्री.)
५७. वावाळें = (पहा-मो. को. वाघळी) (न.)
५८. वाटु = (मो) (पु)
५९. वेर्ली = (ल.) (स्त्री.)
६० शिंपी = (मो. को.). यास तिसऱ्या असेही म्हणतात. (स्त्री.)
६१ शीवड (पु.)
६२. शेतुक = (ल.). (न.)
६३. सांगाट = यास तीन कांटे असतात. (न.)
६४. सुंगट = झिंगा — Prawn. (न.)
६५. सोगी = (ल.) (स्त्री.)
६६. हुंकीर = हा मासा पाण्यांत हुंकार करतो. (ल.) (पु.)

———

# मराठीच्या प्राकृत भाषा.

(लेखकः– व्यं. मा. कुरूलकर, वकील.)

एक सद्वस्तुशिवाय या जगांत स्थिर अशी कोणतीहि वस्तू अगर गोष्ट नाहीं. अभेद्य किल्ले कालांतराने जमीनदोस्त झालेले आपणांस दिसतात; नद्यांचीं पात्रें बदलून जातात, फार काय, पृथ्वीचा मानदंड जो हिमाचल त्याचेंहि कालांतराने स्थित्यंतर होत चाललें आहे; मग "शब्द बापुडा केवळ वारा" याच्यामध्ये बदल व्हावा यांत काय आश्चर्य आहे. चार पांच दशकांपूर्वी बोलली गेलेली, ग्रंथांतून लिहिली गेलेली भाषा जर आज आपण बोलूं लागलों अगर लिहूं लागलों तर आपलें आपणांसच खास हसूं लोटेल. त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरमहाराज जर समाधी सोडून आळंदी नगरींत प्रकट झाले तर सभोंवतालीं बोललीं जाणारी भाषा ऐकून ते म्हणतील "अमृतातेंहि पैजा जिंके" अशा ज्या भाषेंत मीं माझी ज्ञानेश्वरी लिहिली तीच भाषा आज हे लोक बोलत आहेत काय? कालाचें सामर्थ्य असें आहे कीं, कोणत्याहि अभेद्य गोष्टींचा चक्काचूर तो 'लीलया' करूं शकतो. नाहीतर मंत्रद्रष्टया ऋषींनी पुनीत केलेली भाषा आपणांस सायणाचार्यांच्या अगर यास्काचार्यांच्या मदतीशिवाय कळूं नये ना? श्रीराम, भगवान् कृष्ण वगैरे जगद्वंद्य असे आपले पूर्वज ज्या भाषेंत बोलले, ज्या भाषेंत व्यास-वाल्मीकींनी आपल्या पूर्वजांचे पोवाडे गाइले, ज्या भाषेच्या साहाय्याने श्रीशंकराचार्यांनी बुद्धमताचें खंडन केलें ती भाषा आज मृत व्हावी, आणि ती शिकण्यास आपणांस इतके श्रम पडावे! खरोखर अशी परिस्थिति पाहून "कालाय तस्मै नमः" ह्या चरणाची आपोआपच आठवण होते. एवंच कालाने भाषेमध्यें बदल होतो ही निश्चित गोष्ट आहे व हा घडामोडीचा क्रम असाच चालू राहणार. मानवी प्रयत्नाचें या सृष्टिनियमापुढें कांहीं चालणार नाहीं. पाणिनीने अष्टाध्यायी लिहून संस्कृत भाषेला जिवंत ठेवण्याचा प्रयत्न केला, परंतु तो निष्फळच ठरला. आजच्या चालू भाषा कालांतराने मृत होणार हें भाकीत करावयास ज्योतिषाच्या ज्ञानाची मुळीच जरूर नाहीं. हा सृष्टिक्रम आहे. बल-शाली राष्ट्रें नामशेष होऊन त्यांच्या उच्च संस्कृतीची आठवण देखील बुजून गेली। लॅटिन, ग्रीक, संस्कृत सारख्या नियमबद्ध श्रुतिमनोहर भाषा मृत झाल्या हा इतिहासाचा दाखला असल्यावर, इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, हिंदी, बंगाली, मराठी, या भाषा मृत होणार नाहींत असें छातीठोकपणाने कोण सांगूं शकेल? एवढें मात्र खरें कीं भाषा मृत होतील; परंतु त्या भाषेंतील वाङ्मय मात्र चिरंतन राहील. इलियड, इनियड, भारत, रामायण, डिव्हाइन कॉमेडी, पॅरेडाइज लॉस्ट, ज्ञानेश्वरी हे ग्रंथ कोंदण गेलें तरी हिऱ्याप्रमाणें चकाकत राहतीलच.

एकच भाषा भिन्न प्रदेशांत, भिन्नस्वरूपांत व भिन्नस्वरांत बोलली जाते. कानडी प्रदेशाजव-ळील मराठी बोलणारे लोक ज्या स्वरांत मराठी बोलतात त्याच्याहून आगदींच भिन्न स्वरांत कोकणपट्टीकडील मराठी बोलणारे लोक मराठी बोलतात या स्वरभिन्नत्वामुळें भाषेंत आणि विशेषतः शब्दांत बरेच फरक झालेले आपणांस दिसून येतात. मराठी भाषेने व्यापलेल्या प्रांताला कानडी, गुजराथी, हिंदी आणि तेलगू या भाषांनी विळखा घातलेला आहे आणि त्यामुळें त्या त्या निकटवर्ती भाषांचा परिणाम मराठीवर झालेला आपणांस दिसून येतो. इंग्रजीचा परिणाम तर सर्रहा सर्वच भाषेवर झालेलाच आहे. परभाषेंतील शब्द जसेच्या तसेच अगर विकृत स्वरू-

पांत प्रत्यहीं मराठी भाषेंत ओढून घेतले जात आहेत, आणि त्यामुळे निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या बोली बोलल्या जात आहेत, त्या बोली इतक्या वेगळ्या स्वरूपाच्या आहेत कीं अशा निरनिराळ्या बोली बोलणारे लोक जर एकमेकांशीं बोलूं लागले तर एकाचें बोलणें दुसऱ्याला कळणार नाही आणि तिन्हाईत ऐकणारांस हे सर्व एकच भाषा बोलत आहेत असें शपथेवर तरी खरें वाटणार नाही. गोंव्याकडील मराठी बोलणारा माणूस जर सोलापुराकडे गेला व त्यास चहा पिण्याची हुक्की येऊन तो जर टावरणाची चौकशी करूं लागला तर हाटेल मैदाळ असून देखील त्यास चहा मिळणार नाहीं; कारण टावरण म्हणजे हाटेल हें हाटेलवाल्यांना ठाऊक नाहीं. त्याचप्रमाणें "हंगाक्षी त्ये मगूण हक्कड आन्" म्हणणाऱ्या कुणब्यास इकडचा कोळी "सवया" देऊं नको म्हणेल व त्यानें "तू कळा आयलास?" म्हणून विचारलें तर त्या कुणब्यास कांहींहि कळणार नाहीं.

अशाप्रकारें निराळ्या बोली निर्माण होण्यास परभाषेचा संबंध ज्याप्रमाणें कारणीभूत होतो त्याच प्रमाणें होता होईल तितके कमी श्रम करण्याची मनुष्याची जन्मजात प्रवृत्तीहि कारणीभूत होत असते. शुद्ध व सुसंस्कृत भाषा बोलण्यास परिश्रम पडतात, ते कमी करण्याकडे जनतेची प्रवृत्ति असते. फुप्फुसांतून हवा बाहेर सोडतांना निरनिराळ्या ठिकाणीं तिला दाबून स्वर आपण काढीत असतों; आपण ज्या वेळेस बोलतों त्या वेळेस हवा दाबण्याचे श्रम आपणांस पडत असतात, याची कल्पना आजारी माणसास बोलतांना ज्यांनी पाहिलें असेल त्यांस सहज येईल. "ही" उच्चारावयास जितके श्रम पडतात त्याच्या पेक्षां "ई" उच्चारावयास जास्त श्रम पडतात. त्यामुळे इकडच्या ऐवजी हिकडे असा उच्चार आपण करितों. "ही" आणि "डे" पेक्षां "हा" "ड" ज्यास्त सोपे म्हणून "हिकडे" चें "हकड" मध्यें रूपांतर कुणबी वगैरे लोक करितात. "कशाळा" ऐवजीं इकडील कोळी "कळा" म्हणतात त्याचेंही कारण हेंच आहे. "आण्" म्हणण्याऐवजी "हार" असें म्हणतात तें असें:—"आ" चें हा मध्यें रूपांतर होतें, आणि अनुनासिक "ण" ऐवजीं त्याच वर्गांतील "ड" आणि "ड" ऐवजीं सोपा "र;" म्हणून "आण" "आणशील" ऐवजीं "हार", "हारशील" असें होतें.

उपरिनिर्दिष्ट मनुष्यप्रवृत्तीप्रमाणेंच अज्ञानहि पुष्कळ अंशीं निरनिराळ्या बोली निर्माण करितें. मूळ शब्द नीट कळला नाही तरी तत्सम उच्चार करून मनांतील भाव अडाणी लोक व्यक्त करितात. त्याचीं उदाहरणें प्रत्यहीं नजरेस पडतात. आपण अभिजात भाषा बोलतों असें दाखविण्याच्या भरांतहि पुष्कळ शब्दांचीं रूपांतरें केलेलीं आपणांस आढळून येतात. सुसंस्कृततेचा आव आणून "इपर" "घिरीत" असें म्हणणारे पुष्कळ लोक आहेत आणि "ओंभुर्भुस" अशा प्रकारें गायत्रीमंत्राचे पाठ म्हणणारे नूतनोदित "ब्रिरामण"हि आपणांस आढळल्यावांचून राहात नाहीत. अशा प्रकारें झालेलीं रूपांतरें सर्व प्रांतांत एकाच तऱ्हेचीं होत नसल्यामुळे एकाच मूळ शब्दापासून व भाषेपासून निरनिराळे शब्द व बोली उत्पन्न झालेल्या आपणांस दिसून येतात.

मूळ शब्दांचे व वाक्यरचनेचें रूपांतर होण्यास आणखी एक कारण आपणांस दाखवितां येईल. ( कारण शोधण्यास आपणांस अलंकारशास्त्राचा आधार घेतला पाहिजे. अलंकारशास्त्रांत, विशिष्ट अक्षरसमूहाचा उच्चार केल्याबरोबर विशिष्ट प्रकारचा अर्थ आपल्या मनांत उदित होतो. ही जी शक्ति ज्या अक्षरसमूहांत असते त्यास त्या अक्षरसमूहाची अभिधाशक्ति असें म्हणतात. प्रत्येक शब्द प्रथम अभिधायुक्त असतो, परंतु फारच थोडे शब्द केवळ अभिधायुक्त राहातात. त्याच्या पाठीमागें "लक्षणा" अगर "व्यंजना" लागल्यावांचून रहात नाही. शब्दाच्या मूळ अर्थाबरोबर, तत्सम दुसऱ्या अर्थाची, शब्दाची अगर स्वाभाविक तुलनेमुळें निर्माण झालेली संवेदनेची जोड मिळते त्यास लक्षणा असें म्हणतात; व मूळ अर्थाबरोबरच दुसरा एखादा अर्थ सूचित करण्याची शब्दाची शक्ति त्यास व्यंजना

असें म्हणतात. या दोन उपाधींमुळे शब्दांचे अर्थ बदलत जातात. शब्दमात्रांना दिवसेंदिवस निर-निराळ्या भावनांचें व कल्पनांचें आवरण बसत जातें व एकच शब्द कालांतरानें निराळाच अर्थ उद्भूत करतो. अर्थ बदलण्याच्या शक्तीमुळे Shakespearने Twelfth night या नाटकांत कांटो करून शब्दांस Rascals असें म्हटलें आहे हें विख्यातच आहे.

एथपर्यंत देशकाल, मनुष्यप्रवृत्ति, लक्षणा, व्यंजना, वगैरे कारणांनी निरनिराळ्या बोली ( प्राकृत भाषा ) कशा निर्माण होतात त्याचें थोडक्यांत विवरण झालें. आतां मराठीच्या निरनिराळ्या बोलींकडे थोडें लक्ष देऊं.

**वऱ्हाड-नागपूर**—नागपूरकडील मराठीला हिंदीबरोबर संसार करावा लागत असल्यामुळें तिकडे हिंदी शब्द मराठीला आंदण म्हणून मिळालेले आहेत. त्याचप्रमाणें वऱ्हाडकडची स्थिति निजाम-शाहींतील अर्धवट शुद्ध, हिंदी, उर्दु, फार्शी, भाषांनी वऱ्हाडी मराठीवर आपला छाप उमटविलेला दिसतो. वाक्यरचनेमध्येसुद्धा बराच फरक झालेला तिकडील प्रांतांत दिसून येतो. नागपूरकडे "रावसाहेब गेले" ऐवजीं "रावसाहेब चालले गेले" "मी हें काम करीन" ऐवजीं "मी हें काम करून करीन" असें म्हटलेलें आढळतें. त्याचप्रमाणें वऱ्हाडी माणूस "तुम्ही आलेत" "तुम्ही गेलेत ना माऊ" असें म्हणतो. सध्यां 'विदर्भ-साहित्य-सम्मेलना'कडून तिकडील प्रस्तुत प्राकृत भाषेचा समाचार घेतला जात आहे व तिकडील बोलींचें ग्रंथभाषेंत रूपांतर करण्याचेहि प्रयत्न चालू आहेत.

नंतर दुसरी प्राकृत भाषा म्हणजे कोंकणी. या कोंकणीभाषेमध्यें अनेक विभाग आहेत. मालवण, सावंतवाडी या भागांत बोलली जाणारी भाषा निराळी. कारवार जिल्ह्यांत बोलली जाणारी निराळी, रत्नागिरीची निराळी, त्याचप्रमाणें इकडे उपनगरच्या बाजूचे खिश्चन कोळी बोलतात ती निराळी. अशा एकमेकांत पुष्कळसें साम्य असणाऱ्या चार पांच पोटभाषा दृष्टीस पडतात. रत्नागिरीकडील चित्पावनी भाषेच्या व्याकरणाचा आणि विशिष्ट शब्दांचा अत्यंत परिश्रमपूर्वक अभ्यास करून रा. साठे ह्यांनी महाराष्ट्र-साहित्यपत्रिकेच्या गेल्या वर्षाच्या ४ थ्या अंकांत लेख लिहिला आहे तो वाचनीय आहे. त्यांनी दिलेला चित्पावनी भाषेचा नमुना वाचला म्हणजे त्या भाषेविषयीं पूर्ण कल्पना येईल. त्याचप्रमाणें त्याच अंकांत दिलेला गोमंतकीय भाषेचा नमुना पाहिल्यास या दोन्ही भाषेंतील साम्यभेद सहज लक्षांत येतात.

कोंकणी बोली बोलणारांची भाषा कळणें फार कठीण जातें. मूळभाषेहून तिच्यांत फरक झालेला आहे. कांहीं गोमांतकस्थ व सावंतवाडीकडील लोकांचा त्या भाषेंत ग्रंथ निर्माण करण्याचा प्रयत्नहि चालू आहे.

कोंकणीनंतर गुजराथेकडील व देशावरील अशा दोन बोलींचा निर्देश करावयाचा राहतो. गुज-राथेकडील दक्षिणी लोकांच्या तोंडांत अगाशी, कुवा, खोट, गोत वगैरे शब्द व क्रियापदें आलेलीं आपणांस आढळून येतात.

देशावरील कुणबी लोक जी बोली बोलतात ती आपणांपैकीं पुष्कळांना अवगत आहेच. अपभ्रंश व वेडेवाकडे उच्चार केल्यामुळें ती बोली निर्माण झालेली दिसून येते. "गळ्याच्यान् मी म्होर आयचा न्हाय" "औंदा पिक लइ आळ हाय्, यकदा खुरप्णी बेगी बेगी क्येली मंग मी राजावाणी लोडास्नि टेकुन्शान् बसून बग्" "तु हाळी मारलीस तवा मी वरलीकडल्या शेतामंदी ढोरास्नी चारीत व्हतो." हे सोलापुराकडील कुणबाऊ भाषेचे नमुने आहेत आणि

"न्यारिचा वकुत होईल मैतरणी बिगि बिगि चाल
लइ वाडुळ जपि झाल्याली असतील समदि शिणल्याली"

हें पुण्याकडील कुणबाउ बोलीचें उदाहरण म्हणून घेतां येईल. त्याचप्रमाणें लावण्या पोवाडे वगैरेंतून

आपणांस त्या ह्या बोलींचीं उदाहरणें सापडतात तीं भाषाशास्त्राच्या दृष्टीने अभ्यास करण्याजोगीं आहेत.

असो. प्रसृत प्राकृत बोलींचा हा अंगुलिनिर्देश करून आतां शेवटीं एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करितों. या प्राकृत बोली पुष्कळ दिवसांपासून चालू आहेत आणि त्यांचा परिणाम मूळ भाषेवर सारखा होत आहे. त्यांच्याकडे आपलें लक्ष पुष्कळ दिवस गेलें नव्हतें. गोंव्याकडील त्याचप्रमाणें वऱ्हाडकडील लोकांनी त्या बोलींत वाङ्मय निर्माण करून त्यांना स्थिर स्वरूप देण्याचा प्रयत्न सुरू केल्यापासून आपणांला तिकडे लक्ष देणें भाग पडलें. इंडक्शनने निर्माण झालेल्या शास्त्राची ज्या वेळेस डिडक्शन् सुरू होतें त्या वेळेस तें शास्त्र पूर्णावस्थेस गेलें असें म्हणतात. त्याचप्रमाणें बोलींतून भाषा निर्माण होऊन त्या भाषेंतून पुन्हा बोली निर्माण होऊं लागतात त्या वेळेस मूळ भाषेला क्लासिक स्वरूप प्राप्त झालें असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. मराठी भाषा आज क्लासिक भाषेच्या दर्जाप्रत पोहोंचली आहे, ज्ञानेश्वरएकनाथांच्या वेळीं जिची तुच्छतेने पंडित लोक उपेक्षा अवहेलना करीत होते त्याच मराठीने आज वंदनीय स्थान पटकाविलें आहे हें पाहून कोणास समाधान वाटणार नाहीं ? मातृभाषेला प्राकृत भाषारूपीं मुलें व लेंकरें झालेलीं पाहून आपणांस समाधान वाटतें. परंतु त्याचबरोबर एक शंका मनांत डोकावूं लागते कीं हीं बालें आईचें स्तनपान करितांकरितां तिला शोषून तर टाकणार नाहीतना ? नाहीतर कोंकणी बाळानें मराठीच्या माईच्या भरपूर दुधानें धष्टपुष्ट झाल्यावर आपला नवीन संसार थाटावा, वऱ्हाड नागपुरी लोकांनी आपली निराळीच भाषा काढण्याचा प्रयत्न करावा व महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी वगैरे प्राकृत भाषांनी संस्कृतची जशी स्थिति करून टाकली त्याप्रमाणें संस्कृत भाषेच्या नातीची ही स्थिति व्हावी; असें होऊं नये म्हणून कोंकणी, कारवारी लोकांस आपण म्हटलें पाहिजे, बाबारे चल तुझ्या ह्या भाषेचा आपण विचार करूं आणि तुझ्या भाषेंतील शब्दांचा परत आहेर घेवूं. वऱ्हाडच्या भाऊंना सांगावयास पाहिजे कीं, चला आपण भाऊ भाऊ. आपण एकाच प्रकारची भाषा बोलूं, आणि अशा तऱ्हेने मराठी भाषेच्या "श्रेयाची खणूं खाण" आणि मराठी भाषेला उज्वल स्वरूप प्राप्त करून देऊं. तें इतकें कीं कोणत्याहि राष्ट्राला मराठींतील ग्रंथांचा आस्वाद घेण्याचा हव्यास लागावा.

---

# कोल्हापूर प्रांतांत स्त्री-पुरुषांच्या तोंडीं असलेल्या म्हणी.

(१) लोकाचें तट्टू, किती मी नट्टू.

(२) विडयाच्या कामाला तोडा घालवायचा.

(३) लग्नाची पोळी, आयुष्याची होळी.

(४) एवढेसे दाणे, थोडेसें गाणें.

(५) दीड दाणा, कोष्टी उताणा. (थोडया प्राप्तीनें गर्विष्ठ होणें)

(६) आला भला भावकाईला[1] टोला. (एकाद्या स्त्रीला वारंवार कामें सांगून सतावणें अगर वरचेवर टोंचून बोलणें).

(७) स्वयंपाक येईना, ओली लाकडें.

(८) जोखून खावें, कुंथून हगावें.

(९) आईजी राणी, बायजी राणी, तोंड धुवायला कोण देणार पाणी !

(१०) मुदलांत तोटा, कोंबडीला मासपट्टा[2].

(११) थेर नाचतय थेरांत, कोंबडें नाचतय केरांत.

(१२) ये बी लडदू, जा बी लडदू.

(१३) रिकामी राणी, तुला मी ताणी.

(१४) बोलायचें बोलून थोडें कां ? रानांत निजून अडचण कां ?

(१५) आईजीच्या जिवावर बाईजी उदार, दिवसाचा दिवा रात्रीचा अंधार.

(१६) माझें मला होईना, पाहुणा दळून खाईना.

(१७) सळ्ळ्याला नाहीं सुई, गुडघ्याला आली वाई.

(१८) तेली साचे[3] धारोधार[4], खुदा[5] मारे एकच वार.

(१९) गावलें तिथें फावलें.

(२०) रेडा मेला, जागा झाला.

(२१) गांवांत गाय हागली अन् चुलीला आग लागली.

(२२) खातय खातय, वाजलं कां कण्हतय !

(२३) लांडें लुडबुडतय अन् पाटलाचें गुंडें[6] मोडतय.

(२४) पेंढीसाठीं मेंढी गमवायची.

(२५) हातांत पै, अन् बोलणं करतो लई.

---

१ भावकाई=ग्रामदेवता. २ मासपट्टा=सोन्याचा किंवा चांदीचा कमरपट्टा. ३ साठवी. ४ धारेगणिक. ५ ईश्वर. ६ कुचाड.

(२६) हातांत नाहीं आडका, अन् बाजारांत मारतोय धडका.
(२७) हातांत नाहीं पैका अन् म्हणतो माझें बोलणें ऐका.
(२८) तूं आलीस नटत, पण मला नाहीं बरं वाटत.
(२९) ऊठ रे छंदा, एकच धंदा.
(३०) खावं तर बाधतय, टाकावं तर शापतय.
(३१) धरावं तर चावतय, सोडावं तर पळतय.
(३२) इकडे आड, तिकडे विहीर.
(३३) पैची भवानी, लाखाचा गोंधळ.
(३४) व्यापार सटयाचा, चट्टा जिवाचा.
(३५) जोंवर तेल, तोंवर कथा[७].
(३६) चार आण्याची कोंबडी, बारा आणे फळणावळ.
(३७) जिथें शितें, तिथें भुतें.
(३८) अरे बाळा, घरची शाळा.
(३९) जात्यांतल्यांनी रडायचें, सुपांतल्यांनी हसायचें.
(४०) उडदामाजीं काळेगोरे काय निवडणाऱ्यांनी निवडावें.
(४१) मिय्या-बिबी राजी, काय करील काजी.
(४२) दिवा लावून येणें, हात हलवित जाणें.
(४३) झाडाजवळ छाया, बुवाजवळ माया.
(४४) आधीं गुंतूं नये, मग कुंथूं नये.
(४५) रोकडा व्यवहार श्रीमंतीचा, उधार व्यवहार अधोगतीचा.
(४६) पैसा सरूं नये, अन् पोर मरूं नये.
(४७) जीव धड तर सर्व धड.
(४८) कुंटिणी, जारिणीच्या वाटा.
(४९) वरिष्ठाला हात, कनिष्ठाला दांत.
(५०) अंगापेक्षां बोंगा, आणि कुठें जाशी सोंगा ?

के. रा. कुलकर्णी

---

७ यावत् तैलम् तावद्याख्यानम्.

## म्हणी

१ अडाणी कुणबी दुप्पट राबे.
२ अती राग भीक माग, त्याहून राग देशत्याग.
३ अन्न तारी, अन्न मारी.
४ अरे तर कां रे, अहो तर कां हो.
५ असतां पैशाची पूर्णता, नाहीं मित्रांची न्यूनता.
६ आईच्या लाडामुळें मूल होई खुळें.
७ आपण हसतो लोकां, शेंबूड आपल्या नाका.
८ आदाय थोडा खर्च मोठा, मग लायांना काय तोटा
९ आदाय थोडा खर्च मोठा, त्याचा होईल सदा तोटा.
१० आहारी व्यवहारी, कदापी लज्जा न धरी.
११ इदरबी थप्पड, उदरबी थप्पड.
१२ करावें तसें पावावें, रांधावें तसें जेवावें.
१३ कोणाच्या गाई म्हशी, अन् कोणाला उठाबशी.
१४ खटपट करी ते पोट भरी.
१५ काम थोडें बोभाटा मोठा.
१६ छत्र गेल्यावर कुत्रें देखील विचारीना.
१७ चोराला चावला विंचू, चोर करीना हूं कां चूं.
१८ गांठचें खावें पण जामीन न व्हावें.
१९ कोण दिवस येईल कैसा, देहाचा नाहीं भरंवसा.
२० गंध उगाळतां कष्टी, अन् आवडीनें भांग घोटी.
२१ अचाट बुद्धी चालवावी, अन् बळेंच लक्ष्मी मिळवावी.

महादेव विनायक डोंगरे

---

## कांही वाक्प्रचार

(१) पोट पिकणें = गर्भारपण येणें.
(२) वांगें वाढीस लागणें = वरीलप्रमाणें.
(३) मुलाचीं हाडें भाजणें = मुलाचें लग्न करणें.
(४) पोळी पिकणें = लग्नकार्य निघणें.
(५) नीळ रापणें = असंभाव्य गोष्टीचा लोकांत प्रसार होणें व शेवटीं ती गोष्ट खोटी ठरणें.

प्र. गो. कामिटकर.

**राजापुराकडील कऱ्हाड्यांच्या बोलीचा मासला म्हणून प्रचलित असलेली विनोदात्मक कविता**

अण्णा हात गो घरांत हात । कोणगो पुती आजीबाय् । सांगतों आधीं बैस ॥
मी आतां सांगतों तुमचा । नारू आधीं येता हाय् । पापी चांडाळ माझी म्हैस ॥
सोडुन वेणेस ठकेस मज । नाटयाकडुन दिवाकरभट । पाध्ये आलेति सोधुम् ॥
गाळी देऊन फटाफट । नारुची शेंडी धरून । मुटके मारलेन कुचाकुम् ॥

संग्राहकः— विष्णू सदाशिव सोहोनी

———

## अभिप्राय

**लघुकथांचें मानारचें आखातः—** ( ले. सौ. इंदिराबाई निफाडकर व श्री. नाथ निफाडकर. किं. आठ आणे ) स्वतःचे अनुभव जमेस घेऊन अद्भुत गोष्टी आणि विनोदी व उपरोधिक लघुकथा यांच्या द्वारें टीका व आत्मसमर्थन वगैरे लिहिण्याचे प्रकार मराठीमध्ये नवीनच आहेत. त्यामुळे निफाडकर पतिपत्नींनी लिहिलेल्या या पुस्तकाला नावीन्याचें महत्व प्राप्त झालें आहे. कांहीं गोष्टींचें तात्पर्य समजण्यास कठीण पडतें. पण मनोरंजकत्व नाहीसें होत नाहीं. निरनिराळया अंगांनी वाङ्मयाची वाढ होणें अवश्य आहे. त्यांत लघुकथांत व्यक्त झालेल्या अंगाचा अधिक परिपोष झाला तर मराठी वाचकांना हवाच आहे.

**हजरत महंमद पैगंबरः—** (ले. सय्यद अहंमद सय्यद अमीन. किं. ६ आणे.)

श्री. सय्यद अहंमद यांची मातृभाषा ऊर्दु असून शुद्ध व सुंदर मराठींत त्यांनी हें महंमद पैगंबराचें छोटें चरित्र लिहिलें आहे हें त्यांस अत्यंत भूषणास्पद आहे. "जगांतील सारेच धर्म परमेश्वरास प्रिय आहेत अशी उदार घोषणा त्यांनी इस्लामधर्मीं-यन केली आहे" हें जर खरें असेल तर परधर्मीयांना आपल्या धर्मांत ओढण्याचा अट्टहास प्रत्येक धर्म कां करतो हें कोडें उकलतां येणें कठीण आहे. देवळांच्या मशिदी किंवा चर्चें कां व्हावीं ? कोणीहि धर्मसंस्थापक झाला तरी चांगल्याच गोष्टी सांगणार. पण अनुयायी मात्र विपर्यास करतात आणि मूळ धर्मसंस्थापकावर आपल्या कृत्याने मूर्खपणाचा आरोप आणवूं देतात. असो. सय्यद अहंमद यांचें हें पुस्तक प्रत्येक मुसलमानाने वाचावें आणि आपल्या धर्माविषयीं उराशीं घट्ट बाळगून ठेवलेल्या कुकल्पना सोडाव्या. सर्व धर्म सारखेच आहेत हें हिंदुस्थानांतील प्रत्येक तरुणाचें ब्रीदवाक्य पाहिजे. पुस्तकाची किंमत कमी ठेवली असती तर मुसलमान समाजांत ह्या पुस्तकाचा अधिक अधिक प्रसार झाला असता.

# सारिकाशतकी.

( संपादकः—काशिनाथ परशराम साने, शिक्षक, राजुरी )

पुनः चातुर्यलतिका गुणसागरास सांगत आहे; विद्या आणि राज्यसंपत्ति दैव-योगानें प्राप्त झाली असतां नम्रता असावी. उपयोगी सेवकजन यांचा मनोभंग व अपमान करूं नये, परंतु सर्वांस चित्तांत भय असावें. आपलें अंतःकरण भलत्यास कळवूं नये. अपमान केल्यानें यथास्थित चालणार नाहीं. या अर्थीं कथा सांगतें.

पूर्वीं कुबेरनामें नगरांत उपेंद्रराजा राज्य करीत असे. त्याची स्त्री शृंगारमंजरी परम सुंदर आणि अतिप्रिय, तिचा वियोग त्यास क्षणमात्रही साहात नसे. पुत्र कळा-विलास, प्रधान चतुर. असें असतां कोणे एके समयीं चतुर प्रधान देशांतरीं यात्रेस गेला होता. तेथून येतेसमयीं अपूर्व कस्तूरीमृग दोन आणिले. त्यांत एक नेऊन उपेंद्र यास दिला, एक आपण पुत्रास घरीं ठेविला. नंतर राजपुत्र कळाविलास याणे दुसरा हरिण प्रधानाचे घरीं आहे असें ऐकून पिता उपेंद्र यास सांगितलें कीं, दुसरा हरिण प्रधानाचे घरून आणवावा, मजला पाहिजे. तेव्हां पुत्राचे प्रीतीस्तव प्रधानास सांगितलें कीं, दुसरा हरिण आमचे पुत्रास पाहिजे आणून द्यावा. मग चतुर म्हणाला कीं महा-राज पुत्रानें ठेविला आहे आज्ञा झाल्यास घेऊन येईन. नंतर राजाचा आग्रह पाहून हरिण आणून दिला. प्रधानपुत्र सचिंत होऊन बसला. हें पाहून प्रधानही उदासीन झाला. आम्ही सेवक यास्तव मनोभंग केला हा भाव प्रधान यानें चित्तांत धरून कित्येक दिवस गेल्यानंतर कोणास न कळतां काष्ठाची एक पोकळ मूर्ती भवानीची करवून नगराबाहेर एक ब्राह्मण आपला आश्रित राहात होता त्याचे घरांत नेऊन स्थापिली. उपेंद्र देवीभक्त असे. त्यास सांगितलें कीं नगराबाहेर एक ब्राह्मण आहे, त्याचे घरांत देवीची मूर्ति आतां प्रगट झाली आहे. तिचें दर्शन आपण गुप्तरूपें रात्रौ मजबरोबर येऊन घ्यावें, असा त्या ब्राह्मणानें स्वामींस निरोप सांगावयास सांगितलें आहे. त्याजवरून विनंति केली. पुढें मर्जीस येईल तसें करावें. हें आश्चर्य ऐकून उपेंद्र म्हणाला कीं, आज रात्रौ तुजबरोबर मी येतों. असा संकेत करून मध्यरात्रीस शृंगारमंजरी राजपत्नि निद्रित झाल्यानंतर राजा उपेंद्र व प्रधान दोघे निघून ब्राह्मणाचे घरीं गेले. ब्राह्मण स्त्री पूर्वींच आंत बसली होती. नंतर राजा यानें देवीचें दर्शन घेऊन साष्टांगमस्कार करून हात जोडून राहिला. तेव्हां आंतून ब्राह्मणस्त्री बोलली कीं तुझे भक्तिस्तव मी सहज दर्शन द्यावें म्हणून येथें आलें आहे. यासाठीं प्रतिदिवशीं दर्शनास रात्रौ येत जावें. मी प्रगट झाल्याचें वर्तमान कोणास सांगूं नये. कांहीं दिवस मी राहून, जाते समयीं तुजला प्रसाद देऊन जाईन. असें बोलून आपले हातांतील फुलांचा गजरा देती झाली. उपेंद्र प्रधानाबरोबर निघून स्वगृहास आला. याप्रमाणें प्रतिदिवशीं देवीचें

दर्शन घेऊन येऊं लागला. इकडे चतुरप्रधान यानें शृंगारमंजरी राजपत्नि तिजला सांगितलें कीं, आजपर्यंत परम धार्मिक एकपत्नि असे भासत होते. सांप्रत वृत्तीस अंतर पडलें, व्यभिचारांत चित्त घातलें असें वाटतें. मग राजस्त्रीनें विचारिलें कीं हें विसंगत भाषण, याचा शोध कसा तुझे समजण्यांत आला ? नंतर प्रधान बोलिला कीं, महाराज राजश्री रात्रौ कदापि एकाकी बाहेर जात नाहींत आणि सांप्रत बाहेर जातात असा बारीक शोध आहे. असें बोलून म्हणाला कीं, आम्ही सेवक आम्हांस या गोष्टीचें प्रयोजन काय ? परंतु, ऐकिलें वर्तमान आपल्यास कळविलें. इतकें भाषण होऊन प्रधान स्वगृहास गेला. शृंगारमंजरी शोधास प्रवर्तली. रात्रौ निद्रेचें मीष करून जागत राहिली. तों मध्यरात्रीस राजा उपेंद्र निघून बाहेर गेला, चार घटकानंतर हार गजऱ्यासहित घरीं आला. हें पाहून प्रधानाचें भाषण प्रत्ययास आलें. त्या दिवसापासून शृंगारमंजरीनें पूर्ववत् उपेंद्राबरोबर भाषण व भोजन अनास्थेनें करणें आरंभिलें. तेणेंकरून राजा संशयग्रस्त होऊन शरिरानें क्षीण होऊं लागला. मग एके दिवशीं प्रधान यानें एकांतीं विचारिलें कीं महाराज, आपलें शरीर दिवसेंदिवस क्षीण होऊं लागलें, तर राज्य निःकंटक असतां कोणती चिंता प्राप्त झाली आहे ? नंतर राजा आतुर होऊन कोणतेहि प्रकारें स्त्रीची प्रीति यथास्थित व्हावी यास्तव घरांतील सर्व वृत्तांत प्रधानास सांगता झाला. तेव्हां प्रधान बोलिला कीं महाराज, ही गोष्ट कठीण आहे, प्रयत्न करितों. असें बोलून घरीं गेला. नंतर प्रधान पोटदुखीचें निमित्त करून घरीं राहिला. तेव्हां राजास समाधान होईना म्हणून प्रधानास बोलाविला, तों पोट दुखावयाचें वर्तमान ऐकिलें. मग प्रधानपुत्रास बोलाविलें त्यानें उत्तर केलें कीं, सेवकाचे घरीं कांहीं उत्तम पदार्थ असल्यास ज्या प्रभूस देखवत नाहीं त्याची सेवा माझे कडून होणार नाहीं. वडील करितात ते करोत. असा निरोप पाठविला. तेव्हां आपण स्त्रीची प्रीति संपादून घेणार ती प्रधानावाचून होत नाहीं. त्याचे पुत्रानें हें उत्तर केलें. तस्मात्, मी कृष्णसार हरिण आणविला त्याजवरून पुत्र सखेद आहे त्या अर्थीं प्रधानाचेहि चित्तांत किंतु असेल, परंतु प्रौढतेस्तव दर्शवीत नाहीं. हा अर्थ ध्यानांत आणून एक कृष्णसार प्रधानाकडे पाठविला. तेव्हां प्रधानानें सांगून पाठविलें कीं, आपले घरीं होता तो माझाच होता मग पाठवावयाचें प्रयोजन काय ? हें उपेंद्रास सेवकांनीं सांगितलें तथापि कृष्णसार प्रधानास दिला. नंतर दोन दिवसांत प्रधान बरा होऊन स्वकार्य झालें हें समजून शृंगारमंजरीसमोर गेला आणि बसला आहे, तों तिनें सांगितलें कीं, प्रधाना तूं जें सांगितलें होतें तें सत्य भासलें तेणेंकरून मला अन्न गोड लागत नाहीं. भाषणहि स्वल्प करितें, यास्तव शरीरहि क्षीण होऊं लागलें. महाराजांचीहि शरीरप्रकृति यामुळेंच झाली. याचें कारण काय ? तें तुझे समजण्यांत आलें असल्यास सांगावें. नंतर प्रधान म्हणाला कीं महाराज, आपलें शरीर क्षीण व पूर्ववत् भाषणादिक व्यवहार होत नाहीं याजकरितां स्वामींस चिंता बहुत झाली तेणेंकरून त्यांचेहि प्रकृतीस विपर्यास आहे. परंतु, स्वामीसमान एकपत्नीव्रत व स्वधर्माचरण कोठेंहि दिसत नाहीं.

हें वचन ऐकून विपरित बोलतो असें समजून शृंगारमंजरी म्हणाली कीं, पूर्वीं तूं गोष्ट बोललास त्याचाहि प्रत्यय मला आला असतां आज तूं ही गोष्ट काय समजून बोलतोस ? नंतर चतुर प्रधान म्हणाला कीं, महाराज पूर्वीं मी विनंती केली होती परंतु शोध पाहतां स्वामी प्रतिदिवशीं गांवाबाहेर देवी प्रगट झाली आहे तिचे दर्शनास जातात असा शोध लागला. त्याजवरून मीहि तेथें जात असतों. आपणहि आज रात्रौ यावें. स्वामींची आज्ञा घेतों असें भाषण ऐकतांच शृंगार-मंजरी संतुष्ट होऊन प्रधानास उपेंद्राकडे पाठविती झाली. नंतर चतुर यानें जाऊन राजास प्रार्थना केली कीं, महाराज मातोश्रींस श्रीदेवीचें दर्शन घ्यावें असें वाटत आहे, त्यांस आज समागमें नेल्यास सर्व यथास्थित होईल. हें श्रवण करून राजा मान्य करिता झाला. मध्यरात्र होतांच त्रिवर्ग मिळून देवीचे दर्शनास गेलीं. देवीस नमस्कार करून उभीं राहिलीं आहेत तों आंतून ब्राह्मणस्त्री बोलिली कीं अरे उपेंद्रा तुम्हा उभयतांची वृत्ति पाहून मी संतुष्ट झालें वर माग. तेव्हां उपेंद्र बोलिला कीं, देवी माझें राज्य निःकंटक चिरकाल चालावें, तुझी दया असावी. हें अवश्य म्हणून देवीनें सांगितलें कीं, आतां मी स्वस्थळास जाईन तुझें कल्याण होईल. असें बोलून दोन हार दो हातीं दोघांस देती झाली. राजानें सद्भावें घेतले. त्रिवर्ग देवीची आज्ञा घेऊन स्वगृहास येतीं झालीं. शृंगारमंजरीचे चित्तांत संशय होता तो दूर झाला. भावें-करून राज्यवृद्धि झाली. प्रातःकाळाचे पूर्वीं काष्ठाची प्रतिमा भूमीगत प्रधानानें केली. स्वकार्य साधलें. ही कथा सांगून चातुर्यलतिका म्हणाली कीं, गुणसागरा, कृष्णसाराचा विषय किती ? परंतु, राजा निग्रह करिता तरी शरिरानें क्षीण होऊन क्षय पावता, राज्याचा नाश होता. यास्तव, प्रभूनें उपयोगी सेवक यांचा स्वल्प विषयीं ही मनोभंग करूं नये. राज्य बहुत साहाय एकविचारें असल्यावाचून निभावत नाहीं. याजकरितां आपलें प्रभुत्वाचें वक्र राखून सर्वांबरोबर स्नेहभाव असावा. त्यांस उत्साह देऊन राज्य-चिंतेंत तत्पर राहतील तें कृत्य करीत असावें. ईश्वर कल्याण करील. कथा ३. या कथेचा सारांश; आर्या.

सचिवादिसेवकानां तुष्ट्या पुष्टिं विदधीत राज्यस्य ।
तेषामौदासीन्यादेकाकिनि नायके भवेद्धानिः ।
स्नेहं तथा वितनुयाद्यथा यतेयुर्विपक्षनाशाय ।
गांभीर्येणोपनयेत्स्वार्थं यथा ते न जानीयुः ।

———

# पेशवाईच्या सावलींत

( ना. गो. चापेकर )

वेदमूर्ती रामभट खरे वाईकर दीमत शालग्राम याही वेदाची परीक्षा दील्ही त्याची दक्षणा १३ रुपये तेरा ठरावीली असे मी माघ श्रुा ३ शके १७५८ दुर्मुख नामसंवत्सरे.

१ गोपीनाथ शास्त्री आ का ( गा ? ) शे
१ राघविंदाचार्य वैष्टाच
१ त्रिंवक शास्त्री शालिग्राम
१ लक्ष्मणाचार्य कौलगी
१ नारायण शास्त्री जोशी
१ परशरामभट घारपुरे
( इंग्रजी सही लागत नाही )
एजंट

**टीपः—** या लेखावरून ब्रिटिशांच्या राजवटींतील दक्षणा देण्याची पद्धति समजते.

श्री

श्रीमंत राजश्री आत्या स्वामींचे शेवेसी

पोा राघो नारायण गुण्ये साा नमस्कार विनंती विशेष आपण आम्हांपासी तीकोन्यास जिन्नस ठेवण्यास दिल्ही पुढे आम्हावर सरकारचा प्रसंग गुजरला मागे जीनस गलाठली याजकरीतां आपली जीनस पावली नाही हाली उलगडा करावा तर आमची हलाखी बहुत ये समई हात चालेना याजमुले जीनसाची चौकशी बाजाराटा प्रो करून याद ठरावीली वी रा हरी शामराज पुसालकर वाा
याद रु. ७३७०।।।-

तपशील

३५९० सीका
३७८०।।।- चांदवड
७३७०।।।-

एकूण त्र्याहात्तरशे पावणे एकाहत्तर एक आणा आपलें देणे याचा फडशा सोई सोईन करून देउ मीती चैत्र श्रुा ५ शुक्रवार शके १७३० वीभवनामसंवछरे हस्ताक्षर खुद बहुत काय लिहिणे हे विनंती

**टीपः—** रंगनाथस्वामींच्या धाकट्या बंधूचें नांव विठ्ठलराव आत्या होतें. हे गृहस्थाश्रमी असून निजामाच्या नोकरींत होते. त्यांच्या वंशजाचा उल्लेख या पत्रांत असावा.

---

१ या सदराखालीं भा. इ. सं. मंडळाच्या दप्तरांतील तत्कालीन परिस्थितीवर प्रकाश पाडणारे कांही कागद प्रसिद्ध करण्याचें योजलें आहे. परवानगी दिल्याबद्दल मंडळाचे आभारी आहों.

श्री

याचे उत्तर गुणे यास शके १७२६ चे साली आश्वीनमासी सरकारातून धरून कील्यावर टाकले घरची जप्ती करून वीत विशय नेला घरी मुले माणसे याजवर चौकीही होती हे आम्ही ऐकिले पुढे शके १७३० चे साली गुणे मोकले जाल्यावर जप्तीवीशय गेला त्याजवीशई सरकारात मुछ्दी याजकडे यत्न बहुत केला परतु सरकारातुन व रास्ते याजकडु(न) वीशय माघारा प्राप्त जाला नाही हे आम्हास ठेऊक आहे

श्री

राजश्री यावीराजीत राजमान्य राजश्री भीवराव तात्या भाटवडेकर स्वामींचे शेवेसी.

पो राघो नारायण गुण्ये सा नमस्कार वीनंती विशेष आत्या गुरुजी यांची ठेव होलकराचे दंग्यांत ठेवावयास दिल्ही होती ती सरकारचे दंग्यांत गळांठली त्याची चीटी पेशजी त्याणी करून घेतली होती त्याचा ठराव हली त्याचे स्त्रीने करून फारखत आमचे नावे लिहून दील्ही व पहिली चीटी आमची होती ती अशा दोनी तुम्हाजवळ अमानत ठेविल्या आहेत त्याचा ठराव उक्ता तुमचे विद्यामाने करून फडशा करावयाचा ठरला चांदवड रु. १६०० अक्षरी सोलासे यासी मुदती शके १७४४

४०० जेष्ठ अखेरीस द्यावयाचे ते
१२०० माघ अखेरीस द्यावयाचे ते
१६००

एकूण सोलासे रुा चांदवड मुदती प्रो फडशा करून देऊ आणी पेशजीची चीटी आमचे हातची आहे ती व हाली मातुश्री बाई याणी आमचे नावे फारखत लीहुन दील्ही असे दोनी कागद तुम्हा जवळोन घेऊन मुदतीस अंतर होणार नाही मीती माघ वद्य ९ शुकुरवार शके १७४३ वृषानाम संवछरे हस्ताक्षर खुद हे वीनंती.

श्री

वरातींचे रुपये घेण्याची अर्जी

वो गंगाधर चिंतामण पुराणीक वा पेठ रवीवार घर खासगत सुमा सीत अशरीन मया तैन व अलफ कारणे अर्जी लिहुन दील्ही ऐसीजे श्रीमंत बाबासाहेब याचे जामदार खान्यात कापड दिल्हे रु. १८५० साडे अठराशे त्याची वरात जामदार खान्याकडून भकाजी उधव याजवर दील्ही त्याणी वराती बाबद चीटी नाना चीपोलणकर यास दाखवीली रुा देतो म्हणोन करार केला नंतर श्रीमंत बाजीराव साहेब याचा दंगा जाहाला त्याजमुळे तसेच राहिले कुपणी सरकारचा आमल जाहाल्यावर एक दोन वेला मागणी केली तेव्हा चीपोलणकर याणी वाकडी गोष्ट सागीतली त्यास साहेबी कृपाळु होऊन चीपोलणकर यास ताकीद करून आमचा ऐवज व्याजा सुधा देवीला पाहिजे. आम्ही मुले आमचे घरी गुमस्ता वाकबदार होता तो मृत्य पावला म्हणोन आमची गरीबाची दाद लगो देत नाहीत आणि आम्हास तर लोंकाचे देणे ते लोक

परजात वसऊन आपला ऐवज मागतात यास्तव आम्ही मुले क्रियाव्राळ आम्हास साहेबावाचोन तारणार दुसरा कोणी नाही मी भा वा १ शके १७४७

टीपः— १ जामदार खान्यांत मौल्यवान कापड ठेवीत
२ क्रियाव्राळ म्हणजे अज्ञान.
३ धरणें धरण्यासाठी इतर जातीचे लोक घरांत वसवीत.

---

## अभिप्राय

**माधवी**— विविध कविकवियित्रींच्या किरकोळ कवितांचा संग्रह या पुस्तकांत केला असून तें नाशिक येथील वाङ्मयविहार मंडळाने प्रसिद्ध केलें आहे. २६ कवि आणि दोन कवयित्री यांच्या एकंदर ६४ कविता त्यांत घेतल्या आहेत. यांतील कवितांचे विषय विविध असून, स्त्रीपुरुषांतील प्रेमाबरोबरच, विराट्स्वरूपवर्णन, ईश्वरभक्ति, सृष्टिवर्णन, मानवहृदयांतील बहुविध भावनांचें आविष्करण, सामाजिक अनिष्ट रुढींचे परिणाम, देशप्रेम, वालस्वभाववर्णन, विनोद, इत्यादिकांनाहि त्यांत स्थान मिळालें आहे. कवि अनेक व विषय बहुत, त्यामुळें या संग्रहांत भाषावैचित्र्य सहजच पहावयास मिळतें. मराठी भाषेंत काव्यरचना करणारांनी व्याकरणविषयक नियमांशीं फारखत करूनच कार्योपक्रम केला असल्यामुळें शिष्टप्रयोगातिक्रम हा मराठी भाषेंतील कवितेचा दोष न होतां गुणच बनल्यासारखें झालें आहे ही गोष्ट मोठीशी स्पृहणीय नव्हे. कवि शब्दसृष्टीचा ईश्वर झाला. तरी, सामान्य ईश्वर जसा आपल्या सृष्टींत आपले नियम पाळितो तसे कवीनेहि आपल्या सृष्टीसाठीं नियम ठरवून ते पाळिले पाहिजेत. कोणतेहि निर्बंध न घालून घेणें हाच एक निर्बंध प्रस्तुत मराठी कवींनी बहुशः घालून घेतलेला असल्यामुळें इतर निर्बंधांना त्यांत जागाच नाहीं. पण ही टीका सामान्यतः आधुनिक मराठी कवितेला लागत असल्यामुळें ‘ माधवी ’ संबंधाचाच विशेष म्हणून येथें ती नमूद केली आहे असें समजूं नये. इंग्रजी कवितेंत व्याकरणासंबंधाने इतका स्वैरपणा आढळत नाही. संस्कृतांत तर नाहीच नाही. मग मराठींतच इतका बेतालपणा कां असा प्रश्न येतो. मराठींत प्रथम कविता होऊं लागली, तेव्हां भाषा नवीन बनत होती, व्याकरणनियमांना स्थिरता नव्हती, म्हणून कवितेंत त्या शिथलपणाची छाया उमटणें स्वाभाविक होतें. पण आतां व्याकरणमीमांसाइत्यादिकांची छाननी होऊन भाषेला गद्यांत संस्कृतपणा आला असतां, पद्यांत त्याची छाया पडावी तशी पडत नाही. कवींनी इकडे लक्ष दिल्यास अधिक श्रेयस्कर होईल.

काव्य पद्यांत असतें तसेंच तें गद्यांतहि राहूं शकतें ही गोष्ट आम्हांला मान्य आहे. पण एकदा त्याला पद्यांत बसवावयाचें ठरविल्यावर पद्याच्या अटी पाळणें हेंहि कवींचें कर्तव्य ठरतें. काव्य हें गद्यपद्यनिर्विशेष असतें हें मान्य केलें तरी त्याला विशिष्ट भाषासरणीची व शब्दरचनेची आवश्यकता असते हेंहि विसरून चालणार नाहीं. या तत्त्वाचें प्रत्यंतर पाहावयाचें असेल, तर सामान्यतः कोणतेंहि साधारण पद्य घ्यावें व त्यांतील शब्दरचना गद्यरूप करावी म्हणजे अर्थ तोच असतांहि रूपभेदामुळें त्या शब्दांतून काव्य नाहीसें झाल्याचें बहुतेक ठिकाणीं आढळून येईल, शुद्ध गद्यांत असलेल्या म्हणींत जें काव्य दिसतें, त्याला अर्थाच्या चटकदारपणाबरोबर शब्दरचनेचा चटकदारपणाहि कांहीं अंशीं कारण असतो. तात्पर्य, काव्याचा विचार करतांना, बाह्यरूपाकडे कानाडोळा करण्याने काव्याला नीरसपणा येऊं लागतो हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

प्रस्तुत ' माधवी ' नामक काव्यगुच्छांतील कवितांत सरस कल्पना व हृदयवेधक भावना जशा ठिकठिकाणीं दृष्टीस पडतात तसा त्यांच्या बाह्यरूपांतहि बराच नीटनीटकेपणा आढळून येतो. यां चिंतयामि सततं मयि सा विरक्ता। इत्यादि भर्तृहरीच्या पद्यांतील हृदयविदारक कल्पनेचें रूपक चंद्र, पृथ्वी व सूर्य यांवर बसविलेलें 'चुकामुकींत' दिसतें. ' नातवाचें गुपित, ' 'छोटा डाक्टर, ' रामाचें मंदिर ' इत्यादिकांत बाललीलांचें रमणीय दर्शन घडतें, तर ' मराठा गडी, ' महाराष्ट्रमहोदय ', 'विहंगविमोचन' 'माझी महत्त्वाकांक्षा' इत्यादिकांत राष्ट्रीय भावना स्फुरित होतात. उभयविध शृंगार तर ठिकठिकाणीं पसरला आहे. 'लपवालपवींत' आजच्या समाजस्थितींतला एक नित्याचा करुणप्राय प्रसंग चटकदारपणें वर्णिला असून ' ही कोण ' यांतील छेकापन्हुति चांगली मनोरंजक साधली आहे. सर्व कवितांचा सविस्तर परामर्श छोट्या निरीक्षणांत घेतां येणें अशक्य आहे हें सांगावयास नकोच.

या संग्रहांत बहुतेक कविता सयमक आहेत व क्वचित् निर्यमक आहेत. 'उत्कंठे'-सारख्या कित्येक कवितांत दोन व चार या चरणांत यमक साधिलें आहे. असलें यमक संस्कृत अलंकार ग्रंथांत सांगितलें असतें, तरी शार्दूलविक्रीडितासारख्या दीर्घचरणी वृत्तांत तरी त्यामुळें विशेषशी अनुकूल संवेदना उत्पन्न होत नाहीं व म्हणूनच बहुधा ते जुन्या मराठी कवींनी टाळून लागोपाठच्या चरणांच्या जोडयांतच तें मोजण्याचें ठरविलें असावें. चरणाचा अंत्य स्वर जात्या ऱ्हस्व असला तरी शास्त्रांत तो दीर्घ असतो हें खरें. पण मराठीच्या विशिष्ट उच्चारपद्धतीमुळें शेवटींचा अ हा स्वर बहुतेक अनुच्चारित असल्यकारणाने 'आस–मनाश' (पा. ५१) 'भजेन–पंच प्राण' (पा. ५०) 'पातळ–शुभ्रीचल' (पा. ४९) 'गंभिर–सुंदर' (पा. ३१) असलीं यमकें न घातलेलीं बरीं. 'कृष्णामाईस' ही कविता सयमक कीं निर्यमक हें सांगणें कठीण आहे. पद्याला चार चरण असावे हा सामान्य नियमहि पालटून इष्टसिद्धयर्थ त्याला द्विपाद केलेलें कांही ठिकाणीं आढळतें. एकंदरींत यमकाच्या दृष्टीने पहातां या

कवितांत फार ढिलेपणा दिसतो. 'नटे–फिरे' (पा. २८) हें काय यमक ? तसेंच 'सुचे–येतसे' (पा. ३३). आठ दहा किंवा दहावीस ओळींच्या कवितेंत एखादें पद्य निर्यमक किंवा एखादें चरणद्वयच निर्यमक (उदाहरण, 'मायेचें घरटें' 'वाटें, मिळो पाहण्या' पा. ३२, ३३) असले प्रकार कवीच्या भाषादौर्बल्याची साक्ष देतात असें म्हणावयास अडचण नाही.

स्तुतीपाठ (स्तुतिपाठ), साम्यता (समता किंवा साम्य) पा. १; नदिकांठ (नदीकांठ) पा. २१, वत्सरें (वासर पुल्लिंग) पा. २२ अन् (आणि) पा. ३१. असले दोषहि टाळतां आले तर चांगलें. 'गौरांगास शिशूपरी लगटलें खंबायती पातळ। वातांदोलनिं बावरे अखुडसा निःशंक शुभ्रांचल' (पा. ४९) यांतील गीर्वाण शब्द-युक्त रचनेला 'खंबायती पातळ' व 'अखुडसा' कितपत मानवतील हा प्रश्नच आहे. 'लाव्हा' हा इंग्रजी शब्द मराठींत मुळींच रूढ नल्यामुळें त्याचा प्रयोगहि योग्य नव्हे. (पा. १९). पान ४१ वर 'मृदू मृदुलता' च्या जागीं 'मृदुल मृदुलता' असें म्हटल्याने 'मृदु' दीर्घ करण्याचा दोष टळेल.

छपाईच्या दृष्टीने 'माधवी'चें बाह्यांग बरें असलें, तरी काव्यग्रंथ या दृष्टीने अंतःशुद्धि अधिक पाहिजे होती. पण मराठी छापखान्यांच्या सांप्रतच्या स्थितींत ती दुरापास्तच आहे. यास्तव एकदां 'नाशिक' तर पुनः 'नासिक' [पा. ५–११] असे व इतर दोष घडणारच; त्याला उपाय नाही.

के. ल. ओगले

**संगीत सत्यानाश नाटक** -- (ले. रामराव ज्योतिराव शिंदे किं. ८३) या तीन अंकी नाटकांत श्री. शिंदे यांनी एका श्रीमंत मराठी गृहस्थाचा दारूने बायका-मुलांसह कसा बळी घेतला याचें हृदयद्रावक वर्णन केलें आहे. श्री. शिंदे यांच्या कविता सुलभ व मनोरम आहेत. खेडेगांवांत हें नाटक करून दाखविण्याजोगें आहे. दारूच्या व्यसनाने श्रीमंतापासून गरीबापर्यंत कशी दुर्दशा होते याचा अनुभव प्रत्यहीं येत असतो. कोकणांत तर दारूचें व्यसन फारच आहे. अशा ठिकाणीं या नाटकाचे प्रयोग करून दाखविले असतां त्याचा परिणाम इष्ट दिशेने झाल्याशिवाय राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. या नाटकाला श्री. केशवराव जेधे यांनी सुंदर व मार्मिक प्रस्तावना लिहिली आहे. श्री. शिंदे यांची भाषा अशिक्षित लोकांस समजेल अशीच आहे. मात्र कित्येक शब्दांचा अर्थ आम्हांला लागला नाही. भोळारामाच्या मोठ्या मुलाच्या मृत्यूचें खापर विश्वविद्यालयावर फोडलें आहे त्याच्या ऐवजीं त्याचा संबंध दारूकडेच दाखवितां आला असता तर कथानकाची एकतानता मोडली नसती. बायकांचा डावा डोळा लवणें अशुभ नसून शुभदायक समजतात. कमळाबाईचा उजवा डोळा लवावयास पाहिजे होता. पुरुषांचा मात्र उजवा डोळा लवणें शुभ-दायक मानतात. असो. एकंदरींत श्री. शिंदे यांची कामगिरी समाजला अत्यंत उप-युक्त आहे यांत संशय नाही.

# सिंधी व मराठी या भाषांची तुलना.

(लेखकः—चि. वि. दीक्षित, एम्. ए.)

**सिंध** प्रांत अनेक दृष्टींनी हल्ली महत्त्वास चढत आहे. **मुंबई** इलाख्यांत जरी मागसलेला म्हणून त्याची गणना असली तरी सक्करचें धरण, मोहंजोदरो येथें सापडलेले प्राचीन अवशेष व राजकीय वातावरण इत्यादि गोष्टींमुळे सर्व हिंदुस्थानचें लक्ष त्याच्याकडे वेधलें आहे. ऐतिहासिक दृष्ट्यासुद्धा ह्या प्रांताचें महत्त्व कमी नाही. **ऋग्वेद, महाभारत,** इत्यादि प्राचीन ग्रन्थांत त्याचा उल्लेख आढळतो. **अलेक्झांडरने हिंदुस्थानच्या** स्वारींत त्यांतील पुष्कळसा भाग पाहिला होता. सातव्या शतकांत **महंमद बिन कासिमने** तो ब्राह्मण (शूद्र ?) राजापासून हस्तगत केला व **इस्लामचें** निशाण ह्या देशांत प्रथम त्याच वेळीं रोवण्यांत आलें. पुढील ७००, ८०० वर्षांचा इतिहास जवळजवळ लुप्तप्राय झाला आहे. १५०० ते सर चा. नेपियरने १९ व्या शतकांत तो जिंकीपर्यंत राजघराण्याची सुसंगत माहिती सापडते. जेत्या **आरब** लोकांनी **मुसलमानी** पेहराव व चालीरिती जित लोकांमध्ये प्रसृत केल्या पण **आरबी** अगर **फारसी** भाषा ते जनसमूहावर लादूं शकले नाहीत; इतकेंच नव्हे तर इंग्रजी अमलापूर्वी **आरबी** लिपी सुद्धा लोकांत चालू नव्हती. देवनागरीपासूनच निघालेल्या अशा आठ लिप्या सर्व सिंधभर निरनिराळ्या भागांत चालू होत्या. १८४० सालीं छापलेला **सिंधी** शब्दकोश **देवनागरी** लिपींतच आहे. इंग्रजी अमलांत सर्व प्रांतांस कारभाराच्या सोयीसाठी एकच लिखाण अमलांत आणण्याचें ठरून आरबी लिपींत थोडाबहुत फेरफार करून ती सर्व लोकांवर कायद्याने लादण्यांत आली. तेव्हापासून बाकीचा सर्व हिंदुस्थान व सिंध ह्यांमध्ये एक अभेद्य तटच निर्माण झाला असून उभयतांचा परस्परसंबन्ध— सांस्कृतिक संबन्ध— जवळजवळ खुंटल्यासारखाच आहे. सिंधी व मराठी ह्या सख्या बहिणीसारख्या असून एकीला दुसरीची स्मृति सुद्धा राहिली नाही. कांही गोष्टींत **गुजराथी**पेक्षाही **सिंधी** अपणांस जवळ आहे. ह्यावरून अनुमान काढण्यास हरकत नाही की **सिंध** व **कोंकणपट्टी** ह्यांमध्यें समुद्रमार्गानें प्राचीनकाळीं (७००–८०० वर्षांपूर्वी) बरेंच दळणवळण असावें. पुढे बरेच दिवस हा मार्ग बंद पडला असला पाहिजे. जरी **सिंधमध्ये** शेंकडा ७५ मुसलमान वस्ती आहे, तरी **हिंदू** व **मुसलमान** एकच भाषा (सिंधी) बोलतात. हल्ली उभय समाजांत तेढ उत्पन्न झाल्यामुळे निष्कारण भाषेचे हाल होत आहेत. प्राथमिक शाळांतील क्रमिक पुस्तकांतून **संस्कृतजन्य** शब्दांची हकालपट्टी करून **आरबी** अगर **फारसी** शब्द घालण्याचा यत्न चालू आहे. कटोरो हा संस्कृतजन्य शब्द वाटून त्याऐवजीं वाटो (वाटी) हा शुद्ध सिंधी शब्द घालण्यांत येतो. पण दुर्दैवाने तोही संस्कृतजन्यच आहे ही गोष्ट लक्षांत येत नाहीं.

भरतभेटीच्या धडयांत चाकरिआ ( पादुका ) हा शब्द काढून जूती हा उर्दु शब्द घातला आहे. पण फायदा काय ? उलट पादुका शब्दाऐवजीं जोडा अगर वहाणा असा उपयोग करून पावित्र्याचा नाश मात्र होणार. हरिश्चंद्र राजाच्या कथेंत 'धन्य' ऐवजीं 'शाबास' घालून इस्लामी वातावरण मात्र उत्पन्न झालें. उलटपक्षीं हिंदूही हिंदी भाषेंतील नवेनवे शब्द उचलून संस्कृतजन्य शब्दांची विदग्ध वाङ्मयांत रेलचेल उडवून देत आहेत.

चमत्कार असा कीं, खेडयांत प्रचलित जी सिंधी भाषा ती शुद्ध सिंधी व शहरांतील सुशिक्षित हिंदू जी सिंधी बोलतात ती फारसीच्या संस्काराने भ्रष्ट म्हणून अशुद्ध सिंधी असें सांगण्यांत येतें. शाळा व कॉलेजें ह्यांत शेकडा ऐंशी विद्यार्थी हिंदू आहेत व ते सर्व दुय्यम भाषा म्हणून फारशी शिकतात. अर्थात् नित्य व्यवहारांत पुष्कळसे फारशी शब्द वापरण्याची सवय त्यांस लागावी यांत नवल नाही. अभिजात सिंधी म्हणजे जिच्यांत उर्दू, फारसी व आरबी शब्द व अवतरणें ह्यांचें प्राचुर्य सर्वत्र आहे ती असा समज आहे. आपल्याकडेही विद्वान् लोक संस्कृताचा सररास उपयोग करून मराठीस नटविण्याचा यत्न करतात. परन्तु हल्ली शुद्ध सिंधी-कडे कांही लेखकांचा कल जात आहे.

महाराष्ट्रांत एक काळ असा होता की, मराठींत ग्रन्थरचना करणें कमीपणाचें मानीत. सिंधांतही भर मुसलमानी रियासतींत सिंधी भाषा फक्त खेडवळ लोकांनी बोलण्यास योग्य असें समजत. सुशिक्षित लोक फारशी बोलत व लिहीत. त्या कालीं हिंदू लोकांनी फारशी भाषेंत कवनेंहि केलीं आहेत.

शुद्ध सिंधींत शेंकडा ८० शब्द संस्कृतजन्य व देशी व बाकीचे २० फारसी व आरबी भाषेंतून उचललेले. शुद्ध सिंधी बोलणारे सर्व खेडवळ म्हणजे मुसलमान व भ्रष्ट भाषा बोलणारे नागरिक म्हणजे बहुतेक हिंदू असा विपरीत प्रकार आहे. सिंधमधील मुसलमानी बहुमत हें राजकीय पारतंत्र्यामुळे आरब अमलानंतर उत्पन्न झालें असावें असें निर्विवाद ठरतें. एरवी इतके प्राकृत व देशी शब्द खेडयांतून आढळतेना.

महाराष्ट्रांत लिपीची सुधारणा करण्याची बावटळ उठली आहे त्याचप्रमाणें हिंदुमहासभेच्या चळवळीमुळें देवनागरी लिपींत सिंधी लिखाण निदान हिंदूंपुरतें तरी प्रचलित व्हावें अशी खटपट चालू आहे. हल्लीची लिपी कृत्रिम असून शास्त्रीयदृष्ट्या दोषपूर्ण ठरते. शिवाय आरबीचा व सिंधीचा कांहीं एक संबंध नसतां ती विनाकारण लोकांवर लादली गेली आहे. ट्रंप हा व्याकरणकार सिंधी ही प्राकृतजन्य भाषा असल्यामुळे देवनागरी हीच तिची नैसर्गिक लिपी ठरते, परंतु मुसलमानांचें बहुमत लक्षांत घेऊन देवनागरी प्रसृत करणें कठीण दिसतें, तथापि उर्दू लिपी थोडया फरकाने सुरू केल्यास हल्लीचे पुष्कळ दोष कमी होतील, असें म्हणतो. ज्यावेळीं इंग्रजी अधिकाऱ्यांनी ही लिपी प्रचारांत आणली तेव्हा सर्व सरकारी नोकरवर्ग हिंदू होता. मुसलमान जरी राज्यकर्ते होते तरी लढणें व ऐषआराम भोगणें ह्या पलीकडे त्यांनी कांहींच केलें नाही.

मुख्य दिवाण पुष्कळ वेळां हिंदूच असे. दप्तर तर हिंदूनांच संभाळलें होतें. आमिल नांवाने प्रसिद्ध असलेली हिन्दूंतील एक जाति त्यांतील लोक सरकारी नोकरी करणारे असें दर्शविते ( आमिल=सरकारी नोकर ). ह्या **आमिल** लोकांना कित्येक शतकें देवनागरी लिपी पारखी झाली व **फारशी** भाषेंत सर्व राजकीय व्यवहार होत असल्या-मुळे तिच्यांत त्यांनी प्रावीण्य मिळविलें. ह्याच आमिल नोकरवर्गाने अव्वल इंग्रजींत **आरबी** लिपीस विरोध केला नाही इतकेंच नव्हे तर स्वतः ह्यांना **देवनागरीचा** गंध नसल्यामुळें आरबीचा पुरस्कार केला असावा असें दिसतें.

हल्लीसुद्धां देवनागरीच्या प्रचारास सुशिक्षित आमिल वर्गाकडूनच विरोध होत आहे. कारणें काय तर १ आरबी मोडीप्रमाणें झरझर लिहिण्यास येते आणि २ मुसलमान व हिंदू ह्यांमध्यें निष्कारण तेढ उत्पन्न होईल. हिंदू माणसास मुसलमान मित्रांशीं लेखन-व्यवहार भाषा एक असूनही करतां येणार नाहीं. खरें कारण एकच; अंगवळणीं पडलेली लिपी टाकून देणें **आर्यसंस्कृती**विषयीं पर्वा वाटत नसल्यामुळें नकोसें वाटतें. दोनही लिप्या शिका. एक मुसलमानांच्या मोहब्बतीखातर व दुसरी हिन्दू संस्कृती टिकविण्या-साठीं व अखिल हिन्दूसमाजाशीं दळणवळण ( सांस्कृतिक ) रहावें म्हणून ' असें सांगितलें तरी दुहेरी श्रम करण्याची तयारी नाहीं. मानववंशशास्त्रदृष्ट्या **फारसी** रक्त आमिल लोकांच्या अंगांत खेळत आहे असें कांहींचें मत. तें खरें असल्यास हिन्दू संस्कृतीविषयीं त्यांस विशेष प्रेम कां वाटावें ! एक सिंधी गृहस्थ तर लिपींत फेरफार करण्याविषयीं बोलणें निघालें असतां म्हणाले ' आरबी सदोष आहे, गोष्ट कबूल; पण देवनागरी तरी पूर्ण निर्दोष आहे कुठे ? फरकच करायचा तर **पिटमन**च्या लघुलेखनपद्धतीनुसार पुष्कळ श्रम वांचविणारी लिपि कां स्वीकारूं नये ? ' ह्यावर देवनागरी **लिपि** आर्यसंस्कृतीच्या भावनेने स्वीकारणें इष्ट आहे हेंच उत्तर. तार्किक वादविवादांत कदाचित् रोमन लिपि सुद्धां सरस ठरेल, किंबहुना सर्व हिन्दवासियांनी स्वभाषा अजिबात सोडून फ्रेन्च अगर इंग्रजी भाषा तान्ह्या मुलांस शिकविण्यास प्रारंभ करणें आर्थिकदृष्ट्या व राजकीयदृष्ट्या लाभदायक ठरेल पण—पण मनुष्य हा निर्जीव यंत्र नाही, त्याला भावना आहे, हीच अडचण. आता आपण उभय भाषांतील साम्याचा विचार करूं.

प्रथम सिंधी भाषेंतील कांही कवितांचे नमुने देऊन नंतर कांही लोकांस रुक्ष वाटणारा पण अत्यंत चित्ताकर्षक व्याकरणविषयक भाग देऊं.

बुड़ंदे बूड़निखे के हातिक हथ विझनि
एड़ों लज लतीफु चवे पसो साणु कखनि
हेकर कंधिअ कनिः नत साणुनि वञनि सीरमें

( नदींत ) बुडणारे ( लोक ) बुडखे हातांत धरतात व लतीफ म्हणतो पहा (पसो) गवताजवळ एवढी लाज (अब्रू) आहे. बुडणाऱ्यांना एकतर ( हेकर ) कांठावर आणतील नाहीतर ( नत ) त्यांसह पाण्यांत वाहवत जातील.

[कखनि = कक्षा = रज्जु (गवताचे दोर करीत);
चवे ( सं. वच्, मराठी वच्वच );
सिंधींत आद्यन्त विपर्यय झाला आहे.]
पँहँजी पोख संभारि प्राणी पेहे ते चढ़ही
खिमा रवांभाणिअसां कढें कल्पत झारी
ड़ेई वाडि वेसाहजी सामी भर्मु निवारि
त खणें बेहद बारि अनभइ अखुट अनाजजी

प्राण्या, [1]पीठावर चढून आपलें पीक संभाळ. ( क्षमारूपी ) गोफणीने कल्पनेचे पक्षी काढून टाक ( हाक ). विश्वासाची ( वेसाहजी) वाडी देऊन ( करून ) सामी ( म्हणतो ) भ्रम निवारण कर तर ( म्हणजे ) आत्मानुभवरूपी अकुंठित (अखुट) अन्नाची बेहद्द रास घेशील.

[वाडी = वल्ली = वई ( म. ); भर्मु = भ्रमः— भम्मो — भम्मु ( अपभ्रंश)]

अकारान्त पुल्लिंगी शब्दाचे शेवटीं 'उ' अवशेष विसर्गाचा राहिला आहे. **ज्ञानेश्वरी**सारख्या जुन्या मराठींतही हा आढळतो. ही 'उ' लकब कानडींतीलच हें मत लंगडें पडतें. अखुट हल्लीच्या मराठींत आढळत नाहीं पण खेडवळ भाषेंत दिसतो 'माझें काय त्यावांचून खुटलें आहे'. खुंट, खुंटा वगैरे सर्व कुंठ् पासूनच निघाले आहेत.

दिलि करि दरख़्त जे दस्तूर
( आपलें मन झाडाप्रमाणे कर )
छाडप लवे छुगा छणानि मेवा ऐं ब्यो वूर
कुहाडो लगे कूक न करे दर्दु न रखे सूर
वढीं-दरसां वेरु न रखे तोडे भञी करे चूर
पाणु जलाए छांव करे नितु इन्हींअ ते नूर

( जर ) झोडपलें ( हालविलें ) तर झुबके ( छुगा ) खाली पडतात. शिवाय फळें व फुलें ( मिळतात ). [ छुगा = गुच्छ = गुत्स]

कुऱ्हाड ( कुहाडो ) लागली तरी कूं कूं करीत नाही (व) वेदना आठवत नाहीं.

लांकूडफोड्याशीं वैर राखीत नाहीं; ( तो ) तोडो फोडो वा चूर करो. स्वतः जळून ( तापून ) ( इतरांस ) सावली करतो. नित्य अशाप्रकारचें त्याचें तेज (नूर = ईश्वरी प्रकाश = प्रासादिक वागणूक ) आहे.

[ब्यो = दोन = वेकंवे ( मराठी पाढा).

कूक ( कण्हण्याच्या आवाजावरून निघालेला शब्द ) कूं कूं अगर कांकू.

वढींदरसां विध् ( विद्ध ) - विड्ढ- वीढ-वढीं+दर ( करणारा ) + सां वैदिक

[1] पेहु = पीठ (– म. पिढें जात्याखालील ) = पक्षी हांकलण्याची उंच जागा.

सा अथवा सह; म. सीं (शीं); मूळ मराठी प्रत्यय सीं जुन्या मराठींत रूढ आहे.

पाणु = स्वतः, आपला, अंतरंग = आपण. मीपणा (मराठी) = अहंपणा 'मुलगी पणांत आली' येथें व्रयांत आली; स्वतःसिद्ध जाहली.

पाणमें वेठो आहे = अंतर्गृहांत (अगर गूढ विचारांत) बसला आहे.

पाणी (सिंधी) ओळखणें म्हणजे अन्तरंग समजणें. आपण (स्वतः) ची षष्ठी आपला अशी होते पण सिंधींत नेहमींचाच प्रत्यय जो जी लागतो उ. पाणजो पुट्ठु.

पाणजो माण्हूं आहे = आपला (च) मनुष्य आहे. छांव = छाया = सांवली. सिंधी शब्द संस्कृतला अधिक जवळ आहे.]

जेड्डो तुंहिजो नांउं वाझ बि ओड्डियाई मडा
रे थंभे रे थूणिअ तूं छपरु तूं छांइ
कुजारो कहांइ तोखे मैलूम सभका (शहा लतीफ).

(ईश्वरा) जेवढें तुझें (तुंहिजो) नांव मोठें तेवढी कृपा सुद्धा (मी) मागतों.

खांबाशिवाय व खोडाशिवाय तूं छप्पर व छाया आहेस. (फार) काय सांगूं, तुला सर्वांविषयीं ज्ञान आहे.

[जेड्डो नांउं ओडियाई वाझ = जेवढें नांव तेवढी कृपा.
रे = ऋते. (म०) रें रें करीत परत आला. रें रें करूं नको.
थूणिअ = स्थूणा. थंभु = स्तंभ = खांब (अधिक परिणत).]

अल्लाह इएं म होइ जिअं आउं मरां बन्दमें
जुसो जंजीरुनिमें रातो डींहां रोइ
पहरीं वञां लोइ पोइ मरू पुजनमि डींहड़ां.

देवा असें न होवो कीं (ज्यामुळें) मी बन्धनांत मरेन;
(माझा) देह जंजाळांत (साखळदोऱ्यांत) रात्रंदिवस रडतो (शोक करतो);
प्रथम (मला) (स्व) लोकास जाऊं दे मग भले दिवस जावोत.

[आऊं = आं = मां = अहम् = मी : सिंधींत तीन शब्द आहेत.

पहिरीं प्रहर. म. पहिली वइली राम पहारा. अथवा प्रथम = पढमर = पहिमर = पहिरीं.

मरु = मृ = मरोत, मरूं दे, जाऊं देत, अशा लाक्षणिक अर्थाने.]

मरणा अगे जे मुआ से मरी थिअनि न माति
हून्दा से हयाति जिअणा अगे जे जिया

---

मराठींतही षष्ठीचा जा प्रत्यय आहे. उ. श्री रायाजा प्रधानु (नागांव शिलालेख – म. सा. प. व. १ अं १ पहा.) संपादक म. सा. पत्रिका

मरणापूर्वी जे मेले ते (पुन्हा)मरत नाहींत व कोणी त्यांना मारित नाहीं.
ते जिवन्त( सदा) रहातील, जे जीवनाच्या( ह्या जन्माच्या ) पूर्वी जिवन्त होते.
**तुकारामाच्या** 'आपुलें म्या मरण पाहिलें मी डोळां' ह्या वचनानुरूप वरील उद्गार आहेत.

[हयाती = हयात - गांवढळ - हैति( आहेत ऐवजी) जे, से = जे, ते.]

सभेई सुहागिण्यूं सभिनी मुंहं जडाउ
सभकंहि भांयों पाणखे ईंदो मूं धरि राउ
पेठो तिनि दरांउ जे पसीं पाण लजा इयूं

सर्व सुवासिनी आपापलीं मुखें (अलंकारांनी) जडवून (बसल्या). सर्वांना मनांत वाटलें आपल्या घरांत राजा ( प्रियकर ) येईल. घरांत प्रतीक्षा करीत बसल्या. जेव्हा त्याला ( आलेला ) पाहिलें ( तेव्हा ) त्या मनांत लज्जित झाल्या.

[सुहागिण्यूं = सुभागिनी = सुहागिणी—ण्यूं ( अनेकवचन ).
दरांउ = दुर् = घर. म. दार.
मुंहं = मुख. जडाउ = जडवून, जडावाचे दागिने जइ = घट (सं.)]

वरील उताऱ्यांवरून मराठी व सिंधीचा सापेक्ष संबन्ध काय आहे ह्याची बरीच कल्पना येईल. आता क्रियापदें, नामें विशेषणें इत्यादिकांत जेथें विशेष साम्य आहे तीं उदाहरणें पाहूं.

### क्रियापदें

उघु (पुसणें) उगा, उगा ( सं. वह् )- ओघळ डोळे पुसण्याच्या क्रियेवरून सान्त्वनपर अर्थ पडला आहे.

चंबुडु=जवळ चिकटणें; चुंबळ, चंवड-चंवू ( गवाळें ).

चुघु=भोंक पाडणें; चघळ (छिद्रान्वेषी) चूक (खिळा).

चुणु चूण पाडणें.

चुमु मुका घेणें-चिमा (नांव)सं. चुम्ब.

बकु बडबडणें—**बकबक** फार करूं नये.

(कारक) बुझु (बुध्)=समजणें. बुझावूं शकेना विधाता तयाला

भञु भुञु ( भञ्ज् ) भडभुंजा (फोडणें, भाजणें).

मुँजु=धाडणें, मुंज (उपनयन) गुरुगृहीं धाडणें. सं. मुंजा = गवत.

बिहणु, (उभे रहाणें) कारक (बिहारणु) उभारणें. मूळ क्रिया० उभणें असावें.

लुणु (लू) शेत कांपणे- लोण (आट्या-पाट्यांतील). लवण ह्या शब्दाशीं संबन्ध नाहीं.

सुण्कु सिण्कु=शिंकरणें, बाळ **सूंकर इं.** स्नीझ नाकांतील आवाजावरून शब्द बनला असावा.

वचुडु गुंतविणें, गुंफणें; बुचडा.

कशणु (कृष्) ओढणें, कसणें ( जमीन नांगरणें). सिंधींत मूलार्थ कायम आहे. मराठींतहि कसून मेहनत करणें ह्यांत मूलार्थ सापडतो. त्याने **खसकन** दोरी ओढली

ह्यांत कृष् व वह् दोन्ही क्रियापदें विशेष जोर दाखविण्यासाठीं योजिलीं आहेत.
खांइणु=जळणें जाळणें; खाईंत टाकलें
लिको (भूतभूतकाळ) लपलेला. कोंकणांतील लिकणें
चखणु चाखणें, रुचकर लागणें
छाडपनुं ( छिद् का. ) झडपणें
छाड़प झडप
झलणुं झेलणें
मुर्किणो मुर्का मारणें
छुहु (स्पृश्)— शिवणें
मोट़णुं मोटी—मोडणें, मागें वळणें नागमोडी

संयुक्त क्रियापदें.

खाई वठु जलदी खा, खा—ऊठ
करे सघणु करूं शकणें
पड़हंदो रहणु पढत (शिकत) रहाणें
करण लग़णु करूं लागणें

नकारवाचकशब्द

अण (ड़िठो) = अ + दृष्ट ( दैव )
ना ( चङो )= न चांगलें ( वाईट ) नाचक्की
अ ( धर्मी ) = अधर्मी
नि ( भागो ) = अभागी
बे ( गुणो ) = विगुर्णा, वे (अकल)
ला (चारु) = लाचार (चारो=उपाय)
रे (कमो)= रि + ( कामा )

नामांपासून विशेषणें

को प्रत्यय (सं.इक) हाणे — हाणे+को (हल्लींचा) म. (दिड+का) दीड + का म. दीड पायाचा)
कारा-कारा+इतो कराईत (उपयुक्त)

डंदि + ( रु ) दंता + डा सं शरा + रु
पुजा + रो पुजा +री
पिंजा + रो पिंजा + री

भाववाचक नामें

चङो चङाई, -चांगुलपणा, महागाई, शिलाई, स्वस्ताई
घटि ( कमी ) ताई कम+(ताई) घटत
साधुपणु, पणो साधूपण, साधूपणा
माण्हूं—( मनुष्य ) माणुसपण, पणा
माण्हि + पी, + पो,
+ पाई + पणो पणु

तद्धित शब्द कर्तृवाचक

मेहि ( म्हैस ) मेंह्युनिवारो म्हैसवाला, गोवारी
लोहु ( लोह ) लुहरु लोहार
धणु ( धन् = धांवडविणें) = धन ( गो ) धन + रु अक्षरांच्या उलटापालटीने धन ( गो ) रु = धनगर
धनारु = गुराखी

क्रियाविशेषणें

मस, मसें, मसां } कष्टानें म. मस = पुष्कळ श्रमाने
ओचितो अवचित.
भेरे भेरे ( भेरो = काळ ) नेहमी, सतत
भैरव व काल = म. (काल)
भैरव ह्यांचें तादात्म्य झालें आहे
=भिरीथिरी हिंडतो
मुखामुखी तोंडातोंडी

अव्ययें वगैरे

एवजि ऐवजी
साम्हुणे सामने

माझ्या सामने येऊं दे बोलायाला

| | |
|---|---|
| बदिरि | बदली |
| लगि लगे | लागीं |
| भर = | वर . भरीला आणखी पाहुणा घेऊन आला आहे गिळायला |
| कोन ( कोऽन्यः ) | कोण-कौन(हिंदी) —गांवढळ कोन |
| जेकर | जर करून |
| पिणि पुणि वि, पि | मी पण (पुन्) वि जाईन |
| नत | नातरि (नाहींतर) |
| सूधां | पर्यंत; आजसुद्धा पूर्व-वैभवाची साक्ष तेथें पटते. |

उद्गारबोधक

छि छा हुं ( नापसंती दर्शक ) छे छे ! हेड

| | |
|---|---|
| थू | थू |
| मरु | वा मारु काम केलेंत |
| भली | भले |
| वाहु | वाहवा |

अपशब्दांतही वैदिक कालचा कृदन्त शब्द सा कायम आहे.

भेण ( बहिण ) सां वै. गोऽसा, अश्व-ऽसां ( धियम् ). मराठींतील भान-चोदाचा भेणसां हा भाऊ आहे.

फक्त सन् ऐवजी चुद् वापरला आहे. पण लवंडिसां ह्यांत सन् (जिंकणें, मिळविणें) कायम आहे.

नात्याचे शब्द

| | |
|---|---|
| ससु ( श्वश्रू ) | सासू |
| नुंहु ( स्नुषा ) | सून |
| आई | आजी. आई तरुण |

असल्यामुळे उत्तर सिंधांत आजीला उद्देशून हा शब्द वापरतात. मराठींतही पुष्कळ ठिकाणीं तसा उपयोग करितात.

| | |
|---|---|
| भाणेजो ( भागिनेय ) | = भाचा |
| पुटु (पुत्र) | = पूत (मायेचा) |
| जाट्रो (जामातृ) | = जांवई |
| बापु | बाप |

हा शब्द कानडींतूनच आला हें म्हणणें टिकणार नाहीं.

| | |
|---|---|
| भाभी | भावजय |
| भाव | भाऊ |
| संडु | साडू |

जुना वर्तमानकाळ

असणुं (अस्)

| | १ एकवचन | वहुवचन |
|---|---|---|
| प्र. पु. | आह्यां (अस्मि प्रा.) | आंहूं |
| द्वि. पु. | आहीं | आह्यो |
| तृ. पु. | आहे | आहिनि |

मराठीशीं ह्याचें विलक्षण साम्य आहे.

सिंधींत सामान्य वर्तमानकाळ थो थी (पु. व स्त्री. १ वचन) व था, थ्यूं ( अनेकवचन ) लागून होतो. मराठींत तो ते, तें, व तों, तां, तात असे भिन्न प्रत्यय लागतात. सिंधींत नपुंसक लिंग नाहीं.

गांवढळ मराठींत स्त्रीलिंगी प्रत्यय ईकारान्तच ( सिन्धी थी प्रमाणें ) असतो हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

उ. ती जाती (जाते ऐवजीं ). मी बसतीं ( बसतें ). भूतकाळ व भविष्यकाळ यांचे प्रत्यय भिन्न आहेत. उ.

सुभाणे मिहु वसे जान वसे परिहँ त वसंदो
उद्या मेघ वर्षेल वा न वर्षेल, परवा तर वर्षेलच.
जे मार्यो थो सपखे त पापुथो थिएमि अँउँ जे न यो मार्यो त डंगेमि थो.
जर सापाला मारावें तर पाप लागतें आणि जर न मारावें तर डसतो.

वर्तमानकालीन थो थी वगैरे क्रियापदाच्या पुढे अगर मागे येवूं शकतात, व क्रियापदापासून ते पृथक् लिहिण्याची वहिवाट आहे.

लुंडु लवंडा ( महिना )
लुण्ठ् लुण्डा ( कान )
लंगडें असणें रिकामे असणें चोरणे
चपुटि चिमुट (चञ्चूपुट)
अछुत अस्पृष्ट = स्वच्छ
बभूत विभूति (देवाचा अंगारा)
वड़वर वरव्रत; वडवतें (वटसावित्री पूजेसंबंधीं.)
वींढो नथ (वेढणें)
मोठ्या नथीला नथच शब्द आहे.
हंध हंत (रूण)
जणी स्त्री; सातजणी ( जनी )
आर ( आरि ) आरी पराणी
वैदिक आरा=दाभण, चाबकाचें लोखंडी टोंक
लुध्रो (√ लभ् + रो) लुव्रा (मनुष्य)
झमठमल्ल कमठमल्ल ( कूर्मावतार ) एक नांव
पखाल ( पयस्खल. ) पखाल
निलो ( नील=आकाश ) निवळ
गचु पूर्ण, गच्च
बिन्द्रो ( विद्रूप ) बुद्रुक, ठेंगू
ढोल्यो (स्थूल) ठोल्या (जार) प्रियकर ह्या अर्थीहि उपयोग.
तिखी काती (कर्द) तिखट (तीक्ष्ण) चाकू
फोटो ( स्फोट ) बुडबुडा; फुटणें ह्या क्रियापदाशीं साम्य.
सवा ( १। ) सवा
सिरापु (शाप) श्राप ( शराप )
जाचे परीक्षा करून चांचणी
वैरागी ( वेरग्ग प्रा. ) वैरागी
जत्ता ( यात्रा ) जत्रा
पथरु (प्रस्तर) दगड, पाथरवट, पत्थर
संड्सारु संवसार
अंगारु अग्नि–इंगळासारखे डोळे
जिति तिति जेथें तेथें
जिंअ तिंअ यदा तदा
पुरुसु पुरूष
गुरो (गुरु) जड; गार झालों भाषण ऐकून
सेणु शेणा शहाणा (स्नेही, सणेह) मूळ अर्थ स्नेही
रिणु (इरिण) रान (ओसाड प्रदेश)
पीजु (पेय) पेज
पुठि ( पुष्टि ) ( अगर पृष्ठ ) सत्ता त्याच्या पुठ्यांतील आहे तो. ह्यांत हातांतील, ताब्यांतील असाही अर्थ संभवतो.
डब्लु ( दुर्बळ ) दुबळा
ढापणु (तृप्त होणें) ढ्इणु (तृप्त करणें) म. ढइ+कर=ढेंकर

प्राकृतप्रमाणेच सिंधीमध्ये पुष्कळ स्वर एकत्र आले तरी संधि होत नाहीं. एकत्र आलेल्या स्वरांत वेगळेपणा रहावा म्हणून सिंधी लोक अनुस्वारांचा भरपूर उपयोग करतात. एकंदरींत नाकांतून बोलण्याची लकब आढळते. **रत्नागिरींतील** मराठी-पेक्षाही अनुस्वार सिंधी शब्दांत अधिक सांपडतील.

| | |
|---|---|
| सुखा–सुखांउं ( अनेकवचन आउं ) | व्रतें निश्चय |
| गंउं ( गउ ) | गाय ( गौ ) |

शब्दाच्या शेवटीं दीर्घ स्वर आल्यास जोर देण्यासाठी.

| | |
|---|---|
| प्रीं ( प्रिय ) | मित्र |
| भूं | ( भू ) भूमि |

सिंधी ही प्राकृताला मराठी पेक्षां बरीच जवळ आहे. सामान्यपणें **ज्ञानेश्वरीं**-तील मराठी व आजची शुद्ध सिंधी ह्या उभयतां एकाच पायरीच्या भाषेच्या उत्क्रान्तीच्या दृष्टीने उतरतील असें वाटतें.

हल्लींच्या मराठींत पुष्कळ तत्सम संस्कृत शब्द घेतल्यामुळे जुने तद्भव व देशी शब्द मागे पडले. परन्तु सिन्धी बोलणाऱ्या लोकांचा संस्कृताचा व्यासंग जवळ जवळ १००० वर्षें कायमचा तुटल्यामुळे तद्भव शब्द कायम राहिले आहेत.

देवनागरींत सिन्धी लिखाण सुरू झाल्यास कित्येक शतकें परस्परापासून विभक्त होऊन भेटलेल्या भगिनीप्रमाणे ती मराठीस दिसेल ह्यांत नवल नाहीं.

देवनागरींत लिहिलेलीं क्रमिक पुस्तकें हल्ली कांही संस्कृत पाठशाळांतून व मुलींच्या शाळांतून सुरू आहेत. शिक्षणखात्याने मुलींच्या प्राथमिक शिक्षणांत देव-नागरीचा उपयोग करण्याची संमति दिली आहे. परन्तु जोंपर्यंत हायस्कूलच्या अखेरच्या परीक्षेंत आरबी लिपीच सिन्धी भाषा लिहितांना वापरावी असा निर्बन्ध आहे तोंपर्यंत देवनागरीस उत्तेजन मिळणें कठीण दिसतें. सिन्धमधील ब्राह्मणवर्ग तर तिला म्लेञ्छ भाषा समजतात. कांही लोकांच्या मतें हिन्दी हीच मातृभाषा म्हणून शिकवण्यांत यावी. कारण सिन्धी शिकून मनुष्य पिंजऱ्यांत पडल्याप्रमाणे होतो. एकन्दर सिन्धी बोल-णाऱ्यांची संख्या अवघी ३० लक्ष त्याहे व तिच्यांत नांव घेण्यासारखें वाङ्मय जवळ-जवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. विश्वविद्यालयांत मराठी व इतर मातृभाषांबरोबर तिला स्थान मिळाल्यामुळे मॅट्रिकपासून एम्. ए. च्या परिक्षेपर्यंत पुस्तकें नेमणें कठीण झालें आहे. जें पुस्तक बी. ए. ला नेमतात तें विशेष आडचणीशिवाय इंग्रजी पांच-वींतील मुलगा वाचूं शकतो. तथापि आजचा काळ मातृभाषांच्या उदयाचा असल्या-मुळें अभिमानाखाली असले प्रकार झाकले जातात. भाषेची प्रगती होण्यास प्राकृत व संस्कृतचें ज्ञान अवश्य पाहिजे. त्याचा सबंद परीक्षांच्या उद्देशपत्रिकेंत कोठेच निर्देश केला नाहीं. सिन्धी भाषा घेऊन विद्यार्थी थोडया श्रमाने परीक्षांच्या चरकांतून बाहेर पडतात ह्याच एक फायदा दिसतो.

मराठीप्रमाणे हिचा गुजराथीशींही निकट संबन्ध आहे. दोन्ही शौरसेनी प्राकृत पासून निघाल्या आहेत असा तर्क आहे.

मराठी भाषेचा सांगोपांग अभ्यास करणारास सिन्धी भाषेच्या व्याकरणाचें व वाङ्मयाचें सामान्य ज्ञान उपयोगी पडेल असें वाटतें. कांहीं मराठी शब्दांची व्युत्पत्ति सिन्धीच्या मदतीने होते हें दर्शविलें आहे. विशेष अभ्यास केल्यास असे कित्येक शब्द सहज उलगडतील.

---

# अभिप्राय

**सुशीलेचा देवः—** [ ले. वा. म. जोशी, एम्. ए. हिंगणें. किं. २ रु. ] श्री. वामनरावजींची रत्नाकरांत प्रथम प्रसिद्ध झालेली ही कादंबरी त्यांच्या इतर कादंबऱ्यांप्रमाणेंच वाचनीय झाली आहे. कादंबऱ्या ह्या औषधाच्या अनुपानाप्रमाणें असतात. शर्करावगुंठित क्विनीनची गोळी रोग्याला दिली तर प्रकृतीच्या मानाला अनुसरून हितावहच होईल. उलट मधुपदार्थान्वित विषारी पदार्थ कोणास खावयास दिल्यास तो माणसाचें जीवनच हिरावून घेईल.

श्री. वामनराव जोशी यांच्या कादंबऱ्या समाजाचें नैतिक व बौद्धिक ओज वृद्धिंगत होईल अशा प्रकारच्या असतात. सुशिलेचा देव ही एक साधी गोष्ट आहे. कथानक सरळ व साधें असल्यामुळें रचनाकौशल्याला फारशी त्यांत वाव नसणें स्वाभाविक आहे. सुशिलेसारखीं सर्वच माणसें लहानपणीं दगडाला देव मानतात. तसेंच सर्वच माणसांत बाल्यावस्थेंतील देवविषयक भावना प्रौढपणीं अवस्थांतर पावते. बाल्य, तारुण्य व वार्धक्य या तीनहि अवस्थांत मनुष्य जसा एकच असतो त्याप्रमाणे विचारी माणसांत देवाविषयींच्या कल्पनांत जरी फरक पडलेला दिसला तरी आस्तिक्यबुद्धि तीच असते. सुशिलेच्या वरपांगी नास्तिकपणाचा अनुभव प्रत्येक विचारी माणसाला येत असतो. सुशिलेच्या वार्धक्यापर्यंत कादंबरीकारांनी आपणांस नेऊन न पोचवल्याकारणाने शिक्षणोत्तर प्राप्त झालेल्या तिच्या देवविषयक कल्पना आणखी रूपांतर पावल्या की नाही हें समजण्यास मार्ग नाही. पण परिणतावस्थेंत विचार परिणत होतात अथवा शरीराप्रमाणेच जीर्ण होतात यांविषयी तरी एकवाक्यता आहे काय ?

राघवा, सुनंद, बळवंतराव व सुशीला यांच्याभोवती ह्या कादंबरीचें कथानक गुरफटलेलें आहे. सुशीला अर्थात् मुख्य व्यक्ति असून बाकीच्या गौण आहेत. तिचें लग्न प्रथम राघवाबरोबर होऊन तो मेल्यावर बळवंतरावाशीं तिचें पुनर्मिलन झालें आहे. तेव्हां या तीन व्यक्ती कथानकाशीं निगडित आहेत. पण सुनंदाला या प्रभावळींत स्थान न मिळाल्यामुळें तो आगांतुकासारखा वाटतो. राघवाची अथवा बळवंतरावांची

बहीण त्याला देऊन रम्य चौकडा बनवितां आला असता असें वाटतें. स्पेन्सरच्या शिकवणुकीच्या कैचींत वाढलेला रावबा व्यसनी निघाला तो कां ? का सुशीलेचा पुनर्विवाह लावण्याची संधि हवी होती म्हणून व्यसनाच्या निमित्ताने तत्सत करणें भाग पडलें ? रावबाच्या वर्तनांत व शीलांत जो बदल पडत चालला तो कोणत्या कारणांनी हें कोडें सोडविणें मनोवेधक होईल. रावबा बदफैली होता कीं, रूपा(बाई)-सक्त होता हें गूढ उकलण्याचाहि कित्येक प्रयत्न करतील. पण त्यांत कितपत यश येईल तें सांगतां येत नाहीं. विषयासक्त पुरुषाने अनेकस्त्रीगमन केलें तर त्यांत आश्चर्य वाट-ण्याचें कारण नाही. पण तो जेव्हा एखाद्या रूपविहीन व असंस्कृत स्त्रीवर फिदा होऊन आपल्या सुशील, नीतिमान, स्वरूपवान व सुशिक्षित स्त्रीचा त्याग करण्यास प्रवृत्त होतो तेव्हां हे मदनाचे चाळे वेडयापिशाच्या चाळयासारखे वाटतात. सुशीलेपेक्षा हा रावबाच वाचकांना बुचकळ्यांत पाडील. असो.

खैबर घाटांतून रशियाने हिंदुस्थानावर स्वारी करण्याची धास्ती नसली तरी विश्वकुटुंब वादाच्या स्वारीची धास्ती सांप्रत सर्वांस वाटत आहे. आपल्या कादंबरीची नायिका रा. वामनरावांनी विश्वकुटुंबवादी बनवून या वादाचा पुरस्कार केला आहे तो सर्वथैव युक्तच आहे. या पुस्तकांत सुविचारांचें पेव फुटलेलें दिसतें. अविवाहित तरुण-तरुणींनी एकांतांत राहणें धोक्याचें आहे असा सुशिलेने कबूलजबाब दिला आहे. " आपणहि कदाचित् उच्च भूमिकेवरून च्युत झालों असतों. झालों नाहीं याचें श्रेय आपल्या संयमाकडे जेवढें आहे तेवढें दैवाकडे आहे हें तिने स्वतःशीं कबूल केलें. " असो. गंभीर विचार गोष्टींतून सामान्य वाचकांपुढे ठेवले तरच त्यांचा प्रसार होण्याचा संभव असतो. अशा दृष्टीने " सुशीलेचा देव " या सारख्या कादंबऱ्या मोठेंच कार्य करूं शकतात.

**मनमोहनः**— ( वर्ष १ अंक ६. संपादक - म. कृ. अभिषेकी. वार्षिक वर्गणी ट. खर्चासह २ रुपये. ) गोमंतकांत मंगेश येथे राहणारे श्री. अभिषेकी यांच्या संपा-दकत्वाखालीं हें मासिक निघत असतें. ठिकठिकाणीं मासिकें निघून त्यांच्या द्वारा लोकांस शिक्षण मिळणें अवश्य आहे. या मासिकांतच " किन्नरलोक " यावर एक उत्तम लेख असून " राधा-विलाप " ही कविता प्रसादयुक्त व करुणरसयुक्त अशी आहे. अंक त्यामुळे वाचनीय झाला आहे.

**स्वातंत्र्ययुद्धाचीं नीतितत्वें**:— ( ले. श्रीयुत रामराव जोतिराव शिंदे. किं. १॥ आणा. ) या पुस्तकाच्या द्वारें श्री. शिंदे यांनी सत्याग्रहाचे जनक व प्रव-र्तक महात्मा गांधी यांच्या अनत्याचारी तत्वासंबंधाचीं महावाक्यें त्यांच्या भाषणांतून व लेखांतून निवडून व संकलित करून लोकांपुढे मांडलीं आहेत. हा वचनसंग्रह प्राथमिक शाळांतून अवश्य लावण्यासारखा आहे. श्री. शिंदे यांनी प्रशंसनीय असें राष्ट्रीय कार्य केलें आहे. कारण मुलांनी या पुस्तकाचा अभ्यास केल्यास पुढली पिढी अधिक ओजस्वी होईल असा आम्हांस भरंसा वाटतो.

# प्रो. भानूंची एक शंका.

(लेखकः— वैद्यपंचानन कृष्णशास्त्री कवडे.)

शके १८५० च्या मकरसंक्रांतीच्या महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या अंकांत प्रो. भानूंनी आपली 'एक शंका' प्रसिद्ध करून सर्व लहान मोठ्या धन्वंतऱ्यांस वाग्युद्धास आव्हान केलें व शके १८५१ च्या विजयादशमीच्या अंकांत 'ज्ञानतंतुव्यूह' या मथळ्याखालीं लेखावली सुरू करून ही लेखावली पूर्ण झाल्यानंतर ही शंका सोडविण्याची किंवा या लेखांतील सिद्धांत खंडण्याची कृपा करावी अशी विनंती केली. परंतु शके १८५१ च्या मकरसंक्रांतीच्या अंकांतील या लेखावलींतील लेख प्रसिद्ध झाल्यानंतर प्रो. भानू हे आकस्मिकपणें इहलोक सोडून गेले. यामुळें ही लेखावली जरी असंपूर्ण असली तरी यापुढें ती पूर्ण होण्याचा संभव नसल्याने त्यांनी प्रसिद्ध केलेली शंका व त्या निमित्ताने प्रकट केलेली मतें यांचा विचार करण्याचें योजिलें आहे.

## शंकोद्भव व शंकासंभव.

"तैत्तिरीयोपनिषदाचें मराठी भाषांतर करीत असतां शिक्षाअध्यायांतील ६ व्या अनुवाकाच्या पहिल्या मंत्रांतील शब्दसमूहानें मला अडविलें व हृदयाचें स्थान वक्षःस्थलाजवळ आहे अशी इतरांप्रमाणे माझी समजूत खोटी असून उपनिषदुक्त हृदय मस्तकांत आहे असें मला वाटूं लागलें." असें प्रो. भानू म्हणतात. याप्रमाणें प्रो. भानूंच्या हृदयांत जरी शंका सहज अंकुरित झाली असली तरी वे. शा. सं. गंगाधरशास्त्री जोशी यांच्यासारख्या 'चांगल्या व्युत्पन्न व वैद्यकांत निष्णात असलेल्या' धन्वंतऱ्यांच्या प्रश्नाने व त्यांनी केलेल्या साहाय्यानेच तिला व्यक्त स्वरूप प्राप्त झालें, असें त्यांनी आपल्या लेखांतच स्पष्ट म्हटलें आहे. ह्या धन्वंतऱ्याच्या साहाय्याने झालेला शंकासंभव अर्थातच छिन्नभिन्न असा झाला आहे. आणि याच कारणाने प्रो. भानूंची शंका काय आहे हेंच वाचकांस समजेनासें झालें आहे.

## शंकासंभ्रम

"पौरस्त्य आर्यांस Nervous System ठाऊक होती किंवा नाहीं हा माझा शंकामूलक प्रश्न आहे" असें लेखाच्या प्रारंभीं प्रो. भानू म्हणतात. व शंकेचा उद्भव कसा झाला हें सांगतांना 'उपनिषदुक्त हृदय मस्तकांत आहे असें मला वाटूं लागलें' या वाक्याने हृदयाच्या स्थानाविषयीं शंका व्यक्त करितात. आणि शंकालेखाच्या अंतीं 'हृदय मस्तकांत आहे आणि उपनिषदांतील नाड्या ह्या बहुतेक Nerves होत ही शंका बद्धमूल झाली' असें म्हणतात! दुसऱ्या लेखांत शंकितांची भूमिका सोडून "उपनिषदुक्त हृदय शब्दाचा अर्थ मनवाचक, ज्ञानवाचक आहे" व हृदय हें मस्तकांत असलें पाहिजे," "प्राचीन आर्ष तत्त्वज्ञांस ज्ञानवाहक व कर्मप्रेरक नाड्या माहीत होत्या, त्यांस Nerves माहित होत्या" असा सिद्धांत प्रतिपादितात; आणि तिसऱ्या लेखांत "दशोपनिषदादि प्राचीन ग्रंथ व तत्समकालीन इतर शास्त्रीय ग्रंथ हे वाचतांना 'हृदय' म्हणजे केवळ वक्षांतर्गत अवयव नव्हे, 'नाभि' म्हणजे केवळ बेंबी नव्हे" असें प्रतिपादन करितात. या विधानावरून भानूंची शंका कोणती हेंच समजत नाहीं. कारण "पौरस्त्य आर्यांस Nervous System ठाऊक होती किंवा नाही हा माझा शंकामूलक प्रश्न आहे" या प्रश्नावरून याविषयीं त्यास शंका आहे असें मानावें तर "प्राचीन आर्ष तत्त्वज्ञांस ज्ञानवाहक व कर्मप्रेरक नाड्या माहीत होत्या, त्यांस Nerves माहीत होत्या असें माझ्या मनानें ठरवें"

असें ते दुसऱ्या लेखांत म्हणतात! बरें, हृदयाच्या स्थानाविषयीं प्रो. भानू यांस शंका आहे असें मानावें तर "उपनिषदुक्त हृदय मस्तकांत आहे" व "दशोपनिषदादि प्राचीन ग्रंथ व तत्समकालीन इतर शास्त्रीय ग्रंथ हे वाचतांना हृदय म्हणजे केवळ वक्षःस्थलांतर्गत अवयव नव्हे" असें ते निःसंदेहपणें प्रतिपादन करितात! नाभि शब्दाच्या अर्थाविषयीं त्यांस कांहीं शंका आहे असें समजावें तर "नाभि म्हणजे केवळ बेंबी नव्हे" असे ते निःशंकपणें सांगतात. यामुळें प्रो. भानूंस शंका तरी कशाची वाटते असा वाचकास प्रश्न उत्पन्न होऊन तो गोंधळून जातो. भानूंच्या लेखावरून तरी त्यांस शंका असेलसें दिसत नाही. पण त्यांच्या लेखांनी मात्र वाचकांच्या मनांत निरनिराळ्या शंकांचा गोंधळ उत्पन्न होण्याचा संभव आहे. म्हणून त्यांच्या लेखांचा परामर्श घेणें आवश्यक झालें आहे.

वेदकालीन मंत्रद्रष्ट्या ऋषींस 'Nerves (ज्ञानतंतू)' ही वस्तु ठाऊक होती कीं नाही याचा निश्चय कशावरून करावयाचा? तर हल्लीं विद्यमान असलेल्या वैद्यक ग्रंथांच्या टीकांवरून! वेदकालीन मंत्रद्रष्ट्या ऋषींस Nerves (ज्ञानतंतू) माहीत होते कीं नव्हते हें त्यांच्या मंत्रांवरून ठरवावयाचें नाही एवढेंच नव्हे तर तें तत्कालीन ग्रंथांवरूनहि ठरवावयाचें नाही. या अनुमानाच्या जोरावरच त्यांनी सर्व धन्वंतऱ्यांस जो नम्र पण जोराचा सवाल केला आहे तोही विचारणीय आहे. 'प्रचलित आकृति-विज्ञान-शारीरामधून (Anatomy) अथवा प्रकृति-विज्ञान-शारीरामधून (Physiology) Nervous System सारखी पाश्चात्य प्रणाली प्रसिद्धपणें काढून दाखवावी आणि जर कदाचित् महाप्रयत्नांतीं हल्लींच्या वैद्यकांत ती सापडतच नसेल तर ज्ञानोद्गमाचा आद्यंत शोधून काढणाऱ्या सर्वज्ञकल्प मंत्रद्रष्ट्यांसही Nervous System चा पत्ता लागला नव्हता असें प्रांजलपणें कबूल करावें.' प्रो. भानू यांचें हें

## शंकामूलक आह्वान

वाचून कोणासही हसूं आल्यावांचून राहणार नाहीं. प्रचलित आकृति-विज्ञानांत अथवा प्रकृति-विज्ञान-शारीरांत Nervous System सारखी प्रणाली आढळत नाहीं असें क्षणभर गृहीत धरलें तरी त्यावरून फार तर प्रचलित वैद्यकग्रंथांच्या कर्त्यांस ही प्रणाली माहीत नव्हती असें म्हणतां येईल. वेदकालीन सर्वज्ञकल्प मंत्रद्रष्ट्यांसही Nervous Systemचा पत्ता लागला नव्हता असें कसें म्हणतां येईल? वेदकालीन मंत्रद्रष्ट्या ऋषींस ज्ञाननाड्यांचें ज्ञान होतें कीं नाहीं याचें अनुमानच करावयाचें झालें तर तें त्यांच्या मंत्रांवरून अथवा वेदकालीन वाङ्मयावरून केलें तर कदाचित तें बरोबर होईल. पण हल्लीं प्रचलित असलेल्या वैद्यक ग्रंथांतील ज्ञानावरून सर्वज्ञकल्प मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या ज्ञानाचें अनुमान करणें सर्वस्वीं चुकीचें होणार आहे. म्हणून प्रो. भानूंच्या या नम्र पण जोराच्या सवालास कोणीही लहान मोठा धन्वंतरी तितक्याच नम्रतेने पण जोराने असें उत्तर देईल कीं अशा प्रकारचें आह्वान स्वीकारून तर्कशास्त्रविरुद्ध सिद्धांत मांडून आम्ही आपलें हसें करून घेण्यास तयार नाहीं. हल्लींच्या वैद्यकग्रंथांत ज्ञानसंवहन व कर्मप्रचोदन यांविषयीं विचार केलेला आहे कीं नाहीं व असल्यास तो कशा प्रकारचा आहे असा सरळ प्रश्न केल्यास त्याचें उत्तर देतां येईल. वैद्यक ग्रंथांतील या प्रश्नाविषयींच्या वर्णनावरून वेदकालीन सर्वज्ञकल्पमंत्रद्रष्ट्या ऋषींच्या ज्ञानाविषयीं अनुमान करूं लागल्यास तें कोणासही मान्य होणार नाहीं.

## शंकेचें उगमस्थान.

"तैत्तिरीयोपनिषदाचें मराठी भाषांतर करीत असतां शिक्षाअध्यायांतील ६ व्या अनुवाकाच्या पहिल्या मंत्रांतील शब्दसमूहानें मला अडविलें" असें प्रो. भानू म्हणतात. पण 'स य एषोऽन्तर्हृदय आकाशः। तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः। अमृतो हिरण्मयः। अंतरेण तालुके। य एष स्तन इवावलंबते। सेंद्रयोनिः। यत्रासौ केशान्तो विवर्तते॥ व्यपोह्य शीर्षकपाले॥' या शब्दसमूहांत अडविणारें काय आहे हेंच समजत नाही. उपनिषत्कालीन हृदय हल्लींच्या हृदयाहून भिन्न असावें असें अनुमान करण्यास या वचनांत काय आहे याचा खुलासा त्यांनी आपल्या लेखांत केला असता तर बरें झालें असतें. प्रो. भानू हे स्वर्गस्थ

झाल्यामुळें त्यांचा खुलासा आता आम्हांस तरी मिळणें शक्य नाहीं. म्हणून या शंका-समन्वाचे कामीं त्यांस पूर्ण साहाय्य करणाऱ्या व त्याच्यासाठीं वेदोपनिषदाचें आलोडन करणाऱ्या वैद्यवर्य गंगाधरशास्त्री जोशी यांस याविषयीं खुलासा करण्याची विनंती केली होती. परंतु त्यांनीहि तो करण्याचें नाकारलें. अर्थात् या वचनांतील कोणत्या शब्दावरून हृदयाचें स्थान मस्तकांतच असलें पाहिजे असें जोपर्यंत कोणी प्रतिपादन केलें नाहीं तोपर्यंत याविषयीं विशेष लिहितां येत नाहीं

## भानूंचीं भ्रमोत्पादक विधानें.

" हृदयापासून अनेक सहस्र नाड्या निघतात व तेथें ५ सुषिरें ( पोकळ्या ) आहेत असें कित्येक उपनिषदें स्पष्ट म्हणतात " असें म्हणून प्रो. भानू आपल्या समर्थनार्थ कठ, छान्दोग्य, प्रश्न, बृहदारण्यक, मुंडक या उपनिषदांतील वचनांचा उल्लेख करितात. परंतु 'तेथें' म्हणजे हृदयांत ५ सुषी ( सुषयः ) असल्याचा उल्लेख दशोपनिषदांपैकीं फक्त छान्दोग्य उपनिषदांतच आलेला आहे. हृदयापासून नाड्या निघतात असें मात्र अनेक उपनिषदांत स्पष्टपणें सांगितलें आहे व तें कोणासही मान्य आहे. **हृदयांतील पांच सुषींचा** उल्लेख मात्र दशोपनिषदांपैकीं छान्दोग्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपनिषदांत आलेला नाहीं. 'तस्य ह वा एतस्य हृदयस्य पञ्च देवसुषयः' या छान्दोग्योपनिषदांतील वचनांत उल्लेखिलेल्या पांच सुषी म्हणजे प्राण, अपान, व्यान, उदान व समान वायूंचे पांच मार्ग होत. या वचनाशिवाय 'हृदयान्तर्गते सुषौ' असा एका सुषीचा उल्लेख मैत्र्युपनिषदांत आला आहे. पण तेथें 'सुषौ' असा एकवचनात्मकच उल्लेख आहे. **या पांच पोकळ्या मस्तकांतील मेंदूमध्ये आहेत, वक्षःस्थळाजवळ दाखविल्या जाणाऱ्या हृदयांत पांच पोकळ्या नाहीत."** असें प्रो. भानू म्हणतात. परंतु त्यांचें हें म्हणणेंही त्रिकालाबाधित सत्य नाहीं. **ज्या अर्थानें मस्तकांतील मेंदूमध्यें पांच सुषी ( छिद्रें अथवा पोकळ्या ) आहेत असें म्हणतां येतें त्याच अर्थानें वक्षःस्थळाजवळील हृदयांतही पांच पोकळ्या आहेत असें म्हणतां येतें.** म्हणून हृदयाचें स्थान मस्तकांतच आहे असें या प्रमाणावरून तरी म्हणतां येत नाहीं.

## आत्म्याचें व मनाचें स्थान हृदय.

आत्म्याचें व मनाचें स्थान हृदय आहे असें प्रतिपादन करणारीं हवीं इतकीं वचनें देतां येतील. त्याचप्रमाणें हृदयापासून अनेक नाड्या निघाल्या आहेत असें प्रतिपादन करणारीं वचनेंही उपनिषदांत हवीं इतकीं आहेत हें कोणासही मान्य करावें लागेल. परंतु यावरून हृदयाचें स्थान मस्तकांत आहे असें कसें सिद्ध होणार ? आत्म्याचें व मनाचें स्थान हृदय आहे असें जरी प्रतिपादलें असलें तरी त्याचा अर्थ हृदयाव्यतिरिक्त स्थलीं आत्मा व मन नसतें असें नाहीं. आत्मा व मन हीं सर्वशरीरव्यापी आहेत; आणि हीं दोन्ही शरीरव्यापी असलीं तरी त्यांचें म्हणजे आत्म्याचें व मनाचें स्थान प्रामुख्यानें हृदय आहे असाच या सर्व वचनांचा मथितार्थ आहे. हृदय हेंच मनाचें स्थान असल्यानें मन या अर्थानें हृदय शब्दाचा उपयोग अनेक स्थलीं करण्यांत आला आहे; त्याच कारणानें अमरकोशकारांनीं हृदय शब्दाचे दोन अर्थ दिले आहेत.

## हृदयाचें स्थान

हृदय हा शब्द मनाच्या अर्थानें योजला असला तरी त्यावरून हृदयाचें स्थान मस्तकांत आहे असें सिद्ध होत नाहीं. प्रो. भानू ह्यांनी हृदयाच्या स्थानाचा निश्चय करितांना हृदय शब्दाचे अमरकोशान्तर्गत दोन्ही अर्थ दिले आहेत. शरीरावयववाचक हृदयाचें स्थान वक्षःस्थलाजवळ आहे हें त्यांसही मान्य आहे. उपनिषद्वाक्यांतील उद्धृत केलेल्या वचनांत हृदय शब्दाचा अर्थ मनवाचक, ज्ञानवाचक आहे. अर्थात् हें हृदय मस्तकांत असलें पाहिजे असें प्रो. भानूंचें अनुमान आहे. व हें म्हणणें सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं योगवासिष्ठ ग्रंथांतील वचनें उद्धृत केलीं आहेत. परंतु योगवासिष्ठांतील श्लोक उद्धृत करितांना

त्यांनी एक श्लोकार्ध गाळला आहे. त्या श्लोकार्धाचा अर्थ मात्र त्यांच्या विरुद्ध जातो, हें पुढे स्पष्ट होईल. प्रथम अवतीर्ण केलेले श्लोक त्यांच्या म्हणण्यास पोषक आहेत कीं नाहींत हें पाहूं. योगवासिष्ठांतील अवतीर्ण केलेल्या श्लोकांचा अर्थ लावतांना पूर्वीचा संदर्भ काय आहे हें अवश्य पाहिलें पाहिजे. या सर्गाचें नांव 'योगवर्णन' असें आहे. कोलीत फिरविलें असतां भ्रमानें अग्निचक्र दिसतें त्याचप्रमाणे चित्तस्पंदानें असज्जगताचा सदाभास होतो असें श्रीवसिष्ठांनी सांगितलें असतां 'चित्ताचें स्पंदन कशानें होतें व काय केलें असतां चित्ताचें स्पंदन होत नाहीं हें मला सांगा' असा प्रश्न श्रीरामचंद्रांनी केला. या प्रश्नाचें उत्तर श्रीवसिष्ठांनी दृष्टांतपूर्वकच दिलें आहे. कुसुम आणि सुगंध अथवा अग्नि आणि उष्णता यांत ज्याप्रमाणें भेदाभेद करितां येत नाहीं त्याचप्रमाणें चित्त व चित्तस्पंद यांतही भेदाभेद करितां येत नाही. यामुळें जोंपर्यंत मनाचे व्यापार सुरू आहेत तोंपर्यंत चित्तस्पंदाचें निवारण करितां येणें शक्य नाही. योगमार्ग व ज्ञानमार्ग असे चित्तनाशाचे दोन उपाय आहेत. अशा आशयाचें उत्तर ऐकल्यावर श्रीरामचंद्रांनी पुन्हा असा प्रश्न केला कीं प्राणापाननिरोधात्मक योगानें मनास अत्यंत सुखप्रद अशी शांति कशी मिळते? या प्रश्नाचें उत्तर सर्गसमाप्तीपर्यंत दिलेलें आहे व त्यांत योगाचें वर्णन केलें आहे.

चित्तस्पन्द हा प्राणस्पन्दाधीन आहे.

अन्तःप्राणपरिस्पन्दात्संकल्पकलनोन्मुखी
संवित्संजायते यैषा तच्चित्तं विद्धि राघव ॥ १३ ॥
प्राणस्पन्दाच्चित्तस्पन्दस्तत्स्पन्दादेव संविदः ।
चक्रावर्तविधायिन्यो जलस्पन्दादिवोर्मयः ॥ १४ ॥
चित्तप्राणपरिस्पन्दमाहुरागमभूषणाः ।
तस्मिन्संरोधिते नूनमुपशांतं भवेन्मनः ॥ १५ ॥

प्राणपरिस्पन्द म्हणजेच चित्त असें श्रुतींत म्हटलें आहे. 'प्राणबन्धनं हि सोम्य मनः' 'प्राणाद्वा एष उदेति' 'प्राणेऽस्तमेति' 'प्राणं तर्हि वागप्येति' प्राणं चक्षुः प्राणं श्रोत्रम् इत्यादि' श्रुती प्रसिद्ध आहेत. श्रीवसिष्ठांचें हें उत्तर ऐकल्यावर श्रीरामचंद्रांनी पुन्हा प्रश्न केला तो असाः—

अनिशं चरतां देहगेहे गगनगामिनाम् ।
प्राणादीनां परिस्पन्दो वायूनां रोध्यते कथम् ॥ १७ ॥

देहलक्षणात्मक स्वगृहांत हृदयादि स्थानांत व ७२ हजार नाडयांत सतत संचार करणाऱ्या व गगनांत म्हणजे मुखनासिकादिछिद्रांत व बाह्य आकाशांत गमनशील अशा प्राणादि वायूंचा रोध कसा केला जातो? या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनी पुढीलप्रमाणें दिलें आहे.

शास्त्रसज्जनसंपर्कवैराग्याभ्यासयोगतः ।
अनास्थायां कृतास्थायां पूर्वसंसारवृत्तिषु ॥ १८ ॥
यथाभिवाञ्छितध्यानाच्चिरमेकतयोदितात् ।
एकतत्त्वघनाभ्यासात्प्राणस्पन्दो निरुध्यते ॥ १९ ॥

शास्त्रश्रवणानें व सत्संगतीनें संसाराविषयीं वैराग्य उत्पन्न झालें असतां यमनियमशमदमादिकांच्या अभ्यासानें तें दृढ होतें व अभीष्ट देवतेचें ध्यान एकाग्रचित्तानें केलें असतां प्राणस्पन्दनिरोध होतो. पूरक, कुम्भक व रेचक याप्रमाणें प्राणायाम केल्यानेंही प्राणस्पन्दनिरोध होतो.

तालुमूलगतां यत्नाज्जिह्वयाक्रम्य घण्टिकाम् ।
ऊर्ध्वरन्ध्रगते प्राणे प्राणस्पन्दो निरुध्यते ॥ २५ ॥

जिह्वामूलभागीं स्तनाप्रमाणें लोंबणारा असा जो इंद्रयोनि (आत्ममार्ग) दिसतो त्या प्राणसंचार मार्ग-

रूपी मूर्धरंध्रांत प्रयत्नाने जिह्वा प्रविष्ट करून दाब देऊन खालीं केल्यावर प्राण ब्रह्मरंध्रांत गेला असत प्राणस्पंदाचा निरोध होतो. याप्रमाणेंच 'नभोधारणा' 'खेचरी मुद्रा' वगैरे उपायांनीं किंवा गुरुकृपेनें अथवा परमेश्वरकृपेने एकाएकी ज्ञान होऊन मनास शांति मिळाल्याने प्राणस्पन्दनिरोध होतो.

चिरं कालं हृते कान्तव्योमसंवेदनान्मुने
अवासनान्मनोध्यानात्प्राणस्पन्दो निरुध्यते ॥ ३१ ॥

गुरुकृपेने किंवा परमेश्वरीकृपेने एकाएकी ज्ञान झालें असतां किंवा दहराकाशांत चित्ताचा निवेश पुष्कळ काळपर्यंत झाला असतां वासनारहित अर्थात् निर्विषय अशा मनाच्या ध्यानाने प्राणस्पन्दनिरोध होतो. याविषयीं पातञ्जल योगसूत्रांतही 'हृदये चित्तसंवित्स्वार्थसंयमात् पुरुषज्ञानम्' असें म्हटलें आहे. हें विवेचन ऐकल्यावर श्रीरामचंद्रांनी पुन्हा प्रश्न केला कीं

ब्रह्मन् जगति भूतानां हृदयं तत्किमुच्यते ।
इदं सर्वं महादर्शे यस्मिंस्तत्प्रतिबिम्बति ॥ ३२ ॥

श्रीरामचंद्रांचा हा प्रश्न विशेष महत्त्वाचा आहे. हृदय हा शब्द पुण्डरीकाकार मांसविशेषावयव, मन व परमात्मा ह्या तीनही अर्थाने योजलेला असल्याने या स्थळीं हृदय शब्दाने कोणता अर्थ घ्यावयाचा या विषयीं शंका आल्यामुळें हा प्रश्न विचारला आहे. या प्रश्नाचें उत्तर श्रीवसिष्ठांनी पुढीलप्रमाणें दिलें आहे.

साधो जगति भूतानां हृदयं द्विविधं स्मृतम् ।
उपादेयं च हेयं च विभागोऽयं तयोः शृणु ॥ ३३ ॥
इयत्तया परिच्छिन्ने देहे यद्वक्षसोऽन्तरम्
हेयं तद्धृदयं विद्धि तनावेकतटे स्थितम् ॥ ३४ ॥
संविन्मात्रं तु हृदयमुपादेयं स्थितं स्मृतम् ।
तदन्तरे च बाह्ये च न च बाह्ये न चान्तरे ॥ ३५ ॥
तत्तु प्रधानं हृदयं तत्रेदं समवस्थितम् ।
तदादर्शः पदार्थानां तत्कोशः सर्वसंपदाम् ॥ ३६ ॥

यो. वा. उपशम प्र. सर्ग ७८

या श्लोकावरील टीका विशेष मननीय आहे. ती अशीः—

तत्र मांसमनसोः परिच्छिन्नत्वादैक्यमेव प्रकल्प्य द्वेधा विभागो बोध्यः ॥ ३३ ॥ ३४ ॥ ननु आत्मनि हृदयशब्दो हृदयमात्रस्थितिकृद्धा गौणः किं न स्यादित्याशङ्क्याह तदन्तरे चेति ॥ ३५ ॥ 'अस्मिन् द्यावापृथिवी अन्तरेव समाहिते' इति श्रुतेरिति भावः ॥ ३६ ॥

यावरून वरील श्लोकांत हृदयाचे दोन विभाग कां केले आहेत हें स्पष्ट होत आहे. पुण्डरीकाकार **मांसविशेषात्मक हृदयावयव व मन** हीं एकच समजून हृदयाचे दोन विभाग केले आहेत. वक्षःस्थलांतर्गत कमलाकार मांसविशेषावयव व मन या अर्थाचें जें हृदय तें हेय अर्थात् त्याज्य होय आणि **संविद्रूप आत्मा या अर्थाचें जें हृदय तें उपादेय होय.** या आत्मरूप हृदयाचें स्थान कोणतें असा प्रश्न सहजच उत्पन्न होईल. या प्रश्नाचें उत्तर 'संविन्मात्रहृदय (शरीराच्या) आंतही आहे आणि बाहेरही आहे आणि तें बाहेरही नाही व आंतही नाही' असें दिलें आहे. **संविन्मात्र हृदय** आंतही आहे व बाहेरही आहे आणि बाहेरही नाही व आंतही नाही म्हणजे काय अशी शंका कदाचित् कोणास येईल. म्हणून या शंकेचें निवारण करण्यासाठीं पुढील श्लोक अवश्य पहावा.

सर्वेषामेव जन्तूनां संविद्धृदयमुच्यते ।
न देहावयवैकांशो जडजीर्णोपलोपमः ॥ ३७ ॥

सर्व प्राण्यांची संवित् हेंच हृदय होय. देहावयवाचा एखादा भाग हा हृदय नव्हे. तो भाग एखाद्या

जड, जीर्ण पाषाणासारखा होय. सारांश संविन्मात्र हृदय ( आत्मा ) सर्वव्यापी आहे असाच या वचनाचा इत्यर्थ आहे. प्रो. भानू यांनी आपलें म्हणणें सिद्ध करावयासाठी योगवासिष्ठांतील जे श्लोक उद्धृत केले आहेत त्यांतहि शरीरांतील हृदयाचा जो निर्देश केला आहे तो ' हृदयाचें स्थान वक्षःस्थल' असाच आहे. प्राणस्पन्दनिरोधदृष्टीने हें हृदय हेय म्हणजे त्याज्यच होय व संविन्मात्र हृदय हेंच उपादेय म्हणजे ग्राह्य होय.

वस्तुस्थिति अशी असतांहि वक्षःस्थलीन हृदय हें हेय आहे असें वर्णिलें असून उपादेय हृदयाचे स्वरूपाचा मात्र पत्ता या स्थळीं लागत नाही असें प्रो. भानू यांनी आपल्या लेखांत म्हटलें आहे. या उपादेयभूत संविन्मात्र हृदयाचा पत्ता लावण्यासाठी त्यांनी बृहदारण्यकोपनिषद व छान्दोग्योपनिषद यांतील वचनांचा आश्रय केला आहे. संविन्मात्र हृदयाचे स्वरूपाचें दिग्दर्शन करणारा श्लोकार्ध जर गाळण्यांत आला नसता व ३७ वा म्हणजे पुढचाच श्लोक उद्धृत केला असता तर उपनिषदांतील इतर वचनें पाहण्यापूर्वीच त्यांस या प्रश्नाचें उत्तर तेथेच मिळालें असतें ! असो. यानंतर प्रो. भानू यांनी आपल्या मताचें समर्थनासाठीं जीं उपनिषद्वचनें अवतीर्ण केलीं आहेत त्यांचा विचार करूं. त्यांनी अवतीर्ण केलेलें पहिलें वचन पुढील प्रमाणें आहेः—

तयोरेष संस्तावो य एषोऽन्तर्हृदय आकाशः अथैनयोरेतदन्नं य एषोऽन्तर्हृदये **लोहितपिंडः** अथैनयोरेतत्प्रावरणं यदेतदन्तर्हृदये जालकमिव अथैनयोरेषा सृतिः संचरणी यैषा **हृदयादूर्ध्वा नाड्युच्चरति** यथा केशः सहस्रधा भिन्न एवमस्यैता हिता नाम नाड्योऽन्तर्हृदये प्रतिष्ठिता भवन्ति। एताभिर्वा एतदास्रवदास्रवति । तस्मादेष प्रविविक्ताहारतर इवैव भवति । अस्माच्छरीरादात्मनः । बृहदा. ४।२।३.

'अंतर्हृदयांतील आकाश हें पुरुष व प्रकृति यांचें राहण्याचें स्थान आहे, अंतर्हृदयांतील लोहितपिंड ( मांसमय भाग ) हा त्यांचें अन्न होय,………**हृदयासून वर जी नाडी जाते ती ह्या आत्म्याचा संचारमार्ग होय**. केसाचे हजार भाग केले असतां ते जितके सूक्ष्म होतील तितक्या सूक्ष्म हिता नांवाच्या नाड्या हृदयांत म्हणजे मांसपिंडांत प्रतिष्ठित असतात, **या नाड्यांच्या द्वाराच सर्व शरीरास अन्नरस मिळतो. इ.** ' असें यांत म्हटलें आहे.

या वचनांत हृदयाचें स्थान मस्तकांतच असलें पाहिजे असें अनुमान करण्यासारखें काय आहे तें समजत नाहीं. उलटपक्षीं अंतर्हृदयांतील लोहितपिंडाचा उल्लेख, हृदयापासून वर म्हणजे मस्तकांत जाणाऱ्या नाडीचा उल्लेख हे दोन उल्लेख हृदयाचें स्थान वक्षःस्थलींच आहे या प्रचलित समजुतीस पोषक आहेत. ' एताभिः वै एतदास्रवदास्रवति ' म्हणजे ' या नाड्यांचे द्वारानेच सर्व शरीरास अन्नरस प्राप्त होतो ' हें वर्णनहि वक्षःस्थलीन हृदयाशीं जसें जुळतें तसें तें मस्तकस्थ हृदयाशीं जुळत नाही.

दुसरा उताराहि बृहदारण्यकोपनिषदांतीलच आहे.

अयं वाव शिशुः योऽयं मध्यमः प्राणः । तस्येदमेवाधानमिदं प्रत्याधानं स्थूणा अन्नं दाम ॥१॥

अर्वाग्बिलश्चमसः ऊर्ध्वबुध्नस्तस्मिन्यशो निहितं विश्वरूपम् । तस्यासत ऋषयः सप्त तीरे वागष्टमी ब्रह्मणा संविदानेति ॥ बृहदा. २।२।१,२,३.

या वचनांतहि हृदयाचें स्थान मस्तकच असलें पाहिजे असें सिद्ध करणारें कोणतेंच प्रमाण नाहीं.

मध्यमप्राण हा लहान बालक आहे. त्याचें अधिष्ठान हें सर्व शरीर होय. मस्तक हें त्या लिङ्गात्म्याचें प्रत्याधान म्हणजे विशेषाधिष्ठान होय.

मस्तक हें उलट्या चमसपात्राप्रमाणें म्हणजे खालीं तोंड असून वर बुंधा असणारें असें आहे. ज्याप्रमाणें चमसपात्रांत सोम असतो त्याप्रमाणें शिरोरूप चमसपात्रांत नानाप्रकारचीं यशें आहेत. हीं यशें म्हणजे शिरोगत सप्त प्राण होत. हे सात प्राण हेच सात ऋषि होत. परिस्पन्दात्मक सात प्राणांसच सात ऋषि असें म्हटलें आहे. दोन कान, दोन डोळे, दोन नाकपुड्या व मुख हे सात ऋषि आणि आठवी

त्याप्रमाणें 'मूर्तहृदयवाचक' नसून तो 'ज्ञानरूप आत्मवाचक' आहे असें स्पष्ट दिसून येतें. दुसऱ्या उताऱ्यांत हृदय शब्दच नाहीं. सारांश पांच उताऱ्यांपैकीं तीन उताऱ्यांत हृदय हें मूर्त आहे असें म्हणतां येईल. परंतु उपनिषदांतील सर्व वचनांत या शब्दाने हृदयाचें मूर्तत्वच व्यक्त होईल असें म्हणतां येणार नाहीं. पुष्कळ स्थळीं हा शब्द आत्मवाचक अथवा मनोवाचक अर्थानें योजला असल्यानें तो सर्वत्र हृदयाचें मूर्तत्ववाचक आहे असें म्हणतां येणार नाहीं. प्राणस्पंदन हृदयांतच होत असल्यानें आत्मोपलब्धीचें स्थान हृदय आहे हें स्पष्ट आहे.

आतां या पांच उताऱ्यांवरून हृदयाच्या स्थानाचा कांहीं विशेष निश्चय करितां येतो कीं काय हें पाहूं. 'आणि हें हृदय मस्तकांतच आहे' असें या उताऱ्यावरून स्पष्ट सिद्ध होतें असें मानू म्हणतात! आम्हांस तसें वाटत नाहीं. कारण पहिल्या उताऱ्यांत हृदयांत जो लोहितपिंड वर्णिला आहे तो वक्षःस्थलीन मांसमय हृदयांतच असणें अधिक संभवनीय आहे. मस्तकांतर्गत मस्तिष्कांत असा लोहितपिंड असणें संभवनीय नाहीं. 'हृदयस्थ प्रदेशांतून वर मस्तकांत जी नाडी अर्थात् सुषुम्ना नाडी जाते ती नाडी या आत्म्याचा संचारमार्ग आहे. या वचनावरूनही हा 'हृदयावयव वक्षःस्थलांत असलेलाच होय असें स्पष्ट ठरतें. 'हिता' नांवाच्या नाड्या हृदयांत म्हणजे मांसपिंडांत प्रतिष्ठित असतात व 'एताभिर्वा एतदास्रवदास्रवति' म्हणजे 'या नाड्यांच्या द्वारांनीच अन्नरस सर्व शरीरास मिळतो' या वचनावरूनहि शरीराच्या धारणपोषणास आवश्यक असणारा अन्नरस पोहोंचविणाऱ्या या हृदयसंबद्ध नाड्या म्हणजे रक्तवाहिन्याच होत असा अर्थ करणें प्राप्त आहे. हृदय हा अवयव मस्तकांत आहे असें कल्पिल्यास या मस्तकस्थ हृदयांतून शरीरधारणपोषणात्मक असा अन्नरस कोणता व कसा वाहतो याचें विवेचन होणें आवश्यक आहे. प्रो. मानूंचे पक्षपाती कोणी असल्यास त्यांनीं हें विवेचन अवश्य करावें अशी विनंति आहे. याप्रमाणें पहिल्या उताऱ्यांत 'हृदय मस्तकांतच आहे' हें सिद्ध करण्यास कांहीएक आधार नाहीं हें स्पष्ट झालें. दुसऱ्या उताऱ्यांत हृदय शब्दाचा उल्लेखच नाहीं. अर्थात् त्याचे स्थानाचा निश्चय करणारें प्रमाणही नाहीं. तिसऱ्या उताऱ्यांतलि 'हृदय' हा शब्द ज्ञानरूप आत्मवाचक असल्यानें त्यावरून हृदयाचे स्थानाचा निश्चय करितां येत नाहीं. चवथ्या उताऱ्यांतहि 'ताश्च (हितानाम्न्यो नाड्यः) हृदयात् हृदयं नाम मांसपिंडः तस्मात् मांसपिण्डात् पुण्डरीकाकारात् पुरीततं' इत्यादि वचनांतील हृदय नांवाच्या कमलाकार मांसपिंडांतून निघून सर्व शरीरभर पसरलेल्या बहिर्मुख नाड्या ह्याही **हिता** नांवाच्या नाड्या होत व या नाड्यांच्या द्वारें बुद्धि सर्व इंद्रियांचे व्यापार करविते, असें म्हटलें आहे. या वचनांतील हृदय शब्दही मांसपिण्डात्मक असा वर्णिला असल्यानें तो मस्तकस्थ हृदयशब्दवाचकच आहे असें म्हणतां येणार नाही व वक्षःस्थलीन हृदयाशीं बराच जुळणारा आहे. पांचव्या उताऱ्यांत 'दहरं' पुण्डरीकं वेश्म तस्मिन्यदन्तस्तदन्वेष्टव्यं तद्वाव विजिज्ञासितव्यम् असें म्हटलें आहे. या वचनांतील पुण्डरीकाकार हृदय आत्म्याचें स्थान म्हणून वर्णिलें आहे; व हें वर्णन श्रीमद्भगवद्गीतेंतील 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' या वचनाशीं एकरूप आहे. म्हणून या वचनांतही 'हृदय हें मस्तकांतच' आहे असें सिद्ध होत नाही.

याप्रमाणें मुख्य वचनांचा विचार झाल्यावर प्रो. मानू यांनी ज्ञानैकपर दशोपनिषदांतील हृदय व नाड्या यांचा संबंध दाखविणारे कांहीं उतारे दिले आहेत. त्यांपैकीं पहिला उतारा असा :—

हिता नाम नाड्यः द्वासप्ततिसहस्राणि हृदयात्पुरीततमभिप्रतिष्ठन्ते ताभिः प्रत्यवसृप्य पुरीतति शेते

वृहदा. २।१।१९

या वचनांतही पुण्डरीकाकार मांसपिंडात्मक हृदयापासून हृदय परिवेष्टनरूप पुरीतत् भागांत व उपलक्षणाने सर्व शरीरभर हितानाड्या पसरल्या आहेत व जागृतावस्थेंत त्यांचा प्रसार होतो व निद्रावस्थेंत त्यांचा संकोच होतो व त्यामुळें जीव हा स्वप्नावस्थेंत व सुषुप्तावस्थेंत जातो असें म्हटलें आहे. जागृतावस्थेंत हृदय-

संबद्ध रक्तवाहिन्या जोराने चालतात व निद्रावस्थेत त्यांचा जोर कमी असतो यास अनुलक्षून हें वर्णन असणें संभवनीय आहे.

पुण्डरीकेण सदृशं हृदयं स्यादधोमुखम् ।
जाग्रतस्तद्विकसति स्वपतश्च निमीलति ॥ सुश्रुत, शा. ४-३२.

या श्लोकांतील वर्णनहि वरील वचनानुगामि आहे असें म्हणतां येईल.

या एता हृदयस्य नाड्यस्ताः पिंगलस्याणिम्नस्तिष्ठन्ति शुक्लस्य नीलस्य पीतस्य लोहितस्येत्यसौ वा आदित्यः पिङ्गलः, एष शुक्ल एष नील एष पीत एष लोहितः ॥ छान्दोग्योपनि. ८. ६. १.

या वचनावरील श्रीशंकराचार्यांचें भाष्य प्रो. भानूंनी दिलेलें नाहीं. तें असें:—

अथ या एता वक्ष्यमाणा हृदयस्य पुण्डरीकाकारस्य ब्रह्मोपासनस्थानस्य संबन्धिन्यो नाड्यो हृदयमांसपिण्डात्सर्वतो विनिःसृता आदित्यमण्डलादिव रश्मयश्चैताः पिङ्गलस्य वर्णविशेषविशिष्टस्याणिम्नः सूक्ष्मरसस्य रसेन पूर्णास्तदाकारा एव तिष्ठन्ति वर्तन्त इत्यर्थः तथा शुक्लस्य नीलस्य पीतस्य लोहितस्य च रसस्य पूर्णा इति सर्वत्राध्याहार्यम् । सौरेण तेजसा पित्ताख्येन पाकाभिनिर्वृत्तेन कफेनाल्पेन संपर्कात्पिङ्गलं भवति सौरं तेजः पित्ताख्यम् । तदेव च वातभूयस्त्वान्नीलं भवति । तदेव च कफभूयस्त्वाच्छुक्लम् । कफेन समतायां पीतम् । शोणितबाहुल्येन लोहितम् । वैद्यकाद्वा वर्णविशेषा अन्वेष्टव्या कथं भवन्तीति । श्रुतिस्त्वाहाऽऽदित्यसंबन्धादेव तत्तेजसो नाडीष्वनुगतस्यैते वर्णविशेषा इति कथम् । असौ वा आदित्यः पिङ्गलो वर्णत एष आदित्यः शुक्लोऽप्येष नील एष पीत लोहित आदित्य एव ॥ — श्रीशंकराचार्यभाष्य.

ब्रह्मोपासनेचें स्थान जें पुण्डरीकाकार हृदय त्याशीं संबद्ध असलेल्या हृदयमांसपिण्डापासून सर्व शरीरभर पसरलेल्या नाड्या पिंगल, शुक्ल, नील, पीत व रक्त वर्णाच्या सूक्ष्म रसाने पूर्ण भरलेल्या असतात. ह्या नाड्यांतील हा पिंगल, शुक्ल, नील, पीत व रक्तवर्ण आदित्याच्या तेजाच्या कमी अधिक संबंधाने आलेला असतो. कारण आदित्य हा पिंगल, शुक्ल, नील, पीत, व रक्तवर्ण असतो हें प्रसिद्धच आहे. ज्याप्रमाणें आदित्यमंडळापासून अनेक किरण सर्व दिशांनी पसरलेले असतात. त्याप्रमाणें ब्रह्मोपासनेचें स्थान जें पुण्डरीक कमलाकार हृदय त्या **मांसपिण्डरूप हृदयापासून सर्व दिशांस नाड्या** पसरलेल्या असून त्या कांहीं शुक्ल, कांहीं नील, कांहीं पीत व कांहीं रक्तवर्णात्मक रसाने भरलेल्या असतात. त्या नाड्यांतील रसास हा वर्ण आदित्यतेजामुळें येतो. पित्तरूपी आदित्यतेजाने परिपक्व झालेला अन्नरस किंचित्कफयुक्त झाला असतां पित्ताख्य आदित्यतेज पिंगल वर्णाचें होतें. त्यांत कफ हा समप्रमाण मिसळल्यास पीत वर्ण प्राप्त होतो. वायुद्रव्य आधिक्याने असल्यास नीलवर्ण येतो, कफ पुष्कळ असल्यास शुक्लवर्ण प्राप्त होतो व त्यांत रक्त अधिक असल्यास रक्तवर्ण प्राप्त होतो. यापेक्षां विशेष माहितीसाठीं वैद्यशास्त्रावरील ग्रंथ पहावेत. याविषयीं श्रुतिवचन आहे तें असें:— 'आदित्यसंबन्धादेव तत्तेजसो नाडीष्वनुगतस्यैते वर्णविशेषा इति ।'

या वचनांतील नाडी शब्द कशाचा द्योतक अगर बोधक आहे हें अगदीं स्पष्ट आहे. नाडीगत वात, पित्त, कफ, व रक्त असल्याने हा वर्णविशेष प्राप्त होतो असें या वचनांत व त्यावरील आचार्यभाष्यांतहि म्हटलें आहे. असें असतांहि या व्यतिरिक्त निराळाच अणिष्ठ पदार्थ नाड्यांत राहत असतो असें प्रो. भानू म्हणतात. परंतु त्यांचें हें म्हणणें मूळ वचनाशीं विसंगत असल्याने मान्य होण्यासारखें नाही.

**अरा इव रथनाभौ संहता यत्र नाड्यः । स एष अंतश्चरते ।**

मुंडक २-२-६.

या वचनांत नाड्या ह्या हृदयाशीं संबद्ध झाल्या आहेत व हृदयांतच आत्मा असतो असें म्हटलें आहे.

**हृदि ह्येष आत्मा । अत्रैतदेकशतं नाडीनां ... आसु व्यानश्चरति ।**

प्रश्नोप. ३-६.

हृदयांतच आत्मा राहतो. हृदयापासून एकशेंएक नाड्या निघतात ... या नाड्यांतून व्यानवायु संचार करितो.

**शतं चैका हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति ।** कठ. २-६-१६.

या वचनावरील श्रीशंकराचार्यांचें भाष्य विशेष मननीय आहे. तें असें:—

शतं च शतसंख्याका एका च सुषुम्ना नाम पुरुषस्य हृदयाद्विनिःसृता नाड्यः शिरास्तासां मूर्धानं भित्त्वा अभिनिःसृता निर्गता सुषुम्ना नाम ॥ भाष्य.

या वचनांतील ‘ हृदय ’ मस्तकस्थ आहे असें मानल्यास ‘ तासां मूर्धानं भित्वा अभिनिःसृता एका ’ ‘ तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति ’ व ‘ विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति ’ या वाक्यांचा अर्थ सुसंगत लागणें शक्य नाहीं. कारण हृदय मस्तकांत मानल्यावर त्यांतील एक नाडी मस्तकाकडे म्हणजे कोठें जाते व मस्तकाचा भेद करून कोणीकडे जाते ? असा प्रश्न उत्पन्न होतो. मस्तकाचा भेद करून खालीं जाते असा अर्थ करावा असें कोणी म्हणतील. पण ‘ तयोर्ध्वमायन् ’ म्हणजे ‘ त्या नाडीने वर जाणारा ’ व ‘ विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति ’ म्हणजे ‘ दुसऱ्या कांहीं नाड्या वर जात असतां वांकड्या होतात ’ या वाक्यांत ‘ वर जाण्याचा ’ स्पष्ट निर्देश आहे त्याची वाट काय ? सारांश असा अर्थ सुसंगत लागत नाही. आणि प्रचलित समजुतीप्रमाणें ‘ हृदय ’ हें वक्षःस्थलप्रदेशांत आहे असें समजून या वचनांचा अर्थ लावल्यास तो अगदी सरळ लागतो हें उघड दिसून येतें.

याप्रमाणें ‘ हृदय हें मस्तकांतच आहे ’ हें सिद्ध करण्यासाठीं प्रो. मानू यांनी दिलेल्या प्रमाणांचा विचार एथवर केला. यानंतर ‘ हृदय ’ मस्तकांत नसून वक्षःस्थलभागींच आहे हें सिद्ध करणारीं दुसरीं कांहीं प्रमाणें आहेत काय व ‘ हृदय ’ हा अवयव मस्तकांत मानल्यास कांहीं अनर्थ ओढवणार आहे काय याचा विचार पुढील लेखांत करूं.

---

# पुस्तकपरीक्षण.

## " भासकविकृत अविमारकनाटकाचें मराठी भाषांतर. "

( लेखक :— कृ. पां कुलकर्णी)

सदरील पुस्तकास अलंकारभूषण पंडित खुपेरकरशास्त्री यांनी एक विस्तृत व मार्मिक असा उपोद्घात जोडला आहे, व त्यामुळे पुस्तकाला विशेष मोल आलें आहे. पूर्वसूरींच्या ग्रंथांचें अध्ययन करितांना त्यांच्या कालिक विचिकित्सेकडे दुर्लक्ष करण्याची पूर्वीच्या शास्त्र्यांची परंपरा पाहिली म्हणजे खुपेरकरशास्त्रीबुवांनी ऐतिहासिक व तौलनिक प्रमाणावर आधारून लिहिलेली प्रस्तावना वाचून धन्यता वाटते. अलंकारशास्त्रांत शास्त्रीबुवांची उपस्थिति चांगली असल्यामुळें त्यांनी लिहिलेला प्रस्ताव, इतिहास, अलंकार, रहस्यविश्लेषण इत्यादि दृष्टीने चांगला उतरणें साहाजिक आहे.

प्रस्तावानंतर अविमारकनाटकाचें मराठी भाषांतर धुळ्याचे देशपांडे यांनी केलेलें आहे. देशपांडे यांचा मराठी लेखक म्हणून फारसा परिचय नाहीं. असें जरी असलें तरी प्रथम प्रयत्न म्हणून जर भाषांतर पाहिलें तर त्यांचें कौतुक वाटतें. मराठी भाषेंतील नाटयवाङ्मयाच्या आद्य युगांत संस्कृत नाटयरत्नांच्या चांगल्या कसलेल्या लेखकांनी केलेल्या भाषान्तराचे नमुने मुद्राराक्षस, वेणीसंहार, उत्तररामचरित वगैरेंच्या स्वरूपांत पहावयास सापडतात. व पुढे ह्या भाषांतरप्रयत्नाला खंड पडलेला दिसला तरी केवळ एकटया भासाच्या बाबतींत भाषांतराचे प्रयत्न पुष्कळ झाले आहेत. मग तें त्याच्या अलौकिकतेमुळे असो किंवा त्याच्या नवोपलब्धीमुळे असो. आपटे, हिवरगांवकर, किरात, ऊर्ध्वरेषे व देशपांडे ह्यांनी आपआपल्या परीने भासाची नाटयसृष्टी मराठींत अवतरण्याचें काम केलें आहे. पैकीं देशपांडे यांनी आपलें क्षेत्र एका नाटकापुरतेंच मर्यादित केल्यामुळें त्या मानाने दोषहि त्यामध्यें मर्यादितच सापडतात.

भास हा संस्कृत मधील आद्य नाटककार समजला पाहिजे आणि आद्य नाटककार ह्या दृष्टीनें त्याच्या कृतींत उत्तरकालीन नाटककारांच्या संविधानकांचें ग्रथनकौशल्य व तीं उकलण्याची चतुराई सापडत नाहीं. इंग्रजी नाटयवाङ्मयांत ज्याप्रमाणें मार्लो, बेन जानसन ह्यांच्या नाटयसापळ्यावर शेक्सपीयरनें मांस चढवून जगन्मान्यता मिळविली, त्याचप्रमाणें संस्कृत नाटयवाङ्मयांत शूद्रक, कालिदास, भवभूति, हर्ष इत्यादिकांनी भासाच्या प्रातिभाप्राथम्यावर आपल्या प्रज्ञा चालवून जगन्मान्यत्व संपादिलें. तेव्हां प्रतिभाप्राथम्याच्या दृष्टीने भासाच्या ग्रथनकौशल्याकडे सहानुभूतिपूर्वक पहावें हें बरें. व तसें पाहिलें तरी त्याच्या गुणसीमा कोठवर जाऊं शकतात व कथासूत्र, कथाभूमि, रीति, वृत्ति, अलंकार, रसनिष्पत्ति इत्यादि बाबींत दुसऱ्या नाटककारांनी किती ऋण घेतलें आहे हें शास्त्रीबुवांनी दाखविलें आहे.

भासाच्या नाटयचक्राची उपलब्धि ही आधुनिक संशोधनाची नावाजण्यासारखी कमाई आहे यांत शंका नाहीं. हें तेरा नाटकांचें नाटयचक्र अनंतशयनांत (त्रिवेंद्रम्) सुप्तावस्थेंत पडलेलें हुडकून काढून प्रकाशांत आणण्याचें श्रेय म. म. त. गणपतिशास्त्री यांनीं संपादिलें. हें नाटयचक्र प्रसिद्ध झाल्यापासून भासासंबंधींच्या संशोधनास विलक्षण चालना मिळाली व त्यामध्यें कांहीं पक्षोपपक्षहि निर्माण झाले. भास म्हणून एक प्राचीन कवि होऊन गेला, त्यानें कांहीं नाटयलिखाण केलें व त्यांत उत्तरकालीन नाटयोपासकांनी वंद्य म्हणून समजलें जाण्यासारखें प्रतिभाप्राचुर्य होतें ह्या गोष्टी सर्वांना मान्य आहेत. मतभेद फक्त ह्या नाटयचक्रांत गोवल्या गेलेल्या तेरा नाटकाच्या कर्तृत्वाविषयीं. हीं तेराहि नाटकें एकाच कर्त्याचीं असून तो कर्ता भासच आहे हा सिद्धांत शास्त्रीबुवांनी प्रस्तावनेंत मांडला आहे.व हा सिद्धांत मांडतांना अर्थातच त्यावर घेतले जाणाऱ्या आक्षेपांचा विचार त्यांना ओघानेच करावा लागला आहे. त्यानंतर भासाच्या कालनिर्णयाच्या प्रश्नाची साधक बाधक प्रमाणांसह चर्चा करून कवीचा जीवनवृत्तांत त्याच्याच नाटकांत मिळणाऱ्या माहितीच्या साहाय्याने देण्याचा प्रयत्न केला आहे. जातांजातां नाटकांतील गुणदोष, भाषा, कल्पना, नाटयव्यक्ति इत्यादि बाबतींत इतर उत्तरकालीन नाटककारांचें भासोपजीवित्व कितपत आहे ह्याचा आढावा घेतला आहे. अशा रीतीने खुपेरकरांची प्रस्तावना म्हणजे भासाची ग्रंथनिर्मिति व त्याचें नाट्यवाङ्मयांत स्थान ह्या संबधीं एकंदर धावती समालोचना आहे.

प्रस्तुत तेरा नाटकें हीं भासकर्तृक नव्हेत, अन्यकर्तृक आहेत हा एक पक्ष तर ह्याच्या उलट हीं सर्व भासकर्तृक आहेत हा दुसरा पक्ष. ह्या दोन्हीं पक्षांशिवाय प्रतिज्ञा, स्वप्न, प्रतिमा हीं फक्त चारच नाटकें भासाचीं असावींत आणि बाकीचीं अन्यकर्तृक असावींत अशा तऱ्हेचा वरील दोन्ही पक्षांचा समन्वय करणारा एक तिसराहि पक्ष उद्भवला आहे. परंतु ह्या पक्षाचीं प्रमाणें तितकींशीं सबळ नसल्यामुळें हा पक्ष उभा राहूं शकत नाहीं. रहातां राहिले दोन पक्ष. ह्या दोन्ही पक्षांना तेरा नाटकांचें एककर्तृकत्व मान्य आहे. त्या सर्वांमध्यें येणारें "राजसिंहः प्रशास्तु नः" हें भरतवाक्य, त्यांचे आद्यंत, त्यामध्ये उघड उघड प्रतीत होणारी एकहाती रचना, अधमपात्रांच्या व स्त्रियांच्या तोंडांत घातलेल्या प्राकृतभाषा, ठिकठिकाणीं आढळून येणारें छन्दःसाम्य, लेखनरीति, कल्पना, शब्द, वाक्यांश व वाक्यविशेष ह्या सर्वांवरून धावती नजर जरी टाकली तरी हीं सर्व तेरां नाटकें एका कवीच्याच कृति आहेत असें वाटल्यावाचून रहात नाही. व हा कवि भासच आहे हें मानण्यासहि एक मोठें सबल असें गमक उपलब्ध झालें आहे. बाणाने आपल्या हर्षचरितामध्यें भासाच्या नाटकांत त्याला आढळून आलेल्या किंवा तत्कालीन विद्वान लोकांनी मान्य केलेल्या कांहीं ठळक ठळक अशा खुणा एका श्लोकांत गोवून ठेविल्या आहेत. त्या खुणा ह्या नाट्यचक्रांतील प्रत्येक नाटकाला तंतोतंत लागू पडतात. तो श्लोक असाः—

सूत्रधारकृतारंभैर्नाटकैर्बहुभूमिकैः ॥ सपताकैर्यशो लेभे भासो देवकुलैरिव ॥

इतर सर्व नाटकांस सुरुवात नांदीने होते; परंतु भासाच्या नाटकांस सुरुवात सूत्रधार करतो. भासाचीं सर्व नाटकें बहुभूमिक व सपताक अशीं आहेत. स्वप्नवासवदत्ता नाटकांत १६, प्रतिज्ञायौगन्धरायणांत १६, अविमारकांत २७, बालचरित्रांत ३० अशी त्याच्या नाटकांत पात्रांची संख्या आहे. प्रत्येक नाटकांत मुख्य कथानकाशीं एक तरी उपकथानक गुंतविलें आहे. स्वप्नवासवदत्तेमध्यें पद्मावतीचें, प्रतिमेंत भरताचें, अभिषेकांत सुग्रीवाचें, बालचरितांत संकर्षणाचें अशीं निरनिराळ्या नाटकांत गुंतविलेल्या उपकथानकांचीं उदाहरणें आहेत. तेव्हां बाणाने वरील श्लोकांत निर्देशलेलीं विशेष संज्ञांकित अशीं ही नाटकें भासाचींच होत. ह्याच मुद्दयावर बाणाने दिलेल्या पुराव्याशिवाय इतर पुरावाहि उपलब्ध आहे व तो स्वप्नवासवदत्ता नाटकास अगदी स्पष्ट रीतीने लागू पडतो. पूर्वींच्या आलंकारिकांनी दृष्टान्तादाखल उतारे घेतांना 'स्वप्न' असा ज्या नाटकाचा उल्लेख केला आहे तें 'स्वप्न' नाटक आणि भासाचें स्वप्नवासवदत्ता हें नाटक हीं दोन्ही नाटकें एकच आहेत हें त्या नाटकाच्या कांही हस्तलिखित पोथ्यांत सापडलेल्या "स्वप्ननाटकमवसितम्" ह्या शेवटच्या निर्देशावरून सिद्ध होत आहे. याशिवाय त्यांनी उल्लेखिलेले कांही प्रसंग स्वप्नवासवदत्ता नाटकांत हुबेहूब सापडतात. अमरकोशाचा टीकाकार सर्वानन्द (खिस्तोत्तर १२००) ह्याने निर्देशलेला पद्मावती व उदयन ह्यांच्या विवाहाचा प्रसंग भासाच्या नाटकांत सापडतो. तसाच रंगभूमीवर क्रीडेसंबंधाचा प्रसंग आहे. रंगभूमीवर क्रीडा दाखवू नये अशा तऱ्हेचा निषेध नाट्यशास्त्रकारांनी घातला आहे. ह्या निषेधाचें उदाहरण म्हणून अभिनवगुप्ताचार्य भासाच्या नाटकाचा दाखला देतो. व ह्या दाखला पद्मावती व वासवदत्ता ह्यांनी खेळलेल्या कन्दुकक्रीडेशीं बरोबर जुळतो. क्षीरस्वामी आपल्या अमरकोशाच्या टीकेंत नायिका व उपनायिका ह्यांना अनुक्रमें देवी व भट्टिनी हीं बिरुदें कशीं लागतात हें सांगून त्याचीं उदाहरणें वासवदत्ता आणि पद्मावती हीं देतो. वासवदत्तेच्या जोडीला पद्मावती उपनायिका म्हणून भासाच्या स्वप्नवासवदत्त ह्या नाटकांतच फक्त उल्लेख येतो. इतरांच्या येत नाही. तेव्हा क्षीरस्वामीला तरी भासाचेंच नाटक अभिप्रेत असलें पाहिजे. ह्या सर्वांपेक्षां महत्त्वाचें प्रमाण म्हटलें म्हणजे १२ व्या शतकांत होऊन गेलेल्या शारदातनयाने आपल्या भावप्रकाश नांवाच्या ग्रंथांत नाटकाच्या पंचसंधीचीं जीं उदाहरणें दिलीं आहेत तीं स्वप्नवासवदत्त नाटकांतील संधीशीं तंतोतंत जुळतात. व त्याने त्यांतच दिलेला एक श्लोक जसाच्या तसा स्वप्ननाटकाच्या सहाव्या अंकांत आढळतो. ह्या शिवाय भोजदेव, वामन ह्यांनी उद्धृत केलेल्या श्लोकांचे पुरावे आहेत. ह्या सर्व पुराव्यावरून स्वप्नवासवदत्त हें नाटक भासाचेंच ठरतें. आणि ज्याअर्थी स्वप्ननाटकांतील रचनाविशेष इतर १२ नाटकांत सापडतात त्याअर्थी सर्व तेराहि नाटकें भासाचींच होत.

इतका पुरावा पाहिल्यानंतर ही नाटकें भासाचीं नव्हेत असें म्हणण्यांत कांहीं अर्थ रहात नाहीं. ह्या नाटकासारखींच आटोपशीर लहान नाटकें तेच गुणदोष असलेली

नाट्यकथानकें कांहीं प्रसंगानुसार रचण्याची परंपरा दक्षिणेकडे असल्याचें मल्याळी पंडित प्रो. पिशारदी ह्यांनी लिहिलें आहे. नाटकांत वापरलेली प्राकृत भाषा आणि भरतवाक्यांत उल्लेखिलेला राजसिंह राजा ह्या दोन प्रमाणांवर हीं नाटकें सातव्या शतकाच्या सुमारास झालेल्या पल्लवराजा महेंन्द्रवर्माने लिहिलेल्या मत्तविलास प्रहसनाच्या समकालीन असावींत असा त्यांच्या म्हणण्याचा निष्कर्ष आहे. वर दिलेल्या प्रमाणांनी ह्या विरुद्ध मताला स्पष्ट अशी बाधा आल्याखेरीज रहात नाहीं.

नाट्यचक्राचें ग्रंथकर्तृत्व निश्चित झाल्यानंतर व तो कर्ता भासच हेंहि निश्चित झाल्यानंतर तो कवि कधी झाला असावा हा प्रश्न येतो. भासाच्या कालनिर्णयासंबंधीं शास्त्रीबुवांनी केलेलीं अनुमानें आम्हांस मान्य नाहींत. भास कवि बुद्धधर्मसंस्थापक शाक्यमुनींच्या नंतर व अर्थशास्त्रकर्त्या चाणक्याच्या पूर्वी म्हणजे ख्रिस्तपूर्व ५०० आणि ४०० या दोन शतकांच्या दरम्यान झाला असावा असा त्यांचा सिद्धांत आहे व त्याला त्यांनी प्रमाणें दिलीं आहेत. पैकीं भास बुद्धोत्तरकालांत झाला हें आम्हांलाहि मान्य आहे. कारण त्याच्या नाटकांत श्रमणक हा शब्द पुष्कळ ठिकाणीं आला आहे. शिवाय पाटलिपुत्र, नागवन, वेणवुन हीं बुद्धोत्तरकालांत प्रसिद्धीस आलेलीं स्थळें त्याच्या नाटकांत निर्देशलेलीं असल्यामुळें तो बुद्धाच्यानंतर ठरतो. परंतु कौटिलीय अर्थशास्त्रांत भासाच्या नाटकांतील एक श्लोक आला आहे. ह्या उत्तानसाम्याच्या प्रमाणावर भास कवि चाणाक्याच्या पूर्वीचा कसा ठरतो हें मात्र आम्हांस समजत नाहीं. एक तर प्रतिज्ञा नाटकाच्या चौथ्या अंकांत आलेला "नवं शरावं सलिलस्य पूर्णं सुसंस्कृतम्" हा श्लोक भास आणि चाणक्य ह्या दोघांनीहि एका तिसऱ्या ग्रंथांतून कशावरून घेतला नसेल? शिवाय अर्थशास्त्र हा कांहीं अलंकारशास्त्रावरचा ग्रंथ नाहीं कीं त्यामध्यें एकाद्या नाटकांतील अवतरण आधारासाठी म्हणून येऊं शकेल. चाणक्याचें वर्तनकार्कश्य किंवा कट्टर तत्त्वज्ञान प्रसिद्धच आहे. असा ब्रह्ममयतेजाने दीपणारा चाणक्य ललित वाङ्मयांतील उतारा घेईल हें संभवत नाहीं. तेव्हा भासाने व चाणक्याने वरील श्लोक कोणत्या तरी स्मृतितुल्य ग्रंथांतून घेतला असावा हें मानणें सयुक्तिक आहे. शिवाय अर्थशास्त्र हा ग्रंथ शास्त्रीबुवा म्हणतात इतका जुना आमच्या मतें ठरत नाहीं. चाणक्यप्रणीत अर्थशास्त्रामध्यें जी कांहीं भौगोलिक माहिती आली आहे ती आणि त्याच सुमाराच्या मेग्यास्थिनीस ह्याच्या इंडिका नामक ग्रंथांतील भौगोलिक माहिती ह्या दोहोंत कांहीच मेळ नाहीं. चाणक्य हा चंद्रगुप्ताचा प्रधान. तेव्हा त्याचा संबंध उत्तरेकडील मगध वगैरे देशांशीं असणार. परंतु त्याच्या अर्थशास्त्रांत माहिती मात्र दक्षिणेकडील विशेष. तेव्हा हा मेळ कसा लावावयाचा? भरताचें नाट्यशास्त्र, वात्स्यायनाचें कामशास्त्र आणि चाणक्याचें अर्थशास्त्र ह्या तिन्ही ग्रंथांची मांडणी सारखीच म्हणजे गद्यपद्यमिश्रित आहे. सर्वांचा विषयहि सारखाच ऐहिक स्वरूपाचा आहे; म्हणून ते तिन्ही ग्रंथ एकाच प्रवृत्तीचे, अतएव एकाच कालाचे वाटल्यास नवल नाहीं. धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, कामशास्त्र, नाटयशास्त्र

ह्या सर्व ग्रंथांच्या रचनेच्या बाबतींत पूर्वाचार्यांनी त्या त्या शास्त्रावर बांधलेल्या सूत्रांवर उत्तरकालीं शास्त्राची उभारणी केली असें विद्वान लोक मानतात. मानवधर्मशास्त्राच्या पूर्वी मानवधर्मसूत्रें होतीं व त्यांवरच पुढील ग्रंथ उभारला गेला. त्याच दृष्टीने अर्थ-शास्त्राची सुद्धा कौटल्याच्या नांवावर मोडणारीं सूत्रें प्रचलित असावीं आणि त्यांवरच पुढें कौटिलीय अर्थशास्त्र ग्रंथ निर्माण झाला असावा.

ह्याच दृष्टीने प्रतिमा नाटकांत रावणाच्या तोंडीं आलेला "मानवीयं धर्मशास्त्रं" हा उल्लेख महत्त्वाचा आहे. मानवीय धर्मशास्त्र हा ग्रंथ खिस्तपूर्व २०० च्या सुमारास संस्करण केला गेला आहे ( ब्यूल्हरचें मानवधर्मशास्त्र ). त्या अर्थी भास कवि त्याच्या-पुढें होऊन गेला असला पाहिजे.

अविमारकनाटकाच्या नांदीमध्यें श्रीविष्णूने घेतलेल्या रामावताराचा उल्लेख आला आहे. ज्या अर्थी पाणिनि अर्जुन आणि वासुदेव ह्या जोडांचा उल्लेख करतो आणि रामावताराच्या कल्पनेसंबंधीं अगदी मौन स्वीकारतो, त्या अर्थी पाणिनीच्या काळांत रामावताराची कल्पना उद्भूत झाली नव्हती. रामचरित्राचा निर्देश सर्वसंग्राहक महा-भारतांत आहे. म्हणून रामायणाची निष्पत्ति महाभारताच्या पूर्वी ठरते. महाभारताचीं संस्करणें खि. पू. २०० पासून खि. उ. २०० पर्यंत झाल्याचें हॉपकिन्स आपल्या ग्रंथांत सांगतो. तेव्हा भासाची पूर्वकालमर्यादा ह्या प्रमाणानेहि ठरूं शकते. उत्तर कालमर्यादा म्हणजे कालिदासाचा काल होय. कालिदासाच्या काळाच्या बाबतींतहि शास्त्रीबुवांचें म्हणणें आम्हांस संमत नाहीं. परंतु तो मुद्दा गौण स्वरूपाचा असल्यामुळें त्याचा ऊहापोह आम्ही करीत नाही.

उपोद्घातामध्यें ज्या प्रमाणांत इतिहासविचिकित्सा दिसते त्याच प्रमाणांत भासाच्या नाटकांची सौंदर्यसमीक्षा दिसत नाही. आणि ह्या बाबतींत तर आमची शास्त्रीबुवांपासून विशेष अपेक्षा होती. अविमारक नाटकांतील सौंदर्यासंबंधीं चर्चा सांग झाली नाही. आधारभूत अथवा विवादित श्लोकांचा ग्रंथनिर्देश, कर्तृनिर्देश योग्य रीतीने कांहीं ठिकाणी केलेला नाही. भासाच्या लेखनशैलीसंबंधींहि विवेचन नीटसें झालें नाही.

पुढें दिलेल्या भाषांतरासंबंधीं पूर्वी थोडासा उल्लेख केला आहे. मूलबद्ध भाषांतर आणि मूलांतरित भाषांतर असे दोन भाषांतराचे प्रकार आहेत. त्यांपैकीं देशपांडे यांनी दुसऱ्या प्रकाराचा अवलंब केलेला दिसतो. " भाषान्तर शक्य तितकें आम्ही मूळाला अगदीं तंतोतंत धरून करण्याचा प्रयत्न केला आहे." अशी जरी प्रतिज्ञा आरंभीं केली आहे तरी ती प्रतिज्ञा प्रत्यक्ष भाषांतरांत पदोपदीं मोडली आहे. भाषांतर बरेंच खुलें झालें आहे. भाषांतराच्या भाषेंत एक प्रकारचा प्रेमळपणा अथवा घरगुतीपणा साधला आहे. मूळ श्लोकाचें भाषान्तर गद्यांतच केलें आहे. तिसऱ्या अंकांतील दासींचें संभाषण व विदूषकचेटीचा संवाद फारच मार्मिकपणें मराठींत उतरला आहे.

भवतु भवतु = चालेल; पडन्ति = घुटमळतात; गण्डभेद = चोरटा; रक्षिणः = घस्तवाले; अवशीकरोति = गोंधळविते; असंबद्धप्रलापम् = ना ताळ ना मेळ; एतदपि भोजनं चिन्तयसि(५) = अशा वेळीं सुद्धा तुला गिळावयाचें आठवतें ना; अहो अल्पमूलत्वं महतां चानर्थस्य(५) = ह्या मोठ्या अनर्थाचें कारण किती अल्प आहे. व्यापदः प्रवृत्तिश्च निवृतिश्च(५) = संकट आलें काय आणि गेलें काय. इत्यादि — हे भाषांतराचे चांगले नमुने म्हणूनच समजले जातील.

कांही ठिकाणीं भाषान्तरांत शिथिलपणा आला आहे. कांही ठिकाणीं नजर चुकीने अयवा अर्थविपन्नतेमुळें भाषांतर सुटलें आहे. दुसऱ्या अंकांतील दहावा श्लोक व प्रहृष्टरोमकूपम् = तिसऱ्या अंकांत ३/२० 'संपाद्यते योजना'; संधिपाल ५/६; तदिच्छामि मुहूर्तकं प्रासादे — हीं भाषांतर सुटल्याचीं उदाहरणें होत. मितविक्रम (३) = भेकड; प्रभाव (३) = योग; कृतोपहारं द्वारमुखं (२) यतिशास्त्रं दुर्गुणितं यथा ह्यांचीं भाषांतरें तितकीशीं पटत नाहीत. पांचव्या अंकांतील ५ व्या श्लोकांतील उपमान आणि उपमेय भाषांतरांत नीट उतरलें नाही.

द्वितीय मुद्रणाच्या वेळीं हे दोष नाहीसे होतील. असे कांही दोष असले तरी एकंदरींत शास्त्रीबुवांनी आपली अभ्यासनिष्पत्ति अविमारकाच्या प्रस्तावनेच्या रूपाने मांडून ऐतिहासिक ग्रंथसमीक्षेच्या शास्त्रांत नमुनेदार अशी भर घातली आहे. ह्याबद्दल मराठी वाचक त्यांचे ऋणी राहतील ह्याबद्दल शंका नाही. इतर ग्रंथांचें असेंच निमित्त करून संस्कृत कविपंचककारांनी जो मराठी परीक्षणशास्त्राचा उपक्रम केला तोच पुढे ते चालवितील अशी आशा आहे.

———

# पुस्तकपरीक्षण.

## मोत्यांची माळ

(लेखकः — श्री. नाथ निफाडकर)

श्री. नारायण केशव बेहेरे यांनी आपल्या सर्व स्फुट कवितांचें वरील मथळ्याचें एक फारच सुंदर, सुमारें सातशें पानांचें पुस्तक आमच्याकडे अभिप्रायार्थ पाठविलें आहे. मराठी वाङ्मयक्षेत्रांत अजूनसुद्धा स्पष्टोक्तीचीं परीक्षणें खपत नसल्यामुळें, बेहेरे यांची देणगी आम्हांला प्रथम संकटासारखीच वाटली. त्यांतून हल्ली आमचें स्वतःचें मासिक अस्तित्वांत नसल्यामुळें तर हा नसता त्रासच आम्हांला वाटला. पण खुद्द कवींनीच जेव्हां आमच्या स्पष्टोक्तीच्याच परीक्षणाची अपेक्षा पत्रांत कळविली तेव्हां आमची काळजी दूर झाली. आम्ही समग्रग्रंथवाचनानंतर आमची लेखणी उचलली आहे.[१]

रा. बेहेरे यांच्या लेखणीच्या चौफेरीची ओळख महाराष्ट्रांतील अनेक रसिकांना आहे; वाङ्मयभक्तांना तर पुष्कळच आहे; कवींना तर त्याहून जास्त आहे; आणि टीकाकारांनी तर त्यांच्या लिखाणांचा अभ्यासच केला असला पाहिजे, असें धरून चालणें भाग आहे. आम्ही त्यांच्या पुस्तकांवर स्वतंत्र लेख लिहिला नसला तरी प्रसंगविशेषीं त्यांविषयीं अनेकदा उल्लेख केले आहेत. त्या सर्वांची आज आठवण करितां, एकंदरीने त्यांत त्यांचा गौरवच आहे असें म्हणावयास हरकत नाही; आणि योगायोग असा कीं, वाङ्मयक्षेत्रांत आम्ही दोघेहि साधारणपणे एकाच वर्षी उडी घेतली; त्याचप्रमाणे सुदैवाने त्या क्षेत्राच्या अनेक विभागांत, लेखक या नात्याने आमच्या भेटी होत गेल्या आहेत; व "काव्यकौमुदी" आणि "वेणुनाद" या दोन काव्यसंग्रहांत तर आम्ही संपादकबंधु म्हणून कामहि केलें आहे. सांगावयाचें इतकेंच कीं, गेल्या दीडदोन तपांत ज्या लेखकांच्या लेखांबद्दल एकंदरीने गौरवच वाटत राहिला, व ज्यांना समकालीन ही कालवाचक संज्ञा बहुंशीं लागू पडते, अशा सात-आठ नाणावलेल्या, व तीन-चार टीकावलेल्या ग्रंथकारांपैकीं रा. बेहेरे एक आहेत. म्हणून देखील, किंबहुना म्हणूनच, परीक्षकाच्या ठायीं जो सहानुभूतीचा मुख्य गुण लागतो, त्यास आम्ही पात्र आहोंत अशी आमची समजूत आहे. विद्वत्ता, रसिकता, निरीक्षणशक्ति वगैरे गुण तर टीकाकारांच्या ठायीं लागतातच; शिवाय स्पष्टोक्तीच्या अलौकिक गुणाची तर टीकाकारांच्या ठायीं वाण नसावीच; परंतु विशेषेंकरून काव्यप्रान्तांत परीक्षकांच्या

---

१ परीक्षणाचीं कांहीं पृष्ठें लिहिल्यानंतर महाराष्ट्रसाहित्यपरिषदेचे कार्याध्यक्ष व "पत्रिके" चे संपादक नारायण गोविंद चापेकर यांनी पत्रिकेकरतां हें माळेचें परीक्षण करावें असें पत्र लिहिलें त्यामुळेही उत्तेजन मिळालें.

ठायीं जर कवीबद्दल संपूर्ण प्रेमादर नसेल तर त्यांचे इतर गुण मातीमोल आहेत असें साधार म्हणतां येईल; उलट, इतर गुणांतून प्रेमादराचा विशिष्ट गुण चमकत राहील तर त्या परीक्षकांनी केलेलीं परीक्षणें मोतीमोल होतात. सहानुभूतीच्या अभावीं स्पष्टोक्ति कुटिलनिंदेंत रूपांतर पावते; विद्वत्तेची धार विखारी होते; रसिकतेचे प्रवाह आटतात; आणि निरीक्षणशक्ति मुद्दाम असत्याचे प्रलाप करीत सुटते. उलट, परीक्षकांनी आपल्या सुसंस्कृत मनाचे मनोरे व स्वच्छ व मधुर अशा हृदयाची बाग प्रथमपासूनच कवीच्या हवालीं केली; व नंतर जर ते मनोरे बेडौल दिसले, व ती बाग रणवत् भासली, तर त्याची जबाबदारी सर्वस्वी कवीवरच पडते; व तो जर रागाने भलभलतें वकूं लागला, तर अखेर त्याचेंच हसें होतें. सवत्र आजपर्यंतचीं परीक्षणें जशीं अशाच मनोरचनेने आम्ही केलीं, तसें हेंहि परीक्षण करण्याचा आमचा कृतनिश्चय आहे.

(२) "मोत्यांची माळ" ही पांच सरांची आहे, "मुलांचीं गाणीं" हा पहिला सर पांसष्ट कवितांचा आहे; दुसऱ्या "संसारी गीतें" नामक सरांत त्रेसष्ट मोत्यें आहेत; तिसऱ्यांत छप्पन्न "सृष्टीचे बोल" आहेत. "राष्ट्रीय कवितांचा" चवथा सर अठ्या-त्तर दाण्यांचा आहे; व "कवीचें तत्त्वज्ञान" या पांचव्या सरांत चव्वेचाळीस मौक्तिकें आहेत. याशिवाय कवींनी म्हटलें नाहीं, पण त्यांच्या "भूमिकेचा" कौस्तुभमणि आरंभींच असला तरी माळ मोजतांना मध्यमणीपासूनच जव्हेरी आरंभ करतात. अर्थातच "मोत्यांची माळ" हें श्रीमंती नांव उचलतांना सरांतली मौक्तिकसंख्या, त्यांची अनुक्रमोपक्रमादि रचना इकडेहि खुद्द कवींनीच दृष्टि द्यावयाची होती; पण त्या बाबतींत बेहेरे यांनी बेलाशक दुर्लक्ष केलें आहे. अव्यवस्थित संख्यांमुळें सर तर बेडौल झाले आहेतच; त्यामुळें ती माळहि होत नाहीं किंवा मोत्यांचें एक पेंडही होऊं शकत नाहीं. आणि खुद्द मोत्यांच्या जातींचीही पारख नीट झालेली नाही. "भूमिका" अभ्यासितां, संख्याही अवलोकितां, कवींना "राष्ट्रीय कवितां"चे मणि सर्वांत जास्त आव-डतात, तेव्हां तो सर शेवटीं असावयास पाहिजे होता. "मुलांचीं गाणीं" योग्य ठिकाणीं आहेत; पण नंतर "संसारी गीतांचा" सर ठेवण्यापेक्षां "सृष्टीच्या बोलांचा" सर गुंफावयाचा होता. मुलांजवळ फुलेंच हवीं; व मग संसाराचा दुचाकी गाडा रेटायला हरकत नव्हती. त्या सांसारिक जंजाळांतूनच "राष्ट्रीय कविता" उत्पन्न होतात; तेव्हा त्यांचा सर चवथा व शेवटला असावयचा होता. "तत्त्वज्ञान" हें मौक्तिकमणि गणणें म्हणजे केवळ जुलूम आहे. कौपरसारख्या तत्त्वज्ञानात्मक सुंदर व मधुर कविता असल्या तर त्यांना कदाचित् हिरे म्हणतां येईल. तत्त्वज्ञानाला मौक्तिकमण्यांची संज्ञा औचित्याने सजविण्याची पात्रता एखाद्या ज्ञानेश्वरांतच अथवा एखाद्या एकनाथांतच आढळेल. बाकीच्यांनी ती हांव फुकटाफुकटी धरूं नये. आमच्या मतें रा. रा. बेहेरे यांचें पुस्त-काचें नांव चुकलें. तत्त्वज्ञानाची बेहेरे यांची ५१३ पृष्ठ मधली कल्पना लक्षांत घेऊनहि म्हणतां येतें की, सोनें, मोत्यें, पोंवळें इत्यादिकांची "रुद्राक्षांची माळ" हें नांव, सर्व प्रकारें उचित झालें असतें.

( ३ ) तथापि हा संज्ञावाचक मुद्दा फिरकोळ आहे. मुलांचें नांव चुकलें; पण मुलगा जर सुंदर, सुदृढ व सद्गुणी निघाला, तर तो आपल्या चुकलेल्या नावांतहि जादु उत्पन्न करितो; तेव्हा आपण बेहेरे यांच्या माळेचें अंतरंगपरीक्षणच करूं या.

प्रथम एक गोष्ट निःसंशय कबूल करावयास पाहिजे कीं, हें परीक्षणाचें काम खुद्द कवींनीच बिकट करून सोडिलें आहे. कारण त्यांच्या कवितामुक्तांवर त्यांनी आपल्या "भूमिके"ने वेगवेगळे प्रकाशकिरणहि पाडून ठेविले आहेत; आणि ते प्रकाश-किरणहि असे आहेत कीं, त्यामुळे कांहीं मण्यांचें तेज अधिक झळकतें तर कांहीं मण्यांचें व्यर्थ मंदावतें; आणि एकंदर माळ जरी फारच खुलते तरी त्या वेळीं ती तुटून सगळेचे सगळे मणि अधांतरीं उडून, मराठी काव्यवाङ्मयांत चकमकतात कीं काय असा भास होतो. कारण गेल्या तीस वर्षांतल्या प्रमुख कवींच्या कविता चटकन् नेत्रांसमोर चमकतात; विशेषेंकरून ( पण व्यर्थ ), पुणेकरी कवींचीं काव्यवळणें लपकतात; व त्यांच्या तेजो-वलयांनी रसिकांची अंतर्दृष्टि सुखवते तशी दुखवतेहि. हीं स्टेजवरील ट्रान्स्फरसीन्ससारखीं दृश्यें बेहेरे यांच्या "भूमिके"नेच उत्पन्न होतात; हें जरी खरें असलें तरी, त्या "भूमिके"चा संबंध खुद्द माळेशीं थोडाथोडका नसल्यामुळें, त्या दृश्यांना अतीच महत्त्व आलें आहे; व तीं दृश्येंहि अशीं आहेत कीं, तीं आज बेहेरे यांच्या भूमिकेने भडकदार झालीं असलीं तरी, तीं तेजोवलयें गेल्या दहा वर्षांत जमत आलीं आहेत; व यापुढे त्यांचा जर कोणी शांतपणें विचार केला नाही तर, त्यामुळे पुणें व नागपूर यांतील कवींत भांडणें जुंपून शारदादेवीची दोघांकडून विटंबना होण्याची भीति आहे. म्हणून बेहेरे यांच्या भूमिकेवरूनच त्यांची " मोत्यांची माळ " अभ्यासिली पाहिजे.

( ४ ) "भूमिके"वरून आरंभींच असा विचार सुचतो कीं, कवीने आपली भूमिका आपणच सांगावी, किंवा ती रसिकांनी त्याच्या कवनांतून ओळखावी. या प्रश्नाला निश्चयात्मक असें एकच उत्तर देतां येणार नाही. खुद्द कवीची मनोरचना आणि त्याची कविता यांत जसा संबंध असेल तशी भूमिकेची अवश्यकता अथवा अनवश्यकता ठरेल. तो संबंध जर मुख्यतः ( Subjective ) अंतश्चोदनेचा असला तर भूमिकेमुळे कवितांचें तेज चढतें; व तो संबंध जर ( Objective ) बहिर्मुखतेचा असेल तर भूमिकेची मुळींच जरूरी नसते. त्याचप्रमाणें त्या कवीचा कालच जर अंतःकरणप्रवृत्तीच्या क्षोभाचा असेल, तर क्षोभोत्पन्न चुरशीमुळेहि कवीला आपल्या अंतरंगाची ओळख करून देऊन, आपली कविता बाहेर पाठवावी लागते. शिवाय एखाद्या विशिष्ट स्थानीं उभें राहून जर चित्रकाराने एखादा देखावा चितारला असेल तर, त्याच स्थानीं रसिकांनी उभें राहून आपलें चित्र पहावें, असा आग्रह त्या चित्र-काराला धरतां येतो. या तिन्ही दृष्टींनी "मोत्यांच्या माळे"ला "भूमिके"ची खचित जरूरी होती. नाहीतरी, मोत्यांच्याच माळेला केवळ नाही तर, रुद्राक्षांच्या अथवा फुलांच्या माळेलाहि वक्षस्थलाची पार्श्वभूमि ही पाहिजेच असते.

वरील विधानांवरून रा. बेहेरे यांची स्फुट कविता मुख्यतः अंतरंगाविष्कर-

णाची आहे हें दिसलें पाहिजे, हें उघड आहे. आम्हांला वाटतें कीं या बाबतींत दुमत होणार नाही. माळेचा कोणताहि सर कोठेहि दहादा उघडावा; त्यांतून पांचसात वेळां तरी आपणांस बेहेरे आपल्या हृदयाचींच लहरी दाखवतांना आढळतील. ते मुलांशीं खेळोत, मुलांप्रमाणें खेळोत, रुसोत, चिडोत, पस्तावा पावोत किंवा त्यांना उपदेश करोत, त्यांत जसे ते होतां होईल तों स्वहृदयसंवेदनाच दाखवितात, तसेंच "संसारी गीतांत" व "सृष्टीच्या बोलांत" ही दाखवितात. एवढेंच नव्हे तर, जेथें त्यांनी स्वहृदयाला व्यापक रूप देणेंच रास्त होतें. अशा "राष्ट्रीय कवितांत"हि ते स्वभावनांतच गुरफटले आहेत; नव्हे, याच्याहि पलीकडे ते घसरले आहेत. ज्या तत्त्वज्ञानांत प्रामुख्याने बुद्धीचीच चमक उमटावयास पाहिजे, त्या तत्त्वज्ञानांतसुद्धा त्यांनी स्वभावना-विष्करणाचा मोह सोडलेला नाही. तूर्त एकच उदाहरण घेऊं. "आत्महत्त्येचा विचार" ही पृ. ५६३वरली खूप मोठी कविता वाचतां आत्महत्त्येविषयीं आपणांस एकहि नवीन विचार आढळत नाही. उलट शेवटलें सहावें कडवें तर बरोबर आत्महत्त्येच्या विरुद्धच आहे. कवितेंतून सौधारोहण आहे व रम्यचंद्रिकाहि आहे. आणि आत्म-हत्त्येच्या विचाराला त्या वस्तु पार्श्वभागासाठीं आणल्या आहेत असें समजलें तरी कवि, सवाई माधवरावाप्रमाणे खालीं उडी घेऊन मरण्यास सौधावर जात नाही; किंवा पुंड-रीकाप्रमाणें त्याचे प्राण चंद्रमा हरणहि करीत नाही, तर कवि तेथें फक्त मन रिझवाव-यालाच जातो; व त्याचें मन कांही रिझत नाहीं. हे आत्महत्त्येचे विचार तर नाहीतच, पण या भावनाहि पण आत्महत्त्येच्या नाहीत. बेहेरे यांची स्वतःची आत्महत्त्येची भावना नाहीं. (ईश्वराच्या कृपेने त्यांना तशी भावना कधींहि न होवो.) पण नाट्यगीतांस अत्यावश्यक असलेला परहृदयप्रवेशहि त्यांना माहित नाही. याविषयीं पुढें लिहावयाचें आहे; तूर्त एवढेंच सांगावयाचें आहे कीं, आत्मीयतेचा अतिरेक माळेंतून झाला आहे. मात्र हा अतिरेक अहंकार नव्हे. बेहेरे यांची कविता बहुंशीं — नको तेथे सुद्धा — अंतरंगकेंद्रित झाली आहे; व त्या कारणाने "भूमिके"ची फार जरूरी होती, एवढेंच एथे ध्यावयाचें.

या ठिकाणीं एका गोष्टीचा मुद्दाम उल्लेख करणें आहे. स्वतः बेहेरे या आपल्या आत्मप्रत्ययाविषयीं "भूमिकें"त काय म्हणतात हें पाहूं जातां, स्पष्ट असें त्यांत कांहीच आढळत नाहीं; व अस्पष्ट असे जितके ध्वनि उमटतात, त्या सर्वांचे निनाद सामुदायिक रीत्या आत्मप्रत्ययाच्या विरुद्ध न आहेत. इतर कवींपासून ज्याचें वैशिष्ट्य वेगळें आहे; ज्याला परमेश्वराने विशिष्टतेने निवडून एक कानमंत्र सांगितला आहे व त्याला त्या मंत्राकरतांच केवळ अवनीवर पाठविलें आहे, तो आत्मप्रत्ययी असलाच पाहिजे; परंतु तो कवि परिस्थितीशीं समरस होतो ही गोष्ट खोटी; उलट तो परिस्थितीशीं विषमरसच असतो. लोकगंगेच्या लाटांबरोबर तो वाहत जात नाही; तर त्या प्रवाहाला तो वळण देण्याकरितां पराकाष्ठा करतो. लोकांच्या आकांक्षांचें प्रतिबिंब त्याच्या कवनांत पडलेलें नसतें; तर त्याचीं कवनें लोकांना आकांक्षा धरावयास भाग पाडतात. कवि वेगळा व

मुत्सद्दी वेगळा. तो कवि एकच पायरी ( भविष्यकाळाची ) चढलेला नसतो; तर तो लोकांपासून फार दूर असून त्याचीं काव्यकिरणें लोकांच्या हृदयीं भिनत राहतात. Oscar Wilde याने म्हटलें आहे तें खरेंच कीं "The public is wonderfully tolerant. It forgives everything except genius." एखादा संदेशप्रेरित कवि भविष्यकाळाचें एकहि चित्र काढणार नाही; कदाचित् रामायणासारखें गतकालीन अथवा समकालीन काव्यचित्र उभारील. पण बेहेरे यांच्या म्हणण्याप्रमाणें तो संदेशप्रेरित होणार नाही. रामायण वाल्मीकिमुनींनी अगोदर रचिलें व तें भविष्य पुढे खरें ठरेल या पौराणिक कथेचा — पण ही कथा पौराणिक नाहीच; बेहेरे यांनी संस्कृत रामायण वाचलें नसावें — अवलंब करून आपलें शास्त्रीय पद्धतीचें विधान ठोकून दिलेलें पाहून वाईट वाटतें; आमची खात्री आहे कीं, संदेश या शब्दाचा अर्थ अलीकडील राजकारणी मुत्सद्यांच्या तोंडीं असलेलाच त्यांना अभिप्रेत असला पाहिजे. समता, बंधुता व स्वतंत्रता Equality, Fraternity and Liberty या लोकशाहीचा त्रिताल ठेका त्यांच्या काव्यसंदेशाचा आहे असें ते "भूमिकें"त वारंवार वेगवेगळ्या शब्दांत सांगतात. परंतु कविसंदेशाला इतकें खाली ओढावयाला आम्ही महाराष्ट्रीय कवि जरी आज तयार असूं, तरी श्रीशारदादेवीची तशी परवानगी मिळणार नाही. शारदेच्या वीणाझंकारांना देश-काल-राष्ट्र-मर्यादाहि अडवूं शकणार नाहीत. अथवा शारदा कशाला, खुद्द आमचे बेहेरेदेखील तयार नाहीत. त्यांचीं कवनें व त्यांची भूमिका यांत चांगलाच विरोधाभास आहे. आमच्या कवीची पहिलीच कविता "विरोधाभास" हीच आहे. "मानव कीं दानव" या कवितेंत कवि काय उपदेशतात पहा :—

प्रभु आहे ठायीं ठायीं । पायरी मनुज ही एक
प्रल्हाद भक्त पाहून । खांबांतुनि देई हांक
'प्रस्तर, तरु पशु वा पक्षी । सारखे जगीं तूं लेख'
सृष्टीस प्रेम वाहील
सृष्टि त्या साद घालील
संकटीं प्रभू धांवेल
गुणगुणती कानीं बोल । यांनींच शास्त्र वाढेल ॥ पृ. ५९३.

आता समता, बंधुता व स्वतंत्रता हा राष्ट्रीय संदेश, आणि "मनुष्य ही देवाच्या सृष्टीची एक पायरी आहे; सृष्टीवर प्रेम करा; म्हणजेच शास्त्र वाढेल" हा विश्वप्रेमसंदेश, यांत दिव्यतर कोणता आहे हें ठरविण्याचें कारणच नाही. प्रेसओपिनियन व चालू कालची जनता जरी नाही तरी निदान सत्कवि तरी, विश्वप्रेमसंदेशालाच अधिक महत्त्व देतील. आणि तेच कवि खाली उतरून वरील दोनही संदेशांची सांगड घालण्याचा प्रयत्न करतील. पण मोठ्यांत धाकटे मावतें, पण धाकट्याला मोठें पुरून उरतें, हें त्यांना सांगावयालाच का पाहिजे ?

येथें स्वाभाविकपणेंच प्रश्न उत्पन्न होतो कीं, कोणता संदेश दिव्यतर हा वाद

नसून रा. बेहेरे यांचा काव्यसंदेश कोणता आहे हें पहा. परंतु त्याला अजून अवकाश आहे. तूर्त त्यांची भूमिका त्यांच्या आत्मप्रत्ययीभावाचें योग्य दिग्दर्शन करीत नाही. एवढेंच आढळलें तें दाखविलें आहे. त्यांची स्फुट कविता बहिर्मुख नाही असें सामान्यें-करून म्हणतां येतें; म्हणून तर आत्मीयतेकरतां त्यांनी " भूमिके "त त्याविषयीं स्पष्ट रूपरेषा काढावयाची होती. परंतु दुर्दैवाने ते " भूमिका " म्हणजे आत्मचरित्रच समजले असें दिसतें. भूमिकेंत आत्मचरित्र येत नाही असें नाहीं. परंतु जो विशिष्ट संदेश कवि घेऊन आला असतो त्या संदेशाने प्रस्फुरित झालेल्या कवितांवर ज्यांमुळे विशेष उजेड पडेल, त्याच चरित्रविषयक गोष्टी भूमिकेंतून आल्या पाहिजेत. जन्म केव्हा झाला, पहिली कविता केव्हा लिहिली, पत्नी सुंदर होती, अमक्या युनिव्हर्सि-टीची अमकी परीक्षा अमक्या वयांत पास झाली, अमक्या ठिकाणीं अमकी नोकरी झाली, इत्यादि शेंकडों गोष्टी भूमिकेंत तेव्हाच कार्यकारी होतील की जेव्हा त्यांपैकी एकादी जरी गाळली तरी तुमच्या काव्यसंदेशाचें तेज तेवढेंच कमी होईल. त्यावेळीं Oscar Wilde च्या म्हणण्याप्रमाणें "Autobiography is irresistible" पण तसा जर प्रकार तसेल तर त्या सर्व गोष्टी निव्वळ आत्मचरित्रपर होतात व मग Autobiography is ridiculous असें म्हणण्याची पाळी येते. रा. नारायणरावजींची " भूमिका " कांही ठिकाणीं खरोखरच भूमिका झालेली असून कांही भाग तर आत्मचरित्रांत सुद्धा हास्या-स्पद वाटण्यासारखा आहे. पृ. १८ वरील रा. टेकाडे यांच्याविषयींचा मजकूर उदाहर-णादाखल आम्ही देतों. तो " आभारां "त जावयाला पाहिजे होता. सुदैवाने असा मजकूर फारच थोडा आहे व आत्मचरित्रांत शोभण्यासारखा जेवढा मजकूर आहे, त्या-पेक्षां अस्सल "भूमिके"चाच पुष्कळ आहे; आणि म्हणूनच आत्मप्रत्ययीभावाबद्दल त्यांत उत्कृष्ट विशदीकरण होईल अशी अपेक्षा होती ती खोटी ठरल्याचें विशेष वाईट वाटतें.

(५) आतां भूमिकेच्या जरूरीचा दुसरा मुद्दा घेऊं या. कवीच कालच क्षोभाचा असेल तर त्याला क्षोभोत्पन्न चुरशीमुळे आपल्या अंतरंगाची ओळख अगाऊ करून देणें प्राप्त होतें हें अगदी खरें आहे.

जगांतील कोणत्याहि महत्त्वाच्या भाषांचें वाङ्मय अभ्यासितां, त्यांत विशिष्ट ठशांचीं युगें तयार होत असलेलीं व असतांनाहि आढळतात. तयार झालेलीं अशीं ज्या टीकाकारांना आढळतात त्यांचें युगसमीक्षण पुष्कळांशीं अचूक असतें. कारण त्यांच्यापुढे सर्व सामुग्री तयार असते; व त्यांचा कोणा एका कवीशीं अगर कविसंघाशीं जिव्हाळ्याचा संबंध नसल्यामुळे, त्यांना निरपेक्ष दृष्टींनी परीक्षण साधतें. परंतु युग-परिवर्तनाच्या काळांतच जे कवि सापडतात, त्यांना अनेक गोष्टींचें, आजचें मोठें पण उद्यांचें छोटें महत्त्व नीट लक्षांत घेणें जड जाते. तरीसुद्धां ते ज्याला साधतें, व उद्यांचें समीक्षण जो आजच बिनचूक करतो त्याला Prophet-poet म्हणतात. असा Prophet-poet विरळा; त्यांतून ज्याची कविता आत्मप्रत्ययाचीच मुख्यतः आहे, त्याला तर हें द्रष्टेपण

अतिशय दुःसाध्य असतें. तरीहि Prophet-poet हटकून स्वयंकेंद्रित असतो. कारण तें केंद्र परमेश्वरी संदेशाचेंच असतें.

आज १९३० सालीं आमच्या मराठी काव्यवाङ्मयाचें युगपरिवर्तन झालें आहे असें जर कोणाला वाटत असेल तर तें साफ चुकीचें आहे. कै. केशवसुतांनी अंतःकेंद्रित कवितांना आरंभ केला असला तरी, त्या ठश्याचीं सर्व अक्षरें व कडेचा कंगोरा अजून तयार झालेला नाही. सर्व कविवरांची अंतःकरणपूर्वक क्षमा याचून आम्ही जाहीर करतों की, आम्हां कवींच्या भावना अजून पुष्कळ परोपजीवि आहेत. खुद्द केशवसुतांचा पायंडाच उलटा झाला होता. त्यांनीं आगरकरांपासूनच सजीवता मिळविली. मुत्सद्यापासून कवि शिकला; कवीने मुत्सद्याला तेज द्यावयाचें हा निसर्ग नियम व परमेश्वरी हेतु आहे. गोपींनी कृष्णाच्या दिव्यावरून आपापले दिवे लावून घ्यावयाचे; पण येथे कृष्णानेच गोपा(ळा)च्या दिव्यावर आपला काव्यदीप लावून घेतला. प्राचीनकालीं गद्य नव्हतें; आज तेंच जास्त तेजस्वी आहे; या प्रवादांत दम नाही. कवीने वाटल्यास् गद्यहि लिहावें. वेहेरे गद्यदेखील लिहितात; फार चांगलें लिहितात; पद्याहून अधिक चांगलें लिहितात; ही आनंदाची गोष्ट आहे. त्यांच्या गद्यांत चमत्कृतिपूर्ण नावीन्य व चैतन्य असतें; तें त्यांच्या पद्यांत दुर्दैवाने नाही; पण त्याला कारण केवळ त्यांचा बेफिकीरपणा; असो. यविषयीं सविस्तर पुढे लिहूंच. येथे सांगावयाचें तें एवढेंच की, जें स्वतंत्रतेचें, सुंदरतेचें, सजीवतेचें, सुबकतेचें व सौष्ठवाचें काव्यौजस् मराठी आधुनिक कवितेला साधलें नाही, तें कोणातरी कवीकडून साधल्याविना आधुनिक युगपरिवर्तन कायम झालें, असें समजतां येणार नाही. ते कां साधलें नाही, कोणाचे कोणते गुण व कोणते दोष आहेत हे प्रश्न रा. वेहेरे यांच्या "भूमिके"ने तेजस्वितेने पुढे आणिले आहेत. त्यांचा शांत चित्ताने विचार झाला म्हणजे ओघानेच "मोत्यांच्या माळे"चीहि सहज परीक्षा होणार आहे.

हल्लीच्या युगांतलें वातावरण अत्यंत क्षोभजनक आहे हें कोणीहि नाकारणार नाही. परंतु त्याचा प्रस्तुतच्या मराठी काव्यवाङ्मयाशीं कसा संबंध आहे हें श्री. वेहेरे यांनाच सांगूं दिलेलें बरें. ते म्हणतातः—

" राष्ट्रांतील आंदोलनामुळे– मग तें आंदोलन कौटुम्बिक, सामाजिक, धार्मिक राष्ट्रीय किंवा आर्थिक अशा कोणत्याहि स्वरूपाचें असो– मन हेलावलें, व हृदयांतील खळबळ, शब्दांच्या द्वाराने झाली, आणि तें शब्दचित्र सुंदर असलें तरच त्याला वाङ्मयांत कायमचें स्थान मिळूं शकेल. ....सौंदर्य हें वाङ्मयाचें लक्षण आहे, आणि आनंद ही त्यापासून होणारी संवेदना आहे. परंतु वाचकांच्या मनोभूमिकेशीं समरस होईल तेंच त्याला आनंद देऊं शकेल; आणि सौंदर्य हें देखील पाहणाऱ्याच्या मनोभूमिकेवर अवलंबून आहे.....कलेकरतां कला ( Art for Art's sake ) ही ओरड शुद्ध मानभावीपणाची आहे. संदेश सांगणाऱ्या थोर लेखकांची उपदेशपर (Didactic) या विशेषणाने, भावनाशून्य लिखाणाचें समर्थन करणारे लोक हेटाळणी करतांना

आढळतात.....वाङ्मयाचें ध्येय कला नसून ज्ञानदान, लोकजागृति, ध्येयदर्शन हेंच होय. संदेश सांगण्याच्या चातुर्याला कला हें नांव देतां येईल... उपदेशाची थोरवी हें वाङ्मयाच्या भरीवतेचें एकच माप होय!"

या उताऱ्यांत श्री. बेहेरे यांनी जीं सर्वसामान्य विधानें केलीं आहेत, त्यांना पुष्टि देण्याकरतां वास्तविक "भूमिके"चा बराचसा भाग खर्चीं घालावयाचा होता. स्वतःच्या कवितांतील जे दोष टीकाकारांकडून दाखवले जातात, त्यांचें निराकरण बेहेरे यांनी करण्याचा प्रयत्न केला आहे, तेवढा भाग "भूमिके"ला खचित शोभतो. परंतु पुणेकर कवींवर त्यांनी जे ताशेरे झाडले आहेत, त्यांत विकारवशताच जास्त उमटली आहे, हें कष्टानें म्हणावें लागतें. त्या ताशेऱ्यांतहि बरेंच तथ्य आहे; नाही असें नाही. परंतु विकारवशतेने श्री. बेहेरे यांचें विवेचन कांही ठिकाणीं चुकलें तर कांही ठिकाणीं अपुरें पडलें; व कांही ठिकाणीं तर हास्यास्पदच झालें आहे. वास्तविक श्री. बेहेरे यांनी स्वतः अगदी गंभीर राहून उपहासाची शक्ति योजावयाची होती. परंतु आधुनिक मराठी कवींत विनोद अजून उत्पन्न व्हावयाचा आहे. बेहेरे यांचे गद्यात्मक 'बाण' ही खरोखरच बोथट आहेत. परंतु विनोद करतां आला नाही तरी बेहेरे यांनी गांभीर्य तरी सोडावयाचें नव्हतें. त्यांची गंभीर गद्यात्मक लेखनपद्धति खरोखरच सुरेख आहे. आधुनिक काव्ययुगांत अनेक बाजूंनी आपली लेखणी चालवून शत्रु उत्पन्न करणारे, माझ्या ऐकिवांत दोनच नांणावलेले कवि आहेत; त्यांत मृतांपैकीं तसल्या कवींची भर घातली तर गोविंदाग्रजांना तो मान कांही अंशांनी मिळेल; पण हयातांपैकीं एक बेहेरे आहेत. त्यांनी जर "भूमिके"त आपलें गांभीर्य सोडलें नसतें, तर त्यांच्या विवेचनाला निर्णयात्मक अखेरच्या शब्दाचा मान मिळाला असता. दुर्दैवाने ते चिडले; व त्यामुळे ते उपमुद्देही वादस्थितच राहिले आहेत. आम्ही ते यथाक्रम घेऊंच.

आता प्रथम बेहेरे यांच्या भूमिकेंतील अवतरणाचा विचार करूं. राष्ट्रीय आंदोलनामुळे मन हेलावलें, हृदय खळबळलें व त्यांचें शब्दचित्र सुंदर असलें, तर त्या शब्दचित्राला वाङ्मयांत कायमचें स्थान मिळूं शकतें हें बेहेरे यांचें मुख्य विधान आहे; व विशेष खोलांत न जाणाऱ्यांना तें पटण्यासारखेंच आहे. पण "भूमिका"च जर खोलांत जाऊं पाहते, तर रसिकांनीहि तसें करण्यास प्रत्यवाय नाही. तसें करतां राष्ट्रीय या संज्ञेने जें काव्यध्येय व्यक्त होतें, तें आता विसाव्या शतकांत दुसऱ्या पायरीचें (Second-rate) ठरतें. राष्ट्रीय शब्दाची व्याप्ति दाखवतांना भूमिकादर्शकांनी त्यांत धार्मिक स्वरूपाचीही गणना केली आहे खरी. परंतु त्यामुळे सांस्कृतिक अशी व्यापक संज्ञा तयार होते; व त्याचें मुख्य स्वरूप विश्वप्रेमाचेंच असतें. आजच्या युगांत राष्ट्रीय (National) संज्ञेला ठायीं ठायीं ओहोटी लागत आहे व तिथली जागा सांस्कृतिक संज्ञा व्यापित आहे. देशमर्यादा प्राणघातक होतात; आर्थिक मर्यादा समाजविध्वंसक होतात, सामाजिक मर्यादा धर्महानि करतात; धार्मिक मर्यादा बुद्धीला पूर्ण वाव देत नाहीत; बौद्धिक मर्यादा शिक्षणाचा नाश करतात; शैक्षणिक मर्यादा माणु-

सकींच्याच नरडीवर नख ठेवितात; सर्वत्र माणुसकी, मानव्य, मानवता (Humanity, Manliness,) जर सुंदरतेने उत्क्रान्त करावयाची असेल तर आत्मिक बल (Spirituality) हेंच ध्येय ठेविलें पाहिजे; हा धडा आता सर्व जग हजारों वर्षांच्या नानाप्रकारच्या संहाराने शिकत आहे. युरोपियन महायुद्धापर्यंत राष्ट्रीय ध्येयाची अंतिमता सर्वमान्य होती. फक्त मोठमोठे ऋषि, मुनि, तपस्वी, विश्वप्रेमसंदेशाचे कवि इत्यादि शेंदीडशें मानवरत्नांनी मात्र त्या सर्वमान्य (Nationality) राष्ट्रीयतेला दुय्यम स्थानच दिलें; व मनुजप्रेम, व विश्वप्रेम यांची पूजा करा असा अट्टाहास धरला. परंतु, कोणास ठावें की परमेश्वराची लीला कीं मानवांचा अहंकार, यांपैकीं कोणीतरी तें ध्येय लोकांत रुजूं दिलें नाही खरें. कदाचित् अजूनहि कांही वर्षे तें रुजणार नाही. पण त्याकरतां तर मुद्दामच तें सांस्कृतिक उच्चतम ध्येय सत्कवींनी गायिलें पाहिजे. आणि वर "मानव कीं दानव" या कवितेंतील उताऱ्यावरून वेहेरे यांच्याठायींसुद्धा त्या ध्येयाच्या संदेशलहरी स्फुरतात हें दिसून येतें. "खरा नाटककार" "शून्याची चालक शक्ति;" "ओसाडींतील सुख" "मनाची एक स्थिति;" "तान्हें रोप;" "चि. श्रीकृष्णास;" "माधुकरी;" "चल ग पोरी वनामधीं;" "पुष्प नेलें;" "जर तूं गेली तर;" "माझें दुःख किती मोठें आहे" "प्रथम सदा पूर्व फुलें;" "मैना" "लाडकें वासरूं" "कवींचें राज्य;" "हांका महार दूर;" "माझे बंधु;" वगैरे पांचपन्नास कविता विश्वप्रेमप्रस्फुरितच आहेत. हीं नांवें पांचही सरांतून आम्हीं निवडलीं आहेत हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. या हटकून विस्तारणाऱ्या परीक्षणांत उतारे देऊन जागा अडेल; म्हणून आम्ही वरील कविता वाचण्याची शिफारस करतों. तरीसुद्धा एक दोन तरी उतारे देण्याचा मोह आवरत नाही. 'मैने' चे शेवटलें कडवें किती विलक्षण हृदयस्पर्शी आहे पहा.

गाण्यानें ती मैना मेली
हृदयाचीं तीं शकलें झालीं !
आनंदी मम वृत्ति जळाली
प्रणाम केला शेवटचा मी, त्या दिवशीं हो, गाण्याला !
दुसरें कोणी घेतां ताना
समोर दिसते मजला मैना
क्षणीं दूर मी पळतों; देतों विश्रांती या चित्ताला ! पृ. ३३१

(ही शेवटली ओळ मात्र एकदम कमजोर झाली आहे. "क्षणीं दूर मी पळतों, तरिही विश्रांती नच हृदयाला;" अशी केवळ शोकपर्यवसायीच अखेरी या कवितेला पाहिजे होती; असो.)

"प्रथम सदा पूर्व फुले" या कवितेंत तर कवीच्या स्नेहसागराची विशालताच दिसते. ते म्हणतात,

युद्धानलिं होरपळे
पश्चिम निज दर्पबळें

पूर्वेला शांति फुले
तत्त्व जुनें, नविन परी आज भासलें ॥ ६ ॥
शांति फुलो या देशीं
तेज भरो परदेशीं
विझवों कलहाग्नीसी
विनवी हें ईशाला, हात जोडिले ॥ ७ ॥ पृ. २७६

केवळ चांगले उतारे देऊन कवितांना चांगलें म्हणण्याचा, अथवा पूर्व संदर्भ न दाखवतां साध्या ओळी तेवढ्या ( जमल्यास मुद्दाम चुक्या करवून ) देऊन कवितांना वाईट म्हणण्याचा ताज्या गोमाश्यासारख्या टीकाकारांचा उपक्रम आम्ही आजच्या "टोटिझम्" च्या कालांत सुद्धा घेणार नाही. आमची खात्री आहे की, दुसऱ्या उताऱ्यांतील काव्य प्रचलित "प्रेस" ला मुळींच खपणार नाहीं. सांगावयाचें इतकेंच होतें की खुद्द बेहरे यांनी सांस्कृतिक संदेशाचे निनाद ऐकूं येत असतां, त्यांनी राष्ट्रीयत्वाची सतारच कां छेडावी याचें आश्चर्य वाटतें. नेपोलियनच्या जर्मनीवरील स्वारींतही गटेने आपलें सांस्कृतिक ध्येय गढूळ केलें नव्हतें; तरीहि जर्मनीचे पुनरुज्जीवन करणाऱ्यांत त्याचें अग्रस्थान आहे हें बेहरे यांना माहित असलेंच पाहिजे.

काव्यसौंदर्य वाचकांच्या मनोभूमिकेवर अवलंबून आहे ही गोष्ट जरी खरी असली तरी मुळांत सौंदर्य हें सौंदर्यच पाहिजे, ही दुसरी बाजूही विसरून चालणार नाही. वाचकांची मनोभूमिका कवीच्या ताब्यांत नसते; व खुद्द कविलोक मत्सरी असतात; ते आपले पित्ते तयार करून त्यांच्याकडून पित्त ओकवितात; या सगळ्या गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी जे दोनचार तरी कवी, स्नेही व रसिक आढळतील त्यांच्यावर तरी कवीने "वराहाला ऐरावत समजाच" असा प्रसंग आणूं नये. आम्ही अत्यानंदाने जाहीर करतों की, बेहेरे यांची कविता उषेसारखी म्हणजे उर्वशीसारखी सुंदर नसली तरी, अलीकडल्या खानबिश्रीच्या संसारांतील, अनेक मुलांच्या पुरंध्रीसारखी अंगाने भरलेली व भरलेल्या संसारांत राहणारी, अतएव कर्तव्यदक्ष, प्रेमळ, सुखाने सुखी व दुःखाने दुःखी होणारी आहे. काळवेळ पाहून ती चरका चालविते, चरक्यावरलीं सुखी गाणींही गाते; पण पतीकरतां इच्छा नसतांही उत्सवप्रसंगीं हजर राहून प्रासंगिक गाणीं गाते. तथापि तिच्या हृदयांत जी विश्वप्रेमाची ज्योत आहे, ती पाहून ती स्वतःच घाबरते; कारण तिला माहित आहे की एकदा का तिला फुंकार घातला की या मर्त्य जगांत, निदान हिंदुस्थानांत, आपल्या, आपल्या पतीच्या व आपल्या मुलांच्या नाशिबांत "फकिरी" ही ठरलेली ! ती अमीरीप्रमाणें फकिरीचींही पदें गाईल; पण प्रत्यक्ष फकिरींतील गोडी, आतां उतरलेल्या उतरंडीच्या वयांत, ती चाखायला तयार नाही. ती विनोदी असती तर तिला फकिरीचा इतका बाऊ वाटला नसता. असो.

कलेकरतां कला ( Art for arts ' sake ) या ओरडेचा, बेहेरे यांनी गैरसमजें करून घेतलेला दिसतो. संदेशाविषयींच खरी ओरड आहे. विशेषेंकरून शून्यसंशोधनाचा

केशवसुतीय शिक्का आधुनिक बच्चांना हास्यास्पद वाटतो. हें शून्यसंशोधन व ईश्वरी संदेश यांच्या पायीं कवीचा जर उपदेशाचाच (Didactic) ध्वनि (Tone) होऊं लागला तर कसलें काव्य, असें त्या नवतरुणांना वाटतें; व मग तें टीका करतां करतां, "काव्य ही कला आहे" असेंही प्रतिपादन करितात. तेव्हां संशोधन, ईश्वरी संदेश, व उपदेशात्मक ध्वनि यांची सांगड घालावयास हवी. ती घालण्याचा बेहेरे यांनी जो प्रयत्न केला त्यांत ते व्यर्थ चिडले आहेत. कारण संदेश सांगणारा जरी हरदास असला तरी सुद्धा त्याने निव्वळ निरूपण केलें तर तो नकोसा होतो; तर मग कवीची गोष्ट कशाला? कवींने उपदेश करूं नये असें कोणीही म्हणणार नाही. परंतु त्यांत कांही तरी नावीन्य, थोडी तरी चमत्कृति, अल्पसा तरी आवेश, यत्किंचित् तरी पार्श्वभाग, ठिणगीचें तरी ओजस् हवें कीं नको? (Humours are distinguished by their Hue) प्रत्येकाच्या विशिष्ट स्वभावलहरी असतात; त्या त्यांच्या रंगरूपावरून, नाही तर कशावरून ओळखावयाच्या? ज्ञानेश्वरांचें जें ब्रह्म तेंच नाथांचें व तेंच बेहेरे यांचेंही; पण तें दृग्गोचर होतांना नामरूपादि उपाधींनाहि सतेज करतें. (Cowper) तर सर्वस्वी (Didactic poet) च होता; पण त्याचें वैशिष्ट्य किती तरी ठळक आहे पहा. आता तोच उपदेश (Dryden) कसा करतो पहा:—

त्याला (Nuns, priests) वर तडाखा उडवावयाचा होता. तेव्हा त्याने एका कोंबड्याचीच गोष्ट सांगितली. तींत त्या कोंबड्याला स्वप्न पडलें कीं आपणांला एका खोकडाने खाऊन टाकलें. त्याने ते आपल्या बायकांना सांगितलें; पण त्याची जी पट्टराणी होती तिने त्याला धीर देण्याकरतां म्हटलें:—

No woman can endure a Recreant Knight,
He mnst be bold by day and free by night;
Our sex desires a Husband or a Friend,
Who can our Honour and his own defend.
Wise, Hardy, Secret, liberal of his Purse;
A Fool is nauseous, but a Coward worse.

आता कौपरच्या Satiric thong पेक्षां Dryden चा Humourous whip कसा भिन्न आहे पहा. Dryden ने गोष्ट संपवून एक ओळ मजेदार लिहिली आहे. The truth is moral, though the Tale a Lie. म्हणजे नामरूपादी उपाधि असत्य असल्या तरी ॐकाराचें आविष्करण करण्यास त्यांची जरूरी असते. खुद्द बेहेरेदेखील कबूल करितात की, संदेश सांगण्याच्या चातुर्याला कला हें नांव देतां येईल. परंतु ही कबूली भीत भीत दिल्यासारखी होते. कारण त्या चातुर्यांतही ते उपदेशच कोंबतात. आम्ही म्हणतों की उपदेश देखील करा; पण तो चातुर्यांने करा. उपदेश, चातुर्य, कला, नव्हे संदेशदेखील, पृथक् पृथक् मांडतां आले तरी वस्तुतः ते प्राभिन्न नसतात. भोंवरा, भोंवऱ्याचा रंग, भोंवऱ्याची गति व भोवऱ्याचा पार्श्वभाग यांमधून अणूपासून ब्रह्मांडाचें रसिकाला चटकन् ज्ञान होतें. सूचकता हा एक अमोलिक गुण आहे. तो बेहरे

यांच्या लिखाणांतून शोधून सापडत नाही. एवंच, उपदेशावर कोणी गदा उचलित नाही; उपदेशपद्धतीवरच रसिकांचा मुख्य कटाक्ष आहे. " उपदेशाची थोरवी " हें वाङ्मयाच्या भरीवतेचें एकच एक माप नसून वाङ्मयाला जर कोणी किडून पोकळ करित असेल तर तेंच माप करतें. " उपदेशपद्धतीची अपूर्वता " हें वाङ्मयाच्या सजीवतेचें एक महत्त्वाचें लक्षण होय. सबब आम्ही कष्टी होऊन सांगतों की बेहेरे यांच्या किती तरी कविता या उपदेशापायीं निर्जीव निस्सत्व अतएव निरुपयोगी झालेल्या आहे. मात्र त्याबरोबर एक सल्लाही सांगून ठेवितों की, कोणत्याही मोठ्या कवीच्या स्फुट कवितांचा ग्रंथ घ्या; त्यांत शंभरांत पांचसातच कविता निष्कलंक, नव्हे, परमेश्वराच्या दरबारांतील दिव्य संदेश-संगीताच्या असतात. म्हणून बेहेरे यांना आमच्या मताने वाईट वाटण्याचें कारण नाही. कदाचित् आम्हींच चुकत असूं.

" शून्यसंशोधना "विषयीं एवढेंच लिहावयाचें कीं, खरें शून्यधावन केशवसुतांचेंहि नाही. बेहेरे देखील "केशवसुत" आहेत. "विज्ञानाच्या जोरावर अज्ञानाचा किंचिन्मात्र भाग ज्ञात करून घेणें हें" शून्यसंशोधन नव्हे ! या परीक्षणांत यापेक्षा याविषयीं जास्त लिहितां येत नाही; त्यावर स्वतंत्र लेखच लिहिला पाहिजे.

(६) येथपर्यंत प्रस्तुत क्षोभोत्पन्न काव्यलहरींविषयीं बेहेरे यांच्या मतांचा विचार केला. आता त्यांनी पुणेकर कवींवर जे ताशेरे झाडले आहेत त्यांचा, व सर्वसाधारण नव्या पिढीच्या कवींविषयीं केलेल्या विधानांचा थोडक्यांत विचार करूं. त्यांतच बेहेरे यांच्या कवितांवरील आक्षेपांचेंहि विवेचन करतां येईल. " उभ्या आयुष्यांत दहावीस बारक्या स्फुट कविता लिहिणारा पुणेकर काव्यमंडळें व चर्चामंडळें यामुळे सहज महाकवि ठरतो, " असा बेहेरे यांचा एक आक्षेप आहे. प्रथम असें विचारावेंसें वाटतें की पुणेकर कवि महाकवि ठरला तर बेहेरे यांनी वाईट कशाला वाटूं द्यावें ? शंकराचार्यांनी दिलेल्या पदव्यासुद्धां आज हास्यास्पद ठरतात, तर चिरंजीव कवींनी लुटुपुटूची क्रीडा करून परस्परांस महाकवि म्हटलें, नव्हे, पितृवत् कवींनी आमचेंच तुम्ही अनुकरण करतां म्हणून म्हटलें तर त्या पोक्त कवींनी चिडावें की चिरंजीव कवींचें कौतुक करावें? आम्ही स्वतः कौतुक व विनोद करण्याच्या तर्फेचे आहोंत. परवा ज्ञानप्रकाशांत एका लेखकाने आमच्या एका कवितेला निशिगंधांच्या कांही कवितांचें ती अनुकरण आहे, असें लिहिल्याचें आम्हांला वाचायला मिळालें. परंतु तो लेखक कोण, त्याने तसें कां लिहिलें वगैरे गोष्टींकडे कानाडोळा करून, आम्ही निशिगंधांचें कौतुकच करतों. कारण निशिगंधाचें पुष्पच कशाला, त्याच्या कंदाला कोंब फुटण्याच्या अगोदरच्या आमच्या तशा अनेक कविता आहेत; व त्यापैकीं कांही प्रसिद्धही झाल्या आहेत हें आम्हांला माहित आहे. शिवाय मथळ्यांत तर राहोच, पण ठेवणींत, ध्वनींत, शंकांत, उच्चारांत कोठेंहि त्या कवितांत साम्य नाही हें कोणालाही सहज पटेल. मग या कोपरखळीच्या भोक्त्यांवर कां रागवा ?

ही एक गोष्ट. दुसरें असें कीं, पुण्याचा असा कोणता बिंदुस्रावी कवि आहे

की, जो आपल्या मित्रांच्या ढोलक्याने महाकवि पद पावला आहे ? आम्हांला तर एकहि दिसत नाही. उलट अनंततनय, गिरीश व माधवज्यूलियन् यांनी तरी खंडकाव्येंही रचिलीं आहेत. यशवंतांचीही काव्यसेवा बऱ्यापैकीं आहे. केशवकुमारांच्या "विडंबनां"ची अजून परीक्षा झाली नसली तरी, त्यांनी एक नवीन उपक्रम केला आहे हें खरें आहे. त्यांचीं व त्यांच्या प्रभावळींतल्या इतर कवींचीं वर्तमानपत्रांत व मासिकांत नांवें झळकतात, पण त्या पद्धतीचें बेहेरे यांनीहि भरपूर अवलंबन केलें होतें. आश्चर्य हेंच वाटतें की, बेहेरे यांना त्या कीर्तीचा फोलपणा अजून कसा अंतःकरणापासून पटत नाहीं ? तो पटता, तर त्यांनी नवीनांचें कौतुकच केलें असतें.

तिसरी गोष्ट अशी की, जो 'परस्परं प्रशंसंति' असा आरोप बेहेरे पुणेंकरांवर करतात तो आरोप एका विशिष्ट उदाहरणाने त्यांनी आपणांवरच ओढून घेतला आहे. एके काळीं पुण्याचे बिंदुस्रावी, तरी मित्रांकडून भलतेच वाखाणले गेलेले रा. ग. त्र्यं. माडखोलकर यांवर बेहेरे यांनी तरी स्वतंत्र कविता रचून त्यांना

नव्या युगाचा, स्वातंत्र्याचा गमसी शाहीर ।

असा मोठा मान दिला आहे. आज ही पदवी कितपत सार्थ आहे हें बेहेरे यांनीच सांगावें.

नंतर पान २७ अखेरीपर्यंतची इतर कविनिंदा व आमत्प्रौढी यांत आम्हांस एवढेंच दिसतें की, कविनिंदा अप्रस्तुत व आत्मप्रौढी अगदी खरी आहे. कविनिंदा केली नसती तर आम्ही या आत्मप्रौढीलाही आत्मविश्वासच म्हटलें असतें. कारण आम्हांला माहित आहे की बेहेरे "यांची परिस्थिति, चौफेर व्यासंग, साधी राहणी, यशस्वी जीवनक्रम, स्वदेशसेवेची तळमळ व सडेतोड स्वभाव," यामुळे कांही त्यांना शत्रु उत्पन्न झाले नाहीत; तर बेहेरे त्यांची व्यर्थ निंदा करतात, त्यांच्यापासून जरी नाही तरी जनतेपासून कीर्तीची अजून लालसा धरतात व ती अवास्तव असली तरी त्यांना ती तशी भासत नाही; म्हणून त्यांना शत्रु उत्पन्न झाले. फुगलेल्या गालांतून जास्त काव्यौघ वाहतो, सुपारीचें खांड न खावून किंवा सिग्रेटचें एंड न ओढून जर कवितांचें नंदनवन उभारतां येईल तर, दीड दोन वर्षांचा तरणा आजदेखील गटेला एकाच छुरीने पालथा पाडूं शकेल. भरीव कमरेचा काव्याशीं काय संबंध न कळे! व अनेक पत्नींची क्रोधलहरी " भूमिकें " त कशाला ? चाळिशींत सुद्धां ' चाळिसी ' लागली नाही व डोक्यावरचे केस धवल झालें नाहीत, हीं सत्काव्याचीं गमकें का आहेत ? आम्हांला वाटतें की, अशी निंदावाचक तुलना करण्यापेक्षां, "विद्वत्ता, व्यासंग, देशसेवा, लोकजागृति, आणि ग्रंथलेखन," यांविषयीं जर बेहेरे यांनी नवीनांना मार्ग दाखविला असता तर बरें झालें असतें. त्यामुळे ज्यांचा व्यासंग चांगला आहे अशा माधव ज्यूलियन, प्रो. निशिगंध व माडखोलकर यांचा गुणगौरव झाला असता; व निशिंगधांना व माडखोलकरांना जास्त मोठी काव्यसेवा करण्याची खरी कळकळ वाटली असती. उलट गिरीश, यशवंत, अधिकारी, अत्रे इत्यादिकांना काव्य व व्यासंग या दोघांचीही वाढ केल्या-

विना ही तात्कालिक कीर्ति वेगळीच वाटली असती. शेवटीं तुम्हांला कविनिंदाच करण्याची खुमखुमी वाटत असेल तर विनोदाच्या नाना प्रकारांनी ती करा. निव्वळ क्रोध व केवळ बफूनरी अथवा निर्भेळ प्रॉपेगॅन्डिझम् हे या कामीं अत्यंत फुसके बार होत!

(७) आता एक काव्यभाषेचा महत्त्वाचा मुद्दा राहिला. गेल्या दहा वर्षांतले कवि काव्यार्थापेक्षां काव्यभाषेकडेच जास्त लक्ष देतात असा बेहेरे यांचा आक्षेप आहे व आपणांस बोजड संस्कृत शब्द व वाह्यट फारशी शब्द यांचें वेड लागलें नाही, अशासारखें त्यांचें बरेंच मोठें विवेचन आहे. व्यक्तिवाचक आरोप बरेच खरे आहेत. परंतु आम्हांला त्यांत शिरावयाचें कारण नाही. तत्त्ववाचक अशी जी त्या आरोपाची बाजू आहे तिजबद्दल मात्र बेहेरे यांना एकच सुचवावेसें वाटतें की काव्यभाषा ही नुसती अर्थप्रवाहीच असून चालत नाही, तर ती ध्वनिपूर्णही पाहिजे. या बाबतींत आम्हांला एक, सर्वांना खवळून टाकणारें पण खरें, निदान विचारार्ह विधान करावयाचें आहे. तें असें की, आजपर्यंतचें सर्व भाषांतील काव्यलक्षण अपुरें आहे. वाचा व अर्थ या दोहोंतच आजपर्यंत काव्य अडकून दिलें आहे. संगीत हें स्वतंत्र शास्त्र कल्पून संगीतज्ञांचें काव्य जणूं वेगळेंच असें जग धरून चाललें आहे. पण यापुढे वाचा, अर्थ व निनाद यांचा एकजीव होऊन काव्यशास्त्राची प्रगति झाली पाहिजे. याच्याहि पलीकडे जाण्याची आमची इच्छा आहे. काव्याची परीक्षा वर्तमानपत्रांच्या संपादकांच्या सर्वज्ञतेवर अवलंबून ठेवून कवींमध्यें भ्रमोत्पन्न मत्सर उत्पन्न करण्यापेक्षां एक बिनचूक गमक तयार करण्याची जगाने पराकाष्ठा केली पाहिजे. तें गमक असें कीं, कविता म्हटल्याबरोबर, त्यांतील भावना, कल्पना, नाद यांच्या संमिश्रणाने पडद्यावर चित्र रेखाटलें जावें. या गमकापुढे मोठमोठे कवि देखील टिकाव धरणार नाहींत, तर संपादकांच्या मानसपुत्रांची गोष्टच नको. आम्हांला माहित आहे कीं, अत्युत्कृष्ट नर्तनाने व अप्रतिम गायनानेहि फारच सुंदर वालुकाचित्रें उमटतात. परंतु त्या चित्रांत भावनांची व अर्थांचीहि सजीवता नसते, हेंहि तितकेंच खरें आहे. तेवढी भर पडली म्हणजे मग Originalityचीहि खरी परीक्षा होईल. तोंपर्यंत ही अशीच मुद्रणालयोपजीवी काव्यनिर्मिति होऊन मुद्रणालयेंच त्या आपल्या काव्यसंततीला खात राहणार! या जागतिक वृत्तदर्पण सुधारणांच्या बाबतींत केवळ आम्हीच एकटे तक्रार करित असूं तर जग आम्हांला "पढतमूर्खांत" लोटील; म्हणून आम्ही रॉबर्ट ब्रिजेसचा "Milton's Prosody" हा लेख व त्यावरील टीका वाचण्याची शिफारस करितों. त्यांत आमच्या गमकाचा मात्र सूक्ष्म ध्वनीहि नाही.

परंतु वरील गमकाचा उदय होईल तेव्हा होवो. तोंपर्यंत भाषेंतूनहि नवे नवे अर्थचमत्कार उत्पन्न होतात, अर्थचमत्कारांतूनहि भाषेचीं नाना प्रकारचीं वळणें तयार होतात, दोहोंतही चमत्कृति, नावीन्य, सजीवता, प्रवाहीपणा, ओजस्विता वगैरे गुण असतात; त्या गुणांतूनच कवीचा स्वतंत्र संदेश स्फुरतो; हें रा. बेहेरे यांना सांगणें प्राप्त आहे. बेहेरे यांची कांही ठिकाणीं अशी सुंदर भाषा असली तरी, तशी स्थळें

रणांतील हि ळीइतकीं दुर्मिळ आहेत. ते लिहितात मी माझ्या कवितांवर सफाईचा हात वारंव फिरविला नाही व ती चूक ते कबूल करितातही. फिरून सांगतात की मला वेळ आहे ..ापडत नाही. पण तुमच्यावर कविता करण्याचा तरी कोणी आग्रह केला म्हणतात,

शब्द जुळवितां कविता बनते
बघतां बघतांना ! पृष्ठ ५५

तर मग,

शब्द न बघतां कवि होताती
कंपॉझिटरांचे ! !

अशा कैक ओळी दाखवितां येतील की, एका तासांत त्यांतील साठ दोष खुद्द बेहेरे यांना मुंबईच्या फास्ट लोकलमध्येंही सहज सुधारतां आले असते. "ग्रहे वा" सूत्राची सवलत कवींनी चाहील तेथे घेतली; न चाहील तेथे घेतली नाही, असें कां? अहो! एका चालीच्या पदांत, तत्समान थोड्याशा फरकाच्या अन्य चालीचीं चरणें देखील बेहेरे यांच्याकडून पडलीं आहेत. आमची कल्पना आहे की बेहेरे त्या वेळीं आगगाडींत बसून चाकांच्या ठेक्यांवर कविता रचित असावेत. "आनंदी आनंद गडे" या चालीवरलें हें द्वयचरण पहा :—

अनुताप होय तयाला
निमुटपणीं तो वर गेला !

पहिलें चरण 'नृपममता रामावरती' ह्या चालीचें आहे. पण दोहोंनाही १४ च मात्रा लागतात; म्हणून बेहेरे यांचा घोटाळा झाला ! या चुक्या त्यांनी ठायीं ठायीं केल्या आहेत. अगोदर वृत्तवैचित्र्य, कल्पनानावीन्य, अर्थचमत्कृति, काव्यभाषा, वगैरेंत कवीचें भलतेंच मोठें दारिद्र्य आहे. गज्जलाच्या राहोत, इतर चालींच्या कवितांतहि वृत्तदोष भरपूर आहेत. तीव्र संवेदना, प्रदीर्घ व्यासंग, अवांतर गुणांची रास वगैरे गोष्टी मुबलक आहेत, म्हणून "मोत्यांच्या माळेंत"लीं कांहीं मोत्यें चमकतात, बाकीचे शेंकडों मणी रुद्राक्षाचेच आहेत. मधून मधून विश्वप्रेमाचें संदेशसुवर्ण चमकतें म्हणून आम्हीं पूर्वीच या पुस्तकाला "मुक्तामणिमिश्रित सुवर्णबद्ध रुद्राक्षमाला" हें जंगी तरी सार्थ नांव देऊन ठेविलें आहे.

(८) शेवटीं शास्त्रीय ज्ञानाच्या मुद्याविषयीं थोडें तरी लिहिलेंच पाहिजे. आजच्या युगपरिवर्तनाचा तोहि एक मुख्य गुण आहे व आपण सतत वाचित असतों वगैरे आत्मकथन बेहेरे यांनी केलेंच आहे. परंतु त्यांच्याकडून जुन्या कविसंप्रदायांना नवीन वळण तर स्पष्टपणें कोठेच मिळालेलें दिसत नाही; पण सृष्टिक्रमाचेंहि त्यांचें गाढ अज्ञान दिसतें. "दोन बंधू" पृ. ४२ ही सगळी कविता अशास्त्रीय आहे. दोन बंधु म्हणजे दोन मेघखंड; त्यांपैकी एकाला मोह उत्पन्न झाला की, आपण अवनीवर जाऊन स्वर्गाला हसूं. दुसऱ्याने त्याचा इनकार केला; पण बंधुप्रेमाला तो वश झाला. दोघेहि

खाली आले. एक पडला रणांत म्हणून त्यांत लुप्त झाला. दुसरा अ शिंपल्यांत म्हणून मौक्तिक झाला. तात्पर्य " गर्वाचें घर तें खाली; ही म्हण. " कविता मुलां-करितां आहे, हें ध्यानांत धरण्यासारखें आहे. आता मेघखंडांनी अवनते पणें हा मोह कसा ठरतो ? त्याचप्रमाणें वाळूंत पडलेला बंधु तर बाष्परूपानें परत च गेला व शिंपल्यांतला मेघखंड मौक्तिक होऊन अवनींतच अडकला ! तिसरी गो... गर्वाचें घर धरलें तर, वाळूपेक्षां सागरतल, टाकून दिलें तरी, सातआठशें फूट खाली असतो ! ज्या मुलांना हे प्रश्न सुचणार नाहीत तीं मुलें कसलीं ! व जी कविता हे प्रश्न लक्षांत घेऊन रचली गेली नाही ती कविताच कसली ! ! पण बेहेरे म्हणतातच "मनांत हरघडीं उत्पन्न होणारें काव्य शब्दांत मांडण्यास जेथे वेळ नाही, तेथे तें नट-विण्यास कसा वेळ सापडेल ?" पण इमर्सनने म्हटलेलें स्मरतें की " कवि मनांत येईल तें लिहूं लागला तर त्याची कृती भेसूर व बदसूर होईल. " मनांतले सगळेच विचार व हृदयांतल्या सगळ्याच भावना काव्यमय नसतात; पण एका सत्काव्याला अशा लाखों विचारविकारांची जळजळ उपयोगी मात्र पडते. यावरून बिंदुसाक्षी कवींची आम्ही वाखाणणी करितों असें नव्हे. आमची खरी काव्यपरीक्षा स्फूर्तीच्या तेजस्वितेवर अवलंबून आहे. कवितासंख्या हा दुय्यम गुण आहे. प्रेस ओपिनियन तर स्वरूपतः जाहिरातीवजा; तेव्हा तेंहि खऱ्या परीक्षेला उपयोगी पडत नाही. आत्मविश्वास हें पहिलें व सहृदय तज्ज्ञांचें मत हें दुसरें गमक होय. असो.

आता निरीक्षणाच्या किरकोळ चुक्यांची माळ पहा. "अमृतराशी" (पृ. १३९) पातळ पदार्थांची रास होत नसते. "असंख्य तारे वर जमती । प्रकाश देती भूवरती । फिरती चंद्राच्या भोंतीं । कर्तव्याला निज करिती । (पृ. ३१६). सारीच गम्मत ! तारे चंद्राच्या भोंवती फिरतात, हें कवि म्हणतो म्हणून खरें समजावयाचें की काय ? आणि तें ताऱ्यांचें कर्तव्य आहे अशी कवि-आज्ञा ऐकून ते जर खरोखरच चंद्राच्या भोंवती फिरूं लागले तर सगळ्या सृष्टीला देवाज्ञाच होईल ! "प्रकाश देती भूवरती" या वाक्याचा सरळ अर्थ तारे अग्नीप्रमाणें भूवर आहेत व ते प्रकाश देतात ! परंतु ती व्याकरणाची चूक आहे: व बेहेरे यांना विद्याव्यासंग हवा, पण व्याकरणाचे ठोकळहि नियम नकोत !! पृ. ५७१ मध्यें कवि पाताळांत खोल व भीषण विहिरी खणीन म्हणतात ! पण ही चूक तरी कशी समजावी ? कारण ती कविताच "मानवी भ्रमा"ची आहे ! ही जंत्री पुष्कळच वाढवितां येईल. पण एखादी तरी अद्भुतपूर्व कल्पना शोधणाऱ्या मनाला असें ठायीं ठायीं ठेंचा खात जाणें कसें आवडेल ? रसिकांना वारंवार उपदेश करणाऱ्या बेहेऱ्यांना आम्ही जर एकदाच उपदेश केला व तोहि सन्माननीयाच्या भाषेंत, तर ते आमच्यावर रागावतील का ? Nature is matter struggling into mind, so art is mind expressing itself under the conditions of matter, and thus even in the lowliest of her manifestations, she speaks to both sense and soul alike. हें वचन कोणाचें हें बेहेरे यांना माहित आहे; असो.

## उपसंहार

(९) शेवटीं श्री. बेहेरे यांचें एका अमूल्य कामगिरीबद्दल अभिनंदन करणें जरूर आहे. आधुनिक मराठी कवितेच्या बिंदुस्रावाबद्दल कवींची आजपर्यंत हेटाळणी होत असे ती या "मोत्यांच्या माळे"ने प्रथम बंद पडावी हें उचित आहे. इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन व अमेरिकन कवींचे जंगी काव्यग्रंथ आमच्यापुढे फेकून, अथवा ज्ञानेश्वर ते तुकाराम यांपर्यंत प्राचीन मराठी कवींच्या पोथ्या पुढे करून आमच्यांतलेच रसिक आम्हांस व्यर्थ हिणवित होते. त्यांनी ह्या ७०० पृष्ठांच्या ग्रंथाने सडेतोड उत्तर दिलें आहे. बेहेरे यांची ही निव्वळ स्फुट कविताच आहे. खंडकाव्याचा आणखी एखादाच ग्रंथ होईल. शिवाय गद्यग्रंथ वेगळेच. आता त्यांतील गुणांविषयीं नाना मतें उत्पन्न होतील. परंतु कोणत्या ग्रंथाविषयीं होत नाहीत ? वर्डस्वर्थच्या पांचसातशें स्फुट कवितांतून शंभरापेक्षा कांही जास्त उत्तम कवनें नाहीत. रॉबर्ट् ब्रिजेस्च्या "शॉर्टर पोएम्स" पैकीहि कितीशा चांगल्या आहेत ? या स्फुट कवितांचें मूळरूपच असें आहे की, तें स्वार्थी असतें व कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणे त्यांचेंही लिंगवचन असतें; शिवाय आमचा समाज मोठा कार्यप्रवण, नानाविध भावनांचा, मोठा रसिक पडला. एक प्रेसपॉवर आज आहे खरी. परंतु ती अजून भडकलेल्या तट्टूसारखी काव्यप्रांतांत बेफिकीर आहे. तेव्हां जे गुण स्फुट कवितांत नाहीत ते खंड काव्यांत असतात हें सांगणें उचित आहे. हें परीक्षण बेहेरे यांच्या केवळ कवितांचें आहे. त्यांच्या हाताने, लवकरच खंडकाव्याचाहि काव्यग्रंथ बाहेर पडो अशी प्रार्थना आहे मात्र त्यांनी बेफिकीरांच्या भडकलेल्या तट्टूच्या नादीं लागण्याचा दोष अवश्यमेव टाळावा. त्यांची आधुनिक कवींत आम्ही पायरी ठरविली नाही; कारण आमच्या मतें प्रस्तुतचें युगपरिवर्तन संपावयाचें असल्याने ठरविणें पोरखेळाचें होईल. तथापि युगपरिवर्तन घडविणाऱ्या एका हाताच्या बोटांइतक्या पांच कवींत त्यांची खाचित गणना होईल. तूर्त एवढेंच पुरे. जास्त विवेचन खंडकाव्याच्या भावी ग्रंथाकरतां राखून ठेवितों. तोंपर्यंत नानांनी या परीक्षणांतलें आवडेल तें घ्यावें, व नावडतें तेंहि पचनीं पाडावें अशी त्यांना नम्र विनंती आहे.

नार्य

# अभिप्राय

निंदाच कर-
निव्वळ क्रोध
विचार होत !
वर्षांले

**अल्बेरुणीची गीता :—** ( ले. वि. प्र. लिमये, टिळक महा[illegible] कागदी बा. १ रु., कापडी बा. १॥ ).

श्री. लिमये यांच्या कानावर अल्बेरुणीची गीता प्रथम बहुश्रुत अ[illegible] वाचनव्यापी श्री. दादासाहेब करंदीकर यांनी घातली. म्हणून प्रस्तुत पुस्तकाचें आदिकारण दादासाहेब होत. अल्बेरुणी हा विद्वान् होता. त्याने हिंदूंची शास्त्रें व ग्रंथ यांचा परिचय करून घेतला व तद्विषयक माहितीने भरलेला असा एक ग्रंथ अरबीभाषेंत लिहिला. त्यांत त्यांने गीतातत्त्वज्ञानाचाहि विचार केला आहे. अल्बेरुणीने गीता ऐकली असावी. जवळ पोथी ठेवून गीतेचें विवरण केलेलें दिसत नाहीं. अल्बेरुणीच्या पूर्वीपासून गीतेचें सध्याचें स्वरूप निश्चित झालें आहे. गीता सर्वांच्या वाचनांत आहे. गीतेवर असंख्य भाष्यें झालीं आहेत. तेव्हां अल्बेरुणीच्या मोडक्या व पुसट भाषांतरावरून गीतेचें संशोधन करणें हा उपद्व्याप नसला तरी अपव्यापच म्हटला पाहिजे. अहर्गणाचीं अह्+अर्गण अशीं पदें पाडणारा व पंचतन्मात्राणि या पदाचें पांच माता असें भाषांतर करणारा अल्बेरुणी “ हिंदु पंडितांजवळ संस्कृत भाषा शिकून हिंदूंचें तत्त्वज्ञान, गणितज्योतिषासारखीं शास्त्रें त्यानें आत्मसात् केलीं ” या अवाढव्य प्रशंसेस कसा पात्र होतो आम्हांस समजत नाही. अल्बेरुणीसंबंधाने ही भाषा वापरल्यावर हल्लींच्या युरोपियन पंडितांविषयीं लिहितांना शब्दयोजना करणें अशक्य होईल. प्रास्ताविक प्रकरणांत अल्बेरुणीविषयीं दिलेली माहिती मात्र मराठी वाचकांना उपयुक्त वाटेल.

पाठभेद या प्रकरणांत शंकराचार्यांच्या भाष्यावरून स्वरपाठ पुनः स्थापित करण्याचें श्रेय मात्र लिमये यांस दिले पाहिजे. या पाठांकडे आजपर्यंत दुर्लक्ष्य कसें झालें याचेंच आश्चर्य वाटतें. शंकराचार्यांचे पाठ बाजूस सारून आपल्या मनचें पाठ आचार्य लिमये यांनी जे दिले आहेत ते आम्हांस तरी मान्य होत नाहींत.

श्री. लिमये यांनी सुचविलेला पहिला पाठ अ. ९ श्लो. २३ यांतील “ अन्यदेवता भक्ताः ” या पदासंबंधाने आहे. अन्यदेवताभक्ताः या लांबट समासाऐवजीं अन्यदेवताः + भक्ताः अशीं पदें पाडावीं असा श्री. लिमये यांचा अभिप्राय आहे. असें केल्याने यजंते क्रियापदास खालील चरणांतील यजंति या क्रियापदाप्रमाणें कर्म मिळतें असें त्यांचें म्हणणें आहे. आता यजन्ते क्रियापद गीतेंत अकर्मक वापरलें नाही असें नाही. उ. १६–१७, १७–१ पहा. शिवाय हा सुचविलेला पाठ अगदीच नीरस व अर्थशून्य भासतो. नुसत्या भक्ताः या पदाचा अर्थ काय ? श्रद्धयान्विताः या पुढच्या शब्दाने अन्यदेवताभक्ताः असें एक समस्तपद घेणेंच युक्त आहे. नुसत्या उपासनेंत श्रद्धा असतेच असें नाही. म्हणून अन्य देवतांचे उपासक श्रद्धेने आपआपल्या देवतांचें यजन करतील तर ते माझेंच यजन करतात असें होईल हाच अर्थ स्वारस्यपूर्ण आहे.

यजन्ते नाम यज्ञैस्ते हा पाठहि स्वीकारण्यासारखा नाहीं असें आमचें मत आहे. नांवाचा यज्ञ हा अर्थ कां होऊं शकत नाहीं ? केवळ नाम्ना यज्ञः स नामयज्ञः. रा. टिळकांनीहि नांवाचा यज्ञ असाच अर्थ केला आहे. जपयज्ञ आणि नामयज्ञ एकच नव्हे. जपयज्ञांत वैदिक मंत्र म्हणावयाचे असतात. नामयज्ञ म्हणजे नाम्नः यज्ञः असा अर्थ केल्यास नुसतें देवाचें नांव घेणें इतकेंच निष्पन्न होतें. रा. टिळकांनी यजंते नामयज्ञैस्ते....याचा अर्थ " केवळ नांवाचे यज्ञ करीत असतात " असा केला आहे. पण, यज्ञानां जपयज्ञोऽस्मि ( अ. १०–२५ ) याच्या अर्थाचें विवरण करतांना नामयज्ञ व जपयज्ञ एकच होत असें धरून टिळक चालले आहेत असें दिसतें. आमच्या मतें यज्ञांत वेदपठणरूपी यज्ञ मी आहें असा उपरिनिर्दिष्ट चरणाचा अर्थ असावा. पण हा मुद्दा येथें प्रस्तुत नल्याकारणाने सोडून देऊं. रा. लिमये यांचा अर्थ आम्हांस उठावदार वाटत नाही. एवढेंच नव्हे तर त्यांचा अर्थ पतकरल्यास रसहानि व अर्थहानि होते. उठावदार रीतीने अर्थ प्रतीत होण्याऐवजीं वसकेदार रीतीनेच तो प्रतीत होतो. लिमयांच्या मताप्रमाणें श्रीमंत आसुरी लोक यज्ञ करतात. पण तो अविधिपूर्वक करतात इतकेंच. शंकराचार्यांच्या मताप्रमाणें तो यज्ञच होत नाही. तो नुसत्या नांवाचा यज्ञ असतो. लिमयांचा अर्थ मिळमिळीत वाटतो. शंकराचार्यांचा अर्थ जोरदार वाटतो.

येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः
तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् । ( अ. ९–२३ )

या श्लोकांतील अविधिपूर्वकम् या शब्दाचा अर्थ, आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ( १५–१७ ) यांतील अविधिपूर्वकम् या शब्दाच्या अर्थाहून थोडा वेगळा आहे. पहिल्या श्लोकांत अन्यधर्मीय लोक आपआपल्या शास्त्रांतील विधीप्रमाणें यजन करतात पण तें वेदबाह्य असल्यामुळें वैदिक धर्माच्या लोकांच्या दृष्टीने अविधिपूर्वक म्हणावें लागतें असा आशय आहे. दुसऱ्या श्लोकांत वैदिक धर्मानुयायांतीलच दांभिक, श्रीमंत लोक शास्त्रोक्त विधि न आचरतां नुसता नांवाचा यज्ञ करतात असें सांगण्याचा उद्देश दिसतो. श्री. लिमये यांच्या अर्थाच्या योगाने मुख्य सांगावयाची गोष्ट म्हणजे आत्मश्लाघी लोक अविधिपूर्वक यज्ञ करतात असें होतें. शांकर भाष्याप्रमाणें दांभिक लोक यज्ञ करतात तो यज्ञ होतच नाही हा मुख्य प्रतिपाद्य अर्थ होतो. श्रीकृष्ण सांगतात कोणताच विधि न पाळतां मनसोक्त रीतीने केलेलें यजन यजनच नव्हे. परंतु अवैदिक का होईना पण आपआपल्या शास्त्रांतील विधीप्रमाणें केलेलें यजन निष्फळ होत नाही. शंकराचार्यच बरोबर आहेत याबद्दल आम्हांस संशय नाही.

नामयज्ञाप्रमाणे गहना कर्मणो गतिः याचा श्री. लिमये यांनी सुचविलेला पाठभेदही सर्वथैव त्याज्य आहे असेंच आमचें मत आहे. शंकराचार्यांशीं गांठ आहे हें लिमयांच्या ध्यानांत आलें नाही असें दिसतें. गहना अकर्मणो गतिः असा पाठ बरा असें रा लिमये म्हणतात. " कर्में करण्यांत यच्चयावत् भूतमात्रें गढून गेलीं

आहेत व तीं त्यांच्या पूर्ण परिचयाचीं आहेत " म्हणून " यांचेंहि ज्ञान गहन आह या म्हणण्यांत कांही विशेष स्वारस्य दिसत नाही. " कर्में परिचयाचीं असतात खरीं. परंतु कर्माची गति — कर्माचा परिणाम, शेवट कसा होईल हें सुशिक्षितांस तरी कळतें काय ? बरें लिमयांना आम्ही असें विचारतों कीं कर्माचें ज्ञान अगदीं सोपें आहे तर " किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः " असे उद्गार श्रीकृष्णांनी मूर्खपणाने काढले काय ? तसेंच कर्म म्हणजे काय आणि विकर्म कशाला म्हणतात हें समजून घेतलें पाहिजे. ( कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः) असें गीताकार बजावतात त्याचें कारण काय ? कर्म, विकर्म आणि अकर्म ह्यांचें ज्ञान ज्यांना झालें आहे अशीं फारच थोडीं माणसें असतात. रा. लिमयांना वाटतें तितकें सोपें नाही. तसें असतें तर जग कसें सुरळीत चाललें असतें. तात्पर्य श्री. लिमयांचे पाठ आम्हांला तादृश विचारार्ह वाटत नाहीत.

रा. लिमये यांचा अष्टादशोक्तं ह्या मुंडकपदांचा ' अठरा अध्यायाच्या गीतेने सांगितलेलें ' हा अर्थ आणि त्यावरून मुंडक गीतोत्तर आहे हें अनुमान हीं चिंत्य आहेत.

आता शेवटीं ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः यांतील ब्रह्मसूत्रपद याचा श्री. लिमये यांनी केलेला अर्थ कसा चुकीचा आहे हें सांगून त्यांच्या पुस्तकाची रजा घेणें अवश्य आहे. ब्रह्म म्हणजे प्रकृति म्हणून ब्रह्मसूत्रें म्हणजे प्रकृतिवादी सांख्यांची सूत्रें होत असें ग्रंथकारांचें प्रतिपादन आहे. असें ते कां म्हणतात याचा बोध आम्हांला नीटसा होत नाही. पण त्यांच्या विवेचनावरून वेदांत आणि सांख्यशास्त्र यांची एकवाक्यता गीतेनें केली आहे असा ध्वनि निघतो. तो कोणासहि अमान्य होईल असें आम्हांस वाटतें. सांख्य द्वैतवादी आणि गीता अद्वैतवादी. म्हणून एकवाक्यता अशक्य. सांख्यांची प्रक्रिया अद्वैतवाद्यांनी उचलली म्हणजे त्यांच्या तत्त्वज्ञानाचें ग्रहण केलें असें होत नाहीं. ब्रह्मसूत्रपदाने वेदांत अथवा बादरायण सूत्रें घ्यावयाचीं असें शंकराचार्य म्हणत नाहीत आणि तेंच बरोबर आहे. कारण सूत्रांत स्मृतौ म्हणजे गीतेचा उल्लेख आहे. ब्रह्मणः सूचकानि वाक्यानि हा आचार्यांचा अर्थच ग्राह्य वाटतो. हेतुमद्भिः या पदाने मन चंचल होण्याचें कारण नाही. वेदमंत्रांत हेतु दिलेला नसतो. तेथें नुसता सिद्धांत प्रतिपादतात. उपनिषदांतून कित्येक ठिकाणीं हेतु म्हणजे कारण देऊन सिद्धांत सांगितला आहे. उ.— बृ. अ. उपनिषत् पहा.

या ठिकाणीं जातां जातां एवढेंच सांगायाचें आहे की " ब्रह्मसूत्रपदैश्चैव " या शब्दांनी " अथातो ब्रह्मजिज्ञासा " या बादरायणाचार्यांच्या ब्रह्मसूत्रांचाच निर्देश केला आहे असें आनंदगिरि म्हणतो असें टिळकांनी गीतारहस्य पान ३२८ वर लिहिलें आहे तें बरोबर नाही. आनंदगिरींचें म्हणणें असें " अथातो ब्रह्मजिज्ञासा इत्यादीन्यपि सूत्राणि अत्र गृहीतानि अन्यथा छंदोभिः इत्यादिना पौनरुक्त्यात् इति मत्वा विशिनष्टि हेतुमद्भिः इति ". आनंदगिरि शंकराचार्यांच्या विरुद्ध नाही हें यावरून उघड दिसेल.

असो. एकंदरींत रा. लिमये यांच्या श्रमाच्या मानाने फल मननीय नाही असेंच म्हणावें लागतें.

**महाराष्ट्र-कृषीवलः**— (संपादक, वामन रामचन्द्र गाडगीळ, एम. एस्‌सी. (अमेरिका), बी. एजी. (मुंबई), ७०२ सदाशिव पेठ, पुणें २

हिंदुस्थान हा कृषिप्रधान देश असल्यामुळे कृषिशास्त्रविषयक ज्ञान लोकांना असणें अवश्य आहे. याकरतां महाराष्ट्र-कृषीवलासारख्या मासिकाची जरूरी फार आहे हें सांगावयास नकोच. आमच्यापुढे असलेल्या अंकांवरून कृषिविषयक विद्यमान मासिकांत महाराष्ट्र-कृषीवलाचा नंबर फारच वर लागेल यांत शंका नाही. या मासिकांतील माहिती उपयुक्त असते. सर्व लेखक विद्वान व अधिकारी दिसतात. डॉ. विश्राम पाटील यांचा लेख वरील विधानाच्या समर्थनार्थ पुरावा म्हणून देतां येईल. सं. श्री. गाडगीळ यांची धंदेशिक्षणाची योजना मननीय आहे. आम्हांस एवढेंच सुचवावयाचें की, परकी देशांतील शेतकी, परकीयांचे अनुभव इत्यादिकांच्या वर्णनाने मासिकाची जागा न अडवितां आपल्या देशांतील शेतीचे अनुभव अधिक विस्ताराने दिले असतां तें फार उपयुक्त होईल. डॉ. पाटील यांनी आपल्या स्वतःच्या गांवांत प्रत्येक शेतकरी किती जमीन नांगरतो हें कां सांगू नये ? अमेरिकेंतल्या शेतकऱ्याची माहिती आम्हां खेडवळांस सांगून काय फायदा ? आमचा शेतकरी सध्या जितकी जमीन लावतो त्यापेक्षा अधिक लावतां येणें शक्य आहे काय व असल्यास कोणत्या उपायांनी हें समजण्याची आम्हांस इच्छा असते. तसेंच अमेरिकेंत कॉलीफ्लॉवरच्या कोणत्या जाती लावतात हें जाणण्याची आम्हांस गरज नाहीं. आम्ही येथे कोणत्या जातीचा कॉलीफ्लॉवर लावावा एवढेंच आम्हांस समजलें म्हणजे पुरे. लिहिणारास वरील सर्व माहिती पाहिजे यांत शंका नाही. तिचा उपयोग शेतकऱ्यांस होणार नाही. एवढेंच आमचें म्हणणें. असल्या लेखांत स्वतःचे अनुभव असावेत. मिरचीचें पीक पौंडांत देणारा लेखक आमच्या खेडेगांवांतील लोकांकरतां लिहित नसून इंग्लिश लोकांकरतां लिहित आहे असा भास होतो. त्याचप्रमाणें स्वतःच्या अनुभवाने लिहित नसून तो नुसता इंग्रजींतील लेख मराठींत आणतो आहे असा वाचकांत भ्रम उत्पन्न होतो. यामुळे लेखांची उपयुक्तता कमी होते. असल्या लेखांत चैतन्य रहात नाही. असो, या गोष्टी टाळल्या तर महाराष्ट्र-कृषीवाल मोठें राष्ट्रकार्य करील याबद्दल आम्हांस शंका वाटत नाहीं.

**डे. व्ह. ट्रॉ. सोसायटी पुणें या संस्थेचा अहवाल १९२९।३० सालाचा**
सदरहू संस्थेचें वार्षिक उत्पन्न दोनतीन हजारांपलीकडे जात नाही आणि सरकारची मदत वाढल्याशिवाय आहे त्या उत्पन्नांत अधिक वाढ होईल असें चिन्ह दिसत नाही. अहवालाच्या सालीं एकंदर ४७ पुस्तकांना मिळून संस्थेच्या पैशांतून १२३० रुपये बक्षिसादाखल देण्यांत आले. यावरून सरासरीने दर पुस्तकाला सत्तावीस अठ्ठावीस रुपयांपेक्षां जास्त बक्षीस संस्थेला देतां आलें नाही हें उघडच आहे. सर्वांत मोठें बक्षीस म्हणजे ७५ रुपयांचे. हें कै. दिवेकर यांच्या शिवभारताला मिळालें आहे. याशिवाय संस्थेच्या मार्फत इतर फंडांतून दहा पुस्तकांना चारशेंदहा रुपये बक्षिसादाखल देण्यांत आले. एकंदरींत ग्रंथकाराला ही बक्षिसाची रक्कम उत्तेजक आहे

असें म्हणतां येत नाही. त्याचप्रमाणें वर्षांत आलेल्या सगळ्या पुस्तकांचें परीक्षणही होतें असें वाटत नाहीं; त्यामुळे संस्थेकडे आश्रयार्थ कमी पुस्तकें येत असावींत. अह-वालाच्या सालीं फक्त त्रेसष्टच पुस्तकें बक्षिसाकरितां म्हणून आल्याचें दिसतें. आम्हांस वाटतें बक्षिसाकरितां अथवा आश्रयाकरितां सर्व तऱ्हेचीं पुस्तकें स्वीकारण्याच्या फंदांत संस्थेनें न पडतां कांही विशिष्ट प्रकारच्या ग्रंथांनाच उत्तेजन देण्याचें ठरवावें. नाटकें, कादंबऱ्या व कविता यांना आपल्या आश्रयक्षेत्रांतून वगळल्यास मोठेसें बिघडेल असें वाटत नाहीं. बाराशेंतीस रुपयांपैकीं १९२९–३० सालीं दोनशेंऐशीं रुपये वरील वर्गांत पडणाऱ्या पुस्तकांना वाटण्यांत आले आहेत. प्रसिद्ध पुस्तकांची भाषांतरें करण्याचें मर्यादित ध्येय संस्थेने आपल्यापुढें ठेविल्यास संस्थेच्या हातून कांहीतरी कार्य होण्याचा संभव आहे. सुदैवाने इचलकरंजीचे संस्थानिक श्री. बाबासाहेब हे या संस्थेचे अध्यक्ष आहेत. इचलकरंजीच्या अधिपतींचा एक मोठा फंड आहेच. तो फंड त्यांनी डे. व्ह. ट्रा. सो.च्या हवालीं केल्यास आणि त्या फंडाचा विनियोग एका विशिष्ट प्रकारच्या ग्रंथनिष्पत्तिकरतां करण्यांत आल्यास महत्त्वाचें व उपयुक्त वाङ्मय मराठींत प्रसिद्ध होण्यास अडचण पडणार नाही. सटरफटर पुस्तकांना चिमुकली खैरात वाटण्यापेक्षा एक दोनच कां होईना पण श्रेष्ठ प्रतीच्या पुस्तकांना उत्तेजन देणें बरें. बृहन्महाराष्ट्रांत ज्या निरनिराळ्या ग्रंथोत्तेजक संस्था आहेत त्या संस्थांनी आपलें कार्यक्षेत्र मर्यादित ठरवून घेतल्यास हल्लीं पैशांचा होत असलेला अपव्यय बंद पडेल.

**सामराजः**—(ले. प्रो. द. सी. पंगु., एम्. ए., राजाराम कॉलेज, कोल्हापूर; किं. १२ आणे) सामराजाचें रुक्मिणीहरण हें काव्य मुंबई विश्वविद्यालयाने उच्च पदवीच्या अभ्यासक्रमांत गोंवल्यामुळे सामराजाचा व त्याच्या काव्यांचा महाराष्ट्रांत कसोशीने अभ्यास होत आहे. अशा अभ्यासाचें एक फल म्हणजे प्रो. पंगु यांचा प्रस्तुत चर्चात्मक निबंध होय. सामराजासंबंधाने शक्य ती माहिती देऊन त्याच्या काव्याच्या गुणावगुणांचा ऊहापोह प्रो. पंगु यांनी मार्मिकपणें केलेला दिसतो. ज्यांना सामराज या कवीचें काव्य शिकवणें त्यांच्या व्यासंगामुळें भाग पडलें आहे त्यांनी या कवीसंबंधाने लिहिणें स्वाभाविक आहे. परंतु कारण नसतांना केवळ विद्येच्छेने प्रेरित होऊन जुन्या कवींचा अभ्यास करणारे श्री. प्र. धों. कानिटकर यांच्यासारख्यांचे प्रयत्न कौतुकास्पद होत. सामराजाच्या काव्यांत जुन्या मराठी शब्दांचा अर्थ लावणें हेंच मोठें बिकट काम आहे. परंतु पंगु, जोशी, पुरंदरे, राजोपाध्ये वगैरेंच्या प्रयत्नांनी बऱ्याच शब्दांचे अर्थ मनाला पटतील अशा रीतीने लावले गेले आहेत. प्रो. पंगु यांनी हा निबंध सर्व बाजूंनी पूर्ण करण्याची शिकस्त केली आहे त्यामुळे हें पुस्तक विद्यार्थ्यांना तर अत्यंत उपयुक्त असें झालें आहेच. परंतु सामान्य वाचकालाहि तें बोधप्रद व पुष्कळ माहिती ज्यांत आहे असें वाटल्याशिवाय रहाणार नाही असा भरंवसा आहे.

**हं. प्रा. ठा. कॉलेज मॅगेझिन, नाशिकः**— ( वर्ष १ अंक २ ) कॉलेजचें मासिक कोणाकरतां असतें याचा एकदा निर्णय होणें अगत्याचें आहे असें आमच्यासमोर

असलेला अंक वाचून आम्हांला वाटूं लागलें आहे. प्रोफेसरांचे लेख जरी मार्गदर्शक असले तरी प्रोफेसरांच्याकरितां हें नियतकालिक आहे असें म्हणतां येणार नाही. त्याचप्रमाणें विद्यार्थिदशेंत लोकांना मार्गदर्शक होणाऱ्या लेखांची विद्यार्थ्यांकडून अपेक्षा करणें व्यर्थच होईल. अर्थात् अशा नियतकालिकांचें कार्य विद्यार्थ्यांना लेखनकलेची सवय लावणें हेंच असतें. अशा ठिकाणीं विचारांना दुय्यम स्थान मिळतें आणि तें योग्यच आहे. पण लेखनाकरतां कांहीतरी विषय घेणें प्राप्तच आहे. परंतु हे विषय मात्र विद्यार्थिदशेला शोभतील असेच असले पाहिजेत. या दृष्टीने पाहतां या मासिकांतील विद्यार्थ्यांनी लिहिलेले बहुतेक विषय स्त्री व प्रेम यांसंबंधींच असलेले पाहून आमच्या विद्यार्थ्यांचीं मनें किती भ्रष्ट झालीं आहेत याचा प्रत्यय येतो. कॉलेजच्या अधिकाऱ्यांनी या गोष्टीचा विचार करावयास पाहिजे असें आम्हांस वाटतें. नाहीतर यापेक्षां अधिक महत्त्वाचें शिक्षण कॉलेजच्या विद्यार्थ्यांना मिळत नाही असा लोकांचा समज होण्याचा संभव आहे.

**श्रीविष्णु कवि महाराज यांचें चरित्रः—** ( ले. व प्र. नरहरशास्त्री जोशी, खरशीकर; किं. १२ आणे. ) नरहरशास्त्री खरशीकर यांनी आपले मातुल श्रीविष्णुमहाराज यांचें हें चरित्र लिहिलें असून तें बोवांच्या शिष्यांस व त्या गुरुपरंपरेंतील इतर गृहस्थांस स्फूर्तिदायक झाल्याशिवाय रहाणार नाही. आमच्या मतें तिऱ्हाइत मनुष्य श्रीविष्णुदास महाराजांच्या कवित्वालाच अधिक मान देईल. श्रीविष्णुमहाराज हे इतर बहुतेक संतांप्रमाणेंच संत आणि कवी असे होते. महाराजांच्या अंगीं संसारवैराग्य जन्मतःच होतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. महाराजांच्या अप्रसिद्ध कविता खरशीकर शास्त्र्यांच्या हातून लवकरच प्रसिद्ध होतील अशी आम्ही आशा करतों.

**गोमंतकपरिचयः—** ( ले. प्रो. बाळकृष्ण वामन सांवर्डेकर, किं. २ रु.) गेल्या म. सा. संमेलनाचा एक अकल्पित परिणाम म्हणजे गोवा प्रांताची माहिती करून देणाऱ्या ग्रंथांचा जन्म हा होय. श्री. सांवर्डेकर यांनी प्रस्तुत पुस्तक लिहून महाराष्ट्र आणि गोमंतक यांचा दुवा जोडला. आणि संमेलन गोव्यांत भरून महाराष्ट्रियांनी गोमंतकाचें बृहन्महाराष्ट्रांतलें स्थान मान्य केलें. या पुस्तकांत गोमंतकासंबंधीं बहुतेक सर्व माहिती मिळण्यासारखी आहे. सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक, भौगोलिक, ऐतिहासिक, राजकीय, अशीं स्वतंत्र प्रकरणें असल्यामुळे आपणांस जरूर ती माहिती चटकन मिळूं शकते. ग्रंथकारांनी आपल्या पुस्तकास इतिहास असें न म्हणतां परिचय हें नांव देण्यांत आपल्या मर्यादित कार्यक्षेत्राची जाणीव करून दिली आहे. याचा अर्थ असा कीं ग्याझेटिअरच्या धर्तीवर या पुस्तकाची रचना आहे. या दृष्टीने श्री. सांवर्डेकर यांचे श्रम वाखाणण्याजोगे झाले आहेत. पुस्तकाची भाषा शुद्ध आहे. हें विशेष रीतीने सांगण्याचें कारण हें कीं गोवा प्रांतांत सर्व लोक घरींदारीं कोंकणी भाषा बोलत असतात. तसेंच या प्रांतांतील अर्धेअधिक लोक रोमनकॅथोलिक पंथाचे ख्रिस्ती आहेत. अशा परिस्थितींत दूरची पुणेरी भाषा आत्मसात् करणारांचें कोणीहि कौतुकच करील.

कांही ठिकाणीं कसोशीने माहिती कां दिली नाही समजत नाही. उ. "गौड सारस्वतांत चारपांच पोटभेद आहेत ( वि. २ पा. १ ). चारपांच असें डळमळीत विधान करण्याचें वस्तुतः कारण नाही. गौडसारस्वतांत चार अथवा पांच पोटभेद आहेत हें श्री. सांवर्डेकर यांस तरी नक्की सांगण्यास हरकत नव्हती. ९५ ( वि. २ ) वर हिंदुपत्र सुरू झाल्याचा सन चुकून घालावयाचा राहिला आहे. तिकडे दुसऱ्या आवृत्तीच्या वेळस लक्ष जाईलच. एकंदरींत गोव्यांतील व गोव्याबाहेरील लोक या गोमंतकपरिचयाचा दृढ परिचय करून घेतील अशी आम्हांस उमेद आहे.

**श्रीज्ञानदेवी** :–मासिक – संपादक, भगवंत यशवंत पेंडसे व रामचन्द्र महादेव आठवले; वार्षिक वर्गणी अगाऊ ३ ८३ ट. व्य. सह.

या मासिकाचे पहिले दोन अंक आम्ही वाचले त्यावरून इंग्रजी मासिकाशीं स्पर्धा करणारीं जीं कांही थोडी मासिकें मराठींत आहेत त्यांत ज्ञानदेवीचा समावेश करण्यासारखा आहे. ज्ञानेश्वरीवर आजपर्यंत अनेक ग्रंथ झाले आहेत पुष्कळांनी अर्वाचीन मराठींत रूपांतर केलें आहे. तथापि सर्व ठिकाणीं प्रायः भाविकाची दृष्टिच प्रामुख्याने आढळते. श्री. आठवले यांनी श्रद्धेला सोडून न देतां चिकित्सापद्धति स्वीकारली आहे. त्यामुळे हें मासिक आरंभापासूनच वरच्या पायरीवर जाऊन बसलें आहे. गणपतीचें भुज व ज्ञानेश्वरांचीं षड्दर्शनें यांची चर्चा विद्वत्तापूर्ण व पटेल अशी आहे. अवांतर लेखहि उद्बोधक आहेत. संकल्पाप्रमाणें ज्ञानेश्वरीचें संशोधन ज्ञानदेवीच्या हातून पूर्ण चिकित्सक बुद्धीने होईल असा भरंवसा वाटतो. विद्वानांचा आश्रय या मासिकास मिळणें अवश्य आहे.

**आपलें शरीरः**— ( ले. डॉ. ना. शि. सहस्रबुद्धे एम्. एस्. किं. १ रुपया. ) शारीरावर याच्या पूर्वी मराठींत पुस्तकें लिहिलेलीं नाहीत असें नाही. पण तीं पुस्तकें लिहिलीं तेव्हापासून आतापर्यंत मराठी भाषेंत पुष्कळच फरक पडला आहे. वैद्यकीय शिक्षण नसलेल्या माणसाला शरीररचना समजून देतां येईल अशी उमेद बाळगण्यासारखी स्थिति सुदैवाने आज प्राप्त झाली आहे. डॉ. सहस्रबुद्धे यांनी याच दिशेने प्रयत्न केला आहे; आणि तो बराच सफल झाला आहे असा आमचा समज आहे. अशीं पुस्तकें छापण्यापूर्वी तद्विषयक ज्ञान नसलेल्या स्त्रीपुरुषांस वाचून दाखवून त्यांस समजतें कीं नाही तें पहावें. असें करणें कांही कठीण नाही. हा प्रयोग करून तो यशस्वी झाल्याचा अनुभव आल्यावर शास्त्रीय पुस्तक छापलें की तें वाङ्मयांत कायमचें स्थान पटकावल्याशिवाय राहणार नाही. असो. डॉ. सहस्रबुद्धे यांना शिकवण्याचा अनुभव असल्यामुळे प्रस्तुत पुस्तक सुलभ झालें आहे. निदान कांही भाग वाचतांना तरी असें वाटतें. पण इंग्रजी शब्द वापरण्याचा जो मार्ग त्यांनी पसंत केला आहे तो आम्हांला रुचत नाही. इंग्रजी शब्दांना मराठीचा पेहरावहि त्यांनी दिला नाही. उ. खालील वाक्यें पहा. " एओर्टा लेफ्ट व्हेंट्रिकल् पासून निघतो. " (७८) ........ "फुप्फुसांपासून दोन पल्मॉनरी व्हेन्स् जेथें लंगमधें ब्रॉंकस् व पल्मानरी आर्टरी आंत

जातात तेथूनच लंगमधून बाहेर येतात" (९०) इ०. प्रस्तावनेंत डॉ. सहस्रबुद्धे म्हणतात की सर्वमान्य असे पारिभाषिक शब्द मराठींत अद्यापि रूढ झाले नसल्यामुळें सध्या इंग्रजी शब्द जसेच्या तसेच कायम ठेवण्याचा विचार केला.

आम्हांला ही विचारसरणी संमत होत नाही. सर्वमान्य असे पारिभाषिक शब्द तयार होईपर्यंत थांबल्यावर असे शब्द वापरण्याचा प्रसंगच येणार नाही असें आम्हांस वाटतें. उलट इंग्रजी शब्दच रूढ होऊन बसतील. परिभाषामंडळ शब्द बनवीत आहे हें खरें. पण त्याचें कार्य उरकेपर्यंत बाकीच्यांनी आपआपली परिभाषाच उपयोगांत आणणें युक्त होईल. ग्रंथकार डॉ. सहस्रबुद्धे यांनी फार परिश्रम करून पारिभाषिक शब्द बनविले आहेत; त्यांची यादीहि त्यांनी पुस्तकाच्या अखेरीस दिली आहे. यात्र शब्दांचा उपयोग त्यांनी करावयास पाहिजे होता. सुमारें ४५० शब्दांची ही यादी आहे. परिभाषामंडळाने या यादीचा विचार करून ती पसंत केल्यास पत्रिकेंत प्रसिद्ध करतां येईल. कांही शब्द खाली देतों.

Thalamus = अधोमध्यकंद, Endocrinology = अमृतसंस्था,
Xyphoid Process = जत्रुप्रसर, Brachial Artery = बाहवीह रोहिणी,
Ventricle = कोटर.

ग्रंथकारांचे शब्द पुष्कळांना मान्य होतील असे आम्हांस वाटतें. दुसऱ्या आवृत्तींत तेच शब्द घालून इंग्लिश शब्द काढून टाकण्यांत यावे. इंग्रजींतून विचार न करतांना मराठींतून करण्याची सवय आम्हांला होईल तेव्हा शब्दांचा प्रश्न सुटेल. नवे शब्द बनवतांना ते सुटसुटींत असावे इकडे लक्ष्य केवळेंच पाहिजे. संस्कृताचा उपयोग या कामीं करूं नये असें नाही. पण त्यामुळे अवजड शब्द होत असेल तर बाराखडींतलीं कोणतीं तरी अक्षरें एकत्र जुळवून आपणांस पाहिजे तसा शब्द बेला-शक बनवावा असें आम्हांस वाटतें. इंग्रजीचें अनुकरण करूं नये. इंग्रजींत शास्त्रीय शब्द फार अवजड झाले आहेत. परकी भाषेंतील शब्द मराठींत फार घेतले तर मराठींत नसलेले उच्चार द्यावे लागतील. वर्णसंख्येंत भर पडेल. म्हणून इंग्रजी शब्द घेतांना मराठींत उच्चार करण्यास व लिहिण्यास सुकर होईल असा त्याला पेहराव द्यावा. त्याचप्रमाणें ज्या पदार्थाला आपणांस शब्द पाहिजे त्या पदार्थाच्या आकारा-सारखा दुसरा पदार्थ पाहून त्याचें नांव थोड्याश्या फरकाने आपल्या पदार्थास द्यावे. अशिक्षित माणसास पदार्थ दाखवून तूं याला काय म्हणशील असा प्रश्न केला असतांहि एखादे वेळेस चांगला शब्द सुचवण्यांत येतो. व्युत्पत्तीचा विचार करावा. पण प्रत्येक ठिकाणीं व्युत्पादितच शब्द पाहिजे असा आग्रह न धरतां सिद्ध शब्द बनवावे. असो. डॉ. सहस्रबुद्धे यांच्या इच्छेप्रमाणे सामान्य वाचकांना समजेल अशी या पुस्तकाची धाटणी झाली आहे. पण वाचीत असतांना इंग्रजी शब्द मात्र काट्याप्रमाणें वाटतात.

**बालशिक्षक** :— (भाग १ ला ले. के. रा. खुजगांवकर व वि. स. जोशी, किं. २ आणे.)

शिशुवर्गाकरितां जीं अनेक लहान मोठी पुस्तकें हल्ली लिहिलीं जात आहेत त्यावरून बालशिक्षणाचें महत्त्व लोकांना पटूं लागलें आहे असें उघड होतें. श्री. खुजगांवकर व जोशी यांचें "बालशिक्षक" हें पुस्तक याच दिशेने केलेला प्रयत्न आहे. परंतु आमच्या मतें चालू सरकारी बालपुस्तक अथवा श्री. कारखानीस यांची शिशुपाठमाळा ह्यांना मागें टाकण्यासारखें बालशिक्षकांत कांही विशेष नाही. रेषा आणि अर्धचंद्र हे मूलाक्षरांचे घटक आहेत ही गोष्ट मात्र बालशिक्षकांपुढें मांडली आहे हाच या पुस्तकाचा विशेष आहे. शाळाखात्याच्या पुस्तकांत पूर्वीच्या आवृत्तींत असलेली ही योजना हल्लींच्या आवृत्तींतून कां गळली हें समजत नाही. असल्या प्रकारचीं पुस्तकें हीं मुलांकरितां नसून शिक्षकांकरितां लिहिलेलीं असावींत. बिगरयत्तेच्या मुलांच्या हातांत त्यांना अक्षर ओळख करून देण्यास पुस्तकांची गरज नाही. पण त्याशिवाय, दोन लाखांची, ती सुद्धां बारावी आवृत्ती कशी काढतां यावी? अर्धचंद्र व रेषा यांचे निरनिराळे संयोगवियोग करून मुलांना वाळूवर काड्यांच्या साहाय्याने सर्व मूळाक्षरें शिकवून नंतर फळ्यावर त्यांच्याकडून प्रथम परिचित असे शब्द व नंतर वाक्यें लिहून घेतलीं असतां मुलांना बिनखर्चाने लिहितां वाचतां येऊं लागेल. अक्षर हा एक संकेत असल्यामुळें तो ध्यानांतच ठेवणें अवश्यक आहे. त्याच्याकरतां चित्रांचा उपयोग होईल असें आम्हांस वाटत नाही. चित्रें पाहण्याकरतां मुलें पुस्तक उचलतील एवढाच काय तो या सचित्र पुस्तकांचा आम्हांस उपयोग दिसतो. मुलांच्या हातात पुस्तक देणें ही वहिवाटच आम्हाला घातक वाटत असल्यामुळें असल्या पुस्तकांची उपयुक्तता आम्हाला पटत नाहीं. रा. खुजगांवकर आणि जोशी यांनी ह्या पुस्तकांत शिशुवर्गाच्या कानावर कधी गेले नाहीत असे असंख्य शब्द खेचून भरले आहेत. ह्या पुस्तक-लेखकांना सामान्य व्यवहार कळतो किंवा नाही याची आम्हांस शंका येते. खेडेगांवांत अंबारी, गरुडपक्षी, शहामृग ही किती मुलांच्या पहाण्यांत येत असतील वरें! मुलांच्या सोईकरितां पुस्तकें लिहिलीं जात नसून लेखकांच्या सोईकरतांच तीं लिहिलीं असावींत असा कित्येकदा भास होतो. नाहीतर रथ, तरवार यांच्या आकृत्या असल्या पुस्तकांत कोणी घातल्या असत्या का? आम्हांला "अनुभवयुक्त सफल सुधारणा आली आहे" (!) असें म्हणतां येत नाही. तरी सुद्धा आम्ही निःशंकपणें असें ह्मणूं शकतों कीं शिशुवर्गाकरितां लिहिलेलीं सर्व पुस्तकें बाजूस ठेवून मुलांना अधिक मनोरंजक रीतीने बिनखर्चाने व थोडक्या काळांत साक्षर करतां येईल.

'बालशिक्षकां'त दिलेली उजळणी ही शिशूंस झेपण्यासारखी आहे किंवा नाहीं याची आह्मांस शंका आहे.

---

# कथा[1]

( सं :— ना. गो. चापेकर. )

ऐधी नगराचा धर्मपूर नांवाचा राजा होता. त्याचें चौदा चौकडी राज्य होतें. त्याला असें वाटलें कीं माझें राज्य मोठें आहे. तेव्हां मी आतां धर्म करतों. १२ वर्षेपर्यंत त्याने भटजींस धर्म केला. १२ वर्षे पुरी झाल्यावर त्याने ब्राह्मणांस विचारिलें कीं तुम्ही मला आतां धर्मांचा रस्ता दावा. तेव्हां ते सर्वे ब्राह्मण बोलवून त्यांनीं आपल्या कचेरींत नेले. तेव्हां राजा म्हणतोः— मला आठ दिवसांत धर्मांचा रस्ता दाखविला पाहिजे. नाहींतर तुम्हांला समद्यांना कापून टाकीन. तेव्हा त्या भटजीलोकांनी पुष्कळ ग्रंथ पाहिले पण धर्मांचा रस्ता सापडला नाहीं व ७ दिवस झाल्यावर गांवांतून पळून जाण्याचा विचार ब्राह्मणांनीं केला. सर्वे ब्राह्मण रात्रीस गांवाबाहेर पडले. एक लंगडा ब्राह्मण होता. त्यास उशीर लागला. त्या ब्राह्मणाची एक मुलगी होती. ती काय म्हणते 'बाबा तुम्हा जरा थांबा'. माझी एक मैत्रीण आहे तिला भेटून येतें. तितक्यांत रात्रीच्या पाहारांत ती धोब्याच्या घरीं गेली. धोब्याच्या मुलीला गंगू गंगू म्हणुन हाक मारीत गेली. गंगू म्हणते 'तूं कोण आहेस!' ती म्हणते 'मी ब्राह्मणाची जायी आहे,' गंगू म्हणते 'इतक्या रात्रीं आलीस कां?' ती म्हणाली तुला भेटण्यांकरतां आलें. तुझ्यामाझ्या अंतरीं लोभ तुटला. गंगू म्हणते 'इतकें जड तुला काय आलें आहे' ती बोलते. 'आपला धर्मराजा यानें आम्हांला १२ वर्षेपर्यंत धर्म दिला आणि आतां आम्हांला धर्मांचा रस्ता विचारतो पण तो आम्हांला सापडत नाहीं म्हणून आम्ही दुसऱ्या मुलुखांत पळून चाललों आहों. बाई माझें ऐकतेस काय — गंगू म्हणते तुमच्या समद्या ब्राह्मणांना जाऊन सांगा कीं मागें फिरा. आणि ज्याचे त्याचे दरवाजे गच्च लावून आंत बसा. उद्या मी धर्मांचा रस्ता दाबतें.' तशीच ब्राह्मणाची मुलगी निघून आपल्या मंडळींत गेली. बापाला सांगते 'बाबा, माझी थोडी गोष्ट ऐका. आपल्या सर्वे मंडळीला सांगून मागें फिरवा. राजा मारील, कापील त्याबद्दल मी गुन्हेगारी घेतें.' हें ऐकून सर्वे लोक मागें फिरले. ज्याच्या त्याच्या घरांत जाऊन दरवाजे लावून गच्च बसले. दिवस उगवल्याबरोबर राजाचे शिपाई लोक आले. येऊन पाहतात तों सर्वे ब्राह्मणांची घरें ओसाड, दरवाजे लावून बंद. सर्व ब्राह्मणांचीं घरें तपासून ते परत राजाकडे गेले राजाला सांगतात. ब्राह्मण लोक कोण घरांत नाहींत. राजाने हुकूम केला त्यांचे दरवाजे जाऊन फोडा. बरीच मंडळी जाऊन दरवाजे फोडायला लागले. एकदोन घराचे दरवाजे फोडल्याबरोबर बाकीचे लोकांनी आपले दरवाजे उघडले. राजा आतां मारील म्हणून सर्व ब्राह्मण घाबरून गेले. तेव्हां सर्वे ब्राह्मण राजानीं आपल्या राजवाड्यांत नेले. राजा काय म्हणतो कीं मला धर्मांचा रस्ता आतांच्या आतां दाव, तर तुम्हांला सोडून देतों. ब्राह्मण काय बोलते राजाला, राजश्री, तुम्ही आम्हांला धर्म दिला आम्ही खाऊन घेतला. आतां

---

१ एका कासकऱ्याकडून मिळालेली.

रस्ता काय दाखविणार. पुष्कळ प्रयत्न केला पण धर्म सांपडत नाहीं. असें म्हटल्याबरोबर राजा हातांत तरवार घेऊन उभा राहिला. धर्म तुम्ही मला दावीत नाहीं त्याबद्दल मी आतां तुम्हांला मारतों. इतक्यांत ब्राह्मणाची मुलगी धोब्याकडे गेली. बाई लवकर चल राजाकडे नाहीं तर आता माझे सर्व लोक मरतील. तशी धोब्याची मुलगी तिच्याबरोबर राजाकडे गेली. धोब्याच्या मुलीनें राजाला रामराम दिला. राजश्री तुम्हींच आमचे मायबाप तुम्हीच मारणार तारणार. धर्मांचा रस्ता स्वतः गेल्याशिवाय कळत नाहीं. तर तुम्हांआम्हांला सांगता येईल काय ! एवढें सांगितलें तरी राजा ऐकेना. सर्वेच राजाच्या चरणांस गेले. तरी राजा म्हणतो कीं कापल्याशिवाय सोडणार नाहीं. तेव्हां धर्मांचा रस्ता धोब्याच्या मुलीला माहित होता. कापाचा वेळ आला तेव्हां धोब्याची मुलगी म्हणाली मी धर्मांचा रस्ता दावतें. तूं ह्यांना मारूं नको. राजा म्हणतो मला आतां दाखव. मग तिनें धर्मांचा रस्ता थोटानें दाखविला. ही धर्मशीला उघडावी आणि धर्म पाहाण्यास तुम्ही जावें. तेव्हां राजा घोड्यावर बसून धर्म पाहाण्यास गेला. चालून चालून तो बारा कोशींवर गेला. वाटेंत त्याला सोन्यासुवर्णाच्या गाई भेटल्या. तेव्हां राजा म्हणतो ये गोवाऱ्या ह्या गाई कोणाच्या. धर्मपूरराजानी धर्म केला. त्याचा हा धर्म उभा राहिला. हें ऐकून राजाला मोठा ' आनाद' ( आनंद ) झाला. तसेंच पुढें आइबाप भेटले. सोन्यासुवर्णाची त्यांना भेणपालखी होती. दोहोबाजूस ५।५ इसम त्यांना वारा घालीत होते; तेव्हां धर्मराजानें विचारलें हा देव कोण आहे. लोकांनी सांगितलें कीं हा धर्मपूर राजाचा बाप आहे. अप्राट त्याने पुण्य केला; त्यामुळें आईबापाचा मोठा आनाद आहे. तेथून निघून पुढें गेले. वाटेंत एक पिंपळाचे झाड लागलें त्याचें पान सोन्यासारखें दिसत असें. त्या झाडाला राखणदार असे दोनशें लोक होते. जितकें पान पडलें तितका पिंड होतो तेव्हां राजानी विचारलें हा झाड कोणाचा. लोक म्हणाले धर्मराजाचा, त्यानीं धर्म केला त्याच्यामुळें आमचा पण आनाद आहे.

हें सर्व पाहून राजा मागें आला. राजवाड्यांत आल्यावर सर्व मंडळी भेटाला आली. तीन तास राजाच्या पाया पडत होते. राजा म्हणतो जें आपणास पहावयाचें असेल तें स्वर्गांत जाऊन पहावें. जिनी मला धर्मांचा रस्ता दावला ती मला बायको पाहिजे. तिच्यापासून सर्व मला माहिती होईल. तेव्हां धोब्याच्या मुलीला बोलावून राजानें राजवाड्यांत नेली. तो म्हणाला तुला मी स्त्री करून घेतों. राजा, मी धोब्याची मुलगी तुमच्या अंगाचा मळ काढणारी माझ्यावर तुमचा हेतू कसा झाला. तुझ्या तोंडांत पापी वासना झाली. राजा, तुझा तूं धर्म पाहून यावें. मग मी तुझी बायको होईन. तसाच राजा परत गेला. गेल्याबरोबर सोन्यासुवर्णाच्या गायांना कसाब लोक कापावयास लागले. तसें धर्मराजा बोलूं लागला हें झालें काय ? कसाबदार बोलतात कीं धर्मराजाची पापी वासना फार झाली, ह्याच्यापुढें जावें, तुम्हांला आणीक कळेल. आईबापाच्या ठिकाणास गेला. तेव्हां आईबाप नरककुंडांत होते. आईबापाला पाहूनशिनी राजा रडूं लागला. देवा होतें कसें, झालें कसें. हें पाहून आणिक पुढें गेले. पिंपळाचें झाड तोडीत आहेत असें त्यानें पाहिलें. हें पाहून राजाला आणिक दुःख उत्पन्न झालें. हें सर्व पाहून आपल्या राजवाड्यास राजा आला. धोब्याच्या बाईला बोलावून आपल्या कचेरीस

घेतली. बाई तूं सांगितलेंस तें सर्वे झालें. माझी तूं बहीण आहेस. जें तूं मागशील तें तुला मी देतों. माझ्या धर्माचा फार वाईट होऊन गेलेला आहे. तूं राजा तुझ्या तोंडांतून पापी वासना झाली म्हणून तुझा धर्म वाईट झालेला आहे. जेसें शोभेल तैसेंच करावें. जातींतल्या बायका १० कराव्या. परकी स्त्री आपल्या बहिणीप्रमाणें मानावी. आतां आणिक १२ वर्षे याच ब्राह्मणांना धर्म करावा म्हणजे तुझा धर्म पुनः सारखा होईल. नाहींतर तुम्हीसुद्धां नरककुंडांत जाल. मला तुमचें द्रव्यं नको. हत्ती नको. आजपासून मला बहिणीप्रमाणें वागवावें. मी घोत्रीण आहें. पण मी माझ्या पुरुषाशिवाय दुसरा पुरुष बघितलेला नाहीं. त्याच्यामुळें माझ्या नवऱ्याला यश होतो. मी सांगेन तेप्रमाणें होईत होता. अशी मी साधारण महापुण्यवान् होतें. आतां राजा तुम्ही मला बाई हाक मारावी. १२ वर्षे झाल्यानंतर पुनः तुम्ही धर्म पाहण्यास जावें. बामण लोक म्हणतात कीं बाई आम्हांस शेर तूं उत्पन्न केलास. हाच तुझा आशीर्वाद आम्हांला घेतला.

---

# टिपऱ्यांच्या खेळ्यांचीं गीतें

( सं. :- कृ. गो, साठे )

(१)

पयलें नमान गणेसासीं । पयलें नमन गणेसा १
दुसरें नमान ध्यायनासी । दुसरें नमन ध्यायना २
त्याय नमान त्यायनाशी । त्याय न० ३
चौथें नमान चांदसूर्या । चवथें न० ४
पाचवें नमान पांच रे पांडवा ॥ पांचवें न० ५
सावें नमान साव रे भैरी । सावें न० ६
सातवें नमान सतरे परमाण । सातवें न० ७
आटवें नमान आटरे परमाण । आटवे न० ८
नववें नमान नवे गरासी ॥ नववें न० ९
धावें नमान रेसनाशी । धावें न० १०
काय नमान विनंतीची । काय न० ११
बरवें नमान बरेपणाची । बरवें न०

(२)

यामनेच्या तिरीं रे भाय वो । यामनेच्या तिरिं
मांडली चेंडूफळी रे कृष्णा । मांडली चेंडूफळी

चेंडू झुगारिला रे कृष्णा । चेंडू झुगारिला गाजी ३
गगनाशी गेला रे चेंडू । गगनाशी० ४
सूर्या झाकारिला रे तेणें । सूर्या० ५
उतरून खाली अला रे चेंडू । उतरून० ६
गुतला कळंबावरी रे चेंडू । गुतला० ७
कळंब हालविला रे तेणें । क० ८
तिथून ऊडाला रे चेंडू । तिथून० ९
डोवामाजी पडला रे चेंडू । डो० १०
पाताळ भुवनीं गेला रे चेंडू । पा० ११
नागिणी पायला रे चेंडू । ना० १२
चेंडू आणुन देशि ग नारी । चें० १३

---

(३)

पयली सोंड हाय कोणाची । पयली सोंड हाय कुणा ? १
पयली सोंड हाय गणाची । पयली सोंड हाय गणा २
दिसरी सोंड हाय कुणाची । दिसरी सोंड हाय कुणा ३
दिसरी सोंड हाय रे हत्तीची । दिसरी० ४
तिसरी सोंड हाय रे कुणाची । ति० ५
तिसरी सोंड रे मोति मोराची । ति० ६
चवती सोंड रे कोणाची । द्यावें धुंडून । द्यावें सांगून ॥
गण गाइला सा

---

पयलें चक्र आहे रे कोणाचें । पयलें चकर धर्तरीचें १
दिसरें चक्र हाय रे कोणाचें । दिसरें रे चांदसूर्याचें २
तिसरें चक्र हाय रे कोणाचें । तिसरें आहे कुंभाराचें ३
चौथें चक्र हाय रे कोणाचें । द्यावें धुंडून, द्यावें सांगून ४
गण गाइला

---

(४)

नाचे काशावरि रे भाय । नाचे काशावरी गा १
नाचे पायांवरि रे भाय । नाचे पायांवरी गा २
पाई काशावरि रे भाय । पाई काशा० ३
पाई धरण्यावरि रे भाय । पाई० ४
ण काशावरि रे भाय । धरण० ५
डोशावरि रे भाय । धरण० ६

शेषा काशावरि रे माय । शे० ७
शेषा मांडलावरि रे माय । शे० ८
मांडल काशावरि रे माय । मां० ९
मांडल वायोवरि रे माय । मां० १०
वायो काशावरि रे माय । वा० ११
वायो कूर्मावरि रे माय । वा० १२
कुरम काशावरि रे माय । कु० १३

---

लावणी

( सं. कृ. गो. साठे )

रामलंकेची कथा सांगतों, पाया मजबूत ॥ ध्रु० ॥
चोरुन नेली सिते पाया, राम गेले होत ॥
वनामाजी गुंफा बांधली, कटक जंगलांत ॥
रामसिता दोघांव जणां, होतीं गुंफेत ॥
वनास्पाती धुंडित असे, लक्षिमण दूत ॥
रावणाचा मामा मिरग, फिरे गुंफेभोवता ॥
सिता बोले रामाला, पाहा या अप्रीत ॥
मारून या मिरगा चोळी शिवावी तरूत ॥
रामलंकेची कथा सांगतों० ॥१॥
हुकुमाचा सारथी घातला धनुष्याला हात ॥
दोघां बंधुची जोडी एका एक ना विस्वंत ॥
धनुष्याची रेघ ओढुनि दावी रघुनात ॥
चाळवीत खेळवीत गेले दुरले वनांत ॥
त्या दोघांला यश लागले ते रानावनांत ॥
कपटी माव ते दैत्य कळेना तेची हिकमत ॥
झाला मावेचा जोगी झोळी पतंबा बगलेंत ॥
भिक्षा भिक्षा करुनी मग तो फिरे गुंफे भोवता ॥
बाढ माई भिक्षा हरोळी देतो दारांत ॥
सत्वाचें साकडें बयेला मग पडले होत ॥
जाई याचा सत्व होईल मग जन्माचा घात
रामलंकेची० ॥२॥
सवर्णाच्या दानसुपाला वर करते हात ॥
मौनिचा साकडा अंधारा पडला गुंफेत ॥
सिताबाइला घेउन चालला पोलिसासूत ॥
दोनी नेत्रां झाकुन मुखामधीं राम सुमीत ॥

कोणीकडे गेले राम माझे करुनि ध्याईत ॥
रामलंकेची० ॥३॥
मावळला दीन सूर्या शिरला पोटांत ॥
चीत करूनी मिरगाला मग राम झाले यसवंत ॥
सिता सिता करून लक्षिमण फिरे गुंफे भोवता ॥
कोणीकडे गेली सिता सितेचा नाय लागे अन्त ॥
सिता सिता करून लक्षिमण फिरे रामाभोवता ॥
कोणिकडे गेली सिता सितेचा नाय लागे अन्त ॥
सिता सिता करूनि कोमलो रामाची मूर्त ॥
कोणी पाजिलें पाणी फिरवले तोंडावरने हात ॥
आले मावेचा झेंडू उमाडा शिरला पोटांत ॥
कंचा झाडाला धरून देवाना अवघड केलात ॥
पंडित ध्यानीं तुम्ही बैसले करा याचा अंत ॥
असेल कवीचा पूत सांगेल झाडाची जात ॥
धोंडू शिरगाव त्येचा ठिकाणा म्हाईत जकतांव ॥

---

## बायांचीं गाणीं.

[ सं. महादेव विनायक डोंगरे, महाड ]

[ मराठा वगैरे जातींमध्ये देवी आल्या म्हणजे त्यांना गाणीं म्हणतात, त्यांना जागवतात व त्यांच्या नांवाने भिक्षा मागतात. देवींनाच बाया म्हणतात. हीं गाणीं परशुराम येथील एका मराठा बाईजवळून घेतलीं आहेत. ]

१

दादा बोले बायांला। चला ग जाऊं चौलच्या राना ॥
नितळ दवण्याची काडी। बागेमध्यें कौलारी हो माडी ॥
बागेमध्यें कौलारी माडी। खालून काय चाले आगीनगाडी ॥
त्यामधीं दादाचा मठ। बाया खेळती सारंगफास ॥
हरवले हत्तीचे गोट। हरवले हो हत्तीचे गोट ॥
बाया बोलली दादाला। बाया बोले हो दादाला ॥
अजि मी तुराच खोवीन। अजि मी डाव जिंकीन ॥
अजि मी तुराच खोवीन ॥ १ ॥

२

राम पुसे राधिके। चंद्र कां हो कोमेजला ॥
काय सांगूं श्रीपती। बायांचे हरपले मोती ॥
हरपले तर हरपूं दे। जीव तरी सुखी राहूं दे ॥
जाऊं म सुरती शहराला। आणूं जडावाचे मोती ॥
तुमच्या मोत्ये कारण। पुसती नगरच्या नारी हो ॥
घरी कोरा रांजण। किती भरिशी पाणी ॥
बायांची जडवली वेणी। हो बायांची वेणी ॥
बाया माझ्या निघाल्या तांतडी। घरीं विसरले साडी ॥
अरे माझ्या धाकल्या दीरा। मजला नेरे माहेरा ॥
तुजला ग नेईन माहेरा। मजला हांसेल सोयरा ॥
बाराच्या अमलामध्यें। बायांचे ढोल कुठे वाजेल ॥
बायांचा छबीना निघाला। बायांच्या बापांनीं वोळवला ॥
बायांच्या आईने सौदा केला। बायांच्या हातांमध्यें दिला॥
बायांचे छंद पुरवले। बायांचे छंद पुरवले ॥
पालखीचे भोई। नाचवील तिरोतीरी ॥

## कोल्हापुराकडील बहुरूप्याच्या पठनाचा मासला

चला तुम्हीं चला। लग्नाला चला। चंद्रीच्या लग्नाला चला ॥ धृ० ॥
लग्नाची घाई। वांगीं आलिं लई। फोडणीला तेल नाहीं। कशी करूं बाई॥ १ ॥
आवाजी पाटील। सुभाजी पाटील। बैत[1] कोण वाटील ॥
बैत्याची भिषात्। हात घालि खिशांत। साडेचार पैशांत। शेंबुड आला मिशांत ॥२॥

कोल्हापुरची हळद। सासू झाली वाळंत ॥
कोल्हापुरचें गाजर। सांगलीचा बाजार ॥
कोल्हापुरचें वांगं। चोर झालं पांग ॥ ३ ॥
चार जमल्या आयाबाया। मधीं होती ताई ॥
दिवाळीचे वडे खाऊन। पादायाची घाई ॥
करवली तोंड वाशी। मारुती डोळे पुशी ॥ ४ ॥

चला तुम्ही चला। इत्यादि.

संग्राहकः—विष्णु सदाशिव सोहोनी

१ बलुत्यांना वाटण्यांत येणारें अन्न.

# सामाजिक टांचणें.

## पहिल्या गर्भारपणीं करावयाचीं कृत्यें.

१ तिसऱ्या महिन्यांत चोर ओटी भरतात. म्हणजे या ओटभरणाचा गाजावाजा करीत नाहीत. डोहाळतुलीच्या हातांत ओटी भरतांना खण देतात. पुढें त्याच खणाची चोळी शिवतात. हिला चोरचोळी म्हणतात. या दिवशीं डोहाळतुलीला गव्हल्याची खीर व गुळाची पोळी करून घालतात.

२ पांचव्या महिन्यांत हिरव्या बांगड्या भरतात व ओटी भरतात.

३ सातव्या महिन्यांत डोहाळजेवणांचा मारा होतो. मालत्या, फणवल्या, शेवया, नखोले व गव्हले यांच्या पांच खिरींच्या वाट्या वर पुऱ्या ठेवून झांकतात. गर्भार स्त्रीस एका वाटीवरची पुरी काढण्यास सांगतात. तिनें गव्हले व नखोले यांच्या खिरींच्या वाट्यांपैकीं एका वाटीवरील पुरी उचलली तर मुलगा होईल असें समजतात. दुसऱ्या तिहींपैकीं एकादी खीर निघाल्यास मुलगी होईल असें भविष्य करतात. डोहाळतुलीनें जी खीर उघडी केली असेल ती तिला खावयाला देतात. बाकीच्या खिरी गर्भार नसलेल्या तिच्या तरुण सोबतिणींस खावयास देतात. तसेंच दूधतुपांत आंगठी बुडवून ती तिच्या उजव्या कुशीस लावतात. कूस शांत रहावी म्हणून हा प्रयोग करण्याची वहिवाट आहे.

वर सांगितलेल्या पांच खिरी सध्या फक्त मुंजीमध्येंच केल्या जातात. तथापि वरातीच्या वेळेस मुलगी सासरीं जातांना तांदूळगव्हाच्याऐवजीं मालत्यांनी तिची ओटी भरण्याची वहिवाट आहे.

* * * *

मूल चालावयास लागलें म्हणजे मुलाच्या पायांत चाळ घालून आईची ओटी भरतात व लाडू मुलाच्या डोक्यावर किंवा पायांवर ओततात. याला चमकलाडू म्हणतात. हें कृत्य मुलाच्या आतेनें करावयाचें असतें.

x x x x

पहिले तीन महिने मुलाला सुताचा करगोटा बांधतात. पांच महिन्यानंतर पांच मुलांना रेशमी करगोटे व गूळखोबऱ्याच्या वाट्या देऊन मग मुलाच्या कंबरेला रेशमी करगोटा बांधतात.

* * * *

संक्रांतीच्या दिवशीं लहान मुलांस बोरांनी न्हाऊं घालण्याची कित्येक ठिकाणीं वहिवाट आहे. तेव्हा आईची ओटी भरतात व मुलाच्या डोकीवरून बोरें टाकतात.

म. वि. डोंगरे

---

# शंका, चर्चा इ.

## श्री. कानिटकर आणि ज्ञानेश्वरींतील शब्दांची व्युत्पत्ति

( लेखक :– रामचंद्र महादेव आठवले )

प्रस्तुत 'महाराष्ट्र-साहित्यपत्रिके' च्या गेल्या द्वितीय वर्षाच्या १ ल्या अंकांत [शके १८५१ चैत्र] श्री. प्र. धों. कानिटकर यांनी 'व्युत्पत्ति' ह्या मथळ्याखाली निरनिराळ्या ६०-७० शब्दांची सयुक्तिक व्युत्पत्ति विवेचली आहे. त्यांत साक्षात् 'ज्ञानेश्वरी' ग्रंथाचा निर्देश असलेले असे—

| | | | |
|---|---|---|---|
| १ उळिग, वोळगी | ६ ठी | ११ पेलणें | १६ वहिला, वायला |
| २ अंतोरिया | ७ पडिघा | १२ पैठी | १७ बावरणें |
| ३ खेंव | ८ पन्नासिलें | १३ फुडें | १८ विटाळ |
| ४ गुरूळा | ९ पलिता | १४ बिक, बीक | १९ शादुकला |
| ५ चौमेरीं | १० पुंसा | १५ वीज | २० साधणें |

– हे २० शब्द आलेले असून ते आम्ही 'श्री ज्ञानदेवी' मासिकाच्या तृतीय अंकांत [ज्येष्ठ १८५२] वरील अकारक्रमाने उद्धृत केले आहेत. गतकालीन किंवा लुप्तरूढ (obsolete) मराठी शब्दांची व्युत्पत्ति विवेचिण्याचा श्री. कानिटकरांचा उपर्युक्त प्रयत्न प्रशंसनीय आहे यांत शंका नाही. तथापि ज्ञानेश्वरींतील ह्या २० शब्दांच्या संबंधांत जी एक बाधकारक गोष्ट प्रामुख्याने निदर्शनास आली ती श्री. कानिटकरांच्या व इतर अभ्यासकांच्याहि स्पष्टपणें लक्ष्यांत आणून देणें अगत्याचें वाटतें. ज्ञानेश्वरींतील वरील शब्दांची व्युत्पत्ति विवेचितांना श्री. कानिटकरांनी स्वीकारलेले पाठ भाषाशास्त्राच्या दृष्टीने शुद्ध व प्रमाण असलेल्या कै. राजवाडे यांच्या 'मुकुंदराजी' प्रतींतील नाहीत ही बाधकारक गोष्ट होय. व्युत्पत्ति हा भाषाशास्त्राचा व व्याकरण-शास्त्राचाच विषय असल्यामुळें व्युत्पत्ति लावण्याकरितां हातीं घ्यावयाचे शब्द मूलतःच त्या दोनही शास्त्रांच्या दृष्टींनी जितके शुद्ध व प्रमाण मिळतील तितके स्वीकारणेंच इष्ट हें उघड आहे. कै. राजवाडे यांच्या 'मुकुंदराजी' प्रतीव्यतिरिक्त ज्ञानेश्वरीच्या इतर कोणत्याहि प्रकाशित प्रती त्या दोनहि शास्त्रांच्या दृष्टींनी शुद्ध व प्रमाण नाहींत हें विद्वन्मान्य आहे. कै. राजवाडेकृत 'ज्ञानेश्वरी' व्याकरणा' च्या प्रस्तावनेंत पहिल्याच वाक्यांत - ज्ञानेश्वरीचा हा पाठ व ही प्रत छापण्याचा मुख्य उद्देश भाषाशास्त्रीय आहे - असें प्रकाशकांनी स्पष्ट घोषितच केलेलें आहे. स्वतः श्री. कानिटकरहि ह्या गोष्टी जाणत नाहींत असें नाही. कै. राजवाडे यांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं वसत असलेला आदरहि केवळ अकृत्रिम व निरतिशय असा आहे. प्रत्यक्ष ज्ञानेश्वरीच्याच संबंधांत कै. राजवाडे यांचें स्मरण श्री. कानिटकरांनी 'पत्रिके' च्या त्याच अंकांत उपरोक्त 'व्युत्पत्ती' च्या पूर्वीच 'राजवाडे–प्रशस्ति' मध्ये—

'योऽनंतपारं किल शब्दशास्त्रं । स्वधीत्य वेदांश्च कविप्रबंधान् ॥
ज्ञानेश्वरी-व्याकरणं चकार । तं विश्वनाथं सततं स्मरामि ॥ १० ॥'

असें मोठ्या गौरवाने गायिलें आहे. इतकेंच नव्हे, तर '... ... नतोऽस्मि कृतिनं तं विश्वनाथं गुरुम्।' - येणेंप्रमाणें स्पष्ट गुरुस्थानीं लेखूनच त्यांनी कै. विसुभाऊंना सादर नमिलें आहे. पण असें असूनहि त्यांनी वरील व्युत्पत्तिविवेचनांत राजवाडे प्रतींतील पाठ कसे स्वीकारले नाहींत त्याचें आश्चर्य वाटतें.

श्री. कानिटकरांनी राजवाडे प्रतींतील पाठ न स्वीकारल्याच्या योगाने वरील २० शब्दांच्या संबंधांतच अनेक प्रकारचे दोष किंवा घोटाळे झालेले आहेत; आणि म्हणूनच प्रमाण-प्रतीच्या स्वीकाराविषयीं एवढा विस्तार करणें वर अवश्य झालें. वरील २० शब्दांच्या संबंधांत झालेले ते अनेक दोष वर्गीकरणपूर्वक दाखवून देणें येथे ओघतःच प्राप्त आहे.—

अक्षरभेद:—व्युत्पत्ति प्रतिपादितांना खरें महत्त्व शब्दांतील अक्षरविकाराचें असतें; पण तिकडेच वरील शब्दांच्या संबंधांत दुर्लक्ष्य झालेलें आहे, उदा०—

(१) पहिलाच 'उळिग' हा शब्द राजवाडे प्रतींत 'उलिग' असा आहे. तसेंच 'वोळगणें' हा 'वोलगणें' असा आहे. नवव्या 'पलिता' शब्दाखाली व्युत्पादिलेला 'पळिपणें' हा शब्द 'पलिपणें' असा आहे. ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत कै. राजवाडे यांनी पाठभेद विवरतांना स्वच्छ असें लिहून ठेवलें आहे कीं - "ऌचा ळ हा उच्चार ज्ञानेश्वरोत्तर-कालीन आहे. मुकुंदराजाच्या सबंध पोथींत ळ हा उच्चार बिलकूल नाहीं." (पृ. ८९)

(२) दुसरा शब्द 'अंतोरिया' हा आहे, तो राजवाडे प्रतींत 'आंतौरिया' असा आहे. श्री. कानिटकरांनी 'अंतौरि' हा शब्द उल्लेखिला आहे; पण 'आंतौरिया' हें अवस्थांतर उल्लेखिलेलें नाही. अवस्थांतरांच्या क्रमाच्या दृष्टीने त्याचा निर्देश अवश्य पाहिजे.

२ शब्दांतरें:—दोन ठिकाणीं ओंव्यांत आलेले शब्द म्हणून जे व्युत्पादिले आहेत ते राजवाडे प्रतींत मुळींच नसून त्यांच्या स्थलीं त्यांच्या अर्थाचेच वाचक पण अन्य शब्द आहेत. तीं दोन ठिकाणें:—

(१) पहिला शब्द 'वोळगी' ह्याच्या ठिकाणीं त्याचा प्रतिशब्द 'सेवा' हा आहे.—
कानिटकर - 'तंव वोळगी ऐसी कीजेल।' (१३ - ४३१)
राजवाडे - 'तंव ऐसी सेवा कीजैल।' (१३ - ४२९)

(२) दहावा शब्द 'पुंसा'=पोपट ह्याच्या ठिकाणीं तदर्थवाहक 'राउवें' हा शब्द आहे.
कानिटकर - 'होंती पुंसा बोलावीत कौतुकें।' (११ - १०७)
राजवाडे - 'होंती रांउवें बोलाविती कवतिकें।' "

राजवाडे प्रतींतील 'सेवा' व 'राउवें' हे शब्द 'वोळगी' व 'पुंसा' ह्या शब्दांपेक्षा लोकांत अधिक परिचित आहेत. ज्ञानेश्वरीच्या सर्व प्रकाशित व उपलब्ध प्रतींत राजवाड्यांची मुकुंदराजी प्रत सर्वांत प्राचीन असतांना तिच्यानंतरच्या प्रतींत हे त्या मानाने अपरिचित असे शब्द पहिल्या परिचित शब्दांना हुसकून काढून कसे प्रविष्ट झाले हा चिकित्सण्यासारखा प्रश्न आहे. मुकुंदराजी प्रतींत जर ते शब्द नाहींत तर ज्ञानेश्वरींतले अवतरण घेऊन ते व्युत्पादणें शास्त्रशुद्ध नाही. ज्ञानेश्वरींत ते शब्द मागाहून जेव्हांकेव्हां प्रविष्ट झाले असतील त्या काळांतील दुसऱ्या वाङ्मयांतलें अवतरण घेऊन मग तदन्तर्गत म्हणूनच ते व्युत्पादणें ऐतिहासिक रीतींना

धरून होईल. ते शब्द प्रथमतः ज्या ग्रंथांत किंवा वाक्प्रबंधांत आढळून येतात त्या ग्रंथाच्या किंवा वाक्प्रबंधाच्या काळांत किंवा त्याच्यानंतरच ते ज्ञानेश्वरींत प्रविष्ट झाले हें सहजच सिद्ध आहे. हीच गोष्ट तद्या सर्व उदाहरणांत लागू आहे.

३ प्रक्षिप्त ओंव्याः—वरीलपैकीं तीन शब्द असे आहेत की, ते ज्ञानेश्वरींतील ज्या ओंव्यांत आलेले म्हणून व्युत्पादिले आहेत त्या ओंव्याच मुळीं राजवाडे-प्रतींत, अर्थात् मूळ ज्ञानेश्वरींत, नाहींत. ते तीन शब्द म्हणजे १ 'गुरुळा,' २ 'पडिवा' व ३ 'विटाळ' (अनुक्रमें ४ था, ७ वा व १८ वा) हे होत. यांपैकीं पहिले दोन एकाच ओवींत आलेले आहेत. हे तीन शब्द ज्यांत आहेत त्या ओंव्या —

(१) मीचि होईन सागळा। करू धुईन 'गुरुळां'।
सांडिती ती नेपाळा। 'पडिघा' मीचि ॥ १३ - ४१९

(२) साध्वी शांति नागविली। मग माया मागी श्रृंगारिली।
तिये करवीं 'विटाळविली'। साधुवृंदें ॥ २ - २५१

ह्या दिलेल्या आहेत. ह्या ओंव्या मुकुंदराजी ज्ञानेश्वरींत नाहींत. इतर प्रती पश्चात्कालीन असल्यामुळें राजवाडेप्रतींत नसलेल्या ओंव्या अर्थातच प्रक्षिप्त होत. प्रक्षिप्त ओंव्यांतील शब्द ज्ञानेश्वरींतले किंवा ज्ञानेश्वरीकालीन म्हणून व्युत्पादणें विहित नव्हे. अन्यत्र जेथे कोठे ते शब्द आढळतील तेथले म्हणूनच ते व्युत्पादिले पाहिजेत. व्युत्पत्तीच्या संबंधांतहि कालक्रमाचें महत्त्व निरपवादच आहे.

श्री. कानिटकरांनीं उदाहरणांकरितां म्हणून ज्या ओंव्या उद्धृत केल्या आहेत त्या सर्वांतच ज्ञानेश्वरीभाषेच्या दृष्टीने अशुद्ध असे प्रायः शब्दागणिक पाठ आहेत. पण शुद्ध मुकुंदराजी प्रत व इतर कोणतीहि प्रकाशित (पश्चात्कालीन) प्रत यांच्यामध्यें सर्वसाधारण-रीत्याच तितका भेद असल्यामुळे तीं अशुद्ध पाठांतरें श्री. कानिटकरांच्या अवतरणांतून वैपुल्याने आढळावीं हें स्वाभाविकच आहे. उदाहरणार्थ, पहिल्या 'उळिग' शब्दाकरितां अवतरलेल्या दोन ओंव्यांचाच प्रकार पहाः—

| कानिटकर | राजवाडे | कानिटकर | राजवाडे |
|---|---|---|---|
| हुडप | हुडपु | असेल | असैल |
| बोळगेन | वोलगैन | तंव | तवं |
| उगाळू | उगालु | बोळगी ऐसी | ऐसी सेवा |
| उळिग | उलिग | कीजेल | कीजैल |
| आंघोळीचें | आंघोलिचें | देहांतीं | देहांतिं |
| जंव | जवं | आहे | असे |
| देह हें | देह | | |

ह्या अप्रमाण अवतरणांतील पाठांतून प्रयोग, रूपें, पद्धति इत्यादि सर्व प्रकारचीं अशुद्धें साहजि-कच आढळून येतात. शास्त्रीय चिकित्सा चालू असतांना उपयोगावयाची सामग्री अशास्त्रीय असून कसें चालेल? मुकुंदराजी प्रतीनंतरहि म्हणजे स्वकालशुद्ध ज्ञानेश्वरींत मागाहूनहि जे शब्द आपलीं मूळचीं स्वरूपें पालटून राहिले किंवा जे नवीनच प्रविष्ट झाले आणि म्हणूनच आता

रूढ झाले आहेत त्यांची विद्यमान स्वरूपांत व्युत्पत्ति उपपादावयाला पाहिजे खरी, पण ती व्युत्पत्ति उपपादितांना कालाच्या क्रमाचा विचार दृष्टीपुढून ढळूं देतां कामा नये. शब्दाचें ऐतिह्य अबाधितच राखलें पाहिजे. अर्थात् कोणताहि शब्द ज्ञानेश्वरींतील म्हणून व्युत्पादावयाचा म्हणजे त्याचें ज्ञानेश्वरीकालीन प्रमाणभूत अवस्थांतरच व्युत्पादावयाला पाहिजे, आणि तें प्रमाणभूत अवस्थांतर म्हणजे कै. राजवाड्यांची मुकुंदराजी प्रत जें दाखवील तेंच मानणें सर्वथा न्याय्य होय. एरव्ही श्री. कानिटकरांचे परिश्रम विद्वत्तापूर्ण व अनेक अभ्यासकांनी अनुकरणीय असेच आहेत हें निराळें सांगावयालाच नको.

## श्री. ओगले यांची ज्ञानेश्वरींतील एक शंका.

'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'च्या गेल्या अंकांत [ आषाढ १८५२ ] श्री. के. ल. ओगले यांनी आपली 'ज्ञानेश्वरींतील एक शंका।' पुढे मांडली आहे. ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायांतील रूपकात्मक गणेशस्तवनांत ज्ञानोबारायांनी प्रथम १० व्या ओंवींत षड्दर्शनांना गणेशाचे सहा हात म्हटलें असून पुनः लगेच १६ व्या ओंवींत त्याच षड्दर्शनांपैकी दोनहि मीमांसांचा गणेशाचे कान म्हणून पृथक् उल्लेख केला आहे, ह्यांत जो विरोध दिसून येतो त्याविषयींचें योग्य स्पष्टीकरण त्यांना व्हावयाला पाहिजे आहे. ज्ञानेश्वर मानीत असलेलीं षड्दर्शनें कोणतीं असावींत हा विद्वद्वर्गापुढे एक प्रश्नच असून त्यासंबंधींची युक्तायुक्त चिकित्सा सध्या आम्ही 'श्रीज्ञानदेवी' मासिकांत करीतच आहों. तथापि श्री. ओगले यांना हवें असलेलें पूर्वोत्तर-मीमांसांच्या विरोधात्मक उल्लेखांविषयींचें स्पष्टीकरण कांहींसें निर्णायक रीतीने आम्ही त्यांची शंका प्रसिद्ध होण्याच्या पूर्वीच 'श्री ज्ञानदेवी' मासिकाच्या गेल्या चैत्राच्या पहिल्या अंकांत केलेलें असून त्याच्या योगें त्यांच्या शंकेचें बरेचसें निराकरण होईल असें वाटतें. याकरितां तें स्पष्टीकरण पुढे देत आहों:—

"ज्ञानेश्वर मानीत असलेलीं षड्दर्शनें हल्लीं मानण्यांत येतात तीं नसावींत असेंच आम्हांस वाटतें. पण आमचा त्यासंबंधींचा आधार आयुधांच्या वर्णनापेक्षाहि आणखी दुसराच आहे. आमच्या मतें ज्ञानेश्वर मानीत असलेलीं षड्दर्शनें कोणतींहि असलीं तरी त्यांत 'पूर्व' व 'उत्तर' या दोनहि मीमांसा समाविष्ट नसल्या पाहिजेत. कारण ज्ञानेश्वरांनी पुढेच १६ व्या ओंवींत —

'मज अवगमलिया दोन्हीं। मीमांसा श्रवणस्थानीं।'

असा दोनहि मीमांसांचा दोन कानांच्या उपमानाने स्वतंत्र उल्लेख केलेला आहे. २ ऱ्या ओंवीपासून २० व्या ओंवीपर्यंतच्या १९ ओंव्यांतील समग्र वर्णन गणेशाचें परंपरित रूपक आहे. यास्तव ह्यांत द्विरावृत्तीच्या योगाने घडून येणारा उपमान-उपमेयांच्या विसंगतीचा गोंधळ घोंभण्यासारखा नाही. कोणत्याहि महान् संस्कारकर्त्या प्रभावी ग्रंथाच्या अगदी प्रारंभालाच अशा प्रकारचा दोष प्रायः संभवनीयच नसतो. कारण ग्रंथकाराची सावधानता व सूक्ष्म दृष्टि ग्रंथाच्या प्रारंभीं तर विशेषच तीव्र असावयाची हें स्पष्ट आहे. ज्ञानेश्वर मानीत असलेलीं षड्दर्शनें कोणतीं ह्या प्रश्नाचा उलगडा करतांना ह्या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेणें अवश्य आहे हें सांगावयाला

नकोच. " कांहीं झालें तरी 'पूर्व' व 'उत्तर' ह्या दोनहि मीमांसा ज्ञानेश्वरांच्या षड्दर्शनांत समाविष्ट नाहींत एवढें मात्र निश्चित म्हणतां येण्यासारखें आहे.

रा. म. आठवले.

## ज्ञानेश्वरींतील आणखी एक शंका.

गीताध्याय १७ श्लोक २४ ( तस्मादोमित्युदाहृत्य इ. --) यावरील टीकेंत ज्ञानेश्वर म्हणतात 'तरी या नामींचीं अक्षरें तीन्ही। कर्मा आदि मध्य अवसानीं। प्रयोजिति पैं स्थानीं। इहीं तिन्ही। यावरून कर्माच्या आरंभीं मध्यें व शेवटीं प्रणवोच्चार विहित आहे असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें दिसतें. आता कर्माच्या आरंभीं व शेवटीं प्रणवोच्चार प्रसिद्ध आहे खरा. परंतु कर्मांचे मध्यावर प्रणव म्हणण्याचा प्रघात सर्व कर्मांत आहे असें वाटत नाही. कांही कर्मांत मात्र आहे. उ. त्रिपद गायत्री मन्त्रोच्चारांत आदि - मध्य - अवसानीं प्रणवोच्चार येतो. त्याचप्रमाणें षट्प्रणवी महामृत्युंजय जप, नमोनारायणायनमः ह्या अष्टाक्षरी मंत्रजप अशासारख्या कांही विशिष्ट मन्त्रांत आदि - मध्य - अवसानीं प्रणवोच्चार करावयाचा असतो. पण सर्व कर्मांमध्यें ही रूढि नसल्यामुळें गीतेमधल्या पुढच्या श्लोकांतील " विविधाः क्रियाः " हे शब्द सार्थ होत नाहीत. तेव्हां " मध्य ' शब्दाचा निर्वाह सार्वत्रिक कसा ?

महादेव हरी मोडक.

गीतेच्या ७ व्या अध्यायांतील ४ था व पांचवा श्लोक असे आहेत :—

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च  
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥  
अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्  
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

४ थ्या श्लोकांत अष्टधा प्रकृति सांगितली असून तिलाच ५ व्या श्लोकाच्या आरंभीं 'अपरा ' म्हणूण म्हटलें आहे व हिच्याहून भिन्न अशी जीव झालेली माझी दुसरी 'परा' प्रकृति म्हणून सांगितली आहे. आता ज्ञानेश्वरांच्या ५ व्या श्लोकावरील व्याख्यानाचा आरंभ असा आहे :—

आणि एयां आठांची जे साम्यावस्था। ते माझी परम प्रकृति पार्था।  
तिये नावं व्यवस्था। जीउ ऐसी ॥  
जे जडातें जीववी। चेतनेतें चेववी।  
मना तें मानवी। शोक मोह ॥

या ओवींत अष्टधा प्रकृतीच्या साम्यावस्थेलाच 'जीव ' व परम प्रकृति म्हटलें आहे तें कसें ? प्रकृति ही केव्हाहि जड होय व जीव ( वेदान्त ), पुरुष ( सांख्य ), आत्मा ( नैय्यायिक व मीमांसक ) कोणताहि म्हटला तरी चेतन; म्हणून जड प्रकृतीविरुद्ध होय. तर या दोघांचा अभेद ज्ञानेश्वरांनी कोणत्या अभिप्रायाने सांगितला आहे? या शंकेचें उत्तर कोणीं तरी तज्ज्ञांनी द्यावें अशी त्यांस विनंती आहे.

विष्णु हरी निजसुरे

# गोमन्तक शब्दाचें निरुक्त.

( लेखकः— गोविंद पांडुरंग पावशे, सातारा. )

महाराष्ट्र--साहित्यपात्रिकेचा 'वर्षप्रतिपदा' शके १८५२ चा १ ला अंक हातीं आला व त्यांतील उपयुक्त लेख वाचला तेव्हां साश्चर्यानंद वाटला. तो अशामुळें कीं, कै. राजवाड्यांसारख्या संशोधकांनीं गोमान्तक हाच शब्द शुद्ध मानून त्याची अनर्थकारक व असंबद्ध व्युत्पत्ति दाखविली म्हणून आश्चर्य वाटलें, आणि श्री० वालावलीकर वर्दे यांनी तिचा निरास करून सयुक्तिक व्युत्पत्तीने गोमन्तक हा यथार्थ शब्द सिद्ध करून दाखविला म्हणून आनंद वाटला. पण त्यांनी गोमन्त या शब्दाला लागलेल्या 'क' प्रत्ययाच्या अर्थाविषयीं जें विवरण केलें आहे तें यथायोग्य दिसत नाही. शिवाय त्या प्रांताला गोमन्त हें नांव केवळ गाईगुरांनी समृद्ध ह्या एकाच अर्थाने प्राप्त झालें नसून इतर अनेक अर्थांवरून दिलेलें असावें असे विचार माझ्या चित्तांत घोळूं लागले. आणि पुढे थोड्याच दिवसांनी १५ व्या मराठी साहित्य-संमेलनाच्या निमित्ताने गोमन्तकांत मडगांव येथें जाण्याची संधि सुदैवाने प्राप्त झाली. त्याप्रमाणे तिकडे गेलों तेव्हा जातां येतांना आणि त्याशिवाय तिकडील प्रसिद्ध देवस्थानें वगैरे प्रेक्षणीय स्थळें पाहाण्याच्या निमित्ताने जो प्रवास करावा लागला, त्या प्रवासांत जो आल्हादकारक अनुभव आला त्यावरून पूर्वी जे विचार केवळ कल्पनासृष्टींत होते ते प्रत्यक्षतः खरे ठरले. म्हणून त्यांचें आविष्करण मी वाचकांपुढे करितों तें असें—

उपरि निर्दिष्ट 'क' हा प्रत्यय अज्ञात, कुत्सित, अनुकंपा, अल्प, ऱ्हस्व, संज्ञा, अवक्षेपण, अशा निरनिराळ्या अर्थांने निरनिराळ्या ठिकाणीं नामादि प्रातिपदिकांपुढे लागतो, पण त्यापासून एकच ठिकाणीं अनेक अर्थ प्रतीत होत नसतात. 'पुत्रक' यांतील 'क' अनुकंपार्थी आहे. त्यांत सौंदर्य व प्रीति हे अर्थ समाविष्ट नाहीत. इतकेंच नव्हे पण हे दोन्ही अर्थ ह्या 'क'चे व्याकरणांत आढळत नाहीत. शिवाय 'संज्ञायां' हें एकच सूत्र दोन ठिकाणीं (५।३।७५ आणि ५।३।८७) निरनिराळ्या अर्थांने दिलें आहे. पहिल्या ठिकाणीं कुत्सित-( तुच्छ, क्षुल्लक इ० ) हेतुक संज्ञा गम्यमान आहे ( उदा० —शूद्रक ) आणि दुसऱ्या ठिकाणीं ऱ्हस्वहेतुक संज्ञा गम्यमान आहे ( उदा० वंशक, वेणुक ). या शिवाय 'जातिनाम्नः कन्' ५।३।८१, आणि 'अवक्षेपणे कन्' ५।३।९५ ही 'क' विधायक सूत्रें पृथक्त्वाने दिलेलीं आहेत. म्हणून या सर्वांवरून पाहिलें असतां प्रस्तुत 'क' प्रत्यय जेथे ज्या लक्ष्यास जोडलेला असेल तेथे त्या लक्ष्यानुसारच त्याचा अर्थ ग्रहण केला पाहिजे, हें स्पष्ट दिसेल. असो. तात्पर्य हेंच की, विशिष्ट मर्यादा व च्छिन्न असा जो प्रस्तुत ऱ्हस्वदेश, त्यालाच 'गोमन्तक' ही संज्ञा करण्यांत आलेली आहे. अपरान्तक आणि कर्णाटक ह्याही संज्ञा अशाच अर्थाच्या आहेत असें वाटतें.

आता गोमन्त हा शब्द कसा बनला आहे आणि त्यांत अर्थांची व्यापकता किती आहे तें पाहूं.

" संस्कृत ग्रंथांतून गोमान्त असें रूप न आढळतां गोमन्त असेंच रूप सापडतें. ह्या गोमन्त शब्दाला 'क' हा तद्धित प्रत्यय लागून गोमन्तक हा शब्द बनला आहे " असें जें

वालावलीकर वर्दे यांनी लिहिलें आहे तें प्रामादिक आहे. पण तें क्षम्यच समजलें पाहिजे. कारण, ह्यांतील दोष त्यांचा नसून त्यांनी अभ्यासिलेल्या मराठी दूष्य व्याकरणांचा तो दोष आहे असें स्पष्ट म्हणावें लागत आहे; कारण - कोणताही तद्धित प्रत्यय प्रातिपदिकापुढेच लागतें आणि त्याने युक्त झालेला शब्दही प्रातिपदिकच होत असतो. उदा० – 'तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् ५।२।९४' या नियमाने 'गो' या प्रा० प० पुढे 'मत्' हा तद्धित प्रत्यय लागून 'गोमत्, (गावो अस्य अस्मिन् वा सन्ति इति) हें प्रा० प० बनतें आणि त्याचीं गोमान् - गोमन्तौ- - गोमन्तः। अशीं प्रथमेचीं अनुक्रमें एक - द्वि - बहुवचनीं रूपें होतात. यावरून गोमन्त असें प्रा० प० संस्कृतांत नाही हें स्पष्ट होत आहे. परंतु प्राकृत शब्दांतील 'क' प्रत्यय गोमन्त या शब्दापुढेच लागला आहे. तो कसा लागला ? असा प्रश्न सहज उपस्थित होतो. म्हणून त्याचें उत्तर देतों तें असें —

संस्कृत व्याकरणांत 'मतुवादि' जे अनेक प्रत्यय योजिले आहेत त्यांना आदेश होऊन - आलु, इल्ल, उल्ल, आल, वन्त, मन्त, इत्त, इर, मण हे प्रत्यय प्राकृतांत बनलेले आहेत. ('आल्विल्लोल्लालवन्त मन्तेत्तेरमणामतोः ८।२।१५९' हेमचंद्र) त्यांतील 'मन्त' हा सं० 'मत्' याला आदेश झाला आहे. उदा०— हणुमन्त, सिरिमन्त (श्रीमन्त), पुण्ण-मन्त इ०. तात्पर्य हेंच की हाच प्राकृत'मन्त' प्रत्यय गो या प्रा०प०लागून गोमन्त(प्रा०प०) + क = गोमन्तक हें प्रा० प० होऊन त्या पुढील प्र० ए० व० प्रत्ययाचा लोप होऊन गोमन्तक हेंच मराठी पद सिद्ध झालें आहे. हा 'क' प्रत्यय प्राकृतांत व मराठींतही कोठे कोठे विकल्पाने स्वार्थी होतो.

आता गोमन्तक ही संज्ञा गाईगुरांनी भरलेला देश, याशिवाय आणखी कांही अर्थांनी यथायोग्य होईल किंवा कसें तें पाहूं.

'स्वर्गेषु-पशु-वाग्वज्र-दिङ्-नेत्र-घृणि-भूजले । लक्ष्यदृष्ट्या स्त्रियां पुंसि गौः' । इत्यमरः॥ यावरून पाहता एका 'गो शब्दाचे स्वर्ग, इषु, पशु इ० दहा अर्थ अमरकोशांत दिले आहेत. त्यांतील स्वर्ग, पशु, वाग् आणि जल हे चार अर्थ तरी 'गोमन्तक' या प्रस्तुत संज्ञेशीं सहज सुसंबद्ध दिसत आहेत, ते असे—

१ जिकडे पहावें तिकडे रमणीय वृक्षलतांनी आच्छादित असा उद्यानमय प्रदेश दिसत असल्यामुळे निसर्गानें हा पृथ्वीवर स्वर्गच निर्माण केला असून त्यांतील नंदन वनांतच आपण स्थित आहों असा सतत भास होतो. म्हणून अशा देशाला स्वर्गमन्तक म्हणजेच गोमन्तक ही संज्ञा योग्यच आहे.

२ पशु म्हणजे गाई वगैरे गुरें या अर्थाने गोमन्तक ही संज्ञा यथातथ्य असल्याविषयीं विवेचन पूर्वी झालें आहेच.

३ वाग् म्हणजे वाणी – सरस्वती इ० त्या सरस्वतीचे (वाङ्मयाचे) उपासक अथवा पुरा सरस्वतीतीरनिवासी असे जे सारस्वत ब्राह्मण, त्यांनी प्रस्तुत देशांत वास्तव्य करून व राज्य स्थापन करून त्याची सर्वांगीण सुधारणा केल्यामुळे तेथे स्वाभाविकपणेंच वाणीचा(भाषेचा)ही उत्कर्ष झाला म्हणून त्या देशाला वाङ्मन्तक म्हणजे गोमन्तक ही संज्ञा प्राप्त होणें हें यथोचितच आहे.



अनुक्रमणिका

४ दूधसागर (क्षीरसागर) नामक जलाशयापासून उगम पावत असलेला, आणि उपला-स्फालनावक्षेपांनी ज्याचें उदक पथ्यकारक व शुभ्र बनत आहे असा, आणि सह्याद्रीच्या उंच, सखल व कराल उतरणींवरून अनेकधा विभक्त झालेल्या ज्याच्या शुद्ध रजतप्राय नयनमनोहर धारा अधोभागीं एकत्र झाल्या आहेत, असा जलनिपात ज्या देशांतून वाहात आहे, व अनेक नद्यांनी आणि त्यांच्या खाड्यांनी जो देश इतस्ततः जलपूरित झाला आहे, आणि समुद्राच्या सानिध्याने ज्यांतील वातावरण आरोग्यदायक होत आहे अशा 'अनूप' देशाला गो म्हणजे जल या अर्थाने 'गोमन्तक' ही संज्ञा प्राप्त होणें हें अस्वाभाविक आहे असें कोण म्हणेल ?

येणेंप्रमाणे केलेल्या निर्वचनाचें तात्पर्य हेंच की अर्वाचीन कालीं कोणत्याही कारणांनी गोमन्तक प्रांतांत गाईगुरांचा तुटवडा पडला असला तरी त्याची उपर्युक्त लक्षणचतुष्टयांतील प्रथम आणि तुरीय हीं लक्षणें नैसर्गिक असल्यामुळें त्याची 'गोमन्तक' ही पुरातन संज्ञा निरंतर आयतन अर्थात् शाश्वतिक अशीच आहे.

तथापि मध्यंतरीं तो शब्द 'गोमान्तक' असा विकृत झाला होता, तो कसा व कधी झाला असेल तो असो. पण, अलीकडे ज्या गोमन्तकीय संशोधकांनी त्याचें 'गोमन्तक' हें वास्तविक रूप शोधून काढून तें लेखांत व मुखांतही प्रचलित करण्याचा उपक्रम केला, त्यांची उचितज्ञता प्रशंसनीय आहेच, पण इतिहास, परंपरा व रूढी यांच्या बळाने उक्त सुधारणेला विरोध करणारा एकही 'गोमान्तकीय' अद्यापि पुढे सरसावला नाही, हें त्या गोमन्तकीयांचें व गोमन्तक या सुधारित शब्दाचें भाग्यच समजलें पाहिजे.

## पोच.

**काशी नागरीप्रचारिणी सभा का सैंतीसवाँ (वार्षिक विवरण) :- संवत् १९८६ )** या वृत्तांतावरून नागरी प्रचारिणी सभेकडून किती महत्त्वाचीं कामें सुव्यवस्थित रीतीने पार पडताहेत हें दिसून येतें. या सभेचे सभासद ५७४ आहेत. वार्षिक वर्गणी ३ रु. आहे. सभासदास सभेचें त्रैमासिक "नागरी प्रचारिणी पत्रिका" फुकट देण्यांत येतें. सभेचीं नुसती हिंदी पुस्तकेंच १०९३८ आहेत. शिवाय इंग्रजी पुस्तकें १६४१ असून हस्तलिखित पोथ्या २७४ आहेत. सभेची स्वतःची ग्रंथमाला असून तिने अनेक ग्रंथ आजपर्यंत छापले आहेत. निरनिराळ्या विषयांकरतां धनिकांनी देणग्या दिल्या असून त्याजांतून ग्रंथकारांस उत्तेजन दिलें जातें. जवळ जवळ अर्धा लाख रुपये या सभेच्या हातांत खेळत असतात. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेला ही स्थिति कधी काळीं येईल काय ?

## चुकांची दुरुस्ती

वर्ष ३ रें अंक १ ला यांतील 'मराठी शुद्धिभ्रमचर्चा' या लेखांत १३० पानांतील २ ऱ्या परिच्छेदांत धात्वर्थासंबंधाने 'फलव्यापारयोः कर्ता' असें चुकीने लिहिलें गेलें आहे त्या ठिकाणीं फलव्यापारयोः धातुः असें पाहिजे.

या अंकांत पृ. २३५ वर भर्तृहरीचा काल तेरावें शतक मानण्यांत येतो असें पडलें आहे तेथें पांचवें अगर सहावें शतक मानण्यांत येतो असें वाचावें.

# परिषद्वार्ता.

ग्वालेर संस्थानांतील शिक्षणखात्याने महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका ही कॉलेजें, हाय-स्कुलें व सेंट्रल लायब्ररी यांकरतां मंजूर केली आहे. त्याचप्रमाणें मुंबईइलाख्यांतील शाळांच्या वाचनालयांच्या उपयोगाकरतां डायरेक्टर आफ पब्लिक इन्स्ट्रक्शनकडून म. सा. पत्रिका मंजूर करण्यांत आली आहे.

+ + + + + +

## कार्यकारी मं. सभा

२७-७-३०

उपस्थित सभासद

१ ना. गो. चापेकर. २ माधव दामोदर अळतेकर

३ सु. भा वैद्य. ४ वामन म. जोशी

५ के. ल. ओगले

**ठराव १ ला:**—रा व. दा. ग. पाध्ये यांच्याकडे ट्रस्टच्या रकमेवरील व्याजाची मागणी करावी.

(१ ता. २३-५-३० रोजीं कार्यकारी मंडळाची सभा बोलावली होती. पण कोरम न झाल्याकारणानें कांहीं काम झालें नाहीं.)

१४-९-३०

उपस्थित सभासद

१ रा. ना. गो. चापेकर. २ रा. ज. र. घारपुरे.

३ रा. सुंदरराव वैद्य. ४ रा. मा. दा. अळतेकर.

५ पां. वा. काणे.

निरुक्ताच्या ५०० प्रती ज्या इचलकरंजी ग्रंथमालेस द्यावयाच्या त्याबद्दल रा. घारपुरे यांजकडे जे छापखान्याचे दर आले असतील ते पाहून ५०० प्रतींबद्दल किती पैसे घ्यावयाचे ते रा. चापेकर कार्याध्यक्ष व रा. सुंदरराव वैद्य यांनी ठरवावें.

कै. बाळकृष्ण अनंत भिडे यांच्या पुस्तकाची हस्तलिखित प्रत रा. चापेकर, कार्याध्यक्ष यांजकडे रा. जांभेकर यांजकडून परत आली आहे. जांभेकर पुस्तक छापीत नाहीत असें त्यांनी कळविलें आहे.

## साधारण सभा ता. २७-८-३०

परिषदेची साधारण सभा २९ जून १९३० रोजीं कोरम नसल्यामुळे तहकूब राहिली होती. ती वरील तारखेस संध्याकाळीं ४ वाजतां भरली.

१ ना. गो. चापेकर, २ वा. म. जोशी, ३ मा. दा. अळतेकर, ४ सुंदरराव भा. वैद्य, ५ श्री. के. नाईक, ६ रा. रा. खांदेवाले, ७ बाळकृष्ण गणेश मुर्डेश्वरकर,

८ गणपतराव विश्वनाथ लाड, ९ के. ल. ओगले, १० न. र. फाटक, ११ दि. वि. आमोणकर.

१ ला ठराव—प्रो. वा. म. जोशी यांनी अध्यक्ष व्हावें

सूचक—मा. दा. अळतेकर.

अनुमोदक—गणपतराव लाड

सर्वानुमतें पास.

१ महाराष्ट्र साहित्य परिषदेची कचेरी मुंबईहून पुण्यास न्यावी अशी सुंदरराव वैद्य यांनी सूचना केली व ओगले यांनी तिला अनुमोदन दिलें.

रा. अळतेकर यांनी या सूचनेस विरोध केला व या सूचनेला कारणें काय असावीं असें विचारलें. रा. वैद्य यांनी मनुष्याची व जागेची अडचण हीं कारणें सांगितलीं व कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष यांनीहि तसेंच सांगितलें. रा. लाड यांनी सूचनेस विरोध करतांना आपण २।३ माणसें कामासाठीं पुरवूं असें सांगितलें. अशा रीतीचा वादविवाद झाल्यावर रा. वैद्य यांनी आपली सूचना मागें घेतली.

२ नंतर पुढील ठराव रा. फाटक यांनीं मांडिला :—

१९२७, १९२८ व १९२९ या तीन वर्षांचे परिषदेचे हिशोब तयार करण्यासाठीं रा. अळतेकर, रा. खांदेवाले, रा. सुंदरराव वैद्य आणि गणपतराव लाड यांची कमिटी नेमावी व कमिटीने १ सप्टेंबर १९३० पर्यंत काम करून अध्यक्षांकडे रिपोर्ट करावा. रा. मुर्डेश्वरकर यांनी अनुमोदन दिलें. ठराव सर्वानुमतें पास झाला.

३ परिषदेची वार्षिक साधारण सभा, हिशेब, अहवाल वाचन आणि पुढील वर्षासाठी अधिकाऱ्यांच्या निवडणुकी करण्यासाठीं २३ नवंबर १९३० रोजीं बोलवावी.

सूचक—श्री. के. नाईक

अनुमोदक—के. ल. ओगले

सर्वानुमतें पास झाला.

\+ \+ \+ \+ \+ \+

## भोजराज प्राइझ

स. १९२९ सालीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत प्रो. वामन गोविंद काळे यांचें भारतीय अर्थशास्त्र हें सर्वोत्कृष्ट पुस्तक ठरून त्यांस श्रीमंत तुकोजीराव महाराज पवार—देवास संस्थानाधिपति—यांनी ठेवलेलें दोनशें रुपयांचें बक्षीस मिळालें. हा निर्णय एकंदरींत बराच समाधानकारक म्हटला पाहिजे. परंतु परीक्षकांच्या अभिप्रायांचें निरीक्षण केलें तर आमच्यापैकी पुष्कळ परीक्षकांना आपली जबाबदारी ओळखून काम करतां येत नाही असें म्हणणें भाग पडतें. "तिघांनी स्वतःच्याच ग्रंथास पहिला नंबर दिला आहे" हें वाचून कोणालाहि वाईट वाटेल. तसेंच षट्पाद, मुरारबाजीदेशपांडे-चरित्र, कऱ्हाड, लोककथा, अल्बेरुणीची गीता, कादंबरीची कथा यांसारख्या पुस्तकांसहि सर्वोत्तम ठरविणारे सुशिक्षित परीक्षक आमच्यामध्ये आहेत!

महाराष्ट्र-कोश-मंडळ

# महाराष्ट्र-शब्दकोश

## धंद्यांतील शब्द जमविण्यासंबंधीं विनंति आणि सूचना.

इतर विद्यमान कोशांपेक्षां पुण्यांत होऊं घातलेल्या महाराष्ट्र-शब्दकोशांत जो विशेष आहे तो असा की, ग्रंथांतून न आढळणारे पण बोलींत हरघडी येणारे जे असंख्य शब्द शेतकरी, कोळी, माळी, साळी, कुंभार, सोनार, कासार इत्यादि कारागीर व धंदेवाईक लोक आपल्या धंद्यामध्ये वापरतात ते जमवून त्यांच्या यथार्थ उपयोगासह ते देण्यांत यावयाचे आहेत. देशहितेच्छूंनी खरें देशकार्य करावयाचें असल्यास असंख्य धंदेवाईक लोकांशीं त्यांच्याच भाषेंत बोललें पाहिजे; व असें बोलतां येण्यास सर्व धंद्यांच्या बोली, परिभाषा त्यांस अवगत पाहिजेत, तेव्हां ज्यांत सर्व जुन्या-नव्या धंद्यांतील शब्द सांपडतील असा कोश उपलब्ध झाल्यास देशसेवा सुलभ होईल. तसेंच सुशिक्षित नागरिक आणि खेडवळ कारागीर यांच्यांत सहकार्य होऊन गांवगाडा सुरळीत चालेल; व खेडवळ कारागिरांस समजेल अशा भाषेंत त्यांच्या निरनिराळ्या धंद्यांसंबंधीं ग्रंथ किंवा लेख लिहावयास सोपें जाईल व त्यांना सध्यांपेक्षां अधिक कार्यक्षम आणि कर्तबगार करतां येईल. तेव्हां खेड्यांतील अठरा कारखाने, कसब, उदीम व इतर धंदे यांतील शब्दांची पूर्ण जमवाजमव होण्याकरितां सर्व धंद्यांतील जाणत्या लोकांनी पण विशेषेंकरून खेड्यांशीं आणि विविध धंद्यांशीं परिचित असणाऱ्या सद्गृहस्थांनी असे शब्द गोळा करून महाराष्ट्र-कोश-मंडळाकडे पाठवावेत. असे शब्द गोळा करण्याचें काम मुख्यतः खेड्यांच्या शाळांतील प्राथमिक शिक्षकांस, ते स्वतः सुशिक्षित असून खेड्यांतील राहणीशीं विशेष परिचित असल्यामुळें, अनायासें करतां येईल म्हणून त्यांच्यावर आमची मोठी भिस्त आहे. तरी त्यांनी हें स्वभाषेचें आणि स्वदेशाचें कार्य अवश्य अंगावर घ्यावें अशी आग्रहाची विनंती आहे.

असे शब्द गोळा करतांना जी दृष्टि वापरावयाची तीहि प्रत्येक धंद्यांत (१) साधनें (कच्चे पदार्थ, द्रव्यें व धंद्याचीं हत्यारें आणि उपकरणें); (२) क्रिया (वरील साधनांनी जिनसा तयार करण्यासाठीं ज्या कृति किंवा प्रयोग करतात ते); व (३) सिद्धि (साधनें आणि कृति यांयोगे ज्या वस्तु तयार करतात त्या) या तीन भागांकडे लक्ष ठेवून त्यांतील विशिष्ट पारिभाषिक शब्द गोळा केले पाहिजेत. उदाहरणार्थ, हातवडे, ठसे, मुशी वगैरे सोनाराचीं साधनें; झाळणें, ओतणें, जडविणें वगैरे त्या धंद्यांतील क्रिया; आणि मोहनमाळ, तोडे बांगड्या वगैरे तयार केलेले दागिने यां सर्वांचीं नांवें या सोनारधंद्याच्या यादींत समाविष्ट केलीं पाहिजेत. ही यादी पूर्ण आणि पक्की होण्याकरितां तींतील शब्द पडताळून पहावे लागतील. त्यासाठीं एकाच धंद्यांतील चार पांच व्यक्तींकडून तरी या धंद्यांच्या परिभाषेसंबंधी माहिती मिळवावी लागेल.

शेवटीं या शब्दसंग्रहाच्या कामाला चालना मिळावी आणि संग्राहकांनाहि कांहीं उत्तेजन मिळावें म्हणून मोबदल्याची एक योजना केली आहे. कोणत्याहि धंद्यांतील किंवा तदनुषंगिक शब्द पंचवीस पासून शंभर दीडशें पर्यंत भरतील, तर त्या मानाने कोश-मंडळ एक कमिटी धंद्यांच्या शब्द-परीक्षणार्थ नेमील व त्या कमिटीने सुचविलेला मेहन-ताना संग्राहकाला देण्यांत येईल. या शब्द जमा करण्याच्या कामाकरितां घ्याव्या लागणाऱ्या श्रमांच्या मानाने मंडळ देऊं करणारा मोबदला त्या श्रमांचें योग्य मूल्य असें केव्हाहि म्हणतां यावयाचें नाहीं तरी तें केवळ अल्प पारितोषिक म्हणून घेण्यांत गौरवच आहे.

मंडळाने अंगावर घेतलेल्या प्रचंड कार्यास द्रव्यनिधि बराच मोठा लागणार त्या बाबतींतहि सर्वांनी मंडळास साहाय्य केलें पाहिजेच. परंतु ज्यांस द्रव्यद्वारा मदत करतां येत नसेल त्यांनी अशाप्रकारें निदान शब्दसंग्रहास तरी मदत करून या राष्ट्र-कार्यांत सहभागी व्हावें अशी अखेरची नम्र विनंती आहे.

महाराष्ट्र-कोश-मंडळ, } यशवंत रामकृष्ण दाते,
८४१ सदाशिव पेठ, पुणें. } मुख्य संपादक.

महाराष्ट्रकोशमंडळाच्या वरील विनंतीकडे सर्वांचें लक्ष वेधेल अशी आम्हांस आशा आहे. मंडळाचें काम अत्यंत पद्धतशीर रीतीने चाललें असून मंडळाकडून तयार होणारा शब्दकोश महाराष्ट्राचा लौकिक वाढेल असाच होईल अशी आमची खात्री आहे. मेहनताना देण्याची योजना स्तुत्य आहे. खेडेगांवांतील शिक्षितांना, अर्धशिक्षितांना शब्दसंग्रह करणें कठीण पडणार नाहीं. शिक्षकांनी तर इकडे विशेष लक्ष द्यावें आणि मंडळाचा हेतु सफल करून एका राष्ट्र-कार्यास हातभार लावावा अशी आमची विनंती आहे.

\+ \+ \+ \+

## परिषदेची हानि.

श्री. बाजीराव रामराव गुत्तीकर हे औंध येथें एकाएकीं फिरण्यास गेले असतां कालवश झालें हें लिहिण्यास आम्हांस दुःख होत आहे. हे निकोप प्रकृतीचे, विनोदी, निर्व्यसनी व बहुश्रुत होते. त्यांनी नुकतेंच पेनशन घेतलें होतें. ते अकालीं मृत्युमुखीं पडले नसते तर पत्रिकेच्या वाचकांस प्राचीन कालच्या परस्थ इतिहासकारांनी हिंदु-स्थानाविषयीं जें कांहीं लिहून ठेवलें आहे तें वाचावयास मिळालें असतें.

\+ \+ \+ \+

## सूचना

गेल्या वर्षाची सूची या अंका सोबत रवाना होत आहे. ही सूची श्री. वि. म. कोल्हटकर यांनी तयार केली त्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

# शब्दाची योग्यता व पांचभौतिकत्व

( ले. म. द्द. मोडक )

आपल्या प्रतीच्य दृष्टीने निखिल ब्रह्मांडाचें निरीक्षण करून पिंडब्रह्मांडाचें ऐक्य सिद्ध करणाऱ्या आमच्या ब्रह्मज्ञ ऋषिमुनींनी व तदनुसारी शास्त्रकारांनी 'शब्दा' ची योग्यता जशी वर्णिली आहे, तशी ती अन्यदेशांतील व भाषांतील पण्डितांनी वर्णिलेली आमच्या तरी ऐकिवांत नाही. याचें कारण उघडच आहे. पाश्चात्यांनी बहिःसृष्टीचें निरीक्षण अत्यंत काळजीनें केलें. पण अंतःसृष्टीचें तसें न करितां आल्याने त्यांचें व्याकरण व एकूण शब्दविषयकज्ञान कमी पायरीचेंच आहे. उदाहरणार्थः—आमच्यांत 'शब्द' म्हटला तरी त्याची उत्पत्ति थेट सृष्टीचें आदिकारण जें ब्रह्म त्यापर्यंत पोंचविली असून परा, पश्यंती, मध्यमा, व वैखरी—अशीं चार स्थानें मार्गीत असलेलीं व्यक्तपणें सांगितलीं आहेत. मात्र पहिलीं तीन स्थानें जे [१] मनीषी असतील त्यांनाच कळतात; प्राकृत जीवांना फक्त तुरीय म्हणजे वैखरीच माहित पडते असें स्पष्टच म्हटलें आहे. आणि तेंच खरें. वर्णमालेंतील वर्णासंबंधेंहि तोच प्रकार. वर्णांचें सूक्ष्म वर्गीकरण व त्यांचे उच्चारणासंबंधें १ वर्ण, २ स्वर ( उदात्तादि ), ३ मात्रा (ऱ्हस्वादि), ४ बल ( बाह्याभ्यंतर प्रयत्न ), ५ साम (उच्चाराची समता), ६ संतान [२] (वर्णांची संहिता-मिलाफ )— इतक्या प्रकारची बारकाई अन्यत्र क्वचितच दिसेल.

शब्दाची योग्यता तर असामान्य शब्दांनीच वर्णिली आहे आणि ती खरीहि आहे. अर्थवादात्मक नाही.

भर्तृहरि ( कारिका )— त्याला —

तद्द्वारमपवर्गस्य वाङ्मलानां चिकित्सितम् ।
पवित्रं सर्व विद्यानां । असें वाखाणितात.

वैयाकरण—एकः शब्दः सम्यक् ज्ञातः सम्यक् प्रयुक्तश्च स्वर्गे लोके कामधुग् भवति । असें म्हणतात.

दण्डी ( काव्यादर्श ) । इदमंधं तमः कृत्स्नं जायेत भुवनत्रयम् ।
यदि शब्दाह्वयं ज्योतिरासंसारान्न दीप्यते ॥

वेदांत तर चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य । त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यां आविवेश (नाम, आख्यात, उपसर्ग, निपात या चार शब्दजाति हीं चार शृंगें १० पातञ्जल महाभाष्य पहा ) —

---

१ चत्वारि वाक्परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।
गुहा त्रीणि निहिता नेङ्गयंति तुरीयं वाचो मनुष्या वदंति ॥ तैत्तिरीयब्राह्मण

२ वर्णः स्वरः । मात्रा बलम् । साम संतानः । इत्युक्तः शीक्षाध्यायः ।
तैत्तिरीयोपनिषद्

नारदस्मृति— नाकरिष्यद्यदि ब्रह्मा लिखितं चक्षुरुत्तमम् ।
तत्रेयमस्य लोकस्य नाभविष्यच्छुभा गतिः ॥

ज्ञानेश्वर बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरणदानी प्रसिद्धु ।
अमूर्ताचा विशदु । आरिसा नोहे ? ।
आपण तंव खपुष्प । परिफळदे जगद्रूप ।
शब्द मविर्ते उमप । कोण आहे ? ।
सहाय आत्मविद्येचें । करावया आपण वेंचे
गोमटें काय शब्दाचें । एकेक वानू. ( अमृतानुभव )

गीतेंत ज्या एकाक्षराला ( शब्दाला ) भगवंतांनी आपली विभूति म्हटलें आहे त्यापासून तर सर्व सृष्टीच झाली आहे. भर्तृहरीने आपल्या कारिकांत ' अनादिनिधनं ब्रह्म शब्दतत्त्वं यदक्षरम् । विवर्ततेऽर्थभावेन प्रक्रिया जगतो यतः ॥ असें शब्दतत्त्वाचें माहात्म्य वर्णिलें आहे. आणि गार्ग्यायणमहर्षींनी तर ॐकारापासून चराचर विश्व व तदंतर्गत यावत् वस्तुजात, शास्त्रजात, कलाकलाप, निपजलें असें सिद्ध करणारा अपूर्वग्रंथ ' प्रणववाद ' नामक लिहिला आहे.

याप्रकारें शब्दाची योग्यता अन्य कोणीं जाणिली असेलसें वाटत नाही.

याप्रकारें शब्दाचें महत्त्व वर्णून पिंडब्रह्मांडाचें ऐक्य सिद्ध करणाऱ्या मुनींनी बाह्यसृष्टींतील यावत्पदार्थांप्रमाणेंच शब्दहि पंचमहाभूतोत्पन्नच आहे असेंच दाखविलें आहेः— **शब्दार्थरत्नांत** (तारानाथ तर्कवाचस्पति ) शब्दाची व्याख्या करितात : शब्दो हि नाम पृथिव्यादिभूतचतुष्टयक्रियाजन्योऽवकाशदेशोत्पन्नो द्रव्याश्रितो गुणविशेषः । तस्य च भूतचतुष्टयप्रयोज्यत्वेनाकाशस्थत्वेन च अन्वयव्यतिरेकाभ्यां पञ्चभूतगुणता । शब्द हा पृथिवी, आप, तेज, वायु या चारहि भूतांचे व्यापारापासून निर्माण होणारा असून आकाशाश्रयी ( शब्दगुणः आकाशः ) असल्याने अर्थात् पंचभूतात्मक आहे.

श्रीयुत रामप्रसाद ( एम्. ए. ) यांनी आपले ( Studies in Patanjali ) किंवा ' Self-Culture ' नामक ग्रंथांत म्हटलें आहे.—' A word has a force ' (पृथ्वीगुण);[१] २ a flow (आपगुण) ३ a temperature (तेजोगुण) ४ a motion (वायुगुण) and ५ a note (आकाशगुण).

या दृष्टीनेहि शब्दाचा विचार अन्य कोणीं केला असेलसें वाटत नाही. पुढील वेळीं सत्व-रजस्-तमस् या गुणत्रयीने शब्दहि इतर सर्व सृष्टपदार्थांप्रमाणेंच अनुविद्ध आहे असें दाखविण्याचा हेतु आहे.

---

१ शब्दाला आकार ( पृथ्वीतत्त्वावाचून आकार नाही ) नसता तर फोनोग्रॅफांत गाईलेले गाणें अर्थात् जडपदार्थांत स्थैर्य पावलेले शब्द पुनः त्याच रूपाने परत उठतेना. टेलिफोन ( दूरध्वनिवाहक ) व रेडिओ ( ध्वनिप्रापक किंवा प्रकाशक) हे ध्वनिलेखकापेक्षाहि शब्दाच्या साकारत्वाचे अधिक बळकट पुरावे आहेत.

# बोंधले घराण्याची बखर.

[ पंढरपूरनजीक भटुंबरें नांवाचें एक खेडेगांव नवीन झालेल्या रेल्वे पुलानजीक आहे. या गांवचें पाटीलघराणें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून त्याचें उपनांव बोंधले असें आहे. या घराण्याचे विद्यमान वंशज स्वतःस "धुंदेले" म्हणवितात. या घराण्याच्या जुन्या कागदपत्रांचें संशोधन शके १८३६ सालांत करण्यांत आलें. उपलब्ध झालेले कागदपत्र महत्त्वाचें असून मराठ्यांच्या इतिहासांत त्यांमुळे चांगलीच भर पडली आहे. एकंदर कागदपत्र ६५ मिळाले. त्यांपैकीं ६२ कागदपत्र, याद्या, पत्रें वगैरे स्वरूपाचें असून एक महत्त्वाचा कागद त्या घराण्याची वंशावळ अथवा बखर हा आहे. याखेरीज एक महजर व एक वृत्तिपत्र असे दुसरे दोन महत्त्वाचे कागद आहेत. या घराण्याच्या बखरींत नमूद केलेल्या हकिकतीस सुरवात औरंगजेब बादशहाचा तळ पंढपूरनजीक बेंगपूर येथे होता तेव्हांपासून झाली असून शेवट थोरले माधवराव पेशवे यांच्या मृत्युच्या सालाचे सुमारास झाला आहे. शके १८३७ सालीं पुण्याच्या भा. इ. सं. मंडळापुढे "राघोबादादांचे हस्तक नरसिंगराव गोविंद बोंधले," हा लेख या कागदपत्राचे आधारें मी प्रथम वाचला. ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची बखरींतील माहिती त्रोटक रितीने त्या लेखांत नमूद करण्यांत आली आहे. वरील ६५ कागदांपैकीं बोंधले घराण्याची बखर, महजर व वृत्तिपत्र या तीन कागदांखेरीज बाकींचे सर्व कागदपत्र त्या सालच्या मंडळाच्या वार्षिक संमेलनवृत्तांत मंडळापुढे मीं वाचलेल्या लेखाचें परिशिष्ट म्हणून छापण्यांत आले आहेत. बोंधले घराण्याची बखर व महजर हे कागद महत्त्वाचे असूनहि ते वेळीं छापले गेले नाहींत. या कागदांपैकी या घराण्याची बखर ही बरीच विस्तृत असून ऐतिहासिक व सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे. सामान्य वाचकांचेंही बखरीचे वाचनापासून मनोरंजन होण्यासारखें आहे. त्या काळच्या ब्राह्मण कुटुंबाचें सामाजिक चित्र या बखरींत उत्तम प्रकारें रेखाटलें गेलें आहे. सामान्य प्रकारच्या ब्राह्मण घराण्याचीं आर्थिक स्थित्यंतरें कोणत्या कारणांमुळे व कशा प्रकारें घडून येत याची हुबेहूब कल्पना या बखरींत पाहावयास मिळते. याशिवाय हिंदु एकत्र कुटुंबाच्या राहणींचे दोष या बखरीवरून समजून येतात. प्रस्तुत काळच्या हिंदु एकत्र कुटुंबाच्या स्थितीची तुलना त्या कालच्या एकत्र हिंदु कुटुंबाच्या स्थितीशीं या बखरीच्या साहाय्यानें करतां येते. या घराण्याच्या बखरींत वर्णिलेल्या पुरुषांच्या चरित्रावरून व त्यांनी केलेल्या पराक्रमावरून त्या कालीं कर्तृत्ववान माणसास कर्तबगारी करून नांवारूपास चढण्यास पुष्कळच अवसर मिळत असे ही गोष्ट या बखरीवरून सिद्ध होते. बखरीशिवाय महजर व वृत्तिपत्र हेही कागद महत्त्वाचे आहेत. औरंगजेबाच्या स्वारीनें दक्षिणेंतील प्रजेची कशा प्रकारची दैना झाली हे या कागदपत्रावरून दिसून येते. बखरीची पहिली पानें गहाळ झाली आहेत सबब छापलीं नाहींत.

भास्कर वामन भट, धुळें.]

निघाल. इतक्यांत औरंगजेब बादशहाचें लष्कर हिंदुस्थानांतून दक्षिणेस आलें ही आवई आयकोन मौजे बेंगपूर नजीक पंढरपूर येथें मा। नुले पाछा याचे लष्करांत मिळाले कांहीं दिवस बेरोजगारी होते उपरांतिक खटपट करून चैवधाची भेट घेऊन पाछाव याची भेट घेतली आपली हकीकत सर्व जाहीर करून बादशहा याजवळ चाकरीस राहिले चार कामकाजें सरकारांत करून दाखविलीं उपरांतिक पाछाव यांनीं मेहेरबानी करून सहा प हाजारी मनसब साहेब नौबत माहमरातबसुद्धां दिले जागिरी दिल्ही त्यांत झुटीसान करकंब दिली वरकड जागिरी भोसें व मंगळवेढें सांगोले काठी मारडी येसी जागिरी पांत जागिरीशुद्धा

दिली हें वर्तमान येकोन चैवथे भाऊही येक येक येवोन भेटले तेव्हां दवलती आंती चैवघे जसे पदरीं होते तसे यांसही येक येक काम सांगून पदरीं ठेवून घेतले त्या चैवघांस कामें काय सांगितलीं याबराव होते त्यांचीं मुल माणसें होतीं त्यांची घर वेगमी करून नेमणूक करून देऊन त्याचा काल चालवीत होते त्यांनीं जेऊन आपलीं मुलमाणसें संवरक्षण करून होते दुसरे येकोजी जनार्दन होते त्याचे स्वाधीन झा × × मामलतीचा कारमार व घर × × × चे स्वाधीन केला त्याचीं हल्लीं घरची खर्चाबद्दलची नेमणूक करून दिली त्यांनीं हा कारभार करून होते. तिसरे रायाजी जनार्दन होता सर्व धनीच त्याची देवलत न्यास जशी आज्ञा करतील ते सवता. चैवथे कोनेरराव याला आरवी दोन घोडे बसावयास तेलपाणी झग यांनी राग रंग करून बरा असावें वरकड कामकाज कांही नाही त्याची घरेंदार मी चौघांप्रमाणें करून देऊन त्याचा कालक्षेप या × × तिचा चालविला.

पांचवे सिवराव यास लेंकाप्रमाणें बालगलें झाडून फौजेचा वगैरे सिबंदी × सरकारांत पाछाव याजपाशीं आणें काम कारवार बोलणें जो जावसाल पडेल तो करावा देवलत चालवावी सर्व येकत्यार यणेप्रमाणे स्वाधीन यांनीं हे वहिवाट करून होते. येणेंप्रमाणें दौलतीचा बंदोबस्त करून कारभार चालत होता. त्यांस रायाजी जनार्दनचे पोटीं संतती नाही म्हणून दुसरें लग्न करावें असा निश्चय ठरला. तेव्हां नवरी पाद्यासको मट उपाधे पाठविले. नवरी मौजे पाटकल परगणे मंगळवेढें येथें होती. तिज नाव हावकाइतक ताई असें म्हणत होते. त्या गांवचा पाटलाची लेंक तिला पाद्यास उपाधे गेले. तेव्हां ते म्हणाले कीं, आमचे घरीं नवरी आहे परंतु आम्ही खुंटावरील कावळ्यास कशी देऊं यास वतन नाही, आम्ही आपली मूल ह्यास देत नाही दौलत दो दिवसाची आम्ही वतनदार असतील त्यास देऊं तेव्हां हें वर्तमान घेऊन उपाधे माघारे आले तेव्हां हें वर्तमान कचेरींत उघड सांगितलें तेव्हां मंगलवेढेचे देशमूख देशपांडे सर्व कचेरींत होते त्या देखत उपाधे यांनीं येऊन बोलले तें सर्वांनीं येकिलें तेव्हां तेथील देशमूख देशपांडे इतरही आधिकारी होते त्यांनीं रायाजी जनार्दन यासी उत्तर केलें कीं आपण चिंता न करावी आम्ही वतन तुम्हांस देवितों तेव्हां तेच बैठकीस मौजे कुपसंगी परगणे मंगलवेढें येथील पाटिलकी नूरखान म्हणून मुसलमान होता त्याचे पोटीं संतत नाहीं तेव्हां देशमुख देशपांडे व काजी यांनीं त्याला बोलाऊं पाठवून त्याजला कासेगांव येथें आणिलें आणि त्यासी बोलले कीं आम्ही तुम्हांस वतनभाऊ करून देतों त्यास तुम्ही रजावंदी आहां कीं नाहीं त्यांनीं उत्तर जमिनदारासी केलें कीं वतणाचे धणी तुम्ही तुम्ही जें सांगाल त्यास मी मान्य आहे मग उभयतां रजावंद होऊन मौजे कुपसंगी परगणे मंगलवेढें येथील पाटिलकी निमे रायाजी जनार्दन याचे नांवें महजर करून कुलबाव कुलकान्हो हाकदक घुगरी इनाम पटी पासोडी जे हाकदम पिराचें इनाम वगैरे कान्हो कायदे सुधां दोन जागा करून निमे रायाजी जनार्दन निमे नूरखान येयेंप्रमाणें वतन घेऊन कागदपत्र करून मागती त्या उपाध्यास त्या पाटखल परगणे मंगलवेढें कुपसंगीस आणि त्या गांवास एका कोसाचें अंतर तेथें पाठविलें हें वर्तमान त्यांनीं सांगितलें उपरांतिक त्यांनीं ही गोष्ट मान्य करून रायाजी जनार्दन ह्याचें लग्न केलें प्रथमता येणेंप्रमाणें झालें तेव्हां रायाजी जनार्दन ह्यास वीरश्री प्राप्त झाली तेव्हां वतनें आणखी राजी· रजावंदीनें मिळालीं तर घ्यावी ऐसे जालें मग पहिली खूपसंगी जाली दुसरी भिकार ओंकाल परगणे मंगळवेढें येथील पाटिलकी ही देशमूख देशपांडे व काजी यांनीं खुष राजावंदीन खरीद करून देविली. तेथील पाटिलकी निमे रायाजी जनार्दन ह्यानें घेतली. निमे धणगराची ह्याची त्याप्रमाणें ठरवून महजर रायाजी जनार्दन याचे नांवचे करून तेथील पाटिलकी घेतली.

मौजे मटउंबरे प्रा. करकंबे येथील वतन झाली. पाटिलकी व कुळकर्ण झाडून व जोतसपिण झाडून व घेटेपण झाडुन येसी वतन कुलबाब कुलकान्हू पहिली पंढरीचे शेवाधारी नववुडे ह्याची होती तेव्हां बादशहा बेदरावर राहिले तेव्हां मुलकांत धामधूम भारी आणि हिंदी ह्याचा राहादारीचा उपद्रव

भारी आणि रुपाया देणेचेही सक्ती फार मुलूक वैराण वस्ती नाही पंढरीस दहावीस घरें मात्र मिळून वस्ती राष अरण्यें तेन्हां शेवाधारीण यास उपद्रव भारी ब्राह्मणांनीं आहीं + + यांच्या बाजा सिरावर घेऊन करकंबस पोहोंचवाव्या मधें जागा गांव नाही येसे नाना प्रकारचे उपद्रव हे उपद्रव ब्राह्मणास सोसेनात तेन्हां सर्व सेवाधारी येकत्र होऊन परगणे करकंब येथें आले तेथें जागिर रायाजी जनार्दन याची तेन्हां याचे दारीं ब्राह्मण उपोशण करीत बसले कीं तूं ब्राह्मण आहेस आम्हांस हा उपद्रव आविं-धाचा सोसेना हें वतन आमचें तुम्हीं घेणें आणि आम्हांस या पिडेंतून काढणें जर तुम्ही हें वतन न घेतलें तर तुमचें दारीं ब्रह्महत्या सारे आम्ही करतों येसा तटऊसान दाहा पांचनी छत्र + + हे म्हणों लागले कीं मजला तुजचें वतन नलगे तुम्ही आणखी कोणास देणें तेन्हां ब्राह्मण येक जाले ब्राह्मण मरायास लागले मग तेथील देशमूख देशपांडे काजी व हाली मवली सर्व मिळोन रायाजी-जनार्दन याजकडे कचेरींत आले यासी विनंती कीं हे ब्राह्मण मरतात तुम्ही ब्रह्महत्या न घेणें हे वतनें देतात तुम्ही हे वतनें घेऊन ब्राह्मणास जिवदान देणें येस नानाप्रकारें यासी बोलून सर्व परगणे मजकूरचे जमिनदारांनीं व सर्व ब्राह्मणांनीं व शेवाधारी यांनीं वतन खुशरजावंदीन रायाजी जनार्दन यास दिलें तेन्हां या नांवचें महजर रायाजी जनार्दन याचे नांवचे कुलबाव कुलकान्होचें जमिनदारानीं बसून करून दिलें. आणि त्या ब्राह्मणाची मुक्तता केली. त्याला नानाप्रकारचे पेंचकुंये पडत गेले रुपाया × हा दारीमुळें फार खर्च झाला इतकेंही देऊन वतन घेतलें आणि वतन अनभित गेलें येणें प्रमाणें मौजे भटउंबरें परगणे करकंबें येथील पाटीलकीचा घेण्याचा निर्णय असा आहे. परगणे टेंभुरणी येथील देशपांडेपण खुशरजा-वदीन खरिदी करून तेथील जमिनदार यांचे विद्यमान महजर करून राजश्री रायाजी जनार्दन याचे नांवें महजर करून वतन घेतलें अनभवित गेले येणें प्रमाणें टेंभुरणीचें वतन घेतलें महजर लिहिले प्रमाणें केलें आहे.

परगणे सांगोलें येथील देशमुखी निमे खुशरजावदिन खरिदी तेथील जमिनदार व खोजे काजी यांचे विद्यमानें खरिदी करून महजर रायाजी जनार्दन यांचे नांवचे करून देशमुखी निमे घेतली मौजे कडकसें येथील पाटिलकी निमे खुशरजावंदिन खरिदी करून महजर रायाजी जनार्दन यांनीं आपलें नांवेच करून पाटिलकीचें वतन निमे घेतलें आहे जमिनदार देशमूख देशपांडे व काजी यांचे विद्यमान महजर करून घेतले येणेंप्रमाणें कडकसचा मजकूर मौजे वंडियार परगणे इंडीयेथील पाटिलकी निम खुश रवजावंदीन खरीदी करून देशमूख देशपांडे व नाडगौडा व काजी यांचे विद्यमानें खरीदी वतन घेऊन महजर रायाजी जनार्दन याचे नांवचें करून वतन पाटिलकीचें घेतलें आसे सारांश रायाजी जनार्दन यांनीं औरंगजेब बादशाहा याचे समईं दैवलत केली. जागीर व मनसब व रायाराव कितावसाहेब नौबत व फत्तेनिशान व भुटीसानक मेळविलीं व वतनें सदरहू लिहिले प्रमाणें खरीदी करून आपले नांवचे महजर करून दैवलत व वतन आन-भवित गेले कांहीं दिवस सर्व चालले उपरांतिक औरंगजेब बादशहा यांचा काल जाला तेन्हां बादशाही गर्दी जाली कोणास कोणी पुसना इतक्यांत रायाजी जनार्दन यांचा काल जाला तेन्हां पातशाही गर्दीत दाद फिर्याद लागना जागा जागा पुंड मवास जाले ते समईं सिवराव जनार्दन यांनीं खटपट फार केली कांहीं स्वल्प दिवस चालल इतक्यांत पांढरे कासीगांवकर यांनीं भारी दंगा केला आणि रायाजी जनार्दन याची जागीर त्यांनीं घेतली दाद फिर्याद लावावी म्हणून सिवराव जनार्दन यानीं खटपट फार केली औरंगा-बादेस आपले मेन्हणे आचितराव घेऊन गेले तेथें फार मेहनत केली लाखों रुपयाचें कर्ज पेचांत आले परंतु बाछागर्दी कोणास कोणी पुसेना फार खराब जाला शेवटीं खायास आन मिळेना आंगास वस्त्र मिळेना बसायास घोडा राहिला नाहीं मग मेन्हण्यांनीं पाठीवर बसून घरास आणलें दौलत सारी बुडाली कर्जाचे पेचांत आले ठिकाण राहिलें नाहीं इकडे पांढरे यानीं जोर करून सर्व ठाणी घेतलीं करकंबें देखील घेतलें मग बहुत हैराणींत आले तेन्हां सिवराव जनार्दन घरास कसबे करकंबें येथें आले येथें

सर्वांचो कुटुंबें होतीं खर्च मारी विलाज चालेना मग तशा काळांत परगणे टेंभुरणीचें देशपांडेपण च्यार रुपये घेऊन करकंबेकर देशमूख देशपांडे यांनां सिवराव जनार्दन व येको जनार्दन यांस सांगून त्याला महजर माघारें दिल्हे ते रुपये सर्वांचे कुटुंबास खायास दिले खर्च मारी पुरेना तेंव्हां फोला × × गेले यासिवाय कर्जदाराचीं धरणीपारणीं तेंव्हां बेजार जाले मुख्य रायाजी जनार्दन दौलत ही त्यांची व वतनें ही त्यांचीं तेंव्हां रायाजी जनार्दन ह्यांचा काल झाला. तेंव्हा त्याचे मागें दौलत बुडाली वतनें मात्र राहिलीं. कर्ज देणें मारी पोटास तर नाही तेंव्हां परम संकटांत रायाजी जनार्दन ह्याचे पोटीं पुत्र नाहीं वंशास्तव दुसरी बायको केली परंतु तिलाही पुत्र झाला नाहीं त्याचे वंशाची नकल झाली त्याची बायको मात्र पाटखलफरताई म्हणून राहिली पुत्र संतत नाही कोनेरराव जनार्दन होता त्याचे पोटीं पुत्र नाही तेही मृत्यु पावले अशी व्यवस्था झाली तेंव्हां तिघांचा वंश करकंबेंत होता. इतक्यांत मोंघलाच्या ह्या गडबडींत याबतराव जनार्दन ह्याचा काल झाला. त्याचे पुत्र दोघे वडील खंडेराव याबाजी त्याचें मागें बाबुराव याबाजी त्यांत खंडेराव याबाजी गेले त्याचे पोटीं पुत्र संतती नाही. त्याची नकल त्याचे दुसो भाऊ बाबुराव याबाजी त्याची मातुश्री व त्याचें कुटुंबे करकंबेंत ते वेळेस होतें येकोजी जनार्दन व त्याचे पुत्र शेषराव व त्याची कन्या एक व त्यांची स्त्री ऐसी करकंबेंत ते वेळेस होतीं. सिवराव जनार्दन करकंबेंत ते समयीं औरंगाबादेहून माघारे आले तेही आपण व त्यांची स्त्री कृष्णमा यांचे पुत्र चौघेजण वडील बंकराव सिवदेव त्याचे मागें दुसरा + + राव सिवदेव त्याचे मागें तिसरे नरसिंगराव सिवदेव त्याचे मागें चौथा गोविंदराव सिवदेव असें कुटुंबसुद्धां करकंबेंत होते तिघांचाही वंश तेथें असतां येको जनार्दन ह्याचा काल झाला तेंव्हां ते सर्व घरचा व जागीरीचा कारभार करीत होते तेंव्हां देवलतीमुळें देणें सावकाराचें होते पठाण व पुर्बे परदेशी ह्या लोकांचें देणें होते त्यांत ह्याचा काल झाला. तेंव्हां याचे प्रेतास कर्जदार अग्नि देऊं देईनात कां म्हणाल तर आमचे कर्जाचा फडशा जो करून देईल तो ह्या प्रेतास अग्नि देईल असा अडथळा घालून बसले. प्रातःकालापासून प्रहररात्र झाली तरी फडशा पडेना प्रेतास अग्निसंस्कार होईना मग करकंब येथील देशपांडे व भोसे येथील देशपांडे सोयरेधायरे हे अगदीं जमा झाले देशमूख हल्लीं मनाली पाढरे व ऐसे सर्व जमा होऊन रात्रीस आले तेंव्हां कोणाकडे यावें तेंव्हां प्रेतापाशीं त्याचे पुत्र शेषराव होते व त्याचे बंधु सिवराव होते व याबतरावाचे पुत्र बाबुराव होते. तेंव्हां या त्रिवर्गापाशीं सर्व मंडळी आली. आणि यांसी पुसलें कीं ह्यास मरून फार काल झाला प्रहर रात्र झाली पुढें या प्रेतास अग्निसंस्कार केंव्हां व्हावा असें सर्वांस पुसलें तेंव्हां त्याचे पुत्रांनीं व बाबुराव ह्यांनीं उत्तर केलें कीं वडील शिवराव काका आहेत; त्यास पुसावें मग त्यांनीं पुसलें कीं हे काय म्हणतात तेंव्हां ह्यांनीं उत्तर केलें कीं माझा उपाय काय मजपाशीं कांहीं द्रव्य राहिलें नाहीं दौलत संबंधें कर्जच आहे तत्रापि भावापेक्षां अधिक कांहीच नाही. मी व बायको व चौघे मूल इतकीं घरांतून बाहेर निघतों माझे घरांत जें असेल तें घेऊन ह्या कर्जदारास देणें आणि प्रेतास अग्नि देणें सर्व तुम्हांस ठाऊक आहे ह्या गोष्टीस मी सिद्ध आहें याप्रमाणें करावें. तेंव्हां चौघांनीं याचें उत्तर येकोन कर्जदार पठाण व जोगडे जितके बसले होते तितकीयास बोलकें कीं हे सिवदेव बोलतात त्याप्रमाणेंच घरांतील माल येत जे आसेल तें घेऊन यास मुक्त करणें प्रेतास अग्नि देऊं देणें याप्रमाणें त्यासी बोलले तेंव्हां कर्जदार या गोष्टीस रजावंदीन होईनात तेंव्हां यांनीं त्यास पुसल कीं तुम्ही काय म्हणतां तेंव्हां कर्जदाराचें म्हणणें जाल कीं आसें नाहीं आम्हांस खतें या त्रिवर्गाच्या नांवची आज नवीन लेहून देणें मागील खत फाडून टाकणें म्हणजे आम्हीं उठतों या प्रेतास अग्नि देणें येणें प्रमाणें उत्तर चैवघासी देणेंदार करूं लागले तेंव्हां पाहातांआंतीं चैवघीचे मतें ठरल कीं गोष्ट बाजवी तेंव्हां या त्रिवर्गास म्हणाले कीं गोष्ट बाजवी म्हणतात यास लेखून देणें तेंव्हां तिघाचें म्हणणें कीं आम्ही कांहीं खतें लेहून देत नाहीं तेंव्हां तट पडले मग चैवघेजण येकयेकास पुसूं लागले कीं तुम्ही

आसें कसें म्हणतां प्रथम बावुराव यावाजी यास पुसलं कीं तूं का लेखून देत नाहीं तेव्हां यांनीं उत्तर केलें कीं आम्ही कांहीं पूर्वीपासून याचे दैवलतीचा कारभार केला नाहीं चैवघावरावर आन खालें यास्तव आम्हांस देणेंचा अर्थ काय तेव्हां चैवघे म्हणाले कीं तुमचें वडील घर वतनें आहेत आणि तुम्हांजवल च्यार रुपये आहेत का कीं तुम्हांकडे खर्च नाहीं. चार रुपये तुम्हांजवळ आहेत आणि देवलतपैकीं वतनें आहेत तर तुम्हीं या वतनास अधिकारी होणें आणि कर्जास अधिकारी होणें तेव्हां त्यांनीं उत्तर केलें कीं आम्हांस दौलतही नलगे आणि वतनही नलगे आणि आम्ही × × × × × ज्यांनीं दौलत खाल्ली आणि कारभार केला त्यांनीं कर्जही द्यावें आणि वतनेंही करावीं आम्हांसी येको त्याचा संबंध नाहीं आम्ही ह्या कामांत नाहीं ह्याची क्रिया झाली म्हणजे आम्ही येथून जातो आम्ही कांहीं देणेदार यांचे आहोतें त्यास खतपत्र देत नाहीं ऐसे साफ बोलून एकोकडे आले तेव्हां चौघे म्हणाले कीं खरें आहे तेव्हां त्यास म्हणा कीं पुंर्ते पाहून बोलणें बावुराव ह्यांनीं उत्तर पूर्ववतच करून निराळें

( ७ व ८ पानें नाहींत. )

हील नाहीं दैवलतीमुळें चेवघे जमा जाले. दैवलत बुडतांच आपली आपली गाठोडीं साभाळून निघोन गेले. एक पक्ष असा खुंटला. दुसरा पक्ष रायाजी जनार्दन यांनीं मिलविलं त्याची नक्कल झाली तेव्हां ही दैवलत अगर वतन पांचा जणाची आसें म्हणतील तर हे दैवलत अथवा वतनें देवलतील रायाजी जनार्दन यांनीं मेलविली तेव्हां यांचे बरे वायेटास जो धणी त्याची वांटणी दैवलतींतही आस्ती आणि वतनांतही आस्ती तेव्हां येकोजनार्दन मेले तेव्हां देणे घेण्याचा तंटा पडला ते वेळेस दोघांची तों नकल जाली होती तिघे सावूत होते ते वेलस तिघांनीं डोई बरावर दिली आस्ती तर देवलतीस आणि वत-नास अधिकारी होते. तेव्हां रुपयावर दृष्टी देऊन सिवराव जनार्दनास देणेचे भरीस घालून आपला ऐवज वांचऊन वतन सिवराव याचे स्वाधीन करून आपण अलग निघून यैवज घेऊन निघोन गेले तेव्हां येथें लाची केली याजमुळें दुसरे गोष्टींतून ही गेले यास वतनास अथवा दैवलतीस बोलायास संमंध राहिला नाहीं तिसरे हे म्हणतील कीं आम्ही वडील. तर हें लटकें कसें म्हणाल तर हे जर वडील आस्ते तर कागदपत्र महजर व वडलांचे नांवेचे आस्तेत नाहींतर रायाजी जनार्दन यांनींच वतनें मेलविलीं आणि महजरही त्यांनींच आपले नांवचें केलें तेव्हां हे पांच भाऊ आपलें आपलें घरचें सांरं वडिल आसे जालें तेव्हां रायाजी जनार्दन याचे दैवलतीस अगर अतनास यांनीं बोलावें असा संमंध राहिला नाहीं. बावुराव याबाजी याचे पुत्र निवाजी बावुराव आहेत हे कदाचित् वतनासाठीं भांडूं लागले तर हें खोटें. यास रायाजी जनार्दन याचे दैवलतीस अथवा वतनास बोलायास संमंध राहिला नाहीं. जिकडे दैवलत जिकडे देणें तिकडेच वतन यासे बोलायास संमंध साहीं रायाजी जनार्दन यांचे दैवलतींचे पूर्वी जें वडिलोपार्जित वतन आसेल त्या वतनांत यांचा विभाग जो भाऊ पंज्याचे वांटणीस येईल तो घ्यावा. आणि त्या वतनांत वडिलकीहि साधल आणि वरकड पांच भाऊ आपला आपला विभाग घेतील आसें ठरलें रायाजी जनार्दन याचें दैवलतींत अथवा वतनांत यावाजी जनार्दन याचे वंशास बोलाव्यास संबंध राहिला नाहीं तिघां भावांची नकल यांस पुत्र संतान नाहीं कोण म्हणाल तर रायाजी जनार्दन दुसरे येको जनार्दन तिसरे कोनेराव जनार्दन ऐसे तिघांस संतत नाहीं नकल जाली चौथे याबतराव जनार्दन यास संतत निवाजी बावुराव आहे त्यास रायाजी जनार्दन याचे दैवलतींत अथवा याचे वतनांत बोलायास संमंध नाहीं अधिकार कुलवाब राहिला नाहीं येणेंप्रमाणें या वतनांत अथवा दैवलतींत चैवघांचा कह्या राहिला नाहीं. पांचवे भाऊ सिवराव जनार्दन यांनी रायाजी जनार्दन यांची दैवलत ही करावी आणि वतन ही करावी आणि त्याचें देणें आसेल तें द्यावें. रायाजी जनार्दनाचा सर्व अधिकार सिवाजी जनार्दन यांनीं करावा. वतनें यांचीं व दैवलतही यांची प्रमाणें पांची भावांचा करिणा असा सिद्धांत आसे. याउपर करकंबेंत सिवराव जनार्दन होते

वरकड भाऊबंद आपले आपले थान्यास गेले तलावर सिवराव राहिले तेव्हां खर्च भारी चालेना मग कनोजा कान्होशा म्हणून पहिले सावकार मातबर जातीचे क्षेत्री हे येंगपुरांत होते यास वर्तमान कळलें तेव्हां पहिली दैवलत भारीच होती. ते समयीं त्याचे दुकानचें.देणें घेणें चालत होतें. त्या वलखीवर त्यांनीं येऊन सिवराव जनार्दन यांसी बोलले कीं तुमचा हा राश काल आणि वृद्धपण तुम्ही बादशा-सिवाय दुसऱ्याची उपाषना केली नाहीं तुम्हीं ज्या चुलांवर खीर खाली तेथें आतां राख न खावी तुमचीं मुलें लहान तुम्ही आपलीं सर्व कुटुंबें घेऊन बेंगपुरास चालावें तेथें आमचा वाडा आहे तेथें तुम्हीं राहावें माझे हातून जे साहित्य होईल तें करीन. मग बेंगपुरास रायाजी जनार्दन याची बायको तिज नांव ताई तिज बरावर सिवराव जनार्दन आपले चैवघे लेंक व बायको वरकड बटकी व गुलाम ऐसे सर्व कुटुंब व कोनेर भट उपाधे कुटुंब सुधां व आचितराव मामा व लक्षुमणराव या वरकड लेव लागणीचीं सर्व कुटुंबें ऐसीं शें दीडशें माणणें निदानचीं राहिलीं होतीं ते सर्व ताईवाई बराबर घेऊन बंगपुरांत कान्होशाच्या वाड्यांत जाऊन राहिलीं ते वेलस वतनाचे कागद पत्र दिले होते ते ही बराबर घेऊन गेले तेथें गेलेवर कांहीं दिवस कान्होशा यांनीं कर्ज वाम देऊन चालविलें परंतु कुटुंब थोर खर्च भारी तरी कान्होशा यांनीं शर्त केली. तेही कुटवर चालवितील तत्रापि त्यांनीं जें करायाची तें केली याचें चालेचना तेव्हां येक रोज कान्होशास ताईनीं व सिवराव जनार्दन या दोघांनीं यांसी बोलले कीं तुम्ही तो आपली शर्त केली आमचा खर्च मारी तुम्ही कोटवर कराल त्यास आमची दैवलत रायाजी जनार्दन मेले तेव्हांच गेली आम्हांजवल वस्तभावे थोडी बहुत होती ते ही खाली आणि तुम्ही जितके चालवावे तितके चालविलें त्यास आम्हा जवल दैवलत पैकीं चार वतनाचे कागद पत्र आहेत तर ये समयीं सर्वस्व तुम्ही जिवदान दिलें आहे तर त्या महजरांतील एक महजर तुम्हांजवल ठेवितों तुम्ही हा महजर ठेऊन च्यार रुपये देणें तेव्हां ताईचे बोलण्यावरून त्यांनीं मान्य करून पाहिलेही च्यार रुपये दिलेच होते आणखी त्यांनीं मागितल्या प्रमाणें रुपये देऊन ताईनीं व सिवराव जनार्दन या उभयतांनीं मौजे भटउंबरे परगणे करकंबें येथील पाटिलकीचा महजर होता तो त्याजपाशीं ठेऊन त्यास ग्येदा मुदत करून कागद पत्र देऊन महजर त्याचे हवाली केला आणि च्यार रुपये बोलल्याप्रमाणें घेऊन कांहीं दिवस काल चालविला. परंतु शेवट होईना इतक्यांत भावाचा वास याजमुलें रात्रौ येऊन दरवडा पडला तेव्हां जें राहिलें होतें तें ही सर्व गेलें ते समई नाश जाला तो कोठवर ल्याहावा सारांश वस्त्रहीन सर्व जाले तेव्हां फार गलोब जाला तेव्हां उपाय नाहीं मग मातुश्री ताईनें सर्वांस बोलावून सांगितलें कीं आज पर्यंत तुमचें पालन केलें आतां कांहीं बाकी राहिली नाहीं तर तुम्हीं आपली आपली सोय पाहून पोट भरणें. माझ्या हातून तुमचें संवरक्षण होत नाहीं ऐसें बोलली तेव्हां सर्व आपले आपले सोईन पोट भरल तिकडे गेले मातुश्री ताई यांनीं त्रिंबकराव म्हणून सिवाजी जनार्दन याचे पुत्र वडील होते ते व त्यांची बायको उमाबाई ऐसी बरोबर घेऊन मौजे कुपसंगी प्रा मंगलवेढें हा गांव पाटिलकीचा तिज माहेर जवल पाटकल परगणे मंगलवेढें तेथें जाऊन बसली सिवराव जनार्दन यांचे पुत्र तिघेजण कोण म्हणाल तर त्यांचीं नांवें भगवंतराव व नरसिंगराव व गोविंद-राव ऐसे तिघे पुत्र सिवराव जनार्दन याजपाशीं राहिले. याचे वडीलपुत्र चौथे तो मातुश्री ताईबरोबर कुपसंगीस घेऊन गेले सिवराव जनार्दन व तिघ पुत्र व सिवराम याची स्त्री कृष्णाबाई व वडील सून भगवंतराव याची बायको दादी पांढरे यांचे दिवाण विठलराव भीमराव यांची बहीण कासेगांवांत तिज माहेर ऐसी खासगत मंडली व अचितराव मामा व कोनेरभट उपाधे यैसी सिवराव याज बराबर बेंगपुरांत राहिली. लक्षुमणराव मामा हे आपली बायको सिऊबाईस बरोबर घेऊन सिरीटीस खान-गवडा बसला होता तेथें सिरीटीस गेले. तेथें यांनीं जाऊन त्याजवल जफातीचा धंदा केला. ते दोघे स्त्री पुरोष आपला कालक्षेप करून राहिले. वरकड बटकी गुलम व इतर सर्व जिकडे पोटभरतील तिकडे

गेले याप्रमाणें आवस्था जाली. दैवलतच गेली. तेव्हां कोण कोणाजवल राहतो सारांश सिवराव जनार्दन केलेला पुरुश मातबर परंतु फार हालकित आले. वय म्हणावें तर पंच्याआईसीवरशाचे पुरुष वरकड कोठ जावें तर वय नव्हे वयातीत पुरुष जाळेले कोणी खटपट करावी तर भगवंतराव वीस वरशाचें वय त्याचें लग्न मोडते दैवलतीत झालें नरसिंगराव म्हणून होते त्याचें वय पंधरा सोळा वर्षे याचें लग्न झालें नव्हतें गोविंदराव तर पांच सात वरशाचे तिवही पुत्र लाहान तेव्हां यांनीं कोठ प्रवास केला नाहीं कोणासी वलख देखील नाहीं माय बापा वरील मुलें कचा खाव तेव्हां फार गोष्ट विलग येसही असून दम खाऊन जे दिवस मिळाले ते दिवस खाले न मिळाले ते दिवस उपास केला यैस करून कालक्षेप केला सिवराव याची स्त्री कृष्णाबाई कर्ती होती व तिचे माऊ आचितराव हे मात्र दैवलत केलेले पुरुष तेव्हा या दोघांनीं हिंमत बांधून संवसार वोढीत चालले. सिवराव तो म्हातारा यांनीं घाली सोडून बसले आचितराव मेव्हणे होते त्यांसी व बायकोसी बोलले कीं मी पाछाव याची चाकरी केली दुसऱ्यास रामराम केला नाहीं. आणि माझें म्हातारपण तेव्हां तुम्ही माझी आस्ता सोडणं तुमचीं मुलें व तुम्ही जिकडे परमेस्वर बुध्ये देईल तिकडे जाणं मी संन्यास घेतों ऐसे बोलले. तेव्हां बायको नवे मेव्हणे आचितराव होते त्यांनीं त्याचे बहुता प्रकारें समाधान करून त्यासी बोलली कीं तुम्ही आमची चिंता न कर्णे आम्हांस कलल तसा संवसार चालवूं तुम्ही कालजी न कर्णे येणेंप्रमाणें त्याचें समाधान करून या उभयतांनीं संवसार चालविला. सिवाजी जनार्दन यांनीं जेऊन स्वस्थ बसावें चतुर्थाश्रम उभयतांनीं घेऊं दिला नाहीं. कृष्णाबाई व आवचितराव या उभयतांनीं हिंमत बांधून संवसार करूं लागले तेव्हां कांहीं दिवस बेंगपुरांतच उपाधे तुह्मां होते मग नरसिंगराव याचें लग्न झाले नव्हतें तेव्हां कोनेर भट यांस नवरी पाह्यास पाठविलें. यांनीं करकंब व मोसे व कासेगांव व मंगलवेढें हे सर्व च्यारी जागे सोयरे धायरे तेव्हां उपाधे यांनीं जाऊन चारी जाग्यांत शोध केला तेव्हां तेथें नवरीचा योग घडेना कांकीं कालाचा महिमा. तेव्हां माघारें ये ऊन तुलजापुराजवल सिदफल म्हणून आहे तेथें नवरी होती तेव्हां तेही मातबरच प्रहस्त बंडगर याचे कारभारी परंतु तेही कालचक्राचे फेऱ्यांत आले होते तेव्हां त्याची घरीं मूल नवरी होती दोघेही मातबरच आणि उभयपक्षी कालचक्राचे फेऱ्यांत आले होते. ऋणानबंधे करून तेथें नवरी करावी यैसा सिधांत करून उपाधे आले वर्तमान सांगितलें तेव्हां कालाप्रमाणें साहित्य करून लग्न केलें याचा विस्तार लग्न कसें केलें म्हणून कोणी पुस्तील तर यांचा विस्तार लिहितों. फार बखेडा यास्तव लिहिला नाहीं. कालासारखें लग्न केलें लग्न करून घरास आले. उपरांतिक बेंगपुर येथें काल चालना मग जितक होती तितकी उठोन मौजे कुपसंगी येथें मातुश्री ताई व रायाजी जनार्दनाची बायको व त्रिंबकराव येथें होते. तेव्हां ताई गेल्यापासून कुपसंगी येथेंच होती त्यानीं वाड्यांत राहावें आणि मेळावें दोन्ही खास बाग व कालामला यांनीं व मुसलमान निमेच पाटीलकीचे होते त्यांनीं हे मेळे करून पोट- भरून होते तेव्हां पांढरे कासीगांवकर याचीं ठाणीं मुलूक वैराण तमाम झाडी वठाण चालेनात तसा आरण्यांत आपले जोर मात्र दोन मेळ दोन शेत करून होतें. इतक्यात सिवराव जनार्दन व याचीं मूल माणसें व उपाधे व मेव्हणे यैसे कुपसंगीस गेले तेव्हां ताई बोलली कीं तुम्ही येथें कां आलां येथें आहेत त्याची पोट भरत नाहींत तुमचे कुटुंबाचें संवरक्षण कसें होईल माझें बऱ्या व वाईटास तुमचा वडील पुत्र मी येतांना समागमें आणिलाच आहे तुमची गुजराणी तेथें कसी होईल वरकड वतनें आहेत त्यांत सोय करून राहणें यैसी ताई नानाप्रकारें बोलली तेव्हां यांनीं दमखाऊनच उत्तर केले कीं आम्ही कांहीं येथें राह्यास आलों नाहीं. बहुत दिवस जाले आपली भेट घ्यावी आणि सोईनें जेथें कालक्षेप चालेल तेथें राहावें तुम्हीं वडील या करितां दर्शणास आलों यैसे बोलून दम खाला. मग कुपसंगींत चार दिवस राहिले. तेथेंही आचितरावमामा यांनीं खटपट करून शेतें व मळा करून कांहीं दिवस तेथें ताईजवल गुजराणी केली

परंतु घरातील कुटकुट वरकड वतनाकडे जावे तर मुलूक उजाड झाडी राण मुलकात दंगा भारी पादरे याची बेबंदी माजाली उदाजी चव्हाण याचा मुलकात दंगा

उदाजी चव्हाण यांनीं साताऱ्याचे माचीपासून गुरें बेकावीं गांव मारावें येसे मिरज व आयनी व मनोली व मंगळवेढें व सांगोलें. बेंगपूर पंढरपुर वगैरे येथपर्यंत धामधूम गुरें + बेकावीं नाश करावे येसे होतें. तेव्हां वरकड वतन होती तिथ जावें तर या धामधुमीमुळें कोठें जायाचें ठीक नाहीं मूल लहान सिवराव म्हातारे याजकरितां वरकड वतनाकडे जाणें जालें नाहीं. मग कुपसंगी येथेंच चार दिवस राहून काल घालविला. तो येथेंही चालला. मग भगवंतराव होते. हेही थोडे प्रबुद्ध जाले मग यांनीं वडलास सिवराव यास पुसलें कीं येथें काल तर चालत नाहीं माझी तर कोठे वलख नाही तुमची कोठें या राज्यांत वलख आसली तर तिकडे तरी जाईन. मग सिवाजी जनार्दन आपले पुत्र भगवंतराव यासी बोलले कीं या राज्यांत वरकड जागा माझी वलख नाहीं. परंतु शाहूराजा यांचें लग्न जालें तेव्हां मी त्यांचें साहित्य केलें होतें. तितकी मात्र वलख आहे परंतु तो काल आमचा नाहीं येसे बोलले तेव्हां भगवंतराव यांनीं त्रास सोसन येकटे उठोन साताऱ्यास शाहूमहाराज याजकडे गेले वरकड कुपसंगींत राहिली. तेव्हां कुटकुट घरातील चुकना मग यांनी आपली घरची तजवीज करून भगवंतरायाची बायको आपले माहेरास कोसगांवास लाऊन दिली दुसरी सून नरसिंगरायाची बायको तिच नाव आऊ-बाई हे सिदफलास माहेरास लाऊन दिली सिवराव व याची स्त्री कृष्णाबाई व मेव्हणे आचितराव व कोनेरभट येसी उठोन सिरटीस लक्षुणराव मामा खानगौंडा याचा रोजगार जकातीचा करीत होता. तेथें सुबत्ता होती. तिथ हे गेले जाऊन तेथें लक्षुमणराव यांनी ठेऊन घेतलें ताई व त्रिंबकराव कुपसंगींत राहिली भगवंतराव साताऱ्यास शाहूराजा यांजकडे गेले. साताऱ्यास जाऊन रायाजीपंत केसरकराचे कारभारांत होते त्याचे घरीं राहिले आपलें वर्तमान सांगितलें त्याजवर त्यांनीं महाराजाची भेट करविली. भेट जाली ते समईं सिवराव जनार्दनच लेक येसे समजल मग महाराजांनीं कृपा करून कऱ्हाड देशचे सरदेश-मुखीचा कारभार यांस दिला आणि जो त्यांनीं केसरकर व रायाजीपंत यांस आज्ञा केली कीं हे थोरांचे वंश आहे या मुलाचें ऊर्जित होईल ते करणें ते जादा नेमणूक करून दिली आणि घर मसुरांत राहावें सरदेशमुखीचा कारभार करावा येसी आज्ञा करून वस्त्रें देऊन यांस केसरकर यांचे स्वाधीन केलें संताजी चव्हाण म्हणून होते त्यास सुभेदारी पहिलीच होती मग हे मसुरास जाऊन राहिले वाडा बांधला सर-देशमुखीचें कामकाज करूं लागले तेव्हां याचा डौल मसुरांत बराच पडला. मग तेथें आपली बायको तिच नांव दादी तिजला कोसगांवाहून मसुरास आणली. व सिरटीहून यांचे तीर्थरूप सिवराव व मातोश्री कृष्णाबाई व भाऊ उभयता नरसिंगराव व गोविंदराव येसी दोघे लाहानच होते ते व आचित-राव व लक्षुमणराव सिवराव जनार्दनचे मेव्हणे व कोनेर भट उपाधे येसी सर्व मंडली मसुरांत मिळाली तेव्हां ईस्वर कृपेन घर मंडलीच ये सबासें माणूस मिळालें कुपसंगीहून त्रिंबकरावही आपले कुटुंब सुधां येथेंच अले मातोश्री ताई रायाजी जनार्दनची बायको ही येकटी मात्र तेथें वतनावर माहेर जवल आणि वतनही येसे जाणून कुपसंगींत राहिली तेव्हां निख दोनशें माणूस पंगतीस भोजनास होऊं लागलें हा रोजगार येकसा तीस वरषें पर्यंत होता. शाहूमहाराज जिंवत होते तेथपर्यंत तेथील सरदेश-मुखीचा अमल याजकडेच होता. त्यांत अमलाचे पैवस्ती पासून दहाबावरशें पर्यंत चडतीच दशा होती तेव्हां त्रिंबकराव वडील यांस वंवश पुत्र दोघे वडील मल्हारराव व धाकटे गुणवंतराव येणें प्रमाणें दोन व कन्या तीन वडील सकुबाई दुसरी येसूबाई तिसरी राजूबाई येणें प्रमाणें कन्या तीन येसी. वडील त्रिंबकराव यास दोन पुत्र व तीन कन्या. दुसरे भगवंतराव यास पुत्र चैवघे जण त्यांची नावें वडील रामचंद्र राव बापू दुसरे खंडेराव तिसरे जनार्दनराव चैवथे गोपालराव येणेंप्रमाणें पुत्र संतत च्यार व कन्या येक तिज नांव मैनाबाई येणेंप्रमाणें यास च्यार पुत्र व कन्या येक येकूण पांच. तिसरे नरसिंगराव

यास संतत नाहीं याचे नकल येक बायको व येक आपण येणेंप्रमाणें तिसरे बंधु पैवये गोविंदराव सर्वाहून लाहान यास संतत पुत्र दोन वडील नरसिंगराव धाकटे माधवराव येणें प्रमाणें यास पुत्र दोन कन्यातर नाहीं सारांश सिवाजी जनार्दन यास वंवश च्यार पुत्र त्यांची वंवशावली सदरहू लिहिलेप्रमाणें व त्यास कन्या येक तिज नांव वेणूबाई तिला आका आसे म्हणत होते. आसे आस्तां रायाजी जनार्दन याचे वेलेस जे वर्तणूक जाली ते सर्व याजवर मागें लिहिला आहे ते मेलेवर पुढें सिवाजी जनार्दन यांचा माथा सर्व भार आला तेव्हां त्याचे पुत्र भगवंतराव दुसरे ह्यांनीं हिंमत धरून सातान्यास येऊन शाहू माहाराजापाशीं सरदेशपुखीचा धंदा करून मसुरांत आपले जिंदगानीचा ठाव घालून मसुरांत संवसार करूं लागले. तेव्हां श्रेष्ठत्व यांजकडे मग धणीपणा कुल याचा कारभार लक्षुमणराव मामा व भगवंतराव व याचे वडील पुत्र रामराव बापू या उभयतांनीं करावा घरांत वडील मातोश्री तिन स्वयंपाक मात्र करावा सर्व देणें घेणें आहे नाहीं पाहाणें हें याची स्त्री दादी म्हणून त्याचे नांव त्यांनीं सर्व सांभालावें हे उभयता कारभारी व हे भगवंतराव धणी घरांतील कारभार दादी यांनीं येणेंप्रमाणें कारभार आपले आपले पद्धतीप्रमाणें करून सर्वांचा परामृष करूं लागले तेव्हां दाहा बारा वर्षे चढता कारभार चालला त्यांत लेक लेकी थोर जालीं तेव्हां त्यांचीं लग्नें मुहूर्त कर्णे प्राप्त जाली तेव्हां मैनाबाई लेक वडील तिचें लग्न करावें आसें ठरलें तेव्हां कालगांवकर आचार्ये थोर प्रतिष्टवंत राज्येमान्य आणि माहाराजाचे राज्याची पंडीतराई येस थोर पात्र तेथें कृष्णेचार्य यांचे पुत्र केशवच्यार्य व माधवच्यार्य त्यांत माधवाच्यार्य यांचे पुत्र वडील गोपालाच्यार्य त्यास हे मूल द्यावी येसा निश्चय ठरून लग्नाची तिथ नेमून तिचें कन्यादान करून दिल्हें ते वेलेस खर्च भारीच बसला सारांश ह्या बाईचें लग्न जाले उपरां-तिक वडील पुत्र बापू याचें लग्न करावें येसें ठरलें तेव्हां यास सोयरीक कोसगांवकर पांढरे याचे दिवाण भिवराव व विटलराव तेव्हां भिवराव याची कन्या तिचें नांव सईबाई म्हणून होती ती करावी असा निश्चये ठरला येक तर पूर्वी सोयरे आणि मातवर तेव्हां ते मूल रामचंद्रराव बापू यांसी लग्न करावें आसें ठरलें· तेव्हां भगवंतराव याचे धाकटे भाऊ गोविंदराव सिवदेव होते याचें लग्न जालें नव्हतें मागील तापत्रयामुलें लग्न जालें नव्हतें. सोलासत्रा वर्शाचें त्याचें वय होतें मग याचें लग्न तर जालें पाहिजे याचे तर कोणी नाहीं मसूर येथें याचे तीर्थरूप सिवराव जनार्दन आले. त्यांचा काल जाला होता. मातोश्री मात्र होती तिचें नांव आमा मग याचें लग्न करावें आसें भगवंतराव याचे भाऊ यांसी कोण बोलतो तेव्हां याचे मामा लक्षुमणराव व आचितराव त्यांत वडील आचितराव यांनीं आपले भाचे भगवंतराव यांसी बोलले कीं तुमचे भाऊ गोविंदराव हे थोर जाले यांचें लग्न अद्याप नाहीं लोकांमधें हासें करें म्हणाल तर तुम्ही कर्ते पुरूष जाला तुमचा भाऊ थोर याचें लग्न न जालें तेव्हां लैवकिक ब्यपनांत वाईट दिसतो तर आधीं लग्न गोविंदराव याचें करावें मागून तुमचे चिरंजीव बापूचें करावें हें मूल आहे त्याच आधीं करावें आणि मागून बापूच करावें यांत उत्तम आहे तुम्हास सांगणार कोण याजकरितां मीच तुम्हांस पुसतों येसे नानाप्रकारचें बोलून भगवंतराव यासी पुसल तेव्हां त्यांनीं सर्व येकून घेऊन यासी उत्तर केलें कीं तुम्ही वडील तुम्हासी काय बोलूं मीच जानवें तोडतो व धोतर फाडतो संन्यासी होऊन मुलकावर जातो येसे बोलून जानवें तोडल आणि धोतर फाडलें म्हणूं लागले कीं मला माझा संवसार तुम्ही करून देत नाहीं तर मी गोसावी होऊन मुलकास जातों येस नानाप्रकारच बोलण बोलून उठोन जायास लागले तेव्हां आचितराव मामा व त्याची मातोश्री व बहिणी व कितेक वृध होते. त्यांत आचितराव मामा हे सर्वांत श्रेष्ट आणि पूर्वील देवलत केलेले माणूस सारे चैत्रघेही यास सारखेच तेव्हां आचेतराव यांनीं त्यास धरून त्याचें समाधान करून त्यास जानवें घातलें व धोत्रें नेसविलीं त्यासी बोलले कीं तुम्ही रागे न भरावें गोसावी न व्हावें तुम्ही आपले चिरंजिवाचें लग्न आरंभिल आहे तेस सिधता करावी लग्न कराव गोविंदरायाची कालजी न करावी. त्यांचे देवीं आसलें तर लग्न होईल

नसल तर तसाच राहील. परंतु तुम्ही आपला संवसार करावा दुसऱ्यावर निमित्य न देणें आपले चिरंजिवाच लग्न कर्णे यैसे नानाप्रकारचें बोलणें होऊन त्याचें समाधान करून बापूचें लग्न करावें असा सिद्धांत करून साहित्य केलें लग्नास येक दोन दिवशीं निघावें येणेंप्रमाणें भगवंतराव यांसी आचितराव मामा बोलून तेच दिवशीं रात्रीस यांचे भाऊ धाकटे लक्षुमणराव होते ते मग भगवंतरायाचे घरचा व मामलतीचा कारभार करीत होते त्याचें घर निराळें होतें सारे दिवस कारभार यांचे वाड्यांत करावा व रात्रीं घरास जावें यैसे होते त्यास मूल फार जाली. परंतु सर्व मेलीं येक कन्या मात्र राहिली होती तिचें नांव भिमाबाई तिचें लग्न जालें नव्हतें तसीच नवरी होती मग लक्षुमणराव यांचे वडील भाऊ आचितराव हा रात्रीस त्याचे घरीं जाऊन भावासी बोलले कीं लक्षुमणराया मी तुम्हाकडे कांहीं कार्यानिमित्य आलों आहें तर तुम्ही माझी गोष्ट मान्य कराल कीं नाहीं तेव्हां पूर्वील भावांच्या मर्यादा फार होत्या मग यांनीं पुसतांच त्यांनीं उत्तर केलें कीं अण्णा आपले वचनाशिवाय मी काय आहें. आज्ञा कराल त्यास मान्य आहें मग भावासी बोलले कीं तुमची लेक माझे वोट्यांत घाला. तेव्हां यांनीं उत्तर केलें कीं मी घालावी यैसे काय लेक तुमचीच आहे तेव्हां आचितराव अण्णा बोलले कीं. ही लेक माझी हिचें लग्न मला कर्णे हें मूल गोविंदराव यास देतों यैसे बोलले तेव्हां बरें आहे यैसे बोलले मग घरांत त्याची स्त्री सिऊबाई होती तिकडे गेले. तेव्हां तिजलाही त्याप्रमाणेंच बोलले. तेव्हां तिन आकांत केला परंतु लक्षुमणराव यांनीं आपले स्त्रीस बोलले कीं आणापेक्षां मजला कांहीं अधिक नाहीं त्याची आज्ञा मान्य करा मग उभयतांचा निश्चय होऊन गोविंदराव यासी हे वधू करावी हा निश्चय ठरला तेव्हां तिच वलस साहित्य करावें यैसें जालें तेव्हां रुपया कोणाजवल आहे मग आचितराव याजपाशीं खासगत शें दोनशें रुपये होते ते तेवेलेस लक्षुमण राव यांचे स्वाधीन केले आणि गोविंदराव यास बोलाऊन पुसलें कीं तुम्हांजवल कांहीं आहे कीं नाहीं. तेव्हां यांनीं भावाचा कारभार तर नाहीं परंतु मसुर गांव थोर चैवघे जणासी इष्टत्व करून होते मसुरकर कुलकर्णी कृष्णपा त्यांचे लेक मल्हारपंत भाऊ म्हणून होते तेव्हां त्यांचे घरांत यांचा घरोबा व पाटील भगवंतराव जगदले व जिवबा जगदले व तुको फुटाणे म्हणू चाटी ×××× नाईक सराफ यैसे सर्व इष्टत्व तेव्हां भावाचा तर कारभार नाहीं परंतु चैवघे गांवचे महस्त त्यांचीं ईष्टत्वें राखून होतें मग ते वेलस चैवघापासून चार रुपये कर्ज घेने ते रुपये आचितराव मामायाचे स्वाधीन केले उपरांतिक यांचे मित्र मल्हारपंत भाऊ यांनीं व आचितराव मामा यांनीं व चैवघा इष्ट मित्रांनीं तेच रात्रीस सरंजामाचा बेत करून लग्नाचा मांडव मल्हारपंताचे घरीं नवऱ्याचा घातला. आणि नवरीचा मांडव लक्षुमणराव यांचे घरीं घातला सर्व सिद्धता तेच रात्रीं करून दुसरे दिवशीं दिवस उगवतांच या उभयतांस हालद लाऊन वाजंत्री घेऊन आमंत्रणेची आक्षता देयास इष्टमित्र गांवची मंडली घेऊन भगवंतराव यांचे वाड्यांत गेले तेव्हां हे आपले लेंकाचे लग्नाचे गडबडींत मग हे जाऊन त्यासी आक्षता दिली कीं गोविंदराव यांचें लग्न आहे आपण सहपरिवारी येऊन मंडप शोभिवंत केला पाहिजे यैसे बोलून आक्षता दिली तेव्हां भगवंतराव खालीं पाहूं लागले ते समई भाशणें जालीं तें कोठवर ल्याहावीं सारांश गोविंदराव यांचे लग्न ते कालीं भावाचे दौवलतींत आसें जालें त्या लग्नांत घरचें मनुशापैकीं झोंबा यास येक मातोश्री कृष्णाबाई तिला आमा यैसें म्हणत होते ती व बहीण तिच नांव वेणूबाई तिला आका यैसें म्हणत होते. यैसी उभयतां मात्र होतीं वरकड इष्टमित्रांनी मिळून साहित्य करून लग्न यैसें केलें भगवंतराव यांचे घरचें साहित्य तिलमात्र गोविंदराव यांचे लग्नास लागल नाहीं. हें लग्न जाल्यावर पुढें भगवंतराव आपले लेकाचे लग्नास कोसगांवास घेऊन निघाले तेही लग्न मातबर जालें त्या लग्नास पांच सात हजार रुपये लागले बापूचें लग्न आसें जालें. गोविंदराव यांचे लग्नाची आवस्था आसी जाली उपरांतिक दुसरे लेंक खंडेराव यांचें लग्न करावें आसे ठरले तेव्हां यास नवरी कडगांवकर तुबाजी अनंत हेही फार मातबर पेशवे यांचे पदरचे तेव्हां यांची मूल तिचें नांव यमुनाबाई तिचा निछये करून त्याचें

लग्न केलें ते लग्नसंमंधें दाहा पांच हजार रुपये लागलें तें लग्न केलें तिसरें जानोबा म्हणून त्याचे लग्न कऱ्हाडांत सोयरीक केली त्या मुलीच नांव मथुराबाई हें लग्न सामान पक्ष जाल चवथे गोपालराव हे लाहान यांचें लग्न जाल नव्हतें भगवंतराव याचे लेक वडील बापू यासी मूल वडील तिच नांव आबाबाई म्हणून जाली तिच लग्न सातान्यास यादो गोपाल ताराबाई यांचे दिवाण त्यांचे घरीं बळवंतराव म्हणून त्याचे पुत्र त्यास तें मूल तेथें दिली त्या लग्नास दाहा पांच हजार रुपये खर्च केले येणेंप्रमाणें भगवंतराव यांनीं संवसार दाहावीस वरशें आपले लेवकीकानेंच केला मानल तेतकी थोडकी आदा थोडा आणि यांचा संवसाराचा खर्च तों लग्नें या रीतीचीं याशिवाय सोयरेधायरे हामेशा येणारे जों जसा येईल तशी करणी करणें प्राप्त याशिवाय दरवर्शास चंपाशष्टीचा उछाव त्या उछावास दरसाल दोन आडीच हाजार रुपये लागावे निख दोनशे दीडशें पान पंक्तीस जेवायास तेव्हां खर्च भारी आदा नाहीं तेव्हां लोकांची कर्जे घेऊन खर्चाचा गाडा लोटीत गेला मग दाहावीस वर्श वहिवाट चालला उपरांतिक खर्च मारी देणें दाराचा उपद्रव भारी मग काल चालना तेव्हां परागंदा मुल माणसें होऊं लागली कर्जेदार मूल बायकोस धरून नेऊं लागले तेव्हां येक येक मुलकास येक माणूस जालें कर्ज लाख रुपये जालें उपाय चालना आन खावयास मिलना इतक्यांत भगवंतराव मेले काल जाला मूल लेकर रानोमाल जालीं नग गोविंदराव सिवदेव यानी हिंदुस्थानांत श्रीमंत पेशवे याजकडून सुभा केला तो त्यास देवान हातीं धरल मग भगवंतराव याच पुत्र वडील रामरावबापू हे हिंदुस्तानांत गेले तेथें त्यानीं गेल्यावर ठेऊन घेतलें त्याचे माघे दुसरे भाऊ खंडेराव गेले तेही ठेऊन घेतले मग त्यांनीं याचे सर्व कर्ज वारलें. मूल माणसें जागा जागा पळून गेलीं होतीं ती एकत्र केलीं याचे वडलाचे कर्ज तमाम देणेंदार हिंदुस्थानांत बोलावयाचे ते बोलावून त्याची कर्जे वारली येथें स्वराज्यांत जे होतें तें देशांत रुपये देऊन त्याची कर्जे वारली त्यास सवसारास लाख दीडलाख रुपयाचं वेत्यविशय व नक्तवस्तभाव व जडाव व भांडें पात्रे आस सर्व देऊन संवसारास लावलें मौजे कुपसंगी परगणे मंगलवेढे येथील पाटिलकी तेथें रायाजी जनार्दन याची बायको ताई मात्र राहिली होती तेव्हां पांढरे याचा आमल राण उज्याड गांवचा रुपया तर घ्यावा तेव्हां गांवास एक रुपया आला तर अर्धा मुसलमान यानी घ्यावा अर्धा ताईन घ्यावा तेव्हां याजवळ यैवज नाहीं मग ताई यानी वरशास तेथील वतनदार महार कारनाक व सुबनाक याजबराबर कागद पाठवावे तेथें जो रुपया देणे तो येथून घ्यावा ताईची चिटी जशी येईल तितके रुपये दरवरशास महाराजवल देऊन शेकडो रुपये त्या वतनास मसुराहून पाठविले तेंव्हा ते वतन राहिलें न पाठवावे तर ताईने साफच लेहून पाठवावें कीं तुम्ही रुपाया न पाठवला तर वतन जाते मजवर शब्द नाहीं असे त्याहावें तेव्हां जे समई जशी चिटी येईल तसा यैवज पाववता करून तें वतन राखलें मसुरास रायाजी जनार्दन आले उपरांतिक कांहीं दिवस होते मगत्याचा काल मसुरी जाला मातोश्री कृष्णाबाई या चैवघाची मातोश्री भगवंतराव याचा काल जाल्यावर ते ही मेली सरदेशमुखांचा आमल तीस वरशे चालला. दहावीस वरशें बराच चालला दहावर्षें हाठोट पठोट चाले मग भगवंतराव याचाही काल राजा मरताच याचाही काल जाला भगवंतराव याणी असी वर्तणूक केली त्रिंबकराव म्हणून सिवराव जनार्दन याचे पुत्र वडील त्याची कथा मातोश्री ताई यानी बेंगपुरावर दरवडा पडला मग हे कुपसंगीस त्यानीं बराबर नेली हे तेथेंच होते यास मूल-लेक दोघ व बहिणी तीन मुली यैसी पांच लेंकर त्यास जाली तोपर्यंत कुपसंगींत होते मग भगवंतराव सातान्यास येऊन महाराजाचा रोजगार केला. तेव्हां मसुरांत मूल माणसें घेऊन भावाचे दैवलतींत आले तेव्हां कांहीं दिवस येकत्र होते यानी पंगतीस जेवावें आणि बायकानी चैवघा बायकाबराबर काम करावें मुलांनी जेऊन चैवघां बरोबर आसावे आसेंच कांहीं दिवस चालले तेव्हां घरांतील राब थोर लंगरखाना मग बायका बायकांत कटकट होऊं लागलीमग याचे पुत्र वडील मल्हारराव म्हणून होते ते येथेंच लेहून शाहाणे जाले सिवाजीपंत म्हणून दसरदार होजे तेव्हां त्यानी हिशेब व किते अक्षर शाहाणे त्यांनीं केलें तेव्हां मग-

वंतराव भाग्याचे परंतु बुध्या लहान यानी आपला मात्र पहात असावें भावबंदीगीचे आगत्य थोडयांचा द्वेश होता आसी प्रकुत होती मग घरांत कुरबूर होऊं लागली तेन्हां त्रिंबकराव तो साधे परंतु यान्हे लेकांनीं इरेधरानें हे निरालें आपलें बाप व आईभाऊ बहिणी इते घेऊन संताजी चव्हाण याचे वाड्यांत ठाव मांडून हे निराले राहिले मग यास खावयास पाहिजे तेन्हां यानी रोजगार रत्नाकर विटल म्हणून माहाराजाचे देशमुखी व ये देश कऱ्हाड देशची मुतालकी राज्याचे वतनाची होती ती त्यांजकडे होती तेन्हां त्याजकडे हें राहिलें राहून आपला संसार करूं लागले मंग शाहू महाराज होते तों पर्यंत रत्नाकर विठल याजकडे देशमुखीचें काम होतें तों पर्यंत हे मल्हारराव त्यांचे कारभारांत होते त्यानीं ही चांगलेंच चालविलें कांकी भगवंतराव सरदेशमूख याचे पुतणे आपले घरीं राहिले तेन्हां याचा त्याचा द्वेश तेन्हां याचे देखत याचें आपणाजवळ ठेवून चांगल चालविलें तेथेंच यानी आपली व भावाची व तिघी बहिणीची लग्न केली आणि संवसार ही केला माहाराज जिवंत होते तों पर्यंत हे ही रत्नाकर पंता बराबर होते. राज्याचा काल जालीयावर रत्नाकर पंताचा रोजगार निधाला मग याची विपत्य चार दिवस फारच जाली तेन्हां चालना इकडे भगवंतराव याची गत आसी जाली तेन्हां फार खराब जालें. मंग निदान उटोन मौजे कुपसंगी येथें सारी मूलमाणसें घेऊन गेले. हे मल्हारराव कुपसंगीस गेल्यावर तेथील वतन करूं लागले ताई कांहीं दिवस होती तों पर्यंत ताईचे आज्ञे प्रमाणें तेथील कारभार चालत गेला मग ताईचा काल जाला. उपरांतिक तिची क्रिया जाली ते समई ते वेलस मल्हारराव होते त्यांनींच क्रिया केली वरकड कोणी नव्हतें भगवंत रावाचा काल जाला. त्याचे लेक दोघे थोरले हिंदु-स्थानांत दोघे लाहान या तापत्रयांत नरसिंग राव सिवदेव याची नकल पोटीं कोणी नाहीं गोविंदराव हिंदुस्थानांत समयास कोणी नाहीं त्रिंबकराव याचे लेक मल्हारराव होते त्यानी क्रिया ताईची केली आणि वतनही चालऊं लागले तेन्हां मुसलमान यासी व मल्हारराव यासी नित्य कर्जाये होऊं लागले तेन्हां जे समई जसें बनेल तस साहित्य होत गल या भांडणामुले रुपायाही फार नाश जाला परंतु मल्हारराव तेथें कुपसंगांत राहिले त्यांत काल पडत गेला तो सविस्तर फार आहे कोठवर ल्याहावा परंतु कार्याकारण लिहिला आहे. रुपये हकडून देत गेले परंतु पुरेना तेन्हां त्यानींही कर्जवाम करून तेथेंच होते पांढरे यांचा आमल उडाला श्रीमंत पेशवे यानी तो मुल्लुक तमाम घेतला आणि मंगळवेढे परगणेस भाऊसाहेब व नानासाहेब यानी कौल दिल्हा मग राज्य स्वस्त जालें झाडी तुटली राण लागलें तेंन्हा सुबता जाली परंतु पहिलें देणेंचा तापत्रय तसेंच बोढींत मल्हार राव कुपसंगींत होते मग धाकटे भाऊ गुणवंत राव हिंदुस्थानांत लाऊन गोविंदराव यांचा काल बरा होता याजकरितां त्याजला तिकडे लाऊन दिल्हें आणि हे घरीं कुपसंगीत होते नरसिंगराव सिवदेव हे तिसरे पुत्र सिवराव जनार्दन याचे याचें वर्तमान हे लाहान होते तेन्हां तीर्थ रुपा बराबर होते तीर्थरूप व मातोश्री मसुरांत आली तेन्हां त्याज बराबर मसुरास आले लग्न तों माघेंच या विपत्यकालांत जालें होतें येथे मसुरास त्याचे वायकोस तिचें नांव आऊबाई तिजलाही माहेराहून येथें आणिली उपरांतिक कांहीं दिवस घरांत होते तों ते फंदी होते तेन्हां येथील भावाची चाल पाहून त्यास ईरशा आली की आपण भावाची वोशालगतीन भाकर खाऊन राहावें हे उत्तम नव्ह मंग आपले मामा आचितराव होते त्यासी येक रोज बोलले कीं मामा आम्हीं लाहान तुम्ही सांगोपान केले त्यास आतां आम्ही थोर जालों आम्ही भावाचे घरीं भाकरी खात उगेच रांडपण घालावें हें उत्तम नव्हे त्यास आपण वडील आमचे वडलांचेही आपण सांगोपन केलें मी तर तुमचे लेंकरूं परंतु बाहेर भीक मागेन परंतु याचे घरीं उगीच भाकर खाणार नाहीं भगवंतराव यानीही वडलाचेच नांवावर रोजगार मेलविला आहे आणि आम्हीही सिवरायाचेच लेंक त्यास आपण मजविशी कंबर बांधावी आणि साताऱ्यास चालावें मी बराबर येतो शाहू महाराजांची भेट घेऊन मला तेथून रोजगारास लावावे हे न केलें आपण तर मी मुलकावर जाईन तेन्हां हें बोलणें त्याचें येकोन आचितराव

मामानी नरसिंग राव यासी बोलले कीं बाबा तूं लेंकरू आतांच तूं खटपट करूं नको तुम्ही बरे थोर जालेवर मग रोजगार करूं तों पर्यंत भावाचे घरी राहा तसे बरे आहां जेऊन स्वस्थ आसावें यांत उत्तम यैसे बोलले तेव्हां हे यैकनात मंग आचितराव यानी भगवंतराव याचे कानावर घातलें कीं नरसिंगराव आसें म्हणतो याचा विचार काय तेव्हां भगवंतराव बोलले कीं उत्तम आहे रोजगार करावा तेव्हां आचितराव भगवंतरायास म्हणाले हें तुम्हास कर्णे तर याचें साहित्य करून देणें आणि तुम्ही सातान्यास जाऊन यांचा माहाराजापाशीं बोलून बंदोबस्त करून देणें तेव्हां भगवंतराव बोलले कीं आमचे हातून सरंजाम ही याचा करून देणें होत नाहीं आणि माहाराजासी बोलणें होत नाहीं यैसे बोलले तेव्हां जिऊबा नाईक केसकर म्हणून मसुरांत सावकार होते त्याजवल हाजार पांसें रुपये कर्ज आचितराव मामा यानी व नरसिंगराव यानी जातीनिशी काढून घोडी व माणसे सरंजाम करून सातान्यास गेले तेथें जाऊन माहाराजाची भेट घेतली आचितराव मामाचे व माहाराजाचे बोलणें जालें उपरांतिक महाराजानीं आज्ञा केली कीं याची सोय करून देऊं मग तेथें कांहीं दिवस राहून वरचेवर विनंती करित गेले मग येक दिवस आबाजीपंत तात्या पुरंधरे यांचे पुत्र माहादोबा हे होते यानी आर्ज केला मग महाराजानी सवाई बाबूराव दाभाडे याजला आज्ञा जाली कीं हे थोराचे वंवशज आहेत तुमचे सरदारींत यास ठेवून ऊर्जित कर्णे आसी आज्ञा जाली तेव्हां नरसिंगराव याची सरदारी दाभाडे तलेगांवकर त्यांजकडे राहिले रोजगार करून घरास आले आणि च्यार रुपये कर्ज करून दाहावीस घोडे घरचे केले आणि च्यार लोक सिलेदार ठेऊन तलेगांवास चाकरीस गेले कांहीं दिवस तेथें चालले श्रीमंत पेशवे यासी व दामाडयासी थोरले जूज जाले तेव्हां त्या जुजाचे तटांत नरसिंगराव पडले ते वेलस गोविंदराव याचे धाकटे भाऊ तेसमई त्यावरशी भावांनीं बराबर नेले होते जेव्हां त्याचा काल जाला रणांत पडले तेव्हां आपले भाऊ नरसिंग राव यांचा मुडदा जातीनिसी येक मिराबाजी म्हणून होता यैसी उभयतांनी त्यांचा मुडदा काढून आणला. दोन दिवस जिवंत होते मग त्याचा प्राण गेला. ते सरदारी पुढें गोविंदराव याचे गला पडली तेव्हां मागील देणें घेणें सरदारींचे ते यानी पुढें चाकरी करून वारीत गेले दामाडे बुडालें नाना प्रकार जाल संकलित लिहिलें आसे सारांश नरसिंगराव यानी आपला काल जोपर्यंत जिवंत होते तोंपर्यंत आपली मेहनत करून पोट भरून होते भगवंतरावं भाऊ परंतु त्याचे दैवलतींत कांहीं खाऊन राहिलें नाहीं एक मात्र होते कीं मुलुकगिरी करून आले म्हणजे घोड्यास दोन महिने गवत मात्र याचे कुरणांतील चारावें इतर सरदारीचा खर्च याजकडे कांहीं नाहीं त्यानी परस्पेरें मिलवावे आणि खावे दोन रुपये कर्जही परभारे करावे आसे करून होते भगवंतराव यासी त्यासी कधी बनल नाहीं याचा काल जाला मग त्याचे देणे व सरदारी गोविंदराव यानी करूं लागले त्याचा कारभार सारा आचितराव मामा करूं लागले होते याचे संवसारांत त्यांचे कर्ज नाहीं यैसें जालें, नरसिंगराव मेले त्याचे पोटीं संतत कांहींच: जाली नाहीं येणेंप्रमाणें तिसरे भाऊ नरसिंगराव सिवदेव याची करिणा आसा आहे त्यांची बायको मात्र होती आतां चैथें रायाजी जनार्दन याचे पुत्र गोविंदराव याचा मजकूर बेंगपुरांत रायाजी जनार्दन होते तेव्हां लहानच हे होते त्याजवर कुपसंगीत आले तेथून सिरीटीकडे गेले तिकडून मसुरास भगवंतराव यानीं रोजगार केला तेव्हां मसुरास मायबापाबराबर आले तव्हां मुंज्य जाली होती दाहाबारा वरशाचे होते मग च्यार वरशे विद्याआभ्यास केला तेव्हां पंधरा सतरा वर्षांत वय आल मंग लग्न नाहीं तेव्हां आचितराव मामा यानी लग्न केलें लग्न करून नरसिंगराव वडील भाऊ याचा व गोविंदराव याचा ऋणानबंध फार तेव्हां घरची आवस्था सर्व नरसिंगराव यानी पाहून यास आपले बराबर लस्करांत दाभाडे यांचे घेऊन गेले तेव्हां त्या सरदारींत काल नरसिंगराव याचा जाला मग ते सरदारी गोविंदराव करूं लागले त्याचे देणेंही यानीच वारावें आणि पोट भरावें मग दाभाडें तर बुडालें तेव्हां कोठ चाकरी करावी तजवीज करून आचितराव मामा हे महादो बापु पुरंधरे कडे गेले यास वर्तमान सांगितल तेव्हां बाजीराव पेशवे जिवंत होते त्यानी

बाजीराव. याचे कानावर घालून याचे सरदारीचा बंदोबस्त केला बाजीराव यानी ठेवलें नावाचे सरदार गोविंदराव सर्वे कर्णे आचितरावमामा आसें जालें तेन्हां दोत च्यार मुलकगिऱ्या केल्या बाजीराव पेशवे याजबराबर फिरले तेन्हां बाजीराव साहेब यांचा काल जाला मग त्यांचे पुत्र श्रीमंत नानासाहेब व दादासाहेब व जनार्दनराव यैस तिघ व चिमाजीआपा यांचा पुत्र भाऊसाहेब यैसा यानी पुढें सरदारी चालविली वसई माघेच घेतली उपरांतिक तमाम मुलूक पेशवे घेत चालले तेन्हां संबाजी सिंदे यांची सरदारी उभी ठाकली रामचंद्र हरी यास पागा सरकारची त्याचा कारभार गोविंद हरी आसें होते तेन्हां पांढरे कासिगांवकर बहिरजी यांनीं फार उपद्रव केला. तेन्हां करकंब व भोस व मंगलवेढे व कासिगाव हे श्रीमंतानीं सरकारात घ्यावी आणि बहिरजी पांढरे आणि जिवाजी पांढरे . व रंभाजी पांढरे याचें पारपत्य करावें यैसें ठरलें त्यावर फैज नेमली संबाजी सिंदे व पटवर्धन रामचंद हारी वगैरे पतके देऊन गोविंद हारी यास कारभार सांगून सरकारांतून पांढरे याचें पारपत्य करून मुलूक घेऊन ठाणीं बसवावी आसें जालें तेन्हां हे फैज बराबर यांचे पतकाची नेमणूक जाली तेन्हां गोविंदरायास आचितराव मामा यांनीं समागमें घेऊन पांढरे याचे मुलकांत आले पंढरपुरांत ठाणें बसले तसच मोश्यांत ठाणे बसविलें व करकंबत ही ठाण बसविलें जुजें फार जालीं पांढरे मोडले साऱ्या मुलकांत ठाणीं बसविलीं तेन्हां पांढरे मोंगलाईंत गेले मंगलवेढेसुधां ठाणीं श्रीमंत पेशवे यांची रामचंद्र हरी व गोविंद हरी यांनीं बसविलीं ते समई मौजे भटउंबरें परगणे करकंबे येथील पाटिलकी रायाजी जनार्दन यांनीं घेतली होती ती पाटिलकी सिवराव जनार्दन याजकडे आली तेन्हां ते पाटिलकी कामास्तव सिवाजी जनार्दन व रायाजी जनार्दन यांची बायको ताईबाई या उभयतांनीं बेंगपुरांत आन खायास नाहीं तेन्हां कान्होशा सावकार जातीचा क्षेत्री बेंगपुरांत होते त्यास महजर देऊन गाहाणवट मुदत करून रुपये घेऊन दिली महजर त्यांजला दिल्हे मुदतीस रुपये देऊन देऊं तर पाटिलकीस बोलायास संमध नाहीं यैसें लेखून देऊन त्यांचे स्वाधीन महजर केला आणि रुपये घेऊन खाले त्या गोष्टीस पंचवीस तीस वरशें जाली याजवर काल तेन्हां रुपाया कोणाजवळ आहे जगायाचें मुसकील तेन्हां वतनाची आशा कोणास याजमुल बहूत दिवस जाले कोणीं खबर घेतली नाहीं अगत्य कोणास या अर्थी बुडाली ज्यांनीं पाटिलकी ठेविली तेही मेल आणि त्यांचे लेंक भगवंतराव यांनीं जिंदगानी बरीच केली परंतु त्यांनीं ही सोडविली नाहीं व वरकड ही वतनाची खटपट केली नाहीं तसेच मेले मर्ते वेलस लाखरुपये कर्ज मात्र केले मुल बायका कर्जदाराचे दारोदार करून मेले परंतु वतन सोडविल नाहीं आसो त्यांचा काल तसा जाला बरें त्रिंबकराव हे थोरले पुत्र सिवरायाचे यांनीं सोडवावी तर यांनीं जेऊन काल घालविला यांचे पुत्र मल्हारराव वडील हे ही कर्ते होते यांनीं च्यार रुपये मेलवून होते पर यांनीं रत्नाकरपंताचे रोजगारांत च्यार रुपये मिलविले आणि प्रपंच केला लग्न केली परंतु वतनें कोणी सोडविलें नाहीं नरसिंगराव यांनीं सोडवावें तर थोड्यातच मरभर होऊन मेले तेन्हां वतनाची परत कोणी केली नाहीं या अर्थी वतन बुडालें दिवस फार जाले तेन्हां गोविंदराव हे चैवघा भावांत धाकटे वतन वडलानीं दिल्हे कान्होशास तेन्हां पांच वरशोंच परंतु आचितराव मामा त्या कालचे यांस सर्व ठाऊक होतें मग यांनीं ते वेलस कान्होशा तर मेला. त्याचे पुत्र होते त्यांसी संदर्भ लावला तों त्याचें म्हणणें पडल कीं तुम्हांस वतनास बोलायास संमध राहिला नाहीं पाहातां खरें तेन्हां त्याची सावकारीही थोडी बसली होती मंग गिरीवडवे व आवंतर ही ते वेलच कितेक होते त्यानीं व आचितराव यांनीं त्यास भिडस घालून व सरकारचा दावेदार गोविंद हरी व रामचंद्र हरी व संबाजी सिंदे सारांश त्या वेलस गोविंद हरी यांनीं फार कुकम केली तेन्हां त्यास रजावंद करून त्याजपासून रुपये घेतले होते त्याचे व्याज मुदल ठराऊन चार रुपये करार करून त्यास द्यावे आणि महजर घ्यावा यैसें बोलण्यात आणिलें रुपये घ्यावयास जागा नाहीं तेन्हां गिरीवडवे व शामभट ठोणपे व आवांतर येसे याजापाशीं कर्ज घेऊन तेन्हां मुलकांत अथवा सरदारींत रुपाया कोटील

रुपाया उत्पन्न होणे कठीण परंतु नाना प्रकार व्याजे व मनोत्या व आडत्या कबूल करून कर्ज मिळविलें आणि गोविंद हारी याचे हातून करकंबकर देशमूख देशपांडया यांचे विद्यमानें कानोशा सावकार यास रुपये देऊन मौजे भटउंबरें येथील पाटीलकीचा महजर माघारा घेतला येणंप्रमाणें उंबरें गोविंदराव सिवदेव यानी आपण रुपये दिल्हे आणि वतन घेतलें ते समई करकंबत ठाणें रामचंद्र हरी गोविंद हरी यांची बसली तेवेलस रामचंद्र हरी याचे सरंजामांत करकंब लाऊन श्रीमंत पेशवे नानासाहेब माऊसाहेब यांनीं दिली ते पाटिलकी गोविंद हरी यांनीं गोविंदराव यास घेऊन दिली हें सर्वांस ठाऊक आहे तेव्हां करकंबत कमाविसदार बहिरोपंत म्हणून गोविंद हरी यांनीं ठेविला मग पाटिलकी करावयासी गुमास्ता पाहिजे तेव्हां जनोबा मनसबदार म्हणून पंढरीस होते त्यांस वेतन करून तेथील पाटिलकीचें कामकाज त्यास सांगितल आणि त्यास गोविंद हरीचे रुबरू बहिरोपंत कमाविसदार यांचे स्वाधीन व देशमूख देशपांडे यांचे विद्यमानें जनार्दन पंत गुमास्ता वतनावर ठेवेला. येसे सांगून गुमास्ते जनार्दन पंत ठेवले त्यांस त्यांची देखरेख सर्व गिरीबडवे यांस सांगितली कर्जही त्यांजपासून घेतलें आणि हाली वतनावर गुमास्ता नवा जनोबा ठेवला हाही आणि वतनाची देखरेख गिरिबडवे यांस सांगू हे मावारे फैजा आल्या त्याजबरोबर आले त्यांजवर मुलूकगिरी हिंदुस्थानांत जाली तेव्हां हिंदुस्थानांत श्रीमंत नानासाहेब व माऊसाहेब व मल्हारजी होळकर व राणोजी सिंदे व केवडे आवाजी व येशवंतराव पोंवर येश्या फैजा श्रीमंतांनीं बराबर घेऊन बुंदेले यांचे मुलकांत गेले ते समई हेही तिकडे गेळे बुंदले यांचे काम काज होऊन फैजा माघाऱ्या फिरल्या ते वेलेस हिंदुस्थानांत नरवर व गालेर पंचमहाल विठलराव सिवदेव यास दिला परंतु तेथें ठाणें येक बसले नाहीं उभ ठाकायास जागा नाहीं नरवरक राजा यांजपासीं सरंजाम मारी तसाच गालेरीत येणंप्रमाणें मवासी मुलूक कोणी तेथें राहीना मंग मल्हारजी होळकर व शिंदे व श्रीमंतांनीं यास तेथें विठलराव सिवदेव यांचें तर्फेस लावून यास ठेवलें कां म्हणाल तर आवरंगजेब बादशहाचे वेलस रायाजी जनार्दन यांनीं दौलत भारीच केली त्यांचा वंवश हे आसे पुरंधरे यास ठाऊक आणि ते कालचे कारभार केलेले आचितराव मामा यांचे वेलचे येस समजून आचितराव मामा खटपटी पुरुष बाजीराव व चिमाजीआपा यांनीं वसई घेतली तेव्हांपासून हुजरातीस हे आचितराव गोविंद रायांस घेऊन होते दत्ताजी घोरपडे येणेगावकर व पसाजी माने व जगदले मंडली सर्व येकत्र होते वसईस हुजरातीचे मोर्चे उधलले तेव्हां जरीपटकाही माघारा निघाला परंतु ते वेलस आचितराव मामांनीं आपला मोर्चा सोडला नाहीं ते समई करीमखान व दाऊभाई येसे दोघे मुसलमान करोल यांचे पागचे होते. ते मर्द माणूस होते हुजरातीचे मोर्चे माघारे निघाले जरीपटका माघारा निघाला. परंतु आचितराव मामा हे आपली लोकाची मंडली घेऊन हे दोघ करोल घेऊन मोर्च्यांत बसले होते तेव्हां सरकारचे मोर्चे माघें काढून पुढें या मोर्च्यांवर वसईचा सरदार पुढें लोक घालून माघें आपण डोसकीवर आबदागीर धरून येत होता कीं हा मोर्चा उडऊन कापून काढावा या उदेशें येत होते तमाम हुजरात तमाशा पाहत होती मंग आचितराव मामा हे दोघे करोल व आवांतरही सें पनास माणूस घेऊन बसले होते ते समई मामा उभ राहून करीमखान म्हणून करोल होता त्यास बोलल कीं करीम कसें करावें आसें म्हणतात तों तेही जवळ आले आणि देव या संधि हिमत दिली मग ते वेलस करीमखान यानें मोर्च्यांतून पुढें उडी टाकून बंदूक छातीवर धरून तो सरदारच ठार मारला. तो मरतांच त्याची मोरचे माघारी फिरली ते वेलस लैवकीक यांचा बरा जाला मर्दमाथुसें आसें ठरलें होतें केलळ पुरुश तेव्हां यांस बोलाऊन सांगितलें कीं तुम्ही या प्रांतांत राहून इकडील ठाणीं बसविलीं तीं दुसरे कोणीं राहिनात मग यांनीं ओंगंजी करून राहिले तेव्हां बराबर लोक कोणी राहीना रान काटक मवासा भारी थांगा कोठें नाहीं घोडयांचे पाठीवर रात्रदिवस बसाव टाकऊन पंचवीस जागे बदलावें आपले बळें जिथ राहावें तेथें राहावें येस कठीण तेव्हां लोक यांचे पूर्वील ममतेचे मामा यांनीं

लोकास फार रीड घातल कीं ये वेलस तुम्ही टाकुन जातां तर सरदारी बुडती आणि लैवकीक जातो तेव्हां ईरकर व पोंवार व सोमण व घाटे कंवेसालसकर यैसे खासे खासे तीनशें आसामी निवडून सेडं मात्र राहिले वरकड बुनगे थोरले फैजे बरावर माघारे घरास लाऊन दिल्हें तशा राणात तीनशें स्वासें घेऊन गोविंदराव व आचितराव सरकारचें आज्ञेप्रमाणें राहिले श्रीमंतांनीं यांस तेथें ठेऊन आपण देशास आले ते समईं मल्हारजी होलकर सुभेदार यांनीं गोविंदरायास व आचितरायास बोलले कीं आचितराव तुम्ही केंऊले मागुत तुम्ही आवरंगजेब वादशायांस पाहलें आणि त्याच चाकरी केली तुम्हांस सांगायें यैस नाहीं आम्ही नानासाहेब भाऊसाहेब यासी तुमची तारीफ करून तुम्हांस हा सुभा सांगितला आहे तर आम्हीं दुसरे मुलूकगिरीस माघारा येतों तोंपर्यंत आपले जिवाचा वचाव करून जितका मुलूक सुटल तितका घेणें आणि राहाणें देव तुम्हांस येश देइल यैस बोलल आणि वस्त्रें दिलीं तुम्ही फिकीर न करणें आम्ही नजद वरसात येतो यैस वलून यास ठेवल तसेंच श्रीमंतांनींही वस्त्रें देऊन आज्ञा यासी केली हे राहिले थोरल्या फैजा झाडून आल्या देशास तेव्हां यांनीं तेथें राहून चार महिने वरसात आंगावर घेतली दिवसांतुन पंचवीस जागा वेसार करावे आणि मारीत फिरावें तेव्हां चौव महिनीयांनीं इटावें म्हणू येक गढी होती तीथील पाटील यांस भेटला आणि त्यान जागा दिली मग तितके आश्रयावर दम खाऊन याचे सुत्रें च्यार मवास राज्याचे नरवरकराचे द्वेशी होते ते त्यानें यांस मिलऊन दिल्हे उभरशेरेकर त्याजपासी पायदल पनास हाजार व माधवसिंग उभरटी कठोलीवाला याजपासीं वीस पंचवीस हाजार पायदल व घोडे तसाच बुधसिंग सुभेदार व धुरीचा पोंवार जोरयावला यैसे जमिनदार यांसी चैवथे महिन्यांत भेटले मग यांनीं तिकडील फैजच ठाण केला गौवालेरीचे व इतर दाहा हाजार ठेवले व पैदल पनास हजार तिकडील सिवंदी सस्त दर माणसी निरख येक आणा ध्यावा स्वार मात्र पठाण मारी ठेवले इतकी जेमतेम करून नरवरचे राज्यावर चालून गेले तेव्हां नरवरापासुन साहा कोसावर पकछा म्हणून ठाणें आहे तेथें त्याची नरवरकर राजे याची दाहा वीस हाजार स्वार व पायदल पंचवीस हाजार व तोफखाना यैसा जमून तेथें येऊन उतरले हेही आपला जमाव घेऊन यांनीं च्यार ठाणीं घेतली होतीं वडवें सराई येफ चिनोरें म्हणून मढीं व ठाणें येक व सालभाई म्हणून किला चांगलाच होता तो व सिटावा म्हणून मढी होती ते घेतली आणि नरवर पंच महालांत मुलकांत ठाणीं घालीत चालले तों इतक्यांत नरवर कराची फौज पलाछयावर येऊन उतरली मग हे आपले जमाव घेऊन त्यांचे मोकाव-ल्यास उभे राहिले त्यांत आपले देसचे तीनशें वाकी झाडून रांगडे जिवन तीनशें मग मोकावला जाला. जूज होऊं लागलें तेव्हां त्याजकडे तोफखाना भारी रात्र दिवस बारा रोज येकसा गोली चालली मैदा-नांत तेव्हां सातशें घोडे पठाणाचे ठार पडले माणसें मेलीं मोठें युद्ध जालें तेरावें दिवशीं त्यास घेरून कापून तुटून परत करून माघारें घातलें नरवरांत यांची फचे जाली त्याजवर दैव हातीं धरेल नरवर व गोलेर प्रांत आवेधा घेऊन चेवलीपर्यंत दुरधार वसीकारवर हा मुलुक तमाम गढयासुधां घेऊन ठाणीं वसविलीं आमल केला तेव्हां सिवंदीचे तंटे व घोडी पडले तेतचें यैसे सर्व मेहनत करून वरून लाखों रुपये सरकारांतही दिल्हे आणि आपणही मिळविले यांचा वयाण कोटवर ल्याहावा सारांश आसी मेहनत आंगीनें करून गोविंदराव यानी दैवलत मिळविली तिकडे नीट जाल्यावर सुबत्ता जाली मग देशास घरास वटकी व गुरें म्हणी व बैल व खर्चास व कापड यैसे वडील भाऊ भगवंतराव होते जिवंत ते वेलस दोन खेपा पाठविल्या कांहीं कर्ज वारायासही यैवज हुंडया करून भिराखान हावालदार याज-बरावर पाठविल्या थोडी सुबत्ता भगवंतराव यांस पडली तेव्हां गोविंदराव यास संतत दोघे लेक जाले होते नरसिंगराव साता आठा वरशाचें माधवराव पांच होऊन साहावें लागलें होतें तेव्हां याच्या मुंजी नव्हत्या गोपालराव व भगवंतरावाचे लेक लाहान यांची मुंज्य जाली नव्हती उपाध्ये कोनेर भट याचे पुत्र चंद्रभट त्यांचे पुत्र रामभट यांची मुंज जाली नव्हती लक्षुमणराव माहा याचे लेक जिवणराव हे

पुत्र बहूत नवसानें येक त्यांस जाले त्याची मुंज व ती येथील कालेतां खायास आन नाहीं दगेंदारामुलें मुलें लेकर बायको व भगवंत राव व याचे पुत्र बापू व खंडेराव यांस बाबूराव उगावे यांनीं धरून साताऱ्यास नेलें व जनोबा यांस रायाजीपंतानीं धरून नेलें बापू व भगवंतराव हे लपत फिरूं लागले वरकड बायका मुलें तांबव्यास पळून गेलीं च्यारच्यार फाके येसी गत इकडे हुजर शाहू महाराज मेले सरदेशमुखीचा आमल निघाला व ये देशचा आमल केला तों आंगावर आला त्यांचे देणें तेव्हां तिन्ही लोकीं राहायास जागा मिळेना खायास आन मिळेना तेव्हां कालगांवकर आच्यार्ये गोपालाचार्य हे भगवंतरायाचे जांवाई यांनीं ते वेलस हिंमत देऊन कांहीं काळ दाणे वगैरे रुपये देऊन कर्ज देऊन चालविलें परंतु कुटुंब थोर चालना फार घाईत आलें इतक्यांत ईस्वर गोविंदराव यांस देव दया करून हिंदुस्थानांत राजमार मारीच जाला. तशा कालांत मुलाचें मुंजी होणें आणि संवसाराचा बखेडा भावाचा व देणें येस समजून मिराखान याजवरावर पंचवीस बटीक व पनास साठ म्हैस व कापड व दाहा पंधरा हजार रुपये हुंडया गेल्या हुंडया मिराखान हवालदार याजवरावर पाठविलें त्यांत आपले बायकोस येक हजार रुपये पाठविले येणेंप्रमाणें सारी भावाकडे पाठविलें तेव्हां भगवंतराव यांनीं जो रुपया आला तो सर्व आपणच घेतला वरकड पाठविले होते तेही घेतले परंतु त्यांनीं आपले बायकोस हजार रुपये पाठविले ते दिले नाहींत व एक म्हैस दुपत्यास दिली नाहीं व एक येक बटीक दिली नाहीं या सान्या मुलाचे मुंजी मात्र येकच वाड्यांत दोन दिवस कनिष्ट पक्षाच्या केल्या आणि येवज आपण घेऊन कलल तसा खर्च केला तेव्हां घरांत बखेडा गोविंदराव यांची बायको व दोन्ही मुलें आपले माहेरास घेऊन गेली कांकीं तिचा बाप लक्ष्मणराव मामा याचे कारभारास भगवंतरायाचे होते तेव्हां देणें घेणें याजे विद्यमानेंच कांहीं जालें होतें तेव्हां ते मागावयासी येत रुपया मिळना मग आबरू वर आली तेव्हां त्या कालांतच आबरूचा माणूस यास देणेंची आंच सोसेना मग परसाकडचे मिसें बाहेर जाऊन कनेरीच्या मुल्या वांटून प्याले आणि भगवंतराव यांचे वाड्यांत येऊन निज्याले हे वर्तमान कोणास ठाऊक नाहीं तेव्हां निजल जाग्यास त्याचा प्राण गेला तेव्हां त्याचे कर्मांतर करून तिची आई सिऊबाई होती तिचे पोटीं एक पुत्र तो लाहान यास्तव आपले आईचे घरी जाऊन राहिली तशांत हिंदुस्थानांतून खर्ची आली ते ही भगवंतराव यांनीं दिली नाहीं तेव्हां तुकु फुटाणे व लिंगापा गुजर याजपाशीं कर्ज घेऊन हे खाऊन होते मिराखान आला त्यापूर्वी कांहीं स्वल्प खर्चास हिंदुस्थानांतून पाठविलें तेव्हां देखून भगवंतराव यानीं आपले पुत्र वडील बापू होते त्यास पाठविले होतें या विपत्तीमुळ ते जाऊन गोविंदराव याजपाशीं पावले तेथें गेल्यावर त्याचे स्वाधीन सालबाईचा किल्ला व तेथील मामलत व पागा घरची येसी त्याचे स्वाधीन करून ते माहालीच होते मग मिराखान दुसरी खेप घेऊन आला तेव्हां तिची गत आसी जाली सबब दुसरे लेक खंडेराव तेथें पाठविले तेही हिंदुस्थानांत गेले वर चिनोरचा किल्ला त्यांची सरदारी देऊन त्यांस तेथें ठेवलें यास मामलतीचें व ल्याहावयाचें ज्ञान नव्हते परंतु लेवकोकाला तेव्हां त्याचे ज्ञानाप्रमाणें खासगत दाहा घोडी घेऊन देऊन बटकी चाकर ठेवून आबदागिरे व सर्व सरंजाम देऊन बालगिळ मल्हारराव त्रिंबक हे वडील भावाचा लेक तेव्हां यांनीं आपले माऊ धाकटे गुणवंतराव हे परभारे हिंदुस्थानांत लावून दिल्हे तेव्हां त्यास घोडीपालखी वस्त्रें देऊन त्यास बराबर पंगतीस जेवावें आणि आसावें त्यास ल्याहावयाचें ज्ञान नाहीं तेव्हां त्याचे योग्यतेप्रमाणें त्यास बालगिल वहिणींचे लेक आनंदराव होतें त्यास पूर्वीपासून बराबरच होते त्यास दफ्तर जामदारखान्याचें त्यास ते या कामावर ठेवले येणे सर्व जे जे होते त्यास ज्याची जशी योग्यता तसे त्यांस बालगोन होते तेथेही नित्य पंगतीस पांचशें च्यारशें पात्र नित्य होत होते येणेंप्रमाणें कालक्षेप हिंदुस्थानांत करून होते त्यांनीं कांहीं दुसरें कोसही दाखविलें नाहीं. येथें देशीं दोन वेल भगवंतराव माऊ आस्ता खर्चास व कापड व गूरें व बटीक पाठविली येथें यांनीं आलें केले

मंग भगवंतराव याचा काळ जाला तेव्हां त्याचे लेंक धाकटे दोघे जनोबा व गोपालराव हे होते जनोबा यांनीं क्रिया केली दिवस जाले मंग गोविंदराव याची बायको व मुलें हेराण तेव्हां भगवंतराव तर मेले कारभारी लक्षुमणराव हेहीं मेले प्रबुद्ध घरांत कोणी राहिलें नाहींत तेव्हां कालगांवकर गोपालाच्यार्ये याचे गळा जाबसाल कोणी आलें तर त्यासी बोलावें आसें जालें मग गोविंदराव याचे बायकोची व मुलाची दशा आसी जाली हें वर्तमान हिंदुस्थानांत माणसांनीं सांगितलें त्याजवरून यासी बोलावयासी तुकोजी जासूद व जाफर म्हणून हिंदुस्थानी याज बरावर खर्चास व घोडीं येसी बोलावयास तिकडून पाठविलें. त्या पूर्वीच भगवंतराव याचा काल जाल्यावर गोविंदराव याचे बायकोचें नांव भिमाबाई यांनीं गोपालाच्यार्ये यांस बोळावून याजपासून शेंपन्नास रुपये घेऊन दोन तीन घोडीं धेतलीं व माणसें ही ठेवलीं आणि मिराखान तिकडून आला होता. त्याचीं मुलमाणस व ही बाई व हिची दोघें व मुलें व उपाधे चंद्रभट व मल्हार॰ पंत माऊ मसूरकर कुलकर्णी येसी सर्व मंडली मिळून हिंदुस्थानांत गोपालाच्यार्ये यांची आज्ञा घेऊन येक दोन दिवस कालगांवीं राहून सर्वांचा निरोप घेऊन तेथून दर मजल चालली मसुरांत या चैवघांची आई कृष्णबाई व भगवंतराव याची स्त्री दादी व दोघे पुत्र व बापूची व खंडेरायाची व जनोबाची बायको व बटकी गुरें संवसार सारा मसुरांत राहिली हे दर मजल राहुरी वांमोरी पावेतों गेले तेथें येक दोन मुकाम जाले तों हिंदुस्थानांतून यासी बोलावयास जासूद व जाफर म्हणून होता तो व घोडी व खर्चासही आले ते यांची नेमणूक होती ते यांनीं घेतली वरकड संवसारास खर्चास पाठविलें होतें तें जासुदाबराबर कागदपत्र व हुंडया मसुरास लावून दिल्ह्या यानें गोपालाचार्येचे जे शे पनास रुपये घेतले ते माघारे जासुदाबराबर माघारे लावून दिले भिमाबाईनीं आपले मातोश्रीस खर्चास परभारे जासुदाबराबर देऊन सर्व कागदपत्र मल्हार पंत माऊ यांचे हातून गोपालाच्यार्ये यांस लेखून पाठविलें आणि हे पुढें कुच करून गेले हा मजकूर आसा जाला. हे मंडली हिंदुस्थानांत पावली भेटी जाल्या उपरांतिक तेथें गेल्यावर माधवराव हे गोविंदराव यांचे धाकटे पुत्र यांची मुंज्य जाली नव्हती मग तेथें जाऊन मुंज्य केली उपरांतिक तिकडे संवसार गोविंदराव करूं लागले तेव्हां भावाचें देणें इकडे मूल माणसास उपद्रव फार होऊं लागला तेव्हां जितके सावकार देणेंदार होते त्यांची याद लेखून झाडून देणें आकारून जे तेथें बोलावयाचे ते बोलाऊन त्यांचे पदरीं रुपाया घातला तेथें न जायाचें त्यांचा यैवज बापू याने पदरीं घालून हिंदुस्थानांतून हुंडया इकडून करून पाठविल्या तो यैवज जनोबा घरचा कारभार येथें करीत होते व गोपालाच्यार्ये यांस पत्रें लेखून ज्याचा यैवज देणें त्यास पावता करविला भगवंतराव याचीं खतें पत्रें होतीं तीं सर्व माघारीं घेतलीं देणेंतून काढलें मग बापू तेथें होते तेव्हां त्याचे हातीं आपले जिंदगानीचा सर्व कारभार केला त्यासी दुसरा विचार ठेवला नाहीं आणि त्याचे वडलाचें कर्ज वारलें आणि त्यास खासगत चैवघांचेही भावास वस्तभाव भांडे कापड जिंदगानी करून दिल्या या सिवाय लाख पनास हजार रुपये नख दिल्हे येणें प्रमाणें त्याची जिंदगानी करून देऊन आपला संवसार सारा त्याचे गळा घालून गाडा चालविला गोपालराव याचें लग्न करून दिल्हें घोडीपिडी सर्व करून देऊन त्याची सोय आसी केली मग बारा वर्षेपर्यंत हिंदुस्थानांत होते वरकडही जितके संग्रही होते तितक्याचा परामृष केला आणि नरवर गोलेर प्रांतीं होते उपरांतिक तेथील मामलत निघाली मग देशास येऊं लागले तेव्हां झांशीस आले तों तेथें नारोशंकर हे गळा पडले तेव्हां त्यांनीं बापू व आपली बायको व दोघे मुलें व सर्व जिंदगानी हे नारोशंकर यांनीं आपले जवळ ठेवून घेतले शें दोनशें पागा शें पनास उंट पालख्या हे सर्व त्यांनीं तेथें सोय करून देऊन ठेवून घेतले तेव्हां गोविंदराव यांनीं बापूचे गळा सर्व घालून मूल व बायका त्या सर्व जिंदगानी त्याचे स्वाधीन करून आपण सडे देशास हिशेबकितेब द्यावयासी आले मग देशी येऊन हिशेब कितेब सर्व देऊन फडशा जाला तों पर्यंत सरकारची बोलावणी नारोशंकर व लक्षुमण शंकर यास आलीं तेही मागून देशास आले श्रीमंताची भेट जाली त्याचाही फडशा

जाला. उपरांतिक हिंदुस्थानांत आमानसिंग व हिंदुपत व जकतराज बुंदेले यांचा भाऊपण्याचा कजिया पडला तेव्हां तिकडे नारो शंकर याची फौज हिंदुपत व जगतराज यांचे कुमकेस पाठवावी हे सरकार आज्ञा मंग नारोशंकर यांनीं श्रीमंत नानासाहेब व भाऊसाहेब यांसी विनंती केली आम्ही तर येथें आहों तिकडील कामास फौज पाठवावी म्हणून आज्ञा तेव्हां या कामास गोविंदराव याजला मला द्यावें आणि त्यासी आज्ञा करावी ते गेले म्हणजे तिकडील बंदोबस्त चांगला होईल मग श्रीमंतांनीं उभयतांनें बोलावून वस्त्रें देऊन नारोशंकर याची फौज घेऊन तुम्हीं हिंदुपत याची कुमक करून आमानसिंग याची त्याची भाऊपण्याची वीद वधून देणें येविसी सरकारच्या फौजा पुढें ही गेले आहेत गोविंदपंत तेथें आहेत तुम्ही जाऊन हिंदुपद याची कार्य सिधी करून देणें म्हणून आज्ञा देऊन वस्त्रें देऊन रवानगी केली तेव्हां पुन्हां हिंदुस्थानांत जाणें ठरलें तेव्हां सरकारांत श्रीमंतस व नारोशंकर यांस पुसलें कीं घरास गेलों नाहीं त्यास. पंढरपुरास जाऊन घरचा बंदोबस्त करून तसाच परमारें जातों बोलीलियावर त्यांनीं आज्ञा केली मंग पंढरपुरास गेले तेथें गेलेवर वतनें घेऊन गेले त्याजवर हे जाणें दुसरें तेव्हां पंढरीस जाऊन देवदर्शण करून करकंबस जाऊन देशमुख देशपांडे व हाकिम यांचे घरास जाऊन यांस वस्त्रें देऊन आपले वतनावर वाडा बांधावा हे त्यास पुसून व सरकारचीही आज्ञा घेतली होती तेव्हां सर्वांनीं सांगितलें कीं तुमचे वतनें तुम्ही वाडा बांधावा नांदणूक करावी तुम्ही गुमास्ता ठेवून गेलां त्याचें आम्ही चालविलें आतांही तुम्ही ज्यास ठेवाल त्याचें चालऊं येसे बोलून माघारे आले तो पंढरीस गोविंद हारी होते यांची भेट जाली त्यांनीं वस्त्रें यांस दिलीं यांनीं वस्त्रें त्यांस दिलीं मेजवानी जाल्या च्यार दिवस तेथें राहिले पहिले गुमास्ते जनार्दनपंत मनसबदार होते ते येऊन भेटले व गिरीबडवे व शामभट ढोणपे हे क्षेत्र उपाधीह भेटले गुमास्ते यांनीं गिरीबडवे यांचे विद्यमानें हिशेब सर्व दाखविले फडशा केला त्यास देणें तेथील जे बोलल्याप्रमाणें सर्वांचे फडशा केले मग वतन घेतलें होतें त्याचें देणें कर्ज तसंच होतें मग त्यांचा हिशेब करून सर्व कर्जाचा फडशा केला तों हे आले. पंढरीस हें वर्तमान त्रिंबकराव यांचे पुत्र मल्हारराव हे कुपसंगीत होते हेही भेटीस आले तों यास अन्नवस्त्र नाहीं. तेव्हां त्यास आपले पोशाक दिल्हें घरीं खर्चास पाठविलें घोडी खासी बसावयास दिली तेंही शाहाणे बापू पेशा लिहीणार व बोलणार परंतु कालचक्राचा फेरा तेव्हां सर्व जाले आतां उंबऱ्यावर वाडा बांधावा तेव्हां त्यास पुसलें कीं वतन घेतल याचे रुपये आज दिल्हे पुढें वाडा बांधावा आसें मनांत आहे तुम्हीं भाऊ आहां तेव्हां तुमच्या मनांत कांहीं आसल तर सांगा तेव्हां यांनीं बोलले कीं तुमचे उंबऱ्या आमचें कोणाचेंही कांहीं नाहीं तुम्हीं वाडा बांधावा आमचा वाद कांहीं नाहीं तुम्हांपेक्षां वतन अधिक नाहीं व वतनास कमी काय याशिवाय आणखी आहेत ज्यास सामर्थ्य असेल त्यांनीं करावीं मग ते वडील भावाचे लेंक तेव्हां त्यांनीं व यांनीं उंबऱ्यावर जाऊन वाड्याचा डोल मल्हारराव यांनीं आपले हातें लेहून गिरीबडवे व लक्षुमणराव अनगळ हे कारभारी व गौडे हिराप्पा नाईक व सुतार × × येसेसे सर्व मिळून वाडयाचा बेत करून त्याचा आजमास करून पांच पंचवीस हाजार रुपये तेथें टाकून वाडयाचा पाया घातला कारखान्यावर वाडयाचा गोपालपंत देशपांडे सांगोलेकर यांनीं त्याहावें गिरीबडवे व लक्षुमण नाईक यांनीं चौकशी करून लाकूड धोंडा वडर जें जें कारखान्यास लागेल तें उभयतांनीं घ्यावें त्याहातें गोपालपंतांनीं कारखाना ज्याचा त्यांनीं चालवावा येसा बंदोबस्त करून याचे स्वाधीन येवज केला गांवकीचें काम जनार्दन पंत यांजकडून काढून गोपाल पंताचे स्वाधीन गुमास्त गिरीही गांवची केली सर्वे देखरेख गिरीबडवे व लक्षु नाईक आनगल या प्रमाणें बहिरोपंतास व देशमूख देशपांडे यांस गोपालपंत गुमास्ता यांचे हातून कारभार गांवचा घेण म्हणून सांगून त्याचे स्वाधीन करून कुपसंगीस गेले तेथें जाऊन मल्हारराव होते त्यांनीं घेऊन गेले कुपसंगीस गेले तेथें गेल्यावर आर्धीली भाऊ मुसलमान आहेत ज्या जवलून नूरखान याजवलून पाटिलकी घेतली ते तर

मेले तेव्हां बडेसाहेब व अकबर साहेब हे त्यांचे पोटचे नव्हत बहिणीचा वंश तेव्हां ते पाटिलकी करतात मग याचे घरांत सर्व बायकांस व त्या उभयतांस व त्याचे लेक होता त्यास व चेवगले व कुळकर्णी व बारा बलुते यास सर्वांस वस्त्रें दिलीं तेथें पीर आहे त्यास गलेफ व शेरणी येस सर्वत्रांस करून आठ चार दिवस तेथें राहिले मल्हारराव याची घरची आवस्था तों यास आनवस्त्र नाहीं मग घरांत मुल व बायका यास व पुरुष यांस वस्त्रें दिलीं यांची पोटाची बेगमी केली आणि याचें कर्ज होतें तें सर्व वारून यास समागमें येऊन पुन्हां पंढरपुरास येऊन वतनाचा व वाडयाचा बंदोबस्त करून देशमूख देशपांडे व हाकीम गोविंद हारी व त्याचे कमाविसदार बाहिरापंत म्हणून होते त्यांनीं येकसा करकंवचा आमल तीस वारसे केला होता त्यांसी सर्वांसी जातांना हिंदुस्थानांत करकंवस जाऊन भेटून गोपाळपंत गुमास्ते त्याचे स्वाधीन करून वाडयाविसीं सांगून गोविंदराव हे मल्हारराव त्र्यंबक पुतणे कुरसंगीकर यांस सांगाते घेऊन हिंदुस्थानांत गेले आणि ते समई मथुरास जाऊन तेथें आई तर माघेच हे हिंदुस्थानांत होते तेव्हां मेली होती मग तेथें बापू याची आई व वरकड मूलमाणसें होतीं त्याची व मथूरकर लाहाण-पणापासून तेथेंच होते तेव्हां इष्टमित्र जितके होते त्यासी व घरच्यांसीं भेटून सर्वांस वस्त्रें देऊन दोन दिवस तेथें राहिले ते कान्होजी मोहिते यांनीं सातान्यास ताराऊसाहेब याजकडे होते त्यांनीं दंगा फार केला होता तेव्हां त्यांनीं बातमी राखून मथुरास येऊन यांजवर दंगा केला यांस धरून न्यावें आणि दाहा पांच लाख रुपये घ्यावे येसे केले परंतु हे सावध होऊन जाती निसी एकटे परकन येकीकडे जाले मग त्यांनीं झाडून उंटें व घोडीं व पालखी सर्व चीजवस्त लुटून नेली तेव्हां तेथें हे बाहेर थोरोवाचा डोंगर म्हणून माळ मैदान आहे तेथें जाऊन सर्व घेऊन उभे ठाकले त्याजवर गांवकरी पाटील व सर्व गेले त्यासी बोलले कीं हें तुम्हीं काय केलें हे पेशव्याचे पदरचे पूर्वी माहाराजाचे पदरचे तिकडून आले आम्हांस सर्वांस भेटायास ते तर गेले तुम्ही त्याची वस्तभाव घेऊन जातां हें नीट नव्हे त्यांनीं हिंदुस्थान कारीज केलेंत हे तुमची स्थीत राखूं देणार नाहींत मग त्यांनीं जी चीजवस्त नेली होती ती माघारी कारकून व गांवकरी यांचे स्वाधीन केलीयेक घोडी सारंगी मातेवर व येक चेवरी व कांहीं किरकोल गेलें होतें तितक मात्र गेलें बाकी सर्व माघारें देऊन ते सातान्यास माघारे कान्होजी मोहिते गेले उपरांतिक संध्याकाळीं हेही आले आणि ते दिवशीं राहून सर्वांसी बोलून भगवंतराव यांची स्त्री दादी व धाकटे पुत्र गोपालराव यांसी काशीस पाठवावी म्हणून त्यांची बंदोबस्ती करून त्यांची रवानगी केली बाकी मुलमाणस कुटुंब राहिलें तें गोपालाच्यार्ये कालगांवकर व जनार्दनराव भगवंत याची सर्व बेगमी करून मथुरांत ठेवलें सर्व बोलणें बंदोबस्त गोपालाचार्य यांस सांगून यांचा निरोप घेऊन हिंदुस्थानांकडे गेले तेव्हां मल्हार-राव याचें स्वाधीन इकडून जातेवेलेस लोक ठेऊन गेले त्यांचा व खासगत येसें मल्हारराव करीत होते झांसीस जाऊन पोहोंचले तेथें कुटुंब सर्व जिंदगानी होती व बापू याचे स्वाधीन होती सर्व येकत्र होऊन पुढें हिंदुपत व जकराज बुंधेले हे आमानसिंगासी भांडत होते तिकडे नारोशंकर याची फौज व आपल पतके घेऊन हिंदुपत याजपासीं दाखल जाले आमानसिंग यांसी झुंजून हिंदुपताचा व आमानसिंग राजे यांचा तह करून देऊन माघार झांसीस आले तेव्हां ते वेलस कारभार मल्हारराव व बापू हे करीत होते त्यास माघारें झांसी आले तेव्हां नारो शंकर ही श्रीमंताकडून वस्त्रें घेऊन पुन्हां झांसीस आलें वजद वरसात श्रीमंत दादासाहिब कुंभेरे जाटाची घ्यावी म्हणून हिंदुस्थानांत आले तेव्हां नारो शंकर यास पत्रें श्रीमंताचीं आलीं फौजासुधां येणें, ते वेलस नारो शंकर आपली फौज घेऊन श्रीमंत दादासाहिब यांजकडे चालले तेव्हां गोविंदराव. सिवदेव यास समागमें घेऊन जावें येसें ठरलें तेव्हां रामराव बापू हे भगवंत रायाचे पुत्र त्यांसही हिंदुस्थानांत येऊन फार दिवस जाले घराला गेले नव्हते मग याची मातोश्री व बंधु कासीस आवयास आली होती त्यांच रवानगी कासीस करून दिली आणि रामराव बापूस देशास लाऊन द्यावें येस ठरलें तेव्हां बापूस बोलाऊन सांगितलें कीं तुम्ही देशास जावें च्यार महिने घरीं राहून

माघारें यावें आम्ही नारो शंकर याजवरावर श्रीमंत दादासाहेब आले होते त्याजकडे जातों तेव्हां यांनी देशास जावें यैसें ठरलें ते वेलस बापूसी बोलले आणि मल्हारराव यैसे उभयतांसी बोलले कीं तुम्ही उभयतां आहां आम्ही मौजे मटउंबरें येथील पाटिलकी सोडविली आणि वाडा बांधायास लागलों त्यास तुमचे पितास करें आहे तेव्हां उभतांनीं बोलले कीं सर्वस्व आम्हांस वडील आपण आम्हांस वडला· सुद्धां माणसांत घातलें कर्ज वारिलें पुढें जिंदगानीची सोई करून दिल्हा लग्नें केलीं यात्रा करविल्या सर्व प्रकारें जें आहे ते दैवलत पुढें कारभार आम्हीच करतों त्यांत हें आपण काय म्हण विचारतात यैसी शंमर. वतनें घेऊ यैसें सामर्थ्य आपण करून दिलीं आहेत तर उंबरें येथें आमचा कोणाचाही आर्था· आर्थी संमंध नाहीं आणि हें वतन दोनतीनच वडलांनी मेलविलीं आणि दैवलतीनच गेलीं आणि आतां आपणही आपला पराक्रम करून वतनही मेलविलं आणि आम्हांस चैवघा भावांस कर्ज वारून संवसाराचे सोईस लावल त्या सध्यां वतनांत आमचें कांहीं नाहीं आपण वाडा बांधतेत तो बांधावा आणि बांधणारही आमीच आपण या गोष्टीचा संशय न करावा आम्हांस वाडा नाहीं तर आणखी च्यार वतनें आहेत· त्यांतील देशास जाऊन नीट करूं त्याचे महजर आम्हांजवल आहेत कांहीं फिकीर नाहीं वतन म्हणाल तर आम्हांस तुम्ही बाजारांत नेऊन विकल तरी उजूर नाहीं यैसें बोलणें रामराव बापू व मल्हारराव हे गोविंदराव याचे पुतणे दोघा भावाचे दोघे तिसरे लाहान गोपालराव व खंडेराव हेही होते व मल्हारराव यांचे भाऊ गुणवंतराव हेही होते मग यानीं हें उत्तर केलें तसें गोविंदराव यांनीं डोल्यास पाणी आणिलें या बोलण्याच वेलस मल्हारपंत मसुरकर कुलकर्णी व सिदोजी चव्हाण कोणेगांवकर पाटील व आनंदराव देशपांडे करकंबकर व केशोपंत म्हणून जामखेडकर व इतरही दैवलतीमुलें कितेक पदरीं होते त्यांत ममतेचे जे होते तेही होते त्यांचे समक्ष हीं बोलणीं जालीं इतके होण्यास कारण काय म्हणून कोणी पुसल तेव्हां यास कारण आहे सर्व जागा बायकाचा आदेशा आस्तो तेव्हां गोविंदराव याचे बायको तिच नांव भिमाबाई तिज म्हणणें घरांत काय पडत गेलें कीं आमची जिंदगानी काय दैवलत तर तुमचे वडलाची माघे होती साहेब + + पर्यंत होती त्यापेक्षा तुमची अधिक नाहीं आतां त्यापेक्षां येक अधिक तुम्ही केलेंत कायकीं च्यार रुपये व जिंदगानी त्या पक्षा तुम्ही आधिक केली परंतु याचा भरवसा काय आम्ही परमुलकांत देशांत वतन नाहीं वाडा घर नाहीं मूल लाहान याचीं लग्नें नाहींत तुमचा रोजगार शिपाईगिरीचा भगवंत राक्षितो तों पर्यंत सर्व आहे यास्तव तुमचा भरंवसा काय माझी जिंदगानी व्यर्थ येक मात्र कीं कोणाचें देणें नाहीं येवढी सोय वरकड कांहींच जिंदगानी तुम्ही भावाबंदाचें बरें केलें आणि पुढें त्यांसच कारभार सांगतां तेव्हां कोणाचे भाऊ कोणाचे कामास आले कीं हे आमचे कामास येतील तुम्ही तो भरी भरला आम्हीं बोलावें तर बायका परंतु जिंदगानी माझी ठीक नाहीं यैस कितेका प्रकारें बोलणीं आंतील आंत होतीं तेव्हां हे काय म्हणत कीं तुम्ही बायका तुम्हांस काय कळतें यैसही बोलत आणि समाधानही करीत कीं तुम्ही बोलता तर इतकही करून देतो यास्तव देशास येऊन वतन तर आर्धी घेतलच होतें घर नव्हतें घर बांधावें तेव्हां सर्वांस पुसावें आणि घरही कांहीं लाहान बांधायाचें नाहीं लाख पनास हजार रुपये घालऊना धणार या अर्थी देशास आले तेव्हां सहजच वतनाकडे जाणें तेव्हां भाऊबंदही जवळ या आर्थी वतन नीट केलें वाडा बांदते वेलस मल्हारराव यासी देशांतच पुसल होते त्याची सल्ला घेतली तेव्हांही संशय वरूनच वाडा बांधायाचा आरंभ केला होता आणि मल्हारराव याचे ऊर्जीत करावें म्हणून बराबर आणिले होते मग बापू हे भगवंतराव याचे + + सर्व आपणाजवल होते मग यास देशास वाटे लावावें आपली जिंदगानी करावी बायकोचा संशय फेडावा या आर्थी चैवघे घेऊन बायकोस बसून आपळे पुतणे यांसह घसऊन याप्रमाणें या उभयतांस पुसल त्यांनीं जें बोलायाचें तें बोलले चैवघांनीं यैकीलंच बायकांनीही यैकीलंच तेव्हां चैवघांचाही गेला आणि बायकाचाही गेला भावबंदगीसही कलेल याजकरितां यैस पुन

त्याचीं उत्तरें यैकोन मग बापू याची रवानगी देशास आणखी जें देणें घेणें होतें तें देऊन याची रवानगी केली ते समई बापू यांसी बोलले कीं तुम्ही पुढें जावें मागून मुलाची लग्नें होणें आहेत तर याची व बायकाची रवानगी करून देतां मुलाची लग्नें करून उंबऱ्यास जाऊन तेथील बंदोबस्ती करून देखरेख करून मग तुम्हीं येथें येतांना पंचवीस हाजार रुपये देऊन आलों आहें आताही तुम्ही जातांना पनास हाजार रुपये घेऊन जाणें आणि च्यार सुतार गौडयांत आधिक लाऊन जलद वाडा तयार कर्णे कांकीं इकडून मुलमाणस येतील तोंपर्यंत यास राह्यास जागा होय यैसें कर्णे आणि तुम्ही ही लग्नें करून मग माघारे बरोबर येणें यैसे बोलले. आणि त्याचे सिधता होऊं लागली त्याची सिधता केली त्याज-बरावर वाडा बांधायास पनास हजार रुपये हुंड्या करून दिल्या आणि पहिलेही पंचवीस हजार रुपये दिलेच होते बापूची रवानगी करून दिली आणि आपली सासू लक्ष्मणराव याची बायको काशीस पाठवायास त्यांची रवानगी करून देणें म्हणून सांगून रवानगी केली यैस वर्तमान जालें त्यास दुसरा संवशय कोणी घेईल कीं इतकेंही जालें परंतु ते कालीं बोलल्याप्रमाणें कागदपत्र जालें कीं नाहीं यैसा कोणी संवशय घेईल तर जे वेलस हें बोलणें झालें तेव्हां गोविंदराव याचे बायकोनीं म्हटलें कीं तुम्ही आपले पुतणे यासी बोलला परंतु तेही बोलले मी यैकिलें परंतु याजप्रमाणें कागदपत्र करून घ्यावें यैसे बोलले तेव्हां गोविंदराव आपले स्त्रीवर राग भरल कीं बायकानीं घरांतील कारभार करावा इतकी बोलायास तुजला योग्यता काय हेंही मी त्यासी न बोलावें परंतु तूं रडतीस म्हणून इतकें बोलून त्याचें चित्त मीं दुखविलें ही गोष्ट मीं त्यास पुसूं नये मज योग्य हें नव्हे मजला आसा संशय आस्ता तर मी इतक यांस मोकल न करतों यास याचे फेध्यात घालून गालतोंची भलताच संवशय काढतेस ते कांहीं आज्ञान नाहींत त्यास सर्व उमजतें आणि रायाजी जनार्दन याजपासून दैवलतही होत गेली आणि वतन ही जाली परंतु च्यारी भाऊ येका जागा बसून निराले जाले आणि च्यारी भांडीं वाटून घेतलीं च्यारी वतन वाटून घेतली त्याचे कागदपत्र करून घेतले आसें रायाजी जनार्दन याजपासून आमचे वडील सिवाजी जनार्दन यांजपर्यंत कोठ जालें किंवा सिवाजी जनार्दन याचे पुत्र आम्ही चैवघे यांत तऱ्ही आम्ही चैवघांनीं येकत्र होतों ते निराले होऊन कोणत्यानें कागद पत्र मांडीं व वतनें वाटून घेतलीं आणि निराले जालों कीं मीच आतां कागदपत्र करून निराला होऊनसी आमची वंवशाची चाल पूर्वीपासून आहे तसी चालली आहे तूं कांहीं लटका आदेशा घेऊं नको तुझा संवशय फेडावा म्हणून इतकें बोललों नाहीं तर याचेंही कारण नाहीं. तुझें वतन मटउंबरें तुला राह्यास वाडा त्याजकडूनच बांधविला आहे दोन तर जालीं आतां मुलाची लग्न होणें येथें पाहिजेसी आसली तर इकडच करतो नाहींतर बापूस सांगितलें आहे ते पुढें गेलेत तुम्ही मागून चेव महिनी यांनीं जाणें तोंवर येथील सांभालायास व काशीस लाऊन यायास तुमची मातोश्री आणविली आहे ते येताच तुम्हीं देशास जाऊन लग्न करून येणें आपलें वतनही पाहाणें आणि वाडा ही पाहाणें चैवघांची भेटी घेऊन येणें यैसे कागदाचा आदेशा काढला व चैवघे ममतेचे होते तेही म्हणाले कीं रावजी वाजवी म्हणतात त्यांचे घरांत शंभर वर्षे चाल नाहीं आणि खर आहे मागील वहिवाट पाहतां तुम्ही संवशय न घेणें तत्रापि कोणी बोलतील तर यांची उत्तरें उदंड आहे या वतनावर आर्धी दुसऱ्यास बोलावयास पाहाता आता तोंड नाहीं कांकीं गोविंदराव याची आवस्था धाकटपणा पासून पाहाता यास गोविंदराव यासी बोलायासी तोंडच नाहीं परंतु हें तूं कुलीन म्हणू इतकही पोटांत घालून याचे चालवितात आणि सांगोपान करितात दुसरातर यांस जवल उभा राहूं देणार नाहीं तुम्ही कांहीं संवशय न धरणें हा हा संवशय कागदाचा सदरहू लिहिलेप्रमाणें आहे- पुढें बापू देशास जाऊन मसुरास आपले घरीं गेले तेथें च्यार दिवस राहून आधीं गोविंदराव यांची सासू व मेव्हणे जीवनराव हिंदुस्थानांत आली बापू घरास जाऊन पंढरपुरास गेले तेथें वाड्यास काम पाहिल लागलच होतें आणि यांनीं जाऊन चैवकशी

करून च्यार कारागीर व माणसें आधिक लाऊन वाडा तयारीस आणला च्यार दिवली मात्र तयार जाली तों इकडून गोविंदराव यांनीं दोघे मूल व बायको थांजवराबर पालखी व घोडीं व माणसें व लोक देऊन मुलाचीं लग्नें करायास रवानगी करून दिली आणि गोविंदराव नारो शंकर बराबर कुंभेरीस गेले दादासाहेबांची भेट जाली तेथें होते नारोशंकर याची दया पूर्ण होती त्या वेलस कारभार सारा बापू देशास आले मग मल्हारराव वडील भावाचे पुत्र यांचें उर्जित करावें म्हणून घेऊन गेले होते तेव्हां तो फारभार सर्व यांस सांगितला हे करीत होते मग विटलराव सिवदेव यांची बायको रखमाबाई हे मेली तेव्हां यास पुत्र च्यार ते लाहान विटलराव यांचा व गोविंदराव यांचा अतिशय घरोबा फार ऋणानबंध तेव्हां यांचें लग्न दुसरें करावें यैसें ठरलें. तेव्हां श्रीमंतांनीं लग्नास जायास आज्ञा दिली तेव्हां भिंडस लग्न करायास विटलराव जाऊं लागले तेव्हां विटलराव यांनीं श्रीमंत दादासाहेबास विनंती करून कीं गोविंदराव सिवदेव यास मजकडे द्या हे आसल्याशिवाय माझें लग्न होयाचें नाहीं तेव्हां श्रीमंतांनीं गोविंदराव यांस बोलावून विटलराव याजबराबर जाणें लग्न करून येणें यैसी आज्ञा जाली यावर विटलराव हे भिंडस येऊन यांचें लग्न करून गोवाळेरीस गेले तेथील किल्यास मोरचे लावले मग तेथें गोहोदकर राणा भीमसिंग येऊन किला घेतला विठलराव यास मारून बाहेर घातलें हे पलाले तेथून आत्रीस आले तेथे गोविहाहून जाऊं लागले मग यांनीं जानवें घेतलें धोतर नेसविलें आणि फौज मिळविली गोविंदरायांनीं जिगणीस जाऊन फत्तेसिंग मारला आणि गोहदास मोरचे लावले गोंहाचा मुलूक सारा घेतला तेव्हां तीस लाख रुपायाचा मुलूक ते सर्व गोविंदराव यांचे स्वाधीनेंत मामलत तेव्हां तेथील कुलकारभार मल्हारराव यांचे स्वाधीन केले ते वेलस त्यांचें कर्ज वारून त्यांचे पदरीं पांच पंचवीस हजार रुपये करून देणें ते दिले त्यांचाही काल नीट करून दिला. उपरांतिक श्रीमंतांनीं, कुंभेरें घेऊन देशास यावयास लागले ते गोहोद जाठास माघारीं देऊन गोवालेरीचे किल्यांत ठाणें विठलराव सिवदेव याचें घातलें मग श्रीमंत देशास आले तेव्हां पंधरा वर्शाची जिंदगानी हिंदुस्थानातून घेऊन मुल माणसें सुधा माघारे देशास भटउंबरें येथें आले वाडा तयार झाला त्यांत येऊन राहिले बापू देशास गेले होते ते लग्नें करून मुलमाणसें घेऊन माघारे गोहोदस आले तेथ बहादुरपुरची मामलत बापूचे स्वाधीन केली गोविंदराव व सर्व मंडली गोहोदचे सुभ्यांत होती तों देशांत बापूची स्त्री सईबाई होती ती हिंदुस्थानांत जावें म्हणून निघाली ते वाटस ओशरीचे राणांत मारली गेली यैस जालें तों वर माघारें झाडून हिंदुस्थानातून देशास आलों ते वेलस मल्हारराव यांचें ऊर्जित करून देशास आणून घातलें हिंदुस्थानांत होती तों बुंधेले यांचे लढाईत घाईत होते तों तेथें निंबाजीपंत हे बाबुराव याबाजी याचे पुत्र मागें याची भावाचा विस्तार लिहिला आहे त्यांत हे थोरले देवलती रायाजी जनार्दनाची त्या देवलतींतून बाबुराव याबाजी करकंबहून आपली वस्तभाव व मूलमाणसं घेऊन निघाले मथुराकडे गेले तिकडे जाऊन कांहीं दिवस होते. मग त्यास पुत्र निंबाजीपंत जाले होते. त्यांनीं आपला कालक्षेप करून होते. उपरांतिक त्याचा काल जाला मग निंबाजीपंत पुत्र होते. व यांची मातोश्री गोपकाबाई होती. तिन यांचें संवरक्षण करून निरालीच होती. मथुरांतही पोट भरलं तेव्हां कांहीं दिवस भगवंतराव यांचेही घरीं दोन्हीं मायलेंकरें जेवून होती. तेथेंही पडंनासं जालं मग पंढरपुराकडे गेली. यैसी जिकडे सोय बसल तिकडे पोट भरीत होती. इतकीयांत यांचें लग्नही मथुरांत चंद्रभट उपाधे याची लेक आमणाबाई म्हणून तिचें नांवही त्यास देऊन त्याचेंही लग्न जालें मग ही मृत्य पावली गोपकाबाई तेव्हां निंबाजीपंत आपले पोट भरून होते कांहीं दिवस कुपसंगीकडे मल्हारराव होते. तेथेंही होते. मग तेथून निघोन फकीर महंमद मन्यार याचे घरीं राहून पोट भरलं त्याजवर चालना मग हिंदुस्थानांत गोविंदराव यांची चलती होती. हे झांशीस होते तेव्हां डगाईस गेले. ते समई हेही तेथें आले तेव्हां याची आवस्था कठीणच परंतु पंगतीस जेवून होते. यांस रोजगार नाहीं तेव्हां गोविंदराव यांची बायको भिमाबाई ह्यांनीं आपले रावजीस म्हणूं लागली कीं वरकड सर्वांस तुम्ही रोजगार

लावले त्याचें बरं केलें आणि हा बुडाले घरचा मोंड यास कोणी नाहीं हा तुम्हांकडे वरकड आले म्हणून हाही आला. यास तुम्ही कांहीं धंदा रोजगार लावित नाहीं तर यास कांहीं काम सांगणें यैसा उपद्रव त्यास नित्य करूं लागले मग त्यास त्यांनीं सांगितले कीं बरें यासही पाहूं सांगू यैसे बोलले तेव्ह- आणखी एकवेळ बोलले कीं यास कांहीं काम सांगा तेव्हां म्हणाले कीं तूर्त कांहीं कामगिरी नाहीं काय सांगू तेव्हां आपले रावजीस म्हणाली कीं उंबरें येथील कारखान्यावर तरी पाठवावें हें यैकून यास उंबऱ्याचे वाडयाचे कामगिरीस लांकडें कोंकणांतील आणावयास खरेदीचे कामावर दरमहा पांच रुपये, सिवाय पोट पांघुरणें यैसें करून पाठविलें ते येथें येऊन यांनीं दहापांचहजार रुपये घेऊन, कोंकणांत जाऊन लांकडें खरीदी करून वाडयाचे कारखान्यास पोहोंचविले कारखान्याचें काम करीत होते. तों हिंदुस्थानांतून देशास सर्व मंडळीच आली. पुढें बजद बरसाद श्रीमंत सावनूरचें मसलतीस निघाले ते वेलस श्रीमंतांबरोबर बागलकोठास जाऊं लागले तेव्हां निबाजी पंत यास बराबर घेऊन गेले व बापूही गेले असे येथें उंबऱ्याचे कामावर मल्हारपंत भाऊ मसूरकर यांस वाडयाचें व विहिरीचें व गांवचे पाटिलकीचे गुमास्त गिरी गोपालपंत याजकडून काढून याचे स्वाधीन करून हे बागलकोटास गेले ते समई निबाजीपंत बराबर गेले तेथें रावजीस गोळीची जखम लागली ते वेलस यांनीं खटपट केली बागलकोट घेऊन सावनुरास गेले मोर्चे लागले तेव्हां पागा आणायास निबाजीपंत पाठविल मग पागा घेऊन नरसिंगराव व निबाजीपंत बराबर सर्व कारखाना घेऊन गेले ती चाकरी होऊन माघारे घरास आले पुढें बजद बरसाद पुण्यास श्रीमंताकडे गेले ते वेलस सके १६७८ त्या सालीं मुधोजी भोसले सेना धुरंधर याची मुजमु श्रीमंत नानासाहेब व भाऊसाहेब यांनीं गोविंदरात्र यास सांगितली तेव्हां ती मुजमु केली त्यावर दोघा भावाचा "जानोजी भोसले व मुधोजी या" कजिया तुटला उपरांतिक मुधोजी भोसले श्रीमंत दादा- साहेब याजकडे जावें येस ठरल सरकारांतून तेव्हां मुधोजीबाबाबराबर यांनीं हिंदुस्थानांत जाव यैस ठरल तेव्हां मल्हारराव यास संवस्थान चंद्रपूर येथील मजमुची आसामी देऊन त्यास चंद्रपुरास रवाना केलें मल्हारपंत भाऊ दरबारचे पेशव्याचे कामगिरी भोसेकर कडील त्याजवर ठेवल रामराव बापू याची बायको मेली तेव्हां याचें लग्न करायास सावनुराहून माघारें उंबऱ्यास खर्चास देऊन पाठविल तेथें येऊन करकंबकर देशपांडे सिवरावपंत याची बहीण तिचें नांव गंगाबाई तिसी लग्न करून मग मुधोजी भोंसले हिंदुस्थानांत जाऊं लागले तेव्हां बापूचे माथा सर्व हुजूरचा कारभार घालून गोविंदराव धणी कारमारी बापू यैसे व त्याची दोघें मुलें व बायको व पतक पागा हाती पालख्या नगारा निशान सर्व घेऊ मुधोजीबवा बराबर हिंदुस्थानांत गेले ते समई घरचा कारभार व पाटिलकीचा कारभार व वाडयाचा कारभार यांस आधिकारी केला पाहिजे तेव्हां ते वेलस भिमाबाई यांनीं रावजीस विनंती केली निबाजीपंत यांस येथील कारभार पाटिलकीचे गुमास्तगिरीचा व कारखान्याचा व संवसाराचा हा सर्व आधिकार यांस सांगणें तेव्हां निबाजीपंत यास दरमाहा पूर्वी केलाच होता मग मौजे भटउंबरें परगणे करकंबें येथील पाटिलकीची गुमास्तगिरी व कारखान्याचे वाडयाचे व विहिरीचे व घर जिंदगानी संवसार हा सर्व सांगून याचे हावाला करून हिंदुस्थानांत मुधोजीबावा बराबर गोविंदराव गेले निबाजीपंत गुमास्ते ठेवले उंबरे येथील कारभार सांगून देशमुख देशपांडे व तेथील कमाविसदार बहिरोपंत यैसे सर्वांस पत्रें दिलीं कीं हे उंबऱ्याचे कामावर गुमास्ते पाठविले आहेत यांचे हातून कामकाज घेणें म्हणून पत्र देऊन यास पाठविल हे सर्व करकंबकर देशमूख देशपांडे व कमावीसदार यांस सर्व ठाऊक आहे गोविंदराव यांनीं वतन घेतलेवर पहिला गुमास्ता जनार्दनपंत त्याजवर दुसरा गुमास्ता गोपालपंत सांगोलेकर देशपांडे त्याजवर तिसरे गुमास्ते मल्हारपंत मसूरकर याजवर हे वेलस चैवथे गुमास्ते निबाजी बाबुराव येणेंप्रमाणें मुधोजी भोंसले याची मुजमु केली तोंपर्यंत उंबऱ्यास च्यार गुमास्ते जाले पुढें हिंदुस्थानांत गोविंदराव मुधोजी- बावाबराबर गेले तिकडील कामकाज बापूराव लेहेत करीत होते चंद्रपूरचें काम मल्हारराव त्रिंबक व

बीकिलीचें पेशवे यांजपाशीं मुधोजीबुवाचे कारभारी सारे राहिले होते तेथें मल्हारपंत भाऊ मसूरकर करीत होते येणेंप्रमाणें कारभार आयेशीं येक्यायेसी सोलाशें तोंपर्यंत असा चालला मग हिंदुस्थानांतून माघारे मुधोजी भोसले आले चंद्रपुरास त्याजवरावर गोविंदराव चंद्रपुरास आले तेव्हां चंद्रपुरे गोविंदराव याजवर लटका आरोप ठेवून मुधोजी भोसले यांनीं गोविंदरायास लुटलें सर्व देवलत घेतली केदेंत ठेवलें उपरांतिक दुसरे वर्षी श्रीमंत तांदूलजचे लढाई मोंगलाशीं जाली देवलताबादचा किला घेतला सवा लक्ष रुपयांची जागिर घेतली ते वेलस मुधोजी भोसल्यास सांगून पाठवून गोविंदराव सिवदेव माघारे केदेतून टोक्याचे व खेड विसादेप या मैदानांत मुधोजी भोसले गोविंदराव यास घेऊन आले श्रीमंताची भेट जाली वस्तभाव + + + होती ती दिली राहिली तिची किंमत करून तो येवज द्यावा तसोंच घोडीं उंटें चीज वस्त जी होती ती दिली बाकी राहिली ती घावी तिचा करार मदार केला खतपत्रें घेतलीं तीं दिलीं तहनामा करून गोविंदराव याची समजाविशी करून श्रीमंताची भेट केली येणें प्रमाणें जालें जे वेलस चंद्रपुरी कसाला जाला तेव्हां मल्हारराव पलून घरास गेले त्याचे भाऊ गुणवंतराव त्याचा काल नागपुरीं जाला बापू होते ते निरोप घेऊन घरास मसुरास आले होते गोविंदराव श्रीमंता-जवल आलेवर सर्व आले भेटी जाल्या त्याजवर बापू भाऊसाहेबाबरावर पाणिपताकडे गेले मल्हारराव याजबराबर होते मग तेथ गांवास उंबऱ्यास मुल माणसें सुधां आले च्यार दिवस घरीं होते मग निबाजीपंत यास कारभार सांगितला होता यांनीं हे गर्दी होतांच कारभार संमर्धे च्यार रुपये खाऊन घड होऊन बसले होते मग याजपासी हिशेब मागितला हिशेब तयार होत होता तों आषाढीची यात्रा आली मग देव दर्शणास गेले आषाढ शुद्ध पौर्णिमेस गोपालकाला पाहून आले तों वाटस मुठीचा झपाटा जाला त्यांचा काल ते दिवशीं जाला मग ते वेलस सर्व होते बापू गेले होते भाऊसाहेबा बराबर तेही वांचून आल तेही होते काल जाल्यावर नरसिंगराव गोविंद व माधवराव गोविंद त्यांचे पुत्र दोघे त्यांनीं आपला बंदोबस्त करून पुण्यास आले ते वेलस निबाजीपंत गुमास्ते काढले जिवाजीपंत याचे मामा होते त्यास गुमास्तगिरी पाटिलकीची सांगितली निबाजीपंताकडे हिशेब तसा राहिला आहे पुढें निबाजीपंत काढून जिवाजीपंत यास पाटिलकीची गुमास्तगिरी सांगितली कांहीं दिवस त्यांजकडून चालना पुढें तेच वर्षी मोंगलानीं वाडा पाडला मग कांहीं दिवस कुपसंगोंत होते तों जिवाजीपंतही कारभार ठीक करीनात मग त्यास काढून रघुनाथ म्हणून येक कारकून गुमास्तगिरीवर ठेवला त्यानेंही कांहीं दिवस ठाण्यांत देशमुख देशपांडे व हाकीम यांजकडे जाऊन पटी पोसाडी करून आला तो आपले घरास गेला तेव्हां बालापा शेट वाणी लिंगाईत यास घरचा व मौजे उंबरे येथील पाटिलकीचा व गुमास्तापणाचा येस यास सांगून ठाण्यास वहिवाट घालून त्याच्या हातून कारभार चालविला तेव्हां करीत होते तों नरसिंगराव हे संवसाराच्या व देणेचे वोढींत पडले मग दोन च्यार वरशें आसेंच चालले तों याचे धाकटे बंधु कर्नाटकचे स्वारींत रावसाहेबांनीं जाहागिरी घेतली नारायण रावसाहेबाचे हातास गोली चाटून गेली ते वेलस माधवराव याचा काल जाला तेव्हां ते येकटे राहिले इकडे भगवंतराव याचे लेंक चैवघे त्यांत रामराव गोविंदराव मेलेवर हैदर नायकाबराबर तिघ बंधु गेले तेव्हां खंडेराव आगा भेतीनें मेले बापू मोतीतलावाचे लढाईचे गर्दीत गेले तेव्हां तेही मेले तिसरे गोपालराव वांचून नरसिंग-राव याजवल आले चैवथे जनार्दनराव तर घरीं आधींच मेले गोपालराव मात्र होते व बापूचे पुत्र गंगाबाई दुसरी बायकोचे पोटचे होते तेही बरेच होते. मूल फार सरस होते त्यास घरीं पिसाललेलें कुत्रं चावलें तेणें करून तेही मेले गोपालराव राहिले होते हेही बापूशेटे यांनीं प्रगणी याचें काम सांगितलें तेथें लढाई जाली तेथें पडले येणेंप्रमाणें भगवंतराव यास पुत्र च्यार या चैवघाचे पोटीं पुत्र संतत नाहीं त्याच्या बायका कांहीं मेल्या गंगाबाई हे कालगावांत तिचे पोटीं दोन कन्या आहेत येक कल-गांवीं दिली तिजपासी आहेत दुसरी मसुरांत बलवंतराव त्रिंबक याजला दिली आहे येवंच वंशाविसी

३७३

त्याची नकल तसेंच दुसरे नरसिंगराव सिवदेव हे दाभाडयाचे जुनात पडले याचे पोटीं कांहीं नाहीं वडील त्रिंबकराव याचे पुत्र दोघे गुणवंतराव धाकटे त्याची नकल वडील मल्हारराव होते याचा काल जाला त्याजला पुत्र वडील बाबुराव त्याचे मागें दुसरा मार्तंडराव व तिसरा बलवंतराव येसी तिघ लेक आहेत ते कुपसंगींत वतन करून आहेत चवथे गोविंदराव यांचे पुत्र दोघे माधवराव लाहान ते मेले त्याचे नकल वडील नरसिंगराव जिवंत आहेत त्याचे पोटीं अद्याप कांहीं नाहीं त्याचे वतन मौजे भट उंबरें परगणे करकंब येणेंप्रमाणें सिवराव जनार्दन यास पुत्र च्यार त्यांनीं रायाजी जनार्दन याची दैवलत करावी वतन करावी त्यास दैवलत वुडाली वतन आहेत तीं त्यांनीं करावीं त्यास या दोघांत वतन समाईक कुपसंगी ते त्रिंबकराव याचा वंवश करितो उबरें परगणे करकंब हा गांव निकालस गोविंदराव सिवदेव यांनीं घेतला यांचे गावांत कोणाचा संमंध नाहीं सिवाजीपंत यास तो कोणतेही रायाजी जनार्दन याचे वतनांत यास बोलायास संमंध तिलमात्र नाहीं वडलोपार्जित कुलकर्ण मद्रकी संमत सगर परगणे सुरापूर येथील कुलकर्ण निमे + + व निमे सिवाजी जनार्दन याचें

श्री

पारसी करपदोम व शिका
येक पारसी.

महजर वी तेरीख छ ५ माहे साबान हाजिरमज्यालस परगणे करकंब सुरसन १०९७ शके १६०९ प्रभवनाम संवत्सरे अधिकशुद्ध सोमवार ते दिवशीं हाजिर मज्यालस

हाजरतकाजी आवदुल
महमद हुते सुलतान
सरकार परंडे
राघोपत सेखदार देहाय
परगणे करकंब निशाणी
खालचा शिका
देसमूख परगणे करकंब
नांगर
सिवाजी गोविंद
देशपांडे परगणे करकंब

मिराखान जाव फौजदार
परगणे करकंब व भोंसे
केशवराव दरकारे
गुमास्ते मुरार नरसिंह
सरकार परांडा
शिका
मोकदम कसबे मार
नांगर

सदरहू विद्यमान महजर केला येसाजे रायाजी जनार्दन मोकदम मौजे उंबर प्रा मा यास मौजे मार चा मोकदमीचा महजर करून दिल्हा येसाजे मौजे मजकुरींचा मोकदम आटवुडं क्षेत्र पंढरपुर याची तेही तुम्हांस लेहून दिल्ही ती त्याचा पत्र दोन्हीवदल किता येक पत्र शामजी विठल ताटे व रंगो विठल ताटे व विराधर समस्त ताटे व भिकंभट बीन नागदेव भट बेणारे व पांडुरंग नागेश बेणारे हरी भटी व बावाजी वीन आपाजी बेणारे व त्रिंबक नरसो बडवे व त्रिंबक कृष्ण बडवे व विठल गोपाल बडवे व कोनेर रघुनाथ बडवे व कोंडो कृष्ण बडवे व देखील विरादर समस्त बडवे व वासुदेव चिंतामणी डिंगरे व नरहर उद्धव डिंगरे व आनंद मल्हार डिंगरे व देखील विरादर समस्त डिंगरे व आपाजी सिवदेव डिंगरे व आपाजी नाखोजी उत्पात बावाजी सिवाजी उत्पात देखील विरादर उत्पात व बापाजी कासि आराधे व गोविंद विठल आराधे व आवाजी अनंत आराधे व गोपाल अनंत आराधे व निराजी वालकृष्ण आराधे व बाबाजीराम आराधे देखील विरादर समस्त आराधे व समस्त हरदास मोकदम मौजे उंबर परगणे करकंब सरकार परंडा सुर सन १०९७ करण लिा दिल्हें पत्र येसाजे आम्हां समस्तां जणाचा मोकदमीचा सेत मजकुरीं आहे ती आम्हांस सेत होईनात आम्ही ब्राह्मण त्या ही वर पैका

नवर पडों लागला सेत करावयास येक रुक्याचा मावसर आम्हांजवल नाहीं सालोसाल नागवणा होतो धुलीस मिलालों हालीं सेत कुल पडली आम्हां समस्ता जणा मंडळांस येक दिवसाचे समस्ता चोथ भक्षावास नाहीं पैका कोठून यात्रा या सेताकरितां आम्ही समस्ता ब्राह्मणाचा कुल क्षय आरंभला क्षेत्रीं सुखी स्नान संध्या करून राहूं म्हटलें तर राहूं न देतां उंबरेचे वृती करितों क्षेत्रीचें वतन बुडालें याच पदार्थ दिसून आला मग तुम्हांस सरणे येऊन आवघा वृतांत तुम्हां प्रति सांगितले कीं आम्ही ब्राह्मण सेताकरितां बहुत हालाल जालों गोसावी यास मौजे उंबरेचा मोकदमी व आपलीं सेत आहेत जीं ते तुम्हांस कुल देतों तुम्ही वृती घेऊन आम्हांस मुक्त करणें म्हणोन सरणे रिघोन विनंती केली त्या उपर तुम्ही बोलिला कीं आपणास या वृतीचें अगत्य नाहीं तुम्ही काय सुख देखतां आम्ही काय म्हणून घ्यावें म्हणून बोलोन गोष्टी उघडून दिल्ही त्यावर आम्ही समस्तजण बहुत फजित जाहालों जे तुम्ही आमची वृती व सेत घेऊन आम्हांस मोकलीक करतां तर तुम्हांस वाराणसिस गेल्याचे पुण्य जोडल सहस्र अश्वमेघ यागाचें पुण्य जोडलें ब्राह्मणाचे आसिर्वाद कडून तुमचें उत्तरोत्तर कल्याण होईल आम्हांस जीवदान दिल्हें सारखें होईल म्हणून बाजिद होऊन आपले आत्म संतोषें कडून मौजे उंबरेचा कुल मोकदमी देखाल मान. बी॥

| | | |
|---|---|---|
| नांगर १ | वश्रीफपान १ | घुगरी |
| वाहेजमा १ | होलीची पोली १ | नागपंचमीचा कळस १ |
| गवर १ | दिवालीचा माधला १ | धुपंचा १ |
| रांबता महार १ | | |
| माडी व खोत्ररेची वाटी १ | लखमादेवीचा काढा १ | यले आवसची पाटी १ |
| | दकरे १ | |

सदरहू येणें प्रमाणें दिल्हें आसे

| | | |
|---|---|---|
| ताटे थल | वेणारे थल | बडवे थल |
| आज जमीन तकसिमा ५ | जमारुके ·॥· कुल | आज बेरीज टके १॥· |
| येकूण जमीन टके १।२ | आवघे दिल्हे असे | पैकीं गोविंद सिदो |
| पैकीं गमाजी ताटे | रुके ·॥· | हाजीर नाहीं ता॥ |
| हाजीर नाहीं येकूण | ता॥ | रुके·रुके ८५ |
| रुके ·।·॥ बाकी चवघा | इनाम खालसा | बाकी वरकडांनीं |
| तकसिमदार येकूण दिल्हे १८१॥ | ८९ खालसा ·॥३ | दिल्हे टके १८७ |
| डिगरे थल | उत्पात | हरदास थल |
| तकसीमा च्यार | तकसिमा दोन २ | येकूण आज |
| येकूण जमा दिले १८९ | खल जमीन रुके ·॥११ | रुके ·॥· आवघे |
| ऐकंदर कुल आवघे डिगरे | येकूण आवघे | कुल दिल्हे असत |
| मिलोन दिल्हे असे | मिलोन दिल्हे | रुके ·॥· |
| टके १८९ | असत टके ·॥११ | |

आराधे तकसिमा च्यार येकूण जमा थल टके १८१॥ कुल आवघेस ते समस्त आराधे यांनीं मिलोन थल दिल्हे असे १८१॥ येकूण जमीन टके दर टकियास चावर १ प्रा येकूण जमीन चावर घ १५ सा चावर दीडपाव जमीन समस्ता जणांनीं मिलोन मोकदमी व सेत सदरहू प्रा दिल्हें असे आपले वाडे व घर तुम्हांस दिल्हें गावांमध्यें आम्हांस येके काडीस संमंध नाहीं आमचा आवघी वृतीचे तुम्हांस आत्म संतोषें तुम्हांस दिलें तुम्ही लेकराच लेंकरी करून आक्षई खाऊन राहाणें आम्हांस व आमचे वेसीचा जो कोणी असल

त्यास तुम्हा सांगाते बोलावयास आर्थाआर्थी संमंध नाहीं या वचेनास आम्ही चुकोंतर आमचे पूर्वज नरकांत जातील आपले संतोषें कडोन वृती दिल्ही आसं हे लिा दिल्हें पत्र सही पाटिलकीचा हाक लाजिमा पेसजी जो आपला आहे तो व तुम्ही आणिक साधाल तो तुमचा तुम्ही घेऊन सुकी राहणें हे लिा पत्रसही किता येक पत्र येके कासी पुजारी व खंडो तुकादेव व यादव चवडो पुजारी व कृष्णाजी गोपाल पुजारी मोकदम व कुलकर्णी जोतीशे मौजे उंबर परगणे करकंब सरकार परंडा सुरसन १०९७ कारण लिहून दिल्हे हें पत्र यैसाजे मौजे मजकूरचें आमचे सेत थल १८१ येक टका येक रुका नी ॥४। दिले ते तकसीमदार ५ येकूण टके ·॥· बाकी जमीन आम्हीं आपली तकसीम दिल्ही रुके ·१५ बी॥ ता॥

येको कासी पुजारी ०६ खंडो तुकदेव पुजारी ०६ यादव चावडो पुजारी ०३

कृष्णाजी गोपाल ०३

येकूण अठरा रुके येकूण तीन तकासिमा जमीन मोकदम व कुलकर्णी व जोसीपण तुम्हांस आम्ही आपले आत्मसंतोशें तुम्हास दिल्हें सबब आपल्या सेतास पैका बहुत पडों लागला सालोसाल पैका देतां हैराण होऊन धुलीस मिलालों सेत करावयास आवसर नाहीं पैका सुटना आमचा मृत्य होणार यैसे दिसून आलें मग स्वामीस शरण येऊन आपली तकासिमीचा पाटिलकी व सेत सदरहू प्रा कुलकर्णी व जोसीपण कुल हाक लाजिमा तुम्हांस दिल्हा आस तुम्ही करोन लेंकराचें लेंकरीं आक्षई खाऊन राहणें तुम्हांस आम्हांस बोलावया अर्थाअर्थी संमंध नाहीं आपण व आपल्या वेसीचा जो कोणी बोलेल त्याचे पूर्वज नरकास जातील रजावंद होऊन आत्मसंतोषें पाटिलीकी व कुलकर्णी व जोसीपण आपले तकसिमीचे सदरहू लि प्रा दिल्हें आसे हें लिहून दिल्हें पत्र सही आपलें घर व वाडा व ठाव व जो आहे तो तुम्हास दिल्हा आहे आम्हासी संमंध नाहीं तुम्ही कुलवृत्तीचे धणी होऊन सुकी राहणें हे लि॥ पत्र सही कितीयेक पत्र पांडुरंग बीन नरसोबा पुजारी व महिपाजी व पांडुरंग पुजारी व दासो नामाजी पुजारी मोकदम कुलकर्णी व जोतिशे मौजे उंबर गोविंद सिदो व खंडो त्रिमल बडवे मोकदम मौजे मजकूर परगणे करकंब सरकार परंडा सुरसन १०९७ लि॥ दिल्हें पत्र यैसाजे आमची वृती मौजे मजकुरीं आहे त्यास पैका पडों लागला सेत पडली आम्हीं पैका देतां देतां धुलीस मिलालों हालीं पैका द्यावयास मबसर नाहीं पैका सुटना पैकिया करितां आम्हां ब्राह्मणांचा मृत्य होणार यैसे सांगून गोसावीं।ास सरण येऊन आपल्या आत्मसंतोशें कडोन वृती तुम्हांस दिल्ही

पुजारी शेत जमीन चावर १ पैकीं लेहून दिल्हें आहे दीड पाव बाकी ·॥· आदपाव वर नऊ टांक राहिले होते त्यामध्यें दिल्हे चावर रुके ·॥·।·

बडवे जमीनपैकीं दिल्हें होते रुके ०५ त्याचे निमे तेही आत्मसंतोषें कडोन दिल्हे रुके ०५

येणें प्रमाणें पुजारी यानीं मोकदम व कुलकर्णी व जोसीपण कुल दिल्हें बडवे मोकदमी आपली तकसीम दिल्ही वृतीचा खावंद तुम्ही आसा आम्हांस कुलसंबंध नाहीं मोकदमी व कुलकर्णीचा हाक व जोसीपणाचा हाक कुल तुम्हांस दिला अस हक लाजिमा हे जे जे चालिले आहे व पुढें जे तुम्ही साधोन घ्याल ते तुमचे तुम्हीं घेणें आम्हांस वृतीचे नांव घ्यावियास संमंध नाहीं आपले घर वाडे तुम्हांस दिल्हें ठाव ही तुम्हास दिले हे लिहून दिलें पत्र सही सदरहू प्रमाणें आठ बुडांनीं तीन पत्र लेखून दिलीं त्याची जमीन टके + + + ७। ५॥ सदरहू मोकदमी व कुलकर्णी व जोतसि लेखून दिल्हें आहे येणेंप्रमाणें मौजे मजकूरचा मोकदमी व कुलकर्ण व जोतीश तुमचे हावालीं केल आस लावणी करून गांव आबादानी करणें मोकदमीचा व कुलकर्णीचा व जोतीशाचा हाक लाजिमा पडेल पान खाणेयास कोणी हिला हरकत करील तो दिवाणाचा गुनेगार व गोताचा आन्याई हा महजर सही-
३७६

श्री. नकल ३

शके १६०९ प्रभव नाम संवत्सरे अधिक शुद्ध ७ शेणवार राजश्री रायाजी जनार्दन यास पांडुरंग पूजारी व दासो नामाजी पूज्यारी मोकदम व कुलकर्ण व जोतिषी मौजे उंबर व गोविंद सिदो व खंडो त्रिंबक बडवे मोकदम मौजे मजकूर पा॥ करकंब सरकार परांडा सु॥ १०९७ लेहून दिल्हें पत्र येसेजे आमची सेत मौजे मजकुरीं आहेत त्यास पैका बहुत पडों लागला सेत पड जाहली आम्ही पैका देतां देतां धुळीस मिळालों हाली पैका घावयास अवसर नाहीं पैका तो सुटेना पैक्याकरितां ब्राम्हणांचा मृत्य होणार येसें पाहून गोसावी यांस शरण येऊन आपले आत्म संतोषें कहून तुम्हांस वृती दिल्ही बी ता॥

पूज्यारी स॥ जमीन चावर १ पैकीं पत्र लेहून दिल्हें आहे दीड पाव बाकी आद चावर नववला राहिला होता त्यामध्यें दिल्हे होते आद च्यावर
येकूण रु. ·॥॥·

स॥ पांडुरंग नरसो पूज्यारी व दासो बीन नामाजी पूज्यारी महिपति बीन पांडुरंग पूज्यारी सदरहू लिहिल्याप्रमाणें आपले मोकदमी व सेत कुलकर्ण जोतीष तुम्हांस दिल्ही असे

बडवे जमीन पैकीं दिल्हे होते रुके ८५ तेही आत्मसंतोषें करून दिल्हे रुके ८५
महिपति बीन पांडुरंग पूज्यारी
गोविंद सिदो बडवे.
खंडो त्रिंबक बडवे सदरहू लिहिल्याप्रमाणें आपली मोकदमी व सेत तुम्हांस दिल्ही आसे.

येणें प्रमाणें पूज्यारी यांनीं मोकदमी व कुलकर्ण व जोतीषपण कुल दिल्हें बडवे मोकदमी आपली तक्षीम दिल्ही वृतीचे खावंद तुम्हीं आसा आम्हांस कुल संमंध नाहीं मोकदमीचा हाक व कुलकर्णपणाचा हाक व जोषीपणाचा हाक कुल तुम्हांस दिल्हा आसे हाक लाजीमा व जें जे चालले आहे व पुढें जें तुम्हीं साधाल ते तुमचे तुम्ही घेणें आम्हांस वृतीचें नांव घ्यावयास संमंध नाहीं आपली घरवाडा तुम्हांस दिल्हा हें लेहून दिल्हें सही

गोही

येमाजी बीन नवलोजी सोनार १
सेटी बीन बापोजी कुंभार १
संताजी माली १
कान ना॥ बीन तुलना॥ माहार १

विठोजी परीट १
भिकाजी गोविंद काले १
रायाजी बीन बयाजी चोगुले १
लखरू ना॥ मांग १
केरनाक माहार
रायेनाक माहार

जमीन झाडा

१८१॥ ताटे ८५
-॥॥- बेणारे
१८७ बडवे ११·
१८९ हिंगरे
४८५॥.

·॥११ उत्पात
-॥- हारदास
१८१॥ आराध्ये
-॥५॥ पूज्यारी
·१६ कुलकर्ण व खंडू कासी व यादं
३१· चोडो व कृष्णाजी गोपाल

७५॥·

## राशींच्या गंजीफा

श्री

यादी रासीचा गंजीफ करून पाठविणेची सन सलासील माहे रोवल

| राशी | चित्रे | रंग | वाहने |
|---|---|---|---|
| १ मेष | १ बकरेवर राजा | १ तांबडा | १ वजीर मेंढा. |
| १ वृषभ | १ बैलावर राजा असावा | १ पांढरा | १ वजीर बैलावर |
| १ मिथुन | १ स्त्रीपुरुष उभयतां | १ हिरवा | १ वजीर घोडेवर |
| १ कर्क | १ कुरलेवर राजा | १ प्याजी गुलाबी | १ वजीर माणुस कुरले पुडे |
| १ सिंव्ह | १ सिंव्हावर राजा | १ अस्मानी रंग | १ वजीर सिंव्हावर माणुस |
| १ कन्या | १ बायको राजा असावा | १ पंचरंगी | १ वजीर बायको घोडेवर |
| १ तुल | १ तागडी धरलेला राजा | १ काळारंग | १ वजीर घोडावर तागडी धरलेला |
| १ वृश्चिक | १ विंचू राजा | १ पीरूराई (?) विंचवाचा रंग | १ वजीर घोडेवर पुडे विंचू |
| १ धन | १ राजा घोडेवर तोंड माणसाचे कृष्णासारखी बिंदु-कली पानावर | १ घोडेचा रंग | १ वजीर घोडेवर त्यास तोंड माणसाचे वजीर तोंड हरणाचे |
| १ मकर | १ तोंड हरणाचे खाली सुस्वर | १ तबकीर रंग | १ खाली सुस्वरीवर माणुस |
| १ कुंभ | १ राजा पुरुष घागर असावी. | १ पिवळा रंग | १ वजीर घोडेवर पुढे घागर |
| १ मीन | १ मच्छासारिखा राजा | १ केसरीरंग | १ वजीर मच्छा-सारीखा |
| १२ | १२ | | १२ |

येणेप्रमाणे दर रंगास १२ पाने एकूण पाने १४४ रंग लिहिलेप्रमाणे तरतरेचे चित्रे चांगली जसी असावी तसी असावी याप्रमाणें करून पाठविणे गंजिफा पुणेस पाठविण्याचा.



अनुक्रमणिका

## देवऋषि श्रीकृष्णाबाई.

कार्तिक शु॥ १५ शके १७५५.

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री रघुनाथरावतात्या यांसी भिकंभटशास्त्री भट आसीर्वाद येथील क्षेम ता॥ कार्तीक शुध्द १३ पावेतो वर्तमान यथास्थित असे. वि॥ आपण पत्र शु. ७ चे मितीचें पाठवले ते शु. १० पावले. वे. विश्वनाथ दिक्षित अयाचित हे देवऋषीपणा करितात. याजकरितां येथे चोरी जाली सबब त्यास तेथे त्याची रवानगी करून देण्याविसी विस्तारे लिहिले त्याजवरून भटजीकडे गेलो त्यांस मजकूर समजाविला नंतर त्यांणीं उत्तर केले कीं आठ दिवसाचे आंत चोरी जालेली असती तरी हटकून माघारी आणतो परंतु या गोष्टीस पंधरा दिवस गुदरले तरी मोटा प्रयत्न करून पाहावा. मजला तेथे जाणे म्हणजे पांच रुपये आगोदर येथे पाहिजेत कारण गडी घोडे व सिध्या व पायाळू बायको बराबर घेतली पाहिजे तेथे गेल्यानंतर तुमचे घरी माझी राहण्याची लोय नाहीं बाहेर बिराड करून राहू. तेथे पर्यंत आमचा खर्च चालवावा व चोरी सापडल्यावर चतुर्थांश मी घेईन असे त्याचे बोलणे आहे व येथे वहिवाट पाहिल्यास चौघाचा उद्योग करितां एकाद्यास गुण येतो एकाद्यास येत नाहीं असे आहे तरी याचे मनन करून उत्तर येईल त्याप्रमाणें भटजींची रवानगी करून देऊं कळावे. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे आसिरवाद.

## मुलीच्या लग्नाची आतुरता

मुलीस सहावे वर्ष लागले आतां यंदा लग्न जमल्यावांचून पुढील वर्षावर ठेवण्यास ठीक नये खर्चाची सोय कशी तरी करून करणे प्राप्त .... .... .... येथे एक बापू गाडगीळ याचा मुल आहे. त्याची मुंज जाली नाहीं. मुंज चेत्रांत करतील. मुहूर्त म्हणावे तर माघांत प्रशस्त

( पौष वद्य २ शके १७५१ सालचें कुशावा चिपळोणकरास पत्र. )

## रामोशी.

काल निघालो तो वेटूलजवळ चार घटका दिवस राहतां धर्मशाळेसमोर आलो. तो अडीचशे रामवशी यांचा घाला गावावर येऊन सचीवाकडील सिपाई यांस धराधर मारामार चालली होती आम्ही तसेच पुढे येऊन सिवरे याची वाट सोडून सिवापुरास आलों. देवाने पार पाडून रात्रीं सर्वांचा समाचार आबानी घेतला. सुखाने होतों. पंतांचे सिपाई जकातदार यांस फार मारले. दोनसें रुपये गांवापासून घेतले. बंदुका वगैरे शिपायांच्या घेतल्या. भाकरतुकडा होऊन चौहोकडे पाचपन्नास माणसें येऊन मग जमा होऊन निघोन डोंगरास ससेवाडी सिंदेवाडीचे वर गेले.

( रघुनाथ सदासीव थत्ते यांचे पत्र शके १७५१ अ. शु॥१० )

पत्रावरील पत्ता

चिरंजीव राजश्री बळवंतराव नाना थत्ते यांस पुण्यास बुधवारांत नाना फडणीस यांचे समोर हौदाचे पूर्वेस थत्ते यांचे वाड्यांत प्रा। कीजे ते नसल्यास चिरंजीव राजश्री रामराव तात्या चिपळोणकर यांनी हा लखोटा ते जेथे असतील तेथे प्रा। करावा.

## धुंदेल्यांचा वाडा

१ सौ. कासीबाई—बुंधेल्यांचा वाडा रामराव विष्णू यांचे घराजवळ आहे तेथे.

( हळदकुंकवाच्या बोलावण्याच्या यादींतून )

## वर्णनशैली

स्वामींनी बहुता दिवशीं स्मरणपूर्वक आशिर्वाद पत्र पाठविले ते पावोन आनंद जाहाला तो लिहून कळविण्यास आसक्तता नाहीं कारण कीं, धेनूचा जो वत्स त्याते मातेचा वियोग जाला असतां तो जसा क्षुधेनें पीडीत होतो त्यातें मातादर्शन होऊन दुग्धपान होऊन क्षुधेनें पीडित जालेला तृप्त होतो त्याचे जसे कोणी प्राणी-मात्र वर्णन करूं सकत नाहीं तदनुसार मजला आसीर्वाद पत्र स्वामींनी लिहिले ते पाहून आल्हाद जाला तो मी लिहून कळविण्यास योग्य नाही. ऐसेच सदैव पत्र लिहिण्यास आज्ञोत्तर होऊन सांभाळ करण्यास योग्य स्वामी समर्थ आहेत.

( विसाजी लक्ष्मण जोशी नेवासे याच्या पत्रांतील उतारा )

## रामशास्त्री प्रभुण्यांचे चिरंजीव

श्री

( सीका )

सरकार दौलत मदार कपीणी ईंग्रज बाहादूर कलकटर सुभा पुणे याणी.

वेदमूर्ती राजश्री गोपाळशास्त्री बीन रामशास्त्री माहुलीकर वा। पेठ शनवार शहर पुणे याचे चेहरा रंग नीला काला टेगणे आहेत दाढी व डोई पीकले मिशा काले आहेत व तोंड लांबोडे नाक उंच आहे डावे हातावरी मनग्टावरी लाहानपणी पोलल्याले आहे वर्ष ४१ यास हुजूर पोत्यातून वर्षासन याचे नावे पेशजी पासून पावत आले ते रु.

२००० जातीस

१००० पालखीस

२०० कापड आखा १००० सी दर ५ प्रो.

३२००

मोबलग तीन हजार दोनशे रुपये अश्वीन वा। ३० येऊन हे पत्र हुजुरचे दाखवून सदरहु बत्तीसशे रुपये घेत जावे जाणीजे तारीख छ ३० माहे सप्टेंबर सन १८१९ ईसवी.

सही इंग्रजी



अनुक्रमणिका

## साक्षी समन्साचा नमुना

श्री

रावसाहेब मुषफक मेहेरबान करम फर्माय दोस्ता दाजीबा चीपळूणकर सलमहु

अर्जीसोब मेस्तर ज्यान अद्रीब दडकेप साहेब बाहादूर इस्कोयर ज्यज्य पुणे व सोलापूर सलाम बा आजद सलाम अकी येथील खैरीयत जाणोन आपली शादमानी हमेशा कलमी करीत असीलें पाहिजे दीगर दीनकरराव देव याचे दागीने मोत्ये वगैरे याची चोरी जाहाली त्याबद्दल कोडतात काम सुरू जाहाले आहे ऐसी यास देव याचा दाणा मोत्याचा एक चोरांस गेला तो आपण पाहिला होता व त्याचे मासल्याचा दुसरा दाणा मोत्याचा आपले पासी आहे असे देव याणी जाहीर केले याजकरिता आपणास लिहिले आहे तर आपणापासी देव यांचे मोत्याचे दाण्याचे मासल्याचा दाणा आहे तो घेऊन देव याचा मोत्याचा दाणा पाहिला होता त्याचा मार सांगण्या-करीता शेसन कोडतात आले पाहिजे रवाना ता। २ आगटोबर सन १८२७ ज्यादा काय लिहीणे प्यार मोहोबत असो दीजे हे कीताबत

(सही इंग्रजी) जज्ज

## टके व रुके

३ रुके = १ पैसा.
४ पैसे = १ आणा.
४ आणे = १ टका.

आळयावर रुके; आण्याची उभी रेघ आणि टक्यांचा आंकडा.

टके व रुके कसे लिहीत हें खालील उताऱ्यावरून समजेल-

एक टका = तीन पैसे

१॰९ चैत्र शु॥ ३ श. १७५८

॰३ देवस्थानाकडे
॰३ तीर्थाबदल
।३ भोजनदक्षणा
॰३ रामभट खरे
॰३ रामभट पेंडसे
॰३ भास्कर शास्त्री
॰३ रामचंद्र जोशी
॰३ सुवासीण
।३
॰६ गौरीकडे पूजेस सौ. ज्यानकीबाई
॥३

।३ भाजी
॰३ पानें विड्याचीं
।॰ बांगडया
॥६

१॰९ टके

# अभिप्राय

**तात्कालिक उपचारः**— ( ले. ना. शि. सहस्त्रबुद्धे, एम्. एस्., किं. १। रुपया. ) "आपलें शरीर" प्रसिद्ध होऊन फार दिवस झाले नाहींत तोंच डॉ. सहस्त्रबुद्धे यांनी 'तात्कालिक उपचार' या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. यावरून व्यक्त होणारा त्यांचा उत्साह प्रशंसनीय आहे यांत शंका नाही. वाङ्मयाचा उत्कर्ष होण्यास सर्व विषयांवर ग्रंथरचना होणें अवश्य आहे. त्यांतहि प्रस्तुत पुस्तकासारखीं सोपपत्तिक व सुलभ भाषेंत लिहिलेलीं वैद्यकीय पुस्तकें उपयुक्ततेमुळे वाङ्मयांत चिर-स्थायित्व पावतात. 'तात्कालिक उपचार' हें पुस्तक सर्वांस समजेल असें आहे अशी आम्ही खात्री करून घेतली आहे. विवेचन व उपचार निरपवाद आहेत. आजाऱ्याला व अपघाताने इजा झालेल्याला तात्कालिक उपचाराची ज़रूरी भासते तसा प्रसंग प्रसूतीसमयींहि येतो म्हणून त्यासंबंधाने एक प्रकरण या पुस्तकांत हवें होतें असें आम्हांस वाटतें. बहुदलपट्टी याला चिरपट्टी किंवा फाडपट्टी प्रतिशब्द बनवण्यास हरकत नाही. शास्त्रीय पुस्तकांत संस्कृत शब्द शक्य तोंवर टाळावे. 'विरुद्ध बाजूस गांठी माराव्या' येथे "उलट बाजूस" म्हटलेलें बरें. अस्थिभंग याच्याऐवजीं हाडमोड शब्द वापरला तर काय हरकत आहे ? पट्टीबंधन हा समास कानाला चांगला लागत नाही. त्यापेक्षां पट्टीबंद असा शब्द बनविणेंच प्रशस्त होईल. Dressing आणि Bandage या दोनहि शब्दांचा अर्थ निराळा असून पट्टी हा एकच शब्द ह्या निर-निराळ्या अर्थीं वापरणें चांगलें नव्हे. रानड्यांच्या कोशांत Dressing ला मलमपट्टी शब्द दिला आहे तोच बरा दिसतो. Coma ला गाढ निद्रा हा शब्द चुकीचा आहे असें आम्हांस वाटतें. गाढनिद्रावस्थेप्रमाणे कोमाची स्थिति इष्ट नाही. निद्रावस्थेपेक्षा कोमाला मूर्च्छा हा प्रतिशब्द योजलेला काय वाईट ? Stupor या अर्थीं झांपड—रानड्यांच्या कोशांत सुचवलेला—शब्दच उपयोगांत आणणें बरें. "जागरूक निद्रावस्था" हा शब्द इतका अन्वर्थक नाही. असो. याशिवाय दुसऱ्या शब्दांसंबंधानेहि सूचना करतां येतील. चालू, सुरू, का ह्या शब्दांवर निष्कारण अनुस्वार देण्यांत आला आहे तिकडे ग्रंथकारांनी लक्ष द्यावें. बाकी, फारच सुबोध भाषेंत पुस्तक लिहिलेलें असल्यामुळे तें फार उपयुक्त झालें आहे. अशासारख्या पुस्तकांची भर मराठी वाङ्मयांत पडल्याने मराठीची योग्यता वाढल्याशिवाय राहणार नाही.

———

अनुक्रमणिका

# ग्रंथिक कीं ग्रांथिक ?

( लेः – गोविंद पांडुरंग पावशे )

अलीकडे ग्रांथिक ( उ. ग्रांथिक भाषा ) हा अपाणिनीय शब्द प्रचारांत येऊ लागला आहे. परंतु पाणिनीच्या नियमांप्रमाणे तो अशुद्ध असून शुद्धरूप ग्रंथिक असेंच पाहिजे हें खालील विवेचनावरून दिसून येईल.

'अत इनि ठनौ ५।२।११५॥' या सूत्राचा अर्थ असा आहे कीं, अकारान्त प्रा० प० पुढे 'इनि' (इन्+इ) किंवा 'ठन्' (ठ+न्) हे प्रत्यय लागून त्यांचें मत्वर्थीय प्रा. पदिक शब्द बनतात. उदा. दण्डिन्–दण्डिक। ग्रंथिन्–ग्रंथिक इ.

यांतील दुसरा प्रत्यय जो 'ठ' (ठन्). त्याला 'ठस्येकः ७।३।५०॥' (अंगात्परस्य ठस्य इकादेशः) या नियमाने 'इक' आदेश झाला आहे. आणि त्याच्या योगाने वृद्धि होण्याची अपेक्षा नाही म्हणून त्याला 'न्' हा इत् जोडला आहे.

पहिल्या 'इन्' प्रत्ययाला जो 'इ' इत् (इनि) जोडला आहे तो केवळ नकार परित्राणार्थ जोडला आहे.

आता 'ठन्' (इक) प्रत्यययुक्त शब्दांचीं आणखी कांही उदाहरणें देतों तीं अशीं–

धनिक, पथिक, क्रमिक, कर्णिक, किसरिक, वस्निक, कुसीदिक, ठराविक, घटिका, गणिका, इ.

ब्यूबॉनिक प्लेग या रोगाला ग्रंथिक संनिपात हा प्रतिशब्द योजिला होता हें पुष्कळांना आठवत असेलच. दैवज्ञ, ज्योतिषी, गाठेपिंपळमूळ इ. अनेक अर्थांचा असा 'ग्रंथिक' हा शब्द माधव चंद्रोबाच्या 'शब्दरत्नाकर' ( संस्कृत मराठी ) कोशांत दिला आहे.

असो. यावरून पाहतां 'ग्रंथिक' या अवृद्धिमान् शब्दाला ऐतिहासिक आधार आहे हें दिसून येईल.

ज्या तद्धित प्रत्ययाच्या योगाने शब्दाच्या आद्याक्षराला वृद्धि होण्याची अपेक्षा असते त्या तद्धित प्रत्ययाला 'ण्–ञ्–क्' ह्यांपैकी इत् ( अनुबंध ) जोडलेला असतो. उदा०–अण्, ठञ्, ठक् इ०

आता वरील तत्त्वाला बाधक असा प्रत्यय ज्यांत दिसत आहे असें एक सूत्र ओघानुसार येथे देतों तें असें––

'प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः ५।२।३७॥'

याची वृत्ति––तदस्य इत्यनुवर्तते। ऊरू प्रमाणमस्य ऊरुद्वयसम्। ऊरुदघ्नम्। ऊरुमात्रम्॥ याप्रमाणें दिलेली आहे.

वरील सूत्रांतील 'दघ्नच्' हा प्रत्यय तद्धित असून 'ञित्' आहे हें स्पष्ट दिसत आहे. अर्थातच त्याने घटित होणारें शब्दरूप औरुदघ्नम् असें वृद्धिमान् झालें पाहिजे पण तें ऊरुदघ्नम् असें वृद्धिरहितच दाखविलें आहे. तसेंच इतरत्रहि पुरुषदघ्नम्, हस्तदघ्नम् अशा प्रकारचींच शब्दरूपें आढळतात. असें जर दिसत आहे तर भाषेंत रूढ असलेलीं शब्दरूपें चुकीचीं समजावीं, किंवा पाणिनीचें वरील सूत्रच चुकीचें समजावें ? अथवा तें महर्षि पाणिनिप्रणीत असल्यामुळे औपदेशिक अथवा आर्ष म्हणून क्षम्य समजावें ? याचा उलगडा करण्याविषयीं तज्ज्ञांना विनंती आहे.

---

**कॉलिफ्लावरची लागवड:**— (ले. वामन रामचन्द्र गाडगीळ, किं. ६ आणे.) फुलवर ही विलायती भाजी कोबीलाहि मागे टाकील अशा प्रकारची आहे. तेव्हा तिच्या लागवडीसंबंधाने संपूर्ण माहिती देणारें पुस्तक हवेंच होतें. ही उणीव 'महाराष्ट्र कृषीवला'चे संपादक श्री. गाडगीळ यांनी भरून काढली आहे. अशाच प्रकारची निरनिराळ्या भाजीपाल्यांच्या लागवडीची माहिती देणारीं पुस्तकें लिहून श्री. गाडगीळ यांच्याकडून मराठी वाङ्मयांत उपयुक्त भर पडेल अशी आम्हांस आशा आहे. त्यांना पुनः एकदा सूचना करावीशी वाटते कीं शेतकऱ्यांकडून वाचल्या जाणाऱ्या पुस्तकांत विलायती वजनें, मापें घालूं नये. आम्हांस औंस, पौंड यांनी काय समजणार ? तसेंच झाडावरील कीड मारण्यासाठी उपाय म्हणून इंग्रजी औषधेंच सांगितली तर त्यांचा शेतकऱ्यांना कांहीएक उपयोग होणार नाही हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे.

# लोलिंबराजकृत वैद्यजीवन ग्रंथ.

( लेः—प्र. धों. कानिटकर. )

१ सदरहू ग्रंथ लोलिंबराज नांवाच्या ब्राह्मणाने शके १५५५ या वर्षी जुन्नर येथे लिहिला आहे. जुन्या आर्यवैद्यांच्या संग्रहीं हा ग्रंथ हस्तलिखित अगर शिळा-प्रेसवर छापलेला आहे. ह्या ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत मला उपलब्ध झाली आहे. त्यावरून लोलिंबराजासंबंधीं माहिती या लेखांत देण्याचा विचार आहे. सदर प्रतीच्या प्रारंभीं जो मजकूर आहे तो जसाचा तसाच खाली देतों.

२ जुन्नर गांवचे दिवाकरभट्ट ब्राह्मण, त्यांचा पुत्र लोलिंबराज अविद्वान् ; त्याने कांही दिवसांनी शके १५५२ या सालीं पश्चात्तापाने सप्तशृंगास देवीचें आराधन करून त्याच सालीं अश्विन शुद्ध ८ रोजीं आपले शरिराचें हवन करूं लागला तों देवी प्रसन्न होऊन वर माग असें बोलतांच लोलिंबराजाने निभित्स वर मागितला. तें देवीने न ऐकून वर दिला कीं भगभाग्य भागीरथी प्राप्त होईल; आणि आपले मुखां-तील तांबूल त्याचे मुखांत घातला तेणेंकरून तुझे जिव्हाग्रीं सरस्वती वास करील असा वर देऊन अंगावरून हात फिरवून दिव्य शरीर केलें. असें जाल्यावर देवी गुप्त झाली. मग लोलिंबराज आपले गांवीं येऊन कांही लौकिक ( अलौकिक ? ) कृत्यें केलीं. हे वर्तमान पाच्छा यास समजतांच मोठया आदराने त्यास नेऊन प्रश्न केला कीं, माझी स्त्री गरोदर आहे तिजला कन्या किंवा पुत्र होईल ? मग लोलिंबराज बोलला आपली कन्या आम्हांस द्यावी ते पाच्छायाने कबूल केलें आणि पुत्र होईल असें सांगितलें. तसें पाच्छायास प्रचीत आल्यावर कन्या लोलिंबराज यांस देऊन तिचें नांव रत्नकला ठेऊन ( लोलिंबराज ) उपभोग करूं लागला. पुढें शके १५५५ या सालीं हा ग्रंथ करूं लागला.

लोलिंबराजाविषयीं माहिती महाराष्ट्र-सारस्वत ग्रंथांत त्रोटक आली आहे. वैद्य-जीवन ग्रंथाशिवाय लोलिंबराजाने रत्नकलाचरित नांवाचें एक काव्य केलें आहे. त्यांतील भाषा उत्तानशृंगारपरिप्लुत असल्यामुळे तें छापलेलें नाही. त्याची हस्तलिखित प्रत भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या दप्तरीं असल्याचें कळतें. रत्नकला जातीची यवनी होती. तिच्यापासून लोलिंबराजास एक पुत्र झाला त्याचें नांव मेघनाद असें होतें. लोलिंबराजाच्या हयातींतच स्त्रीपुत्रांचा त्यास वियोग झाला व नंतर तो विरक्त बनून पुढे महान् साधू म्हणून प्रसिद्ध झाला. लोलिंबराजाच्या पूर्वायुष्यांतील भाग जगन्नाथ-पंडिताप्रमाणेच होता असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. त्या काळीं हिंदू मुसलमान यव-नींशीं विवाहसंबंध करीत ही गोष्ट जगन्नाथपंडित, लोलिंबराज व बजाजी नाईक

निंबाळकर यांच्या उदाहरणांवरून प्रतीत होते व अवनीतलमेव साधुमन्ये । न वनी माधवनी विलासहेतुः ॥ या जगन्नाथपंडितांच्या उक्तीची सार्थता पटते.

४ वैद्यजीवन ग्रंथांत आर्यवैद्यक पद्धतीची निरनिराळ्या रोगांवर औषधें सांगितलीं आहेत. बहुतेक श्लोक लोलिंबराज व रत्नकला यांच्या संवादात्मक आहेत. बरेच श्लोक श्रृंगारात्मक असून कांही वेदांतपर आहेत. कांही श्लोकांत श्लेषालंकार साधल्याने ते विशेष मनोरंजक झाले आहेत. कांही श्लोकांत हास्यरस साधल्यामुळे रोग व त्यावरील औषध सहज ध्यानांत राहातें. वैद्यजीवन ग्रंथांतील श्लोक निरनिराळ्या वृत्तांत लिहिले असून एक दोन श्लोक महाराष्ट्रीय प्राकृत भाषेंतही लिहिले आहेत. यावरून त्याकाळीं संस्कृताबरोबर प्राकृत भाषेचेंही अध्ययन होत होतें असें दिसतें. हल्ली मात्र दुर्दैवाने विश्वविद्यालयाच्या परिक्षांच्या अभ्यासक्रमांत प्राकृत भाषा क्वचितच शिकविली जाते. प्राकृत भाषेचें व्याकरणशुद्ध अध्ययन होऊं लागलें तर शुद्धलेखनकमिटीपुढे येणाऱ्या शंकाकुशंकांचा सहज निरास होऊं शकेल. वैद्यजीवन ग्रंथ पाहतां लोलिंबराजाचा पिता दिवाकरभट्ट हाही वैद्य असून त्याने वैद्यशास्त्रावर ग्रंथ लिहिल्याचें दिसतें. या ग्रंथांत रत्नकलाचूर्ण व लोलिंबराजपाक अशी दोन औषधें दिलेलीं आहेत. वैद्यजीवन ग्रंथांत शब्दालंकार व अर्थालंकार साधले असून प्रसाद व माधुर्य उच्च दर्जाचें आहे. हा वैद्यशास्त्रावरील ग्रंथ एक छोटेसें काव्यच होय. वैद्यांशिवाय इतर जनांच्या परिचयाचा हा ग्रंथ नाही. वैद्यांस याचें महत्त्व वाटणार नाहीं व चिरपरिचयामुळे त्यांस या लेखाचें स्वारस्यहि वाटणार नाहीं. तथापि इतर लोकांस थोडा तरी उपयोग होईल या हेतूने हा लेख लिहिला आहे. या ग्रंथांतील औषधें नित्य परिचयाचींच आहेत तथापि तीं अनुभविक असल्यामुळे उपयोग करण्यास योग्य अशींच आहेत. पुढे कांही निवडक श्लोक दिले आहेत त्यांवरून वरील वर्णन यथार्थ असल्याचें निदर्शनास येईल.

## निवडक श्लोक.

### पित्तज्वरांत अतिदाह होतो त्याजवर.

तृड्दाहमोहाः प्रशमं प्रयांति निंबप्रवालोत्थितफेनलेपात् ।
यथा नराणां धनिनां धनानि समागमाद्वारविलासिनीनाम् ॥ १ ॥

( कडुनिंबाच्या पानाचा फेंस अंगास लावला असतां तृषा, दाह, मोह शांत होतात ).

### अरुचीवर उपाय.

मम द्वयं विस्मयमातनोति तिक्ताकषायो मुखतिक्तताघ्नः ।
निपीडितोरोजसरोजकोशा योषा प्रमोदं प्रचुरं प्रयाति ॥ २ ॥

( कुटकीचा काढा अरुचिनाशक ).

चातुर्थिक ज्वरावर उपाय.

चातुर्थिको गच्छति रामठस्य घृतेन जीर्णेन युतस्य नस्यात् ।
लीलावतीनां नवयौवनानां मुखावलोकादिव साधुभावः ॥ ४ ॥

( जुन्या तुपांत हिंग उगाळून नाकांत नस्य द्यावें ).

विषम ज्वरावर उपाय.

यो भजेत्समधुश्यामां हे हेमकलशस्तनि ।
विषमेषु व्यथास्तस्य न भवंति कदाचन ॥ ५ ॥

( पिंपळीचें चूर्ण मधाबरोबर घेतल्यास विषमज्वर होणार नाही ).

या श्लोकांत 'समधुश्यामां' हें पद श्लिष्ट आहे. त्याचा दुसरा अर्थः— जो काळी देवीचें अराधन करून, मद्य सेवन करितो, त्यास संकटकाळीं कांही पीडा होत नाही.

सायंकाळीं भोजनाचा नियम.

अयि रत्नकले कलानिधे कुशले कोकिलकोमलस्वरे ।
ज्वरवान् ज्वरवर्जितोऽथवा लघु कुर्याद्शनं दिनात्यये ॥ ६ ॥

( सर्व मनुष्यांनी संध्याकाळीं अल्प भोजन करावें ).

खोकल्यावर उपाय.

अतः परं कोमलवाणि कासश्वासप्रतीकारमुदीरयामः ।
निहंति कासं लघु पंचमूलीकृतः कषायश्चपलासहायः ॥ ७ ॥

( रिंगणीमूळ, डोरलीमूळ, सालवण, पिठवण, गोखरू यांच्या काढयांत पिंपळीचें चूर्ण घालून घ्यावें ).

खोकल्यावर दुसरा उपाय.

अस्ति प्राणपते मम प्रियतमा कंदर्पलीलासखी ।
कासक्लेशवशादतीव कृशतां प्राप्तास्ति सा सांप्रतम् ॥
तस्यास्त्वं कथयोपचारमधुना क्षौद्रान्वितं दयिताम् ।
विश्वग्रंथिकणाकलिद्रुमभवं चूर्णं चकोरेक्षणे ॥ ८ ॥

( सुंठ, पिंपळमूळ, बेहेडेदळ यांचें चूर्ण मधांत द्यावें ).

आमवायूवर उपाय.

विलासिनीविलासेन विलासिहृदयं यथा ।
तथा गुडूचिविश्वेन हरेदामसमीरणम् ॥ ९ ॥

( विलासिनीच्या विलासाने ज्याप्रमाणे विलासि पुरुषाच्या हृदयाचें हरण होतें, त्याप्रमाणे गुंळवेल व सुंठ यांच्या काढ्याने आमवाताचें हरण होतें ).

डोळ्यांतील फुलावर उपाय.

श्यामे श्यामे प्रियः श्यामे श्यामात्रोधितमानसे ।
शुक्रं शमयति क्षिप्रं माक्षिको माक्षिकान्वितः ॥ १० ॥

( सुवर्णमाक्षिक मधामध्यें उगाळून नेत्रास अंजन करावें; फूल झडतें ).

### काविळीवर उपाय.

अये मनोज्ञकुंडले स्फुरन्मुखेन्दुमंडले ।
गवां पयः सनागरं प्रिये निहंति कामलाम् ॥ ११ ॥

( गाईचें दूध सुंठ घालून प्यावें; कावीळ दूर होते ).

### क्षयावर उपाय.

विद्वल्लामलोलिंब नृपते वाग्विलासतः ।
न तृप्तिमधिगच्छामि पुनः किंचिन्निरूपय ॥ १२ ॥
क्षयोत्पत्तिविनाशाय सिंहास्यः सेव्यतां सदा
बहूनामस्य विश्वासो जातः कमललोचने ॥ १३॥

क्षयोत्पत्तिविनाशाय = ( १ ) जन्ममरणातीत होण्यास.
( २ ) क्षयरोगाचा उग्रम मोडण्यास.

सिंहास्यः = ( १ ) नरसिंह.
( २ ) अडुळसा.

क्षयरोगावर अडुळशाचा काढा प्यावा.
जन्ममरणातीत होण्यास नरसिंहाचें आराधन करावें.

### क्षयावर दुसरा उपाय.

अयि सुंदरि सुंदराननें रुचिरापांगतरंगलोचने ।
नवनीतमधुपलाशनात् उडुराजस्य भवेत् क्षयक्षयः ॥ १४ ॥

( लोणी, मध, खडिसाखर एकत्र करून भक्षिल्याने चंद्राच्या क्षयाचा सुद्धा नाश होतो ).

### मेदोरोगचिकित्सा.

मदनज्वरकारिनामधेये रसिके रत्नकले प्रभातकाले
शिशिरांबु पिबन् मधूपयुक्तं गणनाथोऽपि भवेत् किलास्थिशेषः॥ १५॥

( प्रातःकाळीं मध व गार पाणी एकत्र करून प्याल्याने गणपति सुद्धा अस्थिशेष ( रोड ) होईल ).

### प्रमेहावर उपाय.

पउमवाणमणोज्जविलोअणे ।
ससिसहामणमोहणजोव्वणे ॥
जयइ मेहगणं अमुआरसो ।
महुजुओबहरी हरिणं प्रिये ॥ १६ ॥

( गुळवेलीचा रस मध घालून प्यावा )

## खरजेवर उपाय.

नखमुखलालनसुखदा पामा रामा नितंबविस्तारा ।
स्नेहकनकरसगंधैर्गच्छति पूर्वापरा वशं याति ॥ १७ ॥

(धोतऱ्याचा पाला, पारा, गंधक तेलांत खलून लाविल्ें असतां खरूज जातें).

. या श्लोकांत उत्तम श्लेषालंकार साधला आहे हें सहृदयवाचक जाणतीलच.

## जठराग्निमांद्यावर उपाय

प्राणेश्वरि प्रियतमे वद किं वदामि ।
तत्कांत भो किमु मृगाक्षि यदग्निकारी ॥
सम्यक् शृणु प्रणयिनि प्रणयिन् शृणोमि ।
खादेत् सनिंबुरससैंधवशृंगबेरं ॥ १८ ॥

लिंबाचा व आल्याचा रस समभाग त्यांत तितकेंच सैंधव घालून जेवणाचे आधीं घ्यावा ).

## दंतरोगावर उपाय.

सोयं सुगंधिमुकुलो बकुलो विभाति ।
वृक्षाग्रणीः प्रियतमे मदनैकबंधुः ॥
यस्य त्वचैव चिरचर्वितया सुगाढम् ।
दंता भवंति चपला अपि वज्रतुल्याः ॥ १९ ॥

( बकुळीच्या झाडाची साल चावल्याने खिळखिळे दांत वज्रतुल्य होतात ).

## शोकावर उपचार.

अयि रत्नकले कुरु मा कलहं कलहंसकलत्रसमानगते ।
शृणु मद्वचनं वद वैद्यमणे मदिरा मदिराक्षि शुचं शमयेत् ॥ २० ॥

( यवनीच्या सानिध्यांत सुखोपभोग घेणाऱ्या वैद्याने शोकनाशनार्थ मदिरा-सेवनाचा उपाय सांगणें यांत विशेष आश्चर्य नाही ).

वैद्यजीवन हें ग्रंथाचें नांव यथार्थ आहे. औषधें साधीं व सहज मिळण्या-सारखीं आहेत. ग्रंथ अगदी लहान आहे. परंतु त्यांत बहुतेक रोगांची चिकित्सा केलेली आहे. होमिओपॅथी. १२ क्षार इत्यादि औषधींऐवजीं वैद्यजीवन ग्रंथ संग्रहीं असल्यास डाक्टरचीं बिलें भरण्याची पाळी येणार नाही. आर्यवैद्यकाचे अभिमानी हल्ली बरेच आहेत. त्यांपैकीं कोणी हा ग्रंथ छापल्यास जनतेवर अनंत उपकार होतील. वैद्य-जीवन ग्रंथास घरचा वैद्य हें नांव अधिक शोभेल. हा लेख वाचून एखाद्यास जरी वैद्य-जीवन ग्रंथ वाचण्याची स्फूर्ती झाली तरी लेखाचें सार्थक झालें असें म्हणतां येईल. लोलिंबराज किती विद्वान् होता ही गोष्ट प्रत्ययास यावी म्हणून निवडक श्लोक ज़ास्त दिले आहेत त्याबद्दल वाचक क्षमा करतील अशी उमेद आहे.

---

# हत्तींची कांहीं नवीन माहिती.

( लेः— चिंतामण गणेश कर्वे, संपादक महाराष्ट्रशब्दकोश )

हत्ती सर्वश्रेष्ठ ऐश्वर्याचें प्रमुख लक्षण असल्यानें सकल ऐश्वर्यांचा भोक्ता जो इंद्र त्याच्याजवळहि ऐरावतासारखा देवदैत्यांनी समुद्रमंथनांतून काढलेल्या चौदा रत्नांपैकीं एक असा गजराज आहे. देवेंद्र भगवंताच्या आज्ञेवरून ऐरावतावरच्या चवरडोलांत बसण्यापूर्वी त्याची प्रार्थना करून नमन करतो असें जुन्या ग्रंथांतून सांगितलेलें आढळतें. चतुरंग सेनेच्या अग्रभागीं अलंकार आणि उंची वस्त्रें यांनी सुशोभित असणारा सुलक्षणी हत्ती ध्वजा भेरी वगैरे राजचिन्हें धारण करून डुलत चाले; महशूर हत्तीवरची ध्वजा धरून बसे व त्याच्या रक्षणार्थ अनेक महावीर मागून चालत अशीं वर्णनें आपण नेहमीं वाचतोंच. आज देखील राज्यारोहण, दसरा व इतर मोठे प्रसंग संस्थानांतून हत्तीशिवाय साजरे होत नाहीत. ' गजांत लक्ष्मी '; ' दारांत हत्ती झुलणें ' यासारखे वाक्प्रयोगहि हत्तीचें अतिशयित महत्त्व पटवून देतात. असो. पुढील टांचणांत हत्तीसंबंधीं शाब्दिक माहिती थोडीफार सांगण्याचा इरादा आहे. चालू काळांत आपण हत्ती विसरत चाललों आहों खरें; तथापि त्याची आठवण कांहीं शब्दांवरून राहीलच.

सर्व सजीव निर्जीव वस्तूंप्रमाणे हत्तींमध्येंहि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशा चार प्रमुख जाती कल्पितात. पुन्हा या प्रत्येक जातीच्या आठरा पोटजाती आहेत. ही पाण्यावर पोहणारी वसुंधरा स्थिर करण्यासाठीं परमेश्वरानें अष्टदिग्गज सूर्यांपाशासून निर्माण केलें अशी कथा आहे. हे आठ दिशांचें आठ हत्ती व त्यांच्या बायका यांचीं नांवें पुढीलप्रमाणें ( कंसाबाहेर हत्तीचें व आंत त्याच्या बायकोचें नांव दिलें आहे. )

१ ऐरावत ( अभ्रमु ). २ पुंडरीक ( कपिला ). ३ वामन ( पिंगला ). ४ कुमुद ( अनुपमा ). ५ अंजन ( ताम्रकर्णी ). ६ पुष्पदंत ( शुभ्रदंती ). ७ सार्वभौम ( अंगना ). ८ सुप्रतीक ( अंजनावती ).

या अष्टदिग्गजांपासून पुढे हत्तींचा जगभर विस्तार झाला !

ज्या रानांत हत्ती असतात त्यांवरून हत्तींचे वर्ग करण्यांत आले होते. पुढे कांहीं रानांचीं नांवें देतों. शिलट; कज्यलीवन; मुरुंगाल; बंगाली; पुरब; नेपाळ; धनश्री; सिंहलद्वीप; पेगो; पिपरा; टिपरा; सैलान; महमुदबंदर; गिड्डावनी; मलबार; कोड ( कुर्ग ? ); नीलगिरी; पालघाट; कोवेमथुर ( कोइमतुर ? ); कडी. यांपैकीं पुष्कळ नांवें आज परिचित आहेत. या प्रत्येक रानांतील हत्तींचें विशिष्ट लक्षण हत्तीवरील ग्रंथांत सविस्तर दिलें असून तें सामान्य वाचकांस वेचव व निरुपयोगी वाटेल म्हणून येथे देत नाही.

हत्ती ५।६ रंगाचे असतात. ऐरावताखेरीज पृथ्वीवर पांढरा हत्ती नाही असें पुराण समजतें. पण सयामांत पांढरे हत्ती आहेत. भुरा. श्यामवर्ण, काळा, ठिपक्यांचा असें हत्ती असतात. ठिपके (कवडे) पांढरे, गुलाबी, कवरे (भुरे) व काळे डोंबहि सांपडतात. दांताचे रंग पिवळट, खडक्या, चिकणा, पांढरा, दुध्यापांढरा, तांबूस अशा प्रकारचे असतात. पलखदंत्या, फाकटदंत्या, चिपटदंत्या, उचलदंत्या असे दांतांवरून वर्ग करण्यांत येतात. हत्तींच्या अवयवांच्या ठेवणीवरूनहि कांहीं नांवें पडलीं आहेत. उदा. सुतरकमानी (उंटाप्रमाणे पाठीला कमान आहे असा). कांहीं जन्मतःच सुतरकमानी असतात तर कांहीं पिल्लांस तोंडांत धरून नदीपार नेतात म्हणून सुतरकमानी होतात. उंच ठिकाणचा चारा खाण्याच्या सवयीने कांहींचा आगा उंच होतो. तर खडे रेतींतून फार फिरल्याने तळ मजबूत होऊन कांहीं तळमुंडे होतात.

हत्तींच्या वीर्याचें स्थान मस्तक आहे असें म्हणतात. तेव्हां हत्ती माजास आला म्हणजे मस्तकांतील (कपाळावरील) छिद्रांतून मद वाहतो. असा मद वाहून गेल्यावर हत्ती नीट रहातो. नाहींतर फार उच्छृंखल होऊन महाताच्या आटोक्याबाहेर जातो. म्हणून मद वहात नसेल तर छिद्रें पाडून तो वहावण्यास लावतात. हा मद चार-सहा महिने वहातो. पुन्हा मद सांठला म्हणजे मस्ती करतो. हत्तींचा मद कसा असतो याची अपूर्व माहिती देतांना तो कधीं पिवळा व थोडा खारटतुरट, कधीं सुवासिक, गुलाबी आणि गोड, तर कधीं तेलकट, मळकट आणि कडू असतो असें सांगितलें आहे; त्याचा अनुभव फार थोडयांस असेल. मनुष्यवीर्यासंबंधींहि कांहीं ग्रंथांतून रंग आणि चवी यांची माहिती आढळते ! मद गळणारीं छिद्रें साधारण चार असतात. मद येण्यापूर्वी हत्ती कुंदी (? आळेपिळे) करतो; छरेरी (? चिरचिर शब्द) करतो; त्याचा मोहरा लाल होतो; निरनिराळया रीतींनी गुंगतो; बडबडतो; 'अंगमोडे देऊन मोहोरे करितो'; 'नाक (?) चढवितो'; 'आपला हात (?) चावून घेतो' वगैरे मनोरंजक वर्णन वाचूनहि आपल्या अज्ञानामुळें फारसा बोध होत नाहीं.

हत्ती मस्तींत असला म्हणजे आठपंधरा दिवसांनी त्यास 'बेहडयास' (? हातपाय मोकळे करण्यास) सोडावें असें सांगून त्या दिवशीं महाताने कसें वागावें यासंबंधीं मोठ्या गमतीच्या सूचना केल्या आहेत.

"मस्तीचे हत्तीस बेहडयास सोडण्याचे दिवशीं माहताने मोठे पहाटेस उठून मंगलस्नान करून कुंकुम टिळा लावावा. अनुकूल असेल तें मिष्टान्न भोजन करावें. नंतर कुलस्वामीचे गुरूचे व धन्याचे पायावर डोकें ठेऊन सोयरे-धायरे इष्टमित्र यांस भेटून असेल पदार्थ त्यांत मन तृप्त करून, वस्त्र-प्रावरण, मुखीं तांबूल, सुगंधी पदार्थ अंगास लावून घ्यावें. निशापाणी कांहीं न घेतां मोठे पहाटेस सूर्योदयाचे पूर्वी येऊन हत्तीजवळ जाऊन तयार करावें. मग आरोहण करावें. गळयांत किलावा बांधून, झूल घालून नाडा करावा. हत्ती फार इरामी असल्यास पुढील व मागील पायास लंगर लावून त्याचे गुणे लावावे. दोरी घेऊन वर बांधावे. हातांत गजबाक बळकट असून

त्यासहि एक लहान दोरी लावावी. माहताने आपले जोडा चांगला पाहून कातवालास मागे बसवून घ्यावें. मागील पायास बिंडा सरकफाश्याचा घालून, गांवाबाहेर गेल्यावर सोडावा. अगर मागील पायास उगी भरावी. कातवालाचे व स्वाराचे भाल्याचे जोड करून चक्रीबाणदार जवळ असावे. हत्ती फार हरामी असल्यास गळ्यांत काट्याचा किलावा बांधावा. त्याजवरहि न ऐकेल तर डोळ्यावर झांपड घालावी. जो हत्ती झाडतो त्यास वेडयास सोडूं नये. याप्रमाणें वेडा करून आल्यावर मान देऊन ठाणावर बांधावें. कांही पशुपक्षी आदि जीव त्याजवर सत्का करून टाकावा. कपाळास मृदु पदार्थ लावावे. फार तात्र झाल्यास मर्जी पाहून उतार गुरुमुखें ऐकून घ्यावा. ”

—हत्तींचें वर्णन, शके १७७८ मधील राजविलास ग्रंथ.

वरील उताऱ्यावरून हत्तीचें, त्याचप्रमाणें त्याच्या मदाचें महत्त्व नीट कळून येणार आहे. शिवाय पुष्कळदां विशिष्ट शब्दयोजना जी आढळतें, ती आज कशी दुर्बोध झाली आहे याचें प्रत्यंतरहि येईल. महाराष्ट्र-शब्दकोशासाठीं अशीं पुस्तकें वाचतांना अनेक शब्दांचें मूळ अर्थ काय याचा मोठा विचार पडतो. जवळपास अर्थ उलगडण्याचीं साधनें नसतात; वृत्तपत्रें आणि मासिकें यांतून तरी किती मजकूर देणार ? संपादकाला ही ब्याद नको असें होऊन जाणें साहजिक आहे. तेव्हा कोश-संपादकाची अडचण येथे अनायासें मांडली गेली आहे.

आतां शेवटीं महाताने हत्तीस कोणत्या बोलांनी समजवावे यासंबंधीं सांगून हें टांचण पुरें करूं.

### हत्तीबरोबर बोलावयाची भाषा.

| बोल अर्थ | बोल अर्थ | बोल अर्थ |
|---|---|---|
| भट = बैस. | हालो = पुढील पाय उचल. | छुम छुम = नाच. |
| सम भट = बरोबर बैस. | भिर भिर = सोड, टाक. | लगी लगी = मार. |
| झल उठ = उठ. | धत्त धत्त = मागे सर. | आउ = पाय लांब कर. |
| बोल = बोल. | त्रेत्रे = उभा रहा. | ताल = मान उचल. |
| दम बोल=सावकाश बोल. | छवदले = पाणी पी. | भड भड = बाजूस फीर. |
| भर = हात वर कर. | हादी हादी=मागील पाय उचल. | पुरु पुरु = गुडघ्याने चाल. |
| भिड = पुढे ये. | धर = रतीब खा. | झुक झुक = सोंडमार. |
| हलध्वा = चाल. | ढील सम = भीड. | झबक झबक=मान खालीं कर. |
| धर धर धर=जलद चाल. | कान रख = कान नीठ ठेव. | |

असें बोल किती तरी आहेत. त्यांची व्युत्पत्ति सांगण्यास भाषाशास्त्रज्ञ जमले पाहिजेत. हें बोल सध्यां प्रचारांत आहेत का नाहीत हें माहीत नाही.

# मराठी शुद्धिभ्रमचर्चा

[ लेखकः — वि. ह. निजसुरे ]

अध्यात्माचें विशद विवेचन करणारे श्लोक रचल्याबद्दल शंकराचार्यांच्या एका शिष्यास 'हस्तामलक' हें नांव मिळालें होतें. तेव्हा करतलामलकाप्रमाणे हस्तामलकहि प्रसिद्ध वाक्-प्रचार होता. त्यापासून रा. गो. कृ. मोडकांच्या कल्पनेप्रमाणे हस्तामलकाचा नादसाम्याने 'हातचा मळ' हा अपभ्रंश असूं शकेल. एतद्देशीयांच्याच मदतीनें केलेल्या मोल्सवर्थच्या कोशांत हातचा मळ याचे ज्ञानसौलभ्य, क्रियासौलभ्य व 'अंगचा मळ' याच्या अर्थाप्रमाणे दानाचा क्षुद्रपणा असे तीन भिन्न अर्थ दिले आहेत. पहिल्या अर्थानें त्याची व्युत्पत्ति संस्कृत पासून व नंतर २।३ हे अर्थविकार अशी व्यवस्था करावी किंवा दुसऱ्या व तिसऱ्या अर्थी त्याची मराठींतूनच स्वतन्त्र उत्पत्ति मानावी. ही तडजोड सर्वांस पटेल अशी आशा करण्यास हरकत नाही.

'करतलामलक' पैकीं 'करतला'चें हातचा मळ हे भाषान्तर व 'मलक' याचा अपभ्रंश मळ, मिळून हातचा मळ ही रा. म. ह. मोडक यांची कल्पना क्लिष्ट असून तिच्यांत द्राविडी प्राणायाम आहे. अर्धें भाषान्तर व अर्धा अपभ्रंश हे संस्कृतामधील 'अर्धजरतीय' (अर्धी कोंबडी खाण्यास व अर्धी प्रसूतीसाठीं) या न्यायाचें खासें उदाहरण होईल. पण तो दोष गणला आहे. शिवाय 'करतलामलक' याचें 'करतलींचा आवळा' हेंही मराठींत असल्यावर दुसऱ्या भाषान्तराची जरूरी काय? तेव्हा त्यांची तडजोड आम्हांस मान्य होत नाही याबद्दल दिलगिरी वाटते.

हरिणी या क्षुद्र प्राण्याचें 'मृगी' हें नांव चन्द्रासारख्या दिव्य वस्तूस लावण्यास लोकांस संकोच वाटतो ही त्यांची कोटी शुष्क आहे. कारण म्हैस या अर्थाचा महिषी हा शब्द राणी या अर्थींहि रूढ आहे. हरि म्ह. विष्णु किंवा माकड तसेंच नवराबायकोचा 'जोडा' व पायांतील फाटका असला तरी 'जोडा' च वगैरे उदाहरणांवरून त्यांचें म्हणणें त्यांचे अंगा-बर येतें. शिवाय अशा विटाळाच्या भीतीनें श्लेषालंकार नष्ट होऊन तन्मूलक व्यंग्यार्थाहे नाहीसा होऊन काव्यरसाची हानि होईल. लोक हे कित्येक वेळां लहरीने शब्दप्रयोग करतात किंवा करित नाहीत हीच त्यांची रीत नैषधकाराने थोड्याशा विनोदाने सांगितली आहे. असो.

## आणखी दोन शुद्धिभ्रमाचीं उदाहरणें.

श्वयुवमघोनामतद्धिते या सूत्रांत पाणिनीने कुत्रा, तरुण, व इन्द्र यांचे पर्याय एकत्र गोवले आहेत म्हणून 'विचारवान् पाणिनिरेकसूत्रे, श्वानं युवानं मघवानमाह' अशी कोटि एका सुभाषितकाराने केली आहे व आपाततः आपल्यास मौज वाटते; पण व्याकरणांत असे

अगदी भिन्न वस्तूंचे शब्द शेजारीं बसणारच. तेव्हा अगदी विचित्र कोटिक्रम एके ठिकाणीं गोवणाराची चेष्टा वरील सुभाषिताने करण्याची पद्धत रूढ होऊन बसली आहे ती दुरुस्त करणें इष्ट असेल तर शक्य आहे काय?

मुर्खांचें मन वळविण्याची अशक्यता दाखविण्याकरितां सशाचें शिंगहि सापडूं शकेल. याबरोबर 'प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे' हें काल्पनिक सत्य गृहीत (hypothetical) धरलें असून तेंच आता वास्तविक सिद्धांत म्हणून रूढ झालें आहे. वाळूंत तेलाचा थेंबहि सापडणार नाही 'जनानने कः करमर्पयिष्यति' (लोकांच्या तोंडास खीळ कोणी घालावी?) दुसरें काय?

## परिभाषा.

Parsing (ग्रंथावरून व्याकरण चालविणें) यास एक शब्द रूढ होणें जरूर आहे. रा. दामले यांनी 'पदस्फोट' हा शब्द तयार केला आहे. रा. मोडकांनी 'पदसंमर्श' हा शब्द सुचविला आहे. दामल्यांचा शब्द चार अक्षरी पण थोडा कठोर व मोडकांचा जास्त कर्णमधुर पण थोडा लांबट आहे. आम्हांस दोन शब्द सुचवावयाचे आहेत. प्रचलित 'विभक्ति' शब्दच या अर्थी रूढ करतां येईल. विभक्तीचा अर्थ नामविभक्ति व क्रियापदविभक्ति अशा दोन्ही तऱ्हेचा पाणिनीमध्यें आहे. अव्ययांच्या विभक्तींचा लोप झालेला आहे असं मानतात. तेव्हा शब्दाची जात हा अर्थ विभक्तीच्या अर्थात अधिक गोवला म्हणजे Parsing ची सर्व कल्पना विभक्ति शब्दाने दाखविली जाईल. कारण लिंग, वचन, काळ वगैरे इतर बहुतेक गोष्टी विभक्ति-प्रत्ययाने दाखविल्या जात आहेतच.

दुसरा शब्द पदकृत्य हा होय. न्यायशास्त्रांत अतिव्याप्ति अव्याप्ति वगैरेंच्या दृष्टीने प्रत्येक शब्दाचें स्वारसिक कार्य सांगणें तसेंच अन्वयार्थाचे दृष्टीने प्रत्येक शब्दाचें महत्त्व सांगणें यास पदकृत्य म्हणतात. तेव्हा Parsing याने जें जें कार्य समजावयाचें तेंच पदकृत्य याने व्याकरणांत समजावयाचें. अमुक शब्दाचें 'पदकृत्य' सांगा म्हणजे ग्रंथावरून व्याकरण सांगा किंवा लिहा. न्यायशास्त्राचे प्रसंगीं त्याचा अर्थ त्या शास्त्रास धरून होईल. परिभाषा-मंडळ या सर्व संज्ञांचा विचार करीलच.

## व्युत्पत्ति

भूयसी—हा भिक्षुकांचा 'पुष्कळ दक्षिणा' या अर्थाचा सांकेतिक शब्द नुकताच केसरींतील अग्रलेखांत आला आहे. त्याची व्युत्पत्ति अशी. कर्मान्तीं 'एतेभ्यो नानागोत्रेभ्यो ब्राह्मणेभ्यो भूयसीं दक्षिणां दातुमहमुत्सृजे' असा दक्षिणा देण्याचा संकल्प आहे. त्यांत 'भूयसी' (बहु याचें तारतम्यदर्शक ईयस् प्रत्ययान्त अनियमित रूप, स्त्री० अर्थ 'अधिक पुष्कळ') हें दक्षिणा याचें विशेषण. तेव्हा अत्यन्त इष्ट जी दक्षिणा तिचें बाहुल्यदर्शक विशेषण हें विशेष्याच्या अर्थी विशेषणविशेष्यसंबंधाने लक्षणेने सांकेतिक म्ह० खुणेचा शब्द म्हणून वापरतात. अत्यन्त आवडीच्या वस्तूचा उल्लेख असाच पर्यायाने होत असतो. 'भूयसी' मध्यें जो लाळघोटेपणा दिसून येतो तोच travelling allowance (प्रवासाचा भत्ता) च्या T. A. यामध्यें आहे. तेव्हा भिक्षुकांसच हसण्याचें कारण नाही.

संचार जाणें—जाऊं देणें=भलतीकडे वाहवणें. हा भाषासंप्रदायहि वैदिक आहे. 'तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे' याचे ऐवजीं "तस्माद्यज्ञात्सर्वहुतः संभृतं पृषदाज्यम्" असें म्हणणें; किंवा मराठी उदाहरण 'या दृढ मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला' याचे ऐवजीं 'या दृढमदभिप्रायापासुनि मागें वळेंचि फिरवील' इ० म्हणावयास लागणें म्हणजे फाजील संचार जाऊं देणें. म्हणजेच विषयान्तर. गाडी भलत्याच रुळावर जाऊं देणें किंवा to drive at a tangent यांशीं समानार्थक सदरहू वाक्प्रचार लोकमान्यांच्या लेखांत कांहीं ठिकाणीं वाचल्याचें स्मरतें. आधुनिक इतर लेखकांपैकीं वैदिक पद्धति फारशी कोणास ठाऊक नसल्यामुळे इतरांचे लेखांत हा वाक्प्रचार आढळला नाही.

## परिभाषा.

संस्कृतोद्भव भाषांना प्राकृत हें नांव आहे. मराठीपासून होणाऱ्या भाषांना 'मराठीच्या प्राकृत भाषा' असा शब्द योजण्यांत येत आहे. प्रकृतीपासून म्हणजे मूळ भाषेपासून आलेल्या त्या प्राकृत असा एकच शब्द रूढ करावा. 'मराठीच्या प्राकृता.' आम्हांस विकृति हा शब्द सुचवावासा वाटतो. मीमांसेंत मूळ यागास 'प्रकृति' व त्यांत फरक करून केलेल्या यागास 'विकृति' म्हणतात. सांख्य मूळ कारणास प्रकृति व कार्यास विकृति म्हणतात. वैद्यकांत प्रकृति बिघडली असतां विकृति झाली असें म्हणतात. या सादृश्यानें मूळ भाषा म्ह. प्रकृति, तिजपासून बदल होऊन झालेली भाषा ती विकृति. तेव्हा प्राकृत भाषा या दुहेरी शब्दापेक्षा प्राकृत स्त्री. ए. वचन व प्राकृता बहुवचन; किंवा विकृति, असे एकेरी शब्द प्रचारांत आणावे.

———

# जुन्या काळच्या गांवठी शाळांतील प्रार्थना

गोमंतकांत गेल्या तीस वर्षांपूर्वीं शणैमामांनी चालविलेल्या गांवठी शाळा असत, त्यांत संध्याकाळचा अभ्यासक्रम आटोपल्यावर मुलांस उभे करून त्यांच्याकडून उजळणी म्हणून घेत व नंतर प्रत्येकाकडून देवादिकांवरील श्लोक, आर्या वगैरे पाठ म्हणून घेतल्यावर शणैमामा खालील प्रार्थना शिकवीत असत.

### प्रार्थना.

गणपत गणपत श्रीपत खंडे । हातोबराबर चौदा दंडे
एक दंड कल्याणी । माणिकमोतीं मल्याणी
मल्याणीचे निळे घोडे । पहिले पाढे गणबाचे
गणबाच्या हातांत चित्रंग काठी । गणबा लागला अक्षरपाठी
एकेक अक्षर कोटीस बाणे । तेंच अक्षर पंडित जाणे
पंडिता पंडिता काय काय लिजो । लिजो लिजो मोत्यां हार
नाद वाजे वाजे टाळ । लिजो लिजो लिजोसळी
तिचीं पिलां कापुसलीं । कापुसलीचे मोरया
मोर गेले चरावया । विद्या आली पढावया
तीच विद्या खरी । पंत मारी छडी
छडी कांही लागेना । विद्या कांही येईना
छडी लागे छमछम । विद्या येई घमघम
छडीवर पडली सावली । आम्हांस विद्या पावली
पावली तर पावुन घ्या । हातपाय जोडून विद्या मागा
सकाळीं उठून शाळेंत या । मंगलमूर्ति मोरया !

ही प्रार्थना दुर्बोध असून आजकाल ती लोकांच्या परिचयांतूनहि गेली आहे. तिचा कर्ता कोण हे कळणें तर अशक्य होऊन बसलें आहे. देशावरून ती गोमंतकांत आली कीं तिची रचना येथेच कोणाकडून झाली हेंही समजण्यास मार्ग नाही. तरी पण जुन्या शाळांतून शिकलेल्या बहुतेकांस ही तोंडपाठ असेल. त्यांपैकीं कोणास या प्रार्थनेचा अर्थ, उत्पत्ति वगैरेसंबंधीं माहिती असल्यास ती त्यांनी प्रसिद्ध करावी.

येथेच, गोमंतकीयांना माझी अशी विनंति आहे कीं, ज्यांना ज्यांना वरील सारखीं जुनीं पदें, कविता किंवा जानपद गीतें ठाऊक असतील, त्यांनी त्यांनी ती शक्य तर अर्थासह माझ्याकडे पाठविण्याची कृपा करावी. अशा गीतांचा समाजशास्त्राच्या अभ्यासाला किती उपयोग होतो, हें सांगावयास नकोच.

जनार्दन विष्णु कामत,
हिंदु कार्यालय, मडगांव—गोवा.

# पारिभाषिक शब्दकोश

## वैजिक–प्रकरण.

महाराष्ट्र-शास्त्रीय-परिभाषामंडळाकडून वास्तव शास्त्रांतील परिभाषेच्या चर्चेकरितां जीं उपमंडळ नेमलें गेलें त्या उपमंडळाच्या सभेमध्यें बराच ऊहापोह होऊन वैजिक प्रकरणीं ज्या पारिभाषिक संज्ञा मान्य झाल्या त्यांची यादी पुढें दिली आहे. पहिली यादी प्रकाश–प्रकरणी असून वर्ष–३–पृ. १३६–१४९ मध्यें प्रसिद्ध झालीच आहे. विद्वज्जनांनीं या विषयांत लक्ष घालून आपल्या सूचना व अभिप्राय मंडळाकडे पाठविण्याची कृपा करावी.

पुणें; शनवारवाड्याजवळ
बिनीवाले यांचा वाडा
१।१२।१९३०

चिटणीस
म. शा. परिभाषामंडळ

Accumulator, Secondary cell, Storage cell, Accumulator cell = प्रायुविजेरी, प्रायु.

Acid Battery = अम्लविजेरी.
Alkaline Battery = अल्कविजेरी.
Alternating current = यातायातिक वहाळ.
Alternation = यातायात, अग्रायण.
Ampere = ओघ.
Amperemeter, (Ammeter) = ओघमापक.
Amperehour = ओघतास.
Ampere-turns = वहाळवेढे, ओघवेढे, ओघवलय.
Amplitude = उन्मेष, त्रिज्या.
Angle of Lag = पश्चांश.
Angle of Lead = अग्रांश.
Anode = धनप्रस्थ, पराग्र, धनवीजायक.
Attraction = आकर्ष, आकर्षण.
Axis = अक्ष.
Axial field = अक्षीय क्षेत्र.

Capacity = धारणा; आवाका.
Capacitance ( condensance ) = धारण.
Capacity reactance = धारणात्मक अवरोध. प्रत्यवरोध.
Cathode. = ऋणप्रस्थ, अपराग्र ऋणवीजायक.
Charge. १ उच्चय, वीजोच्चय, आधान, वीजाधान ( of electricity ) २ भरणा, भरणूक ( of Battery ) ३ वस्तु ( of magnetism )
Charging = १ भरणूक २ उद्भाजन ३ आधान वीजाधान.
Compass Needle = दिशादर्शक
Condenser = धारणी.
Conductivity = वाहिकता.
Conductor = वाहिकद्रव्य, वाहिक.
Conductance = वाह
Connector = जोडणी.
Connecting wires = तारबंद.
Controlling force = नियामक.
Coulomb of Electricity = वेज.
Coulomb – meter.

Counter E. M. F. = प्रत्यूर्ज
Current of Electricity = .

Current density = ओघवत्ता.
Cycle = पर्यय.

Damping = दमन.
Damped = दमित.
Damped Oscillations = दमित आंदोलन.
Un-damped oscillations. = अदमित, आंदोलन, अदम आंदोलन.
Damping Force = दमनक.
Daniell cell = मोरखडी विजेरी, मोरखडी.
Deflection = १ विचलन २ चळणूक.
Deflecting force. = विचालक
Dia-magnetic. = प्रतिवैकर्षिक
Direct current = सरळवहाळ.
Discharge = १ विसर्ग २ खपणूक (क्षपण).

Electricity १ विद्युत्, तडित, वीजा, वीज, वह्रा २ वैजिकविज्ञान, वैजिक (विषय याअर्थी).
Statical electricity. १ स्थिरवीज २ स्थिरवैजिक, वीजाप्रकरण
Current electricity. १ वाहतीवीज २ चलवैजिक, वह्राप्रकरण
Electric Battery = विजेरी.
Electric cell = विद्युत्पुटक, पुटक, विजेरे.
Electric circuit = वैजिक सरणि.
Electric ( Electrostatic ) field. = व्याकर्षक्षेत्र
Electric lines of force = व्याकर्षरेषा.
Electrification = १ उद्वीजन २ उच्चय.
Electrified = सोच्चय, उच्चयी.
Electro-chemical Equivalent = वैज-रासायनिक अंक.
Electrode = वैजिकप्रस्थ, प्रस्थ, वीजायक.
Electrolysis = विच्छेदन.
Electrolyte = विच्छेद्य.
Electro-magnet = वैकर्षुक.
Electro-motive force = वैजिकप्रेरण, ऊर्जे.
Electron = वीजक.
Electroplating = विलेपन.

Electroscope = वीक्षादर्श.
Electrostatic attraction = व्याकर्षण, व्याकर्ष.

Equator = विषुव, विषुवरेषा.
Equatorial field = वैषुवक्षेत्र.
Equivalent resistance = तुल्यरोधन.

Ferromagnetic = प्रवैकर्षिक.
Field of force = कर्षक्षेत्र.
Field of magnet = कर्षुकीयक्षेत्र.
Field strength = क्षेत्रबळ.
Flux = स्रोत.
Flux Density = स्रोतस्विता.
Frequency = क्षिप्रता.

Galvanometer = वह्रादर्श.
Generator = जनित्र.

Hysteresis = अवग्रह.
Hysteresis loop = अवग्रह रेखाटी.
Hysteresis loss = अवग्राहिक लोप.

Impedance = संरोध.
Induction = १ कर्षुकीय विभावन (magnetic) २ वैजिक विभावन (electrostatic) ३ उद्भावन (electromagnetic).
Inductance = १ निर्बन्धन २ मिर्बन्धन, निर्बन्धनी.
Inductive = नैर्बन्धिक.
Inductive-reactance = नैर्बन्धिक अवरोध.
Inertia = निर्बन्ध गुण.
Insulation = १ वेष्टन २ निरोधन ३ निरोधिकद्रव्य.
Insulating material = निरोधिकद्रव्य.
Insulance = निरोधन, निरोध.
Insulated = निरोधित.

Lag = मागसपणा.
Lead = आगसपणा.

Leads = वाहिका, तारबंध, बांधण.
Lightning = तडित्.
Lightning conductor = तडित्त्राण.
Lines of force out = छिति.
Line of force (magnetic) = विकर्षरेषा, कर्षरेषा.
Linkages = छेदाछेद.

Magnet = कर्षुक.
Magnetic material. = वैकर्षिकद्रव्य
,, moment = कर्षुकीय परिबल.
,, circuit = वैकर्षिक सरणि.
,, needle = दिक्सूची.
Magnetisation = १ विकर्षण २ विकेतन ३ विकर्ष-सिद्धि.
Magnetising coil = विकर्षणी.
,, force = विकर्षक.
Magnetism = १ वसु, कर्षुकत्व २ कर्षुकीय (प्रकरण).
North or positive magnetism = उत्तरवसु, धनवसु.
South or negative Magnetism = ऋणवसु.
Magneto-motive force = वैकर्षिक प्रेरण.
Motor (Dynamo-electric) = चलित्र.

Negatively electrified = ऋणोच्चयी.
Negative terminal = ऋणटोंक, ऋणाग्र.
Non-inductive = अनैबंधिक.
Non-magnetic material = अवैकर्षिकद्रव्य.
Northpole = उत्तरदर्शी टोंक, उत्तरटोंक, उत्तराग्र.

Oscillating current = दोलनात्मक वहाळ.
Parallel arrangement = शाखांतर रचना.
Connect in parallel = शाखांतरांत टाकणें, शाखोळींत टाकणें.
Paramagnetic = उपवैकर्षिक.
Permanent magnet = निश्चित कर्षुक, कर्षुक.

Phase angle = अग्रांश.
Phase difference = अग्रभेद.
Polarity = पक्षता.
Poles = १ पक्ष २ केंद्रें ३ टोकें, मुखें.
Polarization. = १ मांघ (Electric Cells)
२ पक्षग्रह, पक्षग्रहण.
३ अवयुति (in light).
Polarized = १ सपक्ष २ अवयुत (light).
Pole strength = केंद्रबळ.
Positively Electrified = धनोच्चयी.
Positive terminal = धनाग्र, धनटोंक.
Potential = क्षिति.
Potential difference = क्षितिभेद.
Power factor = युक्तांश.
Proton = धानक.
Primary cell = स्वायु बिजेरी.
Pulsating current = उत्सेधी वहाळ.
Rate of cutting lines of force = छेदनवेग.

Reactance = अवरोधन, अवरोध.
Reluctance = विरोधन, विरोध.
Reluctivity = विरोधिता.
Repulsion = प्रतिकार.
Resistance = रोधन, रोध.
Resistance coil = रोधिका.
Resistivity = रोधिकता.
Resistor = रोधनी.
Rheostat = रोधनिका, रोधस्थान.

Series arrangement = एकसर रचना.
Connecting in series = एकसरांत टाकणें.
Shunt = शाखोळ, शाखोळी, शाखोळें.
Spiral = वलयावली, वळवट.
Susceptibility = केतनीयता

Terminals = टोंकें, अग्रें.
Voltmeter = ऊर्जमापक.
Voltameter = वैजमापक.

## वास्तवशाळा व कारखाना.

व्याख्यालय, प्रवचनालय = Lecture Hall.
संविधालय = Preparation Room.
प्रयोगालय = Laboratory.
तमालय, अंधेरी खोली = Dark Room.
निकाशालय = Photographic Room.
तुलनालय = Balance Room.
तोळनी, तोलकांटा = Balance.
साधनालय = Instruments Room.
उपाकर, उपाकृतालय = Apparatus Room.
संग्रहालय, कोठी = Store Room
निदर्शालय = Demonstration Room.
प्रदर्शालय = Exhibition Room.
मूर्तालय = Model Room.
प्राकृति = Pattern.
पुस्त, साचा = Mould.
मूर्त = Model.
रेखनालय = Drawing Hall.
रेखन = Drawing.
घूर्णालय = Dynamo Room.
स्थित = Stator
घूर्णित = Rotor.
क्रियालय = Work Room.
साहित्य = Equipment.
साधनसामग्री = Things required.
उपाकृत, उपाकर = Apparatus.
प्रयुक्ति = Appliance.
यन्त्र = Machine.
साधन = Instrument.
करण, हत्यार = Tool.
करणालय = Tool chest.
निदर्शन = Demonstration.
प्रयोग = Experiment.
क्रियाशाळा, कारखाना } = Workshop.
सुतारकाम = Carpentry.
सुतारशाळा = Carpentry shop.
लोहारकाम = Forging.
लोहारशाळा = Forging shop.
घासारकाम = Filing.
कातारकाम = Turning.
ओतारकाम = Casting.
ओतारशाळा = Foundry.
इंजनशाळा = Engine Room.
इंधनशाळा = Fuel Room.

---

सुवात = Well-ventilated.
सुप्रकाश = Well-lighted.
वातवाहन = Ventilation.
वातायन = Ventilator.
प्रकाशायन = Window for Light admission
उपरिदर्श = Episcope.
अन्तरादर्श = Diascope.
अन्तरोपरिदर्श = Epidiascope.
सोसपंप = Exhaust or Vacuum Pump.
ठासपंप = Condensing Pump.

---

निर्वचन = Explanation.
निधारण, निर्णय, निर्णयन = Determination.
प्रक्रिया = Manipulation.
उपात्त, उपदा = Data.
आप्तांक = Constants used.
वेध, प्राप्तांक = Readings taken.
निर्णय, निष्कर्ष, निगमन } = Result obtained, Conclusion ; Inference.
रेखाटन = Sketch ; Sketching.
रेखावी = Curve.
विलेख = Diagram.
आकृति = Figure.
परिलेख = Outline.

---

# पुस्तकपरीक्षण

## सुशीलेचा देव.

( लेः—प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए. एम्. ओ. एल्. नागपूर. )

सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय विद्वान् श्री. वामन मल्हार जोशी यांच्या "सुशीलेचा देव" या नवीन कादंबरीचें परीक्षण "पत्रिकें"त नुकतेंच येऊन गेलें. राजकीय, सामाजिक व धार्मिक बाबतींत जिवंत आणि प्रगमनशील विचारांचे जे थोडे विद्वान् महाराष्ट्रांत आहेत त्यांमध्यें प्रो. वामनराव जोशी यांची गणना होते. "रागिणी" कादंबरी लिहून मराठी वाङ्मयांत तात्त्विक कादंबऱ्यांचा नवीन प्रकार निर्माण करण्याचा मान त्यांना मिळाला आहे व "सुशीलेचा देव" ही तशाच प्रकारची नवी कादंबरी लिहून त्यांनी आपली परंपरा पुढे चालविली आहे. तात्त्विक, सामाजिक व राजकीय बाबतींत या देशांतील तरुणस्त्रीपुरुषांच्या मनांत आजच्या घटकेला जे विचार घोळत आहेत त्यांचें प्रतिबिंब या कादंबरींत पडलें किंवा पाडलें असून तें कितपत स्पष्ट आहे याचें निरीक्षण या लेखांत करावयाचें आहे.

सुशीलेच्या देवाच्या अंतरंगांत शिरून, तेथे साठविलेल्या विचार-संपत्तीचें निरीक्षण करण्यापूर्वी देवाचें बहिरंग थोडक्यांत पाहून घेऊं. या कादंबरीचा साधेपणा तिच्या नावापासूनच सुरू होतो. वामनरावांची प्रतिमा आता प्रौढ झाल्यामुळे तारुण्यांतील नटवेपणाचा तिला आता कंटाळा आला असावा असें दिसतें. या प्रतिमेने "रागिणी "कादंबरींत परिधान केलेलें भाषावस्त्र भरजरीचें व नीटनेटकें धारण केलेलें असें आहे. हिमालयांतील भव्य सृष्टिसौंदर्याच्या वर्णनाचे अलंकार अंगावर घालून ती नटली आहे. याच्या उलट या कादंबरींत साध्या भाषेचें साधें परंतु शुभ्र वस्त्र तिने धारण केलें असून अचलेश्वरीच्या डोंगरावरील सृष्टिवर्णनाचा एखादा अपवाद सोडला तर अशा अलंकारांचा तिने त्याग केला आहे. या साधेपणामुळे तिच्या स्वाभाविक सौंदर्यांत कोणत्याहि रीतीचा कमीपणा आलेला नसून उलट तो तिला शोभतो आहे. आपल्या बोलण्यांत, आपल्या लिहिण्यांत, आपल्या परस्परांशी वागण्यांत एकंदर जो कृत्रिमपणा आला आहे त्याचा ग्रंथकाराला अगदी वीट आलेला दिसतो. "आनुवंशिक संस्कार" या प्रकरणांत विश्वासराव ( विश्वनाथपंत असें यांनाच पुढे म्हटलें आहे. ) म्हणतातः—"खरें सांगूं कां ? मला आताशा चार मंडळींत जावसं वाटत नाही. आणि आपल्याकडे चार मंडळी यावींशीहि वाटत नाही. चार मंडळींत सगळेजण उगाच तोंडदेखलें बोलतात आणि हसतात. कोणी कांही खरें बोलत नाही. खरें संभाषण दोन माणसांतच होतें पण त्यांतहि थोडासा आडपडदा पुष्कळ वेळां असतो." लोकव्यवहाराप्रमाणेच आपल्या वाङ्मयविषयक व्यवहारांतहि कृत्रिमपणा आला आहे म्हणून या कादंबरींत ग्रंथकाराने सहज आली तशी भाषा लिहिली आहे व ही साहजिकताहि मनोहर झाली आहे.

या कादंबरीचा आणखी एक विशेष म्हणजे कादंबरी लिहिण्याच्या सर्व तऱ्हांचा उपयोग करण्यांत आला आहे. स्वतः वर्णन करून, पात्रांच्या संभाषणाच्या द्वारा आत्मचरित्राच्या रूपाने, पत्रद्वारें अशा सर्व साधनांनी कथानकाचा ओघ पुढे नेला आहे. त्यामुळे वैचित्र्य साधलें असलें तरी वाचक थोडासा अडखळतो असें वाटतें.

कादंबरीची भाषा साधी असली तरी मार्मिक कोट्या कांही कमी नाहींत. पहिल्याच प्रकरणांत "सुशीला," "चटकचांदणी" "दिव्य" इत्यादि शब्दांवर केलेल्या कोट्या, तसेंच पान १५८ वर सुशीलेचा व





तिच्या आईचा संवाद चालला असतां " आपला समाज कुजला आहे. ही घाण काढली पाहिजे " या सुशीलेच्या म्हणण्यावर " तूं काढ ही घाण. मी आपली घरांतला केर काढावयास जातें " असें तिच्या आईने दिलेलें उत्तर हीं कोटीबाजपणाचीं कांही उदाहरणें होत. अशीं उदाहरणें पात्रांचे संवाद चालले असतां पुष्कळ ठिकाणीं आढळतील; त्यामुळे गंभीर विषयाची चर्चा चालली असतां पडणारा ताण पुष्कळ कमी होतो. " स्पेन्सर म्हणतो " हें प्रकरण गंभीर विनोदाचें उत्कृष्ट उदाहरण आहे. गरीब सुनंदाचें बालपणचें चरित्र व पान १८ वरील त्याचा व त्याच्या आईचा संवाद ग्रंथकाराच्या सूक्ष्म अवलोकनशक्तीची व सहृदयतेची साक्ष पटवितात. पण ग्रंथकाराची साधी भाषा, कोटीबाजपणा, विनोद, सूक्ष्म अवलोकन इत्यादि गोष्टींचें सोदाहरण व सविस्तर वर्णन करणें हा या निरीक्षणाचा हेतु नाही. या ग्रंथांत तात्विक सामाजिक व राजकीय बाबतींत जे विचार प्रकट करण्यांत आले आहेत त्यांचें निरीक्षण या लेखांत मुख्यतः करावयाचें असल्यामुळे तिकडेच वळणें बरें.

सुशीलेच्या देवाची कल्पना लहानपणापासून हळूहळू जशी बदलत गेली तशी मनुष्यजातीच्या बालपणापासून आतापर्यंत ईश्वराची कल्पना परिणत होत आली आहे. प्रस्तावनेंत ग्रंथकार म्हणतात "ईश्वरविषयक कल्पनांचे बाबतींत कशी क्रांति झाली हें निरनिराळ्या प्रकरणांत दाखविलें आहे. पण ही क्रान्ति नसून उत्क्रान्ति आहे, विकास आहे. वडिलांनी "देवबाप्पा कर" असें सांगितल्यावर सुशीला लहानपणीं देवाला नमस्कार करी. कोणीही "देवबाप्पा" म्हटलें कीं, ती जशी कसरतींतल्या माकडाप्रमाणे देवबाप्पा करीत असे त्याचप्रमाणे मनुष्याच्या बाल्यावस्थेंत परंपरेने चालत आलेल्या ईश्वरविषयक कल्पना व उपासनेच्या पद्धति यांचा तो स्वीकार करीत असतो. त्या त्याला पटलेल्या असतात म्हणून नव्हे. सुशीला जरा मोठी झाल्यावर विचारिते "बाळू, देव म्हणजे आपल्या तात्यासारखा ना? त्याला आईसारखी बायको आहे का?" देवाची कल्पना मनुष्याने आपल्यावरूनच केली आहे. मनुष्यांत नवरा बायको असतात म्हणून देवांनाहि एक एक बायको मनुष्याने कल्पिली आहे. मनुष्यांत ज्याप्रमाणे कमीजास्त सामर्थ्याचे लोक असतात त्याप्रमाणे देवांतहि कमीजास्त सामर्थ्याचे देव असले पाहिजेत ही कल्पना सुशीलेच्या देवांच्या कुस्तीवरून व्यक्त झाली आहे. नंतर या देवाला कांहीतरी दृश्य स्वरूप असावें अशी मनुष्याला इच्छा होते व पुढे त्या प्रतीकालाच देव समजून तो त्याची पूजा करूं लागतो ही पुढची पायरी सुशीलेची दगडाच्या देवाची पूजा, त्याची बाळू-सुनंदाने केलेली चेष्टा, नंतर दगड म्हणजे देव नव्हे असें वाटून तिला झालेलें दुःख, वगैरे गोष्टींनी दर्शविली आहे. नंतर बाराव्या प्रकरणांत अचलेश्वरीच्या डोंगरावरील सृष्टिसौंदर्याचें वर्णन करून व ही व्यवस्था व हें सौंदर्य निर्माण करणारा कोणीतरी ईश्वर असला पाहिजे काय? असा प्रश्न उत्पन्न करून "हा सर्व सृष्टीचा स्वभाव आहे" अशी ईश्वरवादांतील पुढची पायरी दाखविली आहे. अव्यक्त ईश्वराची श्रद्धेने किंवा युक्तिवादानेहि प्रतिष्ठा होऊं शकत नाही असें जेव्हा मनुष्याला वाटतें, तेव्हा तो सर्वश्रेष्ठ मनुष्यानाच विभूति मानून, त्यांचीच देव म्हणून पूजा करूं लागतो ही गोष्ट सुशीलेला तिचा पति हाच देव वाटला या गोष्टीनें दर्शविली आहे. या विभूतीच्या चरित्राचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां तेहि आपल्यासारखेच मर्त्य व स्खलनशील होते असें आढळून आलें म्हणजे आपल्याच कल्पनेने निर्माण केलेल्या देवांना जलसमाधि देऊन देवांच्या ठिकाणीं कल्पिलेल्या सद्गुणानांच मनुष्य महत्त्व देऊं लागतो. पुढे हे सद्गुण म्हणजे स्वार्थाचींच दुसरीं रूपें आहेत असें वाटलें म्हणजे त्यांचेंहि महत्त्व नाहीसें होतें. अशा रीतीने श्रद्धा किंवा युक्तिवाद यांनी सिद्ध न होणारा देव मानण्यापेक्षां मनुष्याने ध्येय हाच देव मानावा व ध्येयपूजा हीच ईश्वरपूजा समजावी अशी आजच्या घटकेची ईश्वरविषयक कल्पना सदतिसाव्या प्रकरणांत सुशीलेने आपल्या भाषणांत व्यक्त केली आहे. खुद्द वामनरावांचे आजच्या घटकेचे ईश्वरविषयक विचारहि असेच आहेत हें रत्नाकरांतील ( वर्ष २ अंक १० ) "ध्येय हाच देव" या त्यांच्या

लेखावरून स्पष्ट झालें आहे. उपनिषदांचें नूतन अवलोकन करूनहि “ पूर्णमिदं पूर्णमदः पूर्णात्पूर्णमुदच्यते ” ही ईश्वर आणि सृष्टिविषयक पूर्णत्वाची कल्पना त्यांना पटलेली नाही. जगांत दिसणारी अपूर्णता व विषमता पाहून, “ हें पूर्ण आहे ” असें उपनिषदांनी म्हटलें तरी तें त्यांना साहजिकच मान्य करवत नाही. ईश्वर आहे व तो नित्य आणि सनातन आहे याबद्दल त्यांना संशय नाही पण त्याच्या स्वरूपासंबंधींची कल्पना बदलत असते असें त्यांचें मत असल्यामुळे, या बदलाचा इतिहास या कादंबरींत त्यांनी दिला असून, “ ज्याने त्याने आपला प्रकृतिधर्म ओळखून आसक्तिरहित आणि अहंकार सोडून स्वकर्तव्य करीत रहावें आणि सर्व भवितव्य भवितव्यतेवर सोंपवावें हा गीतेचा संदेश खरोखरच सुंदर आहे आणि त्याचप्रमाणेंच वागलें पाहिजे ” असा निष्कर्ष शेवटीं त्यांनी काढला आहे. पण अमुक एक गोष्ट ही मनुष्याचें कर्तव्य आहे व अमुक एक गोष्ट ही कर्तव्य नाही हें ठरविण्याचें गमक काय ? मनुष्याने आपल्यापुढे अमुक एक ध्येय ठेवणें अवश्य आहे असा निश्चय झाल्याशिवाय कर्तव्य किंवा अकर्तव्य ठरवितां येत नाही. ज्याने त्याने आपल्याला वाटेल तें ध्येय आपल्यासमोर ठेवावें व त्यालाच देव मानावें हें मत त्यांतील अनिश्चिततेमुळे मान्य होण्यासारखें नाही. ध्येयाचें स्वरूप जोंपर्यंत निश्चित ठरत नाही तोंपर्यंत वाटेल तें ध्येय देवस्वरूपाला पोचेल कीं काय असा प्रश्न आहे. ध्येय ही ध्यान करण्याला योग्य अशी वस्तु पाहिजे आणि अमुक एक गोष्ट ही ध्यान करण्याजोगी हें निश्चित ठरलें पाहिजे. इतर अनेक गोष्टींप्रमाणे देवाच्या कल्पनेंतहि विकास होत आला असेल पण उपनिषदांत या कल्पनेची जी परिणति झाली आहे ती ग्रंथकारांना कां पटली नाही याची समाधानकारक कारणें कादंबरींत दिलेलीं नाहीत. उपनिषदामध्यें वर्णिलेला देव सगुण किंवा निर्गुण कसाही मानिला तरी तो ‘पूर्ण आहे’; किंवा ही पूर्णताच दुसऱ्या शब्दांत सांगावयाची म्हणजे तो “ सच्चिदानंदात्मक किंवा सर्व सद्गुणांची व्याप्त्यामध्यें पराकाष्ठा झाली आहे अशा प्रकारचा आहे ”. आणि असा पूर्ण देव हाच प्रत्येक जीवाचा ध्येय असला पाहिजे एवढेंच नव्हे तर त्याचें ज्ञान, त्याचा साक्षात्कारहि त्याने करून घेतला पाहिजे (ध्येतव्यो-ज्ञेयश्च ) असें उपनिषदांचें सांगणें आहे. पूर्ण होण्याचें हें ध्येय पुढे ठेवूनच मनुष्याने या ध्येयाला पोषक असें आपलें कर्तव्यकर्म ठरविलें पाहिजे. या कर्तव्यकर्माचें स्वरूपहि असें पाहिजे कीं त्याच्या योगाने आपली अपूर्णता घालवीत घालवीत मनुष्याने पूर्ण व्हावें. जीवाचें स्वरूप मूळचेंच अपूर्ण आहे कीं तो मूळचा पूर्ण असून कांही कारणाने लुप्त झालेली ही पूर्णता परिश्रमाने त्याला अभिव्यक्त करावयाची आहे हा तात्त्विक प्रश्न बाजूला ठेविला तरी जीवाच्या “ पूर्णत्वा ”च्या ध्येयासंबंधाने उपनिषदांनी प्रकट केलेले विचार उपनिषदांचा सहृदयतेने अभ्यास केल्यामुळे वामनरावजींना पटावे अशी अपेक्षा कोणीहि करील पण या कादंबरींत शेवटीं सांगितलेला ध्येय हा जो ईश्वर त्याच्या स्वरूपाच्यासंबंधाने अनिश्चितपणा हा मोठाच दोष राहून गेला आहे. “ व्यक्ति तितक्या प्रकृति ” या न्यायाने व्यक्तिगणिक ध्येयें भिन्न होतील या आक्षेपाला उत्तर देतां न आल्यामुळे सुशीलेने तेहतीस कोटी लोकांच्या हिंदुस्थानांत तेहतीस कोटी देव आहेतच अशी कोटी करून वेळ मारून नेली आहे. देवाची कल्पना खोडून टाकण्याकरितां तिने जसा युक्तिवाद केला आहे तसा युक्तिवाद देवकल्पना सिद्ध करण्याकरितांहि करितां येईल;कारण युक्तिवाद दोन्ही पक्षीं करतां येतो. सर्व दृष्टीने पूर्ण असलेला—देव शब्द आवडत नसल्यास दगड म्हणा किंवा वस्तु म्हणा किंवा ब्रह्म म्हणा—जर अस्तित्वांत नसेल तर मनुष्यमात्रांस, सर्व तऱ्हेची पूर्णता संपादन करण्याची जी एकसारखी ओढ लागली आहे ती निराधार होईल. मनुष्य श्रीमंत असो गरीब असो, आहे त्या स्थितींत असमाधान व त्यापेक्षांही श्रेष्ठ स्थिति संपादन करण्याची धडपड त्याच्या ठिकाणीं दृष्टीस पडते. मिळत आहे त्यापेक्षा जास्त सुख मिळावें अशी तळमळ त्याला एकसारखी लागलेली असते. त्याच्या अनुभवाला येणाऱ्या अंशमात्र-

सुखाने त्याचें समाधान होत नाही. अशा स्थितींत अनुभवाला येणारें सुख ज्या सुखाचें अंशमात्र आहे असें परिपूर्ण सुख कोठे तरी असलेंच पाहिजे. " आनन्दं ब्रह्म " या औपनिषद वाक्यांत हीच कल्पना व्यक्त झाली आहे. शांतीची, समाधानाची, सात्त्विकतेची, आनंदाची ज्या ठिकाणीं पराकाष्ठा – पूर्णता– झाली आहे असें कांहीं तरी स्वरूप, अशी कांहीं तरी वस्तु – तिला वाटेल तें नांव द्या– असल्या-शिवाय मनुष्याच्या धडपडीची, तळमळीची, असमाधानाची नीट संगतीच लागत नाही. हा देव, हें "पूर्णब्रह्म," युक्तिवादाचा किंवा अनुमानाचा विषय होऊं शकतें पण हें अनुमान प्रत्यक्षाशीं विसंगत असतां कामा नये. या देवाचें सच्चिदानंद " असें वर्णन तरी मनुष्याने आपल्या अनुभवानेच केलें आहे. मनुष्याला आपण आहों व नेहमी असावें अशी अमरत्वाची इच्छा असल्यामुळे देव सत् व त्रिकालाबाधित आहे. मनुष्य हा चेतन व ज्ञानसंपन्न असल्यामुळे देवही चिदात्मक आहे. मनुष्याला अखंड सुखाची तळमळ लागली असल्यामुळे देवाचें स्वरूपहि आनंदात्मक आहे. सत्त्वाचा, चैतन्याचा व आनंदाचा अंशमात्र अनुभव मनुष्याला आला असल्यामुळे हा अंश ज्या पूर्णाचा भाग आहे अशा सच्चिदानंदात्मक पूर्ण ब्रह्माची किंवा देवाची मनुष्याला कल्पना यावी व हें पूर्णतेचें ध्येय त्याने आपणासमोर ठेवावें हें क्रमप्राप्तच आहे. सर्वसद्गुणसंपन्नता किंवा निर्गुणता हे एकाच वस्तु-स्थितीचे अपर पर्याय आहेत. सत्–असत्, चित् – अचित्, सुख–दुःख हीं शब्दद्वंद्वें परस्परसापेक्ष आहेत. ज्या ठिकाणीं अंधकाराची कधींच प्राप्ति नाही त्या ठिकाणीं प्रकाश या शब्दाचाहि संभव नाही. पूर्ण ब्रह्माची शब्दांनी कल्पना द्यावयाची म्हणजे शब्दद्वंद्वाचा उपयोग केल्याशिवाय गत्यंतर नसतें. ज्या ठिकाणीं असत्तेचा, जडतेचा, दुःखाचा कधीं संभवच नाहीं त्याला सत्–चित्–आनंदात्मक म्हणण्यांतहि कांहीं तात्पर्य नाहीं; पण असत्ता, जडता, दुःख यांचा निरास करण्याकरितां या सच्चिदानंद शब्दांचा उपयोग केला जातो. अंधाराच्या अपेक्षेने प्रकाश शब्दाचा उपयोग होतो. पूर्ण ब्रह्माला अनिर्वचनीय व निर्गुण म्हणण्याचें कारण हेंच. त्याला सर्वसद्गुणसंपन्न म्हटलें तरीहि अर्थ तोच. सर्व सत्पुरुषांचा अनुभव एकच असला तरी तो व्यक्त करणें भाषेच्याच स्वाधीन असल्यामुळे मनुष्याचा भाव निःसंदिग्ध रीतीने व्यक्त करण्याला भाषा पुष्कळ वेळां अपुरी पडत असल्यामुळे व एकच भाग अनेक तऱ्हांनी व्यक्त झाल्यामुळे जगामध्यें आजपर्यंत मतभेद आणि पंथभेद अपरिहार्यपणें होत आले आहेत. स्वार्थ आणि परार्थ हें शब्दद्वंद्वहि असेंच " स्व " आणि " पर " शब्दांचा आपण जसा कमीजास्त व्यापक अर्थ करूं त्यावर अवलंबून आहे. परहि ज्यांत सामावून जाईल इतका " स्व " शब्दाचा व्यापक अर्थ आपण केला तर सर्वच स्वार्थ होईल. परार्थ वेगळा उरणारच नाही. पण या स्वार्थांत व " स्व " शब्दाचा व्यक्तीपुरता मर्यादित अर्थ केला असतां उत्पन्न होणाऱ्या स्वार्थांत जमीनअस्मानाचा फरक आहे. शब्द तोच पण अर्थभिन्नता जशी सापेक्षतेमुळे उत्पन्न होते त्याप्रमाणे शब्द भिन्न असले तरी अर्थैक्यहि सापेक्षतेमुळे निर्माण होतें. ही अपेक्षा कालतः दूर असलेल्या लोकांच्या लक्षांत येत नाहीं आणि मग एकाच शब्दाचे किंवा वाक्याचे अनंत अर्थ व त्यावर अनंत संप्रदाय निर्माण होतात. याच दृष्टीने या कादंबरींत पान २४४-४५ वर " सर्वव्यापी, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, अज्ञेय, अचिंत्य" वगैरे शब्दांचे विशिष्ट अर्थ कल्पून देवकल्पना खोडून काढण्याचा सुशीलेने जो प्रयत्न केला आहे व जे संशय प्रकट केले आहेत ते निरर्थक भासतात. कर्मवादाचा आश्रय करून ईश्वरावरील वैषम्यनैर्घृण्याचा आक्षेप व्यासांनी पूर्वीच दूर केला आहे. तेव्हा या शब्दांच्या पलीकडे जाऊन शब्दच्छल करीत न बसतां, शब्दांचा आग्रह सोडून देऊन शब्दांनी जी वस्तु दाखवावयाची आहे त्या वस्तूकडेच लक्ष देऊन "जी पूर्णता प्राप्त झाली असतां "भिद्यते हृदयग्रन्थिः छिद्यंते सर्वसंशयाः' अशी स्थिति प्राप्त होते. तें पूर्णत्व प्राप्त करून घेण्याचें ध्येय प्रत्येकाने आपल्यासमोर ठेवून त्या धोरणाने आपलें कर्तव्यकर्म ठरविलें पाहिजे" असा निश्चित

उपदेश ग्रंथकारांनी केला असता तर हें पूर्णतेचें ध्येय म्हणजेच ईश्वर असें यथार्थ रीतीने म्हणतां आलें असतें. अर्थात् उपनिषदांपेक्षां आपण कांही नवीन सांगितलें असें म्हणतां आलें नसतें हें खरें; पण नावीन्यापेक्षा सत्याचा आग्रह धरणें व त्यापुढे व्यक्तित्व विसरून जाणें अवश्य नाही काय ! वाटेल तें ध्येय पुढे ठेविलें तर कसा अधःपात होतो हें ग्रंथकारांनीच रावबाच्या उदाहरणावरून चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. भौतिक-वैषयिक सुख हें रावबाचें ध्येय होतें. त्यामुळे झालेले दुष्परिणाम व त्याबरोबर श्रद्धेची व विश्वासाची आवश्यकता "सुखवादाचे परिणाम" या प्रकरणांत ग्रंथकाराने दिग्दर्शित केली आहे. रावबा म्हणतो "सुखाशिवाय मला साध्य नाही. भौतिकशास्त्राच्या नियमांशिवाय मला नियमन नाहीं. वस्तूंच्या गुणधर्माव्यतिरिक्त मी धर्म जाणत नाही. मला धर्म, नीति, सद्‌गुण नको आहेत का ? पण माझा त्यांच्यावर आतां विश्वासच बसत नाहीं. तुझा विश्वास आहे फार चांगलें आहे. मला तुझा हेवा वाटतो आणि असें मनांत येतें कीं, तुझे पाय धरावेत आणि तुला गुरु करावं" पृ. १२६. लहान पणापासून अश्रद्धेवर, जीवनकलहाच्या तत्त्वावर आणि भौतिक शास्त्रावर वाढलेल्या रावबाचे वरील उद्गार वाचले म्हणजे तो सर्व दृष्टींनीं पतित झाला याबद्दल आश्चर्य वाटत नाही.पावित्र्यादि सर्व सद्‌गुण ज्या ठिकाणीं पूर्णतेला गेले आहेत असा ईश्वर आपला ध्येय करावा असा निश्चय नाही. व " हें पूर्णत्व आम्हीं प्राप्त करून घेतलें आहे. या पूर्णब्रह्माचा साक्षात्कार झाल्यामुळे आमचे सर्व संशय नाहींसे होऊन, सर्व कोडीं उलगडून, निरतिशय आनंदाची प्राप्ती आम्हांला झाली आहे. आम्ही आलों त्या मार्गाने तुम्हीहि या म्हणजे तुम्हालाहि त्या पूर्णत्वाचा साक्षात्कार होईल" असें सांगणाऱ्या थोर पुरुषांवर विश्वास नाही. अशा स्थितींत श्रद्धेच्या व निश्चयाच्या अभावीं मनुष्याचें जीवित फुकट गेलें व केवळ भौतिक सुखवादाने त्याचा शारीरिक दृष्ट्या अधःपात झाला तर त्यांत आश्चर्य कसलें ?

ध्येयाचें स्वरूप निश्चित न करितां व्यक्तिगणिक भिन्न ध्येयें असलीं तरी चालतील या मताचा पुरस्कार ग्रंथकारांनी केला असला तरी प्रत्यक्ष उदाहरणें देतांना केवळ सुखवादाचे दुष्परिणाम दाखवून व सुशीला, सुनंदा व बळवंतराव यांजपुढे विश्वकुटुंबवादाचें, नराचे नारायण करण्याचें व जगांत सद्‌गुणाची समृद्धि करून सत्ययुग अवतरविण्याचें ध्येय ठेवून, अप्रत्यक्ष रीतीने कां होईना, पूर्णत्वाच्या ध्येयाचें ग्रंथकारांनी समर्थन केलें आहे ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय. ईश्वरस्वरूपाविषयींच्या जुन्या कल्पना खोडून कांही तरी नवीन सांगण्याचा प्रयत्न करणारे विद्वान्सुद्धा शेवटीं पूर्णत्वाच्या ध्येयाकडेच वळतात तेव्हा " अजर, अमर, अनादि, अनंत, सच्चिदानंदात्मक निर्गुण, निराकार " इत्यादि विशेषणें देऊन उपनिषदांनीं दर्शविलेलें ईश्वराचें पूर्ण स्वरूपच, ( पूर्णमदः ) शेवटीं खरें ठरत नाहीं काय ? या पूर्ण स्वरूपाचें ज्ञान झालें म्हणजे " पूर्णमिदं" — ही सृष्टिहि पूर्ण आहे, व्यवस्थित आहे येथे दिसणारी अपूर्णता ज्याअर्थी काढून टाकणें शक्य आहे त्या अर्थी तिचें मूळस्वरूप पूर्णच असलें पाहिजे व हिचें पूर्ण रूप व ईश्वराचे पूर्णरूप यांत कांही भेद नाही असेंहि ज्ञान होणें संभवनीय नाही काय ? पूर्ण ईश्वर जर या सृष्टीचें आदिकारण आहे व कारणाचे गुण कार्यामध्यें ज्याअर्थी आलेच पाहिजेत त्याअर्थी ही जीवसहित सृष्टि पूर्णच आहे, प्रयत्न करा म्हणजे या जीव-सृष्टीमधील पूर्णता अभिव्यक्त होईल, असें फार मोठें तत्त्व व आशावादित्व " पूर्णमिदं पूर्णमदः पूर्णात् पूर्णमुदच्यते " या औपनिषद सिद्धांतांत साठविलें आहे. मग जुन्यापुराण्या उपनिषदांपेक्षा कांही वेगळें सांगण्याचा आग्रह किंवा हौस असल्यास गोष्ट निराळी. कांही कांही वेगळें सांगण्याचा प्रयत्न करूं लागलें म्हणजे शाब्दिक बदलाशिवाय हातीं कांही लागत नाहीं ही गोष्ट मात्र वरील उदाहरणावरून स्पष्ट झाली आहे.

सुशीला ज्याप्रमाणे तात्विक बाबतींत आजच्या घटकेचे विचार सांगणारी आहे त्याचप्रमाणे सामाजिक बाबतींतहि, तरुण स्त्री—पुरुषांच्या डोक्यांत आजच्या घटकेला घोळणारे विचार ती बोलत

असून ते पूर्ण स्वतंत्र किंबहुना अनिर्बंध आहेत असें म्हटलें तरी चालेल. दुर्दैवाची गोष्ट अशी की, तात्त्विक बाबींचा विचार करितांना ज्या सुखवादाचे दुष्परिणाम ग्रंथकारांनी दाखविले आहेत त्याच सुखवादावर सुशीलेचे हे सर्व प्रगत सामाजिक विचार उभारलेले असून त्यांची दुसरी बाजू ग्रंथकारांनी दाखविली नाही. तेव्हा हेच विचार त्यांनाहि अभिमत आहेत कीं काय अशी शंका येते. कदाचित् हे विचार त्यांचे नसून आजच्या सुशिक्षित स्त्रियांचेहि असतील. कारण मागच्या पिढींतील समाज-सुधारकांच्या स्वप्नांतहि आले नसतील असे विचार आजच्या सुशिक्षित स्त्रिया करीत असून त्यांतील कित्येक धाडशी स्त्रियांनी ते आचरणांतहि आणले आहेत. मागच्या पिढींतील सुधारक स्त्रीपुरुषसंबंधांत पुढील तीन गोष्टींचा प्रामुख्याने पुरस्कार करीत: ( १ ) जरठ-कुमारी विवाह होऊं नयेत, ( २ ) पुनर्विवाह करण्याला हरकत नसावी, ( ३ ) बहुपत्नीकत्वाची चाल मोडून टाकावी. पण ज्या या सुधारणा घडून याव्या म्हणून सुधारकांनी आकाशपाताळ एक केलें त्याच सुधारणा त्यांच्या पुढील पिढींतील कित्येक सुशिक्षित व स्वतंत्र स्त्रियांनी पायाखालीं तुडवून टाकलेल्या पाहून वृद्ध समाजसुधारक थक्क होऊन गेले असतील. पैशाच्या व मानाच्या लोभाने अनेक सुशिक्षित व पदवीधर स्त्रियांनी जरठाच्या गळ्यांत आपण होऊन माळा घातल्या. कित्येकींनी प्रेमाच्या आधीन होऊन पूर्वीची पत्नी जिवंत असलेल्या पुरुषांशीं विवाह केले व आपलें स्वातंत्र्य नाहीसें होतें म्हणून विधवांनी पुनर्विवाहाच्या सवलतीचा फायदा घेण्याचें नाकारलें आणि आता तर या सर्वांच्या मुळाशीं असलेला जो विवाह त्याचीच आवश्यकता नाही, विवाहाशिवाय तरुण स्त्री-पुरुषांनी एकत्र अशनशयनादि व्यवहार करण्यास काय हरकत आहे, असा प्रश्न विचारिला जात आहे. आमच्या प्रचलित विवाहसंस्थेंत स्त्रियांना कोणतेहि अधिकार नसल्यामुळे तरुण स्त्रियांची मनें या संस्थेविरुद्ध विथरून गेलीं तर त्याची संगति लावतां येईल; पण तरुण पुरुषांना अशी कांहीच अडचण नसतांना, त्यांनीहि वैवाहिक मतांत स्त्रियांच्या वरील मताचीच साथ करूं लागावें, याची संगति नीट लागणें कठीण आहे. सुधारणेची एकाच पिढींत झालेली ही विमान-दौड पाहून आपल्या मंदबुद्धित्वाबद्दल मागच्या पिढींतील समाजसुधारक खचित खजिल होऊन जातील. त कांही निर्बंध तोडावयास गेले पण त्याबरोबरच विवाह करावा व तो तरुण स्त्री-पुरुषांतच व्हावा असे कांही निर्बंध त्यांनी ठेविले होते. पण हे निर्बंधहि झुगारून देण्यास नवी पिढी प्रवृत्त झाली आहे; एवढेंच नव्हे तर तरुण स्त्रीपुरुषांनी विवाहबद्ध झाल्यानंतर जन्मभर एके ठिकाणीं जखडून कां बसावें असें आजची सुशीला विचारीत आहे. “ बायकांनी दहादा लग्नें केलीं तरी त्यांत वाईट काय झालं ? पुरुषांनी अनेक पुनर्विवाह केले तर त्यांना तुम्ही व्यभिचार म्हणत नाहीना ? मग बायकांनाच निराळा न्याय कां ? विवाह कितवा आहे हें न पाहतां तो ज्या स्त्री-पुरुषांमध्यें होतो त्यांचं एकमेकांवर प्रेम आहे कीं नाही तें पहावं ( पान १५५--५६ ). आपल्या चालीरीती, आपले विचार, आपला धर्म, सर्व कांही “ रॉटन ” झालें आहे. सगळं कुजलेलं आहे. पार सगळी ही घाण काढला पाहिजे ” ( १५८ ). पतिपत्नींचें परस्परांतील प्रेम नाहीसें झाल्यावर त्यांचा होणारा संबंध म्हणजे अगम्यगमन आहे ( २४९ ). असे आजच्या सुशीलाचे विचार आहेत. गेल्या २५ वर्षांत झालेल्या या प्रगतीचा वेग लक्षांत घेतां यानंतरच्या २५ वर्षांनी येणाऱ्या सुशीलाचे विचार व आचार कसे असतील याची इतर खंडांतील अनुभवावरून नीट कल्पना करितां येते. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते असें म्हणतात. वेदपूर्वकालीं स्त्रीसत्ताप्रधान समाजव्यवस्था होती. सर्व बाबतींत स्त्रियाच पुढाकार घेत. वेदोत्तर कालापासून आतापर्यंत पुरुषसत्ताप्रधान अशी समाजव्यवस्था आहे. या व्यवस्थेंत स्त्रियांवरील जुलमाची परमावधि झाल्यामुळे, त्यांनी प्रचलित व्यवस्थेविरुद्ध बंड पुकारलें तर त्यांत कांही आश्चर्य नाही. आजच्या तरुण मुलींची अनिर्बंध स्वातंत्र्यलालसा व आजच्या तरुण मुलांचें स्त्रीविषयक धोरण पाहिलें म्हणजे जग पुन: स्त्रीसत्ताप्रधान समाजव्यवस्थेकडे चाललें आहे कीं काय असें कांही विनोदाने व कांही गंभीरतेने विचारितां येईल.

विवाह होण्याला व तो कायम टिकण्याला आवश्यक असलेल्या प्रेमाची व विवाह--संस्थेच्या उद्देशाची ग्रंथकारांनी जास्त चिकित्सा करावयास पाहिजे होती. वैषयिक सुखाच्या वासनेमुळे स्त्री-पुरुषांत उत्पन्न होणारें आकर्षण, एवढीच प्रेमाची व्याख्या ग्रंथकारांना अभिप्रेत असेल तर त्यावर उभारलेली कुटुंब--संस्थेची इमारत चिरस्थायी कधींहि होणार नाही. कारण अशा तऱ्हेचें प्रेम अत्यंत चंचल असतें. या प्रेमामुळे दोन तास, महिने किंवा वर्षे टिकलेल्या स्त्रीपुरुषसंबंधाला विवाह म्हणणें म्हणजे त्या शब्दाची चेष्टा करण्यासारखेंच आहे. विवाह ही संस्था चंचल वैषयिक प्रेमावर उभारली नसून उच्चतर व ज्यामध्यें स्वार्थाचा अंश अत्यंत अल्प आहे अशा प्रेमावर उभारली असल्यामुळेच धार्मिक गणली जाते. अ आणि इ यांच्यापासून होणाऱ्या उ ची व्यवस्था लावावी म्हणूनच केवळ विवाहसंस्था अस्तित्वांत आली नाहीं; तर अ आणि इ यांचा अधःपात होऊं नये, त्यांचें आत्मिक कल्याण व्हावें म्हणून त्यांच्या अनिर्बंध वैषयिक वासनांवर निर्बंध घालण्याकरितां विवाह--संस्था अस्तित्वांत आली आहे. कारण ही संस्था अस्तित्वांत येण्यापूर्वी वाटेल त्या स्त्रीला वाटेल त्या पुरुषाशीं व्यवहार करण्याला परवानगी होती. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे स्त्रिया व पुरुष यांना आपल्या आयुष्यांत वाटतील तितकीं व वाटेल तितक्या लहान मोठ्या कालावधीचीं लग्नें करण्याची पूर्ण मोकळीक असे. यामुळे अनर्थ होऊं लागल्यामुळे या स्वैराचाराचें नियमन करणें हा विवाहसंस्थेचा उद्देश आहे. हा उद्देश हाणून पाडण्याचे प्रयत्न सध्या सुरू आहेत. स्त्रियांना पुरुषांइतकेच अधिकार धार्मिक, सामाजिक, राजकीय व आर्थिक बाबतींत दिले पाहिजेत यांत वाद नाहीं. " बायका म्हणजे पुरुषांची खाजगी मालमत्ता, आंगठीप्रमाणे किंवा घड्याळाच्या साखळीप्रमाणे पाहिजे तशी हातांत घेऊन पाहावयाची वस्तु " ही स्थिति निःसंशय बदलली पाहिजे. पण स्त्री व पुरुष या दोघांच्याहि स्वातंत्र्याला, त्यांच्या व समाजाच्या आत्मिक कल्याणाकडे लक्ष देऊन कांहीं मर्यादा घातल्या पाहिजेत. अर्थात् असें करितांना प्रेम व सुख यांच्या केवळ भौतिक कल्पना तेवढ्या लक्षांत घेऊन चालणार नाहीं. खुद्द सुशीलेलाहि " स्त्री-पुरुषांची ऐहिक उन्नति आणि पारमार्थिक कल्याण या करितां विवाह आहे ही गोष्ट मान्य आहे एवढेंच नव्हे तर " प्रेम म्हणजे बहुधा व बहुतांशीं खूळ आहे " असेंहि तिने आत्मचरित्रांत म्हटलें आहे. असें असून " विवाह कितीही होवोत प्रेम आहे कीं नाहीं हा मुख्य प्रश्न आहे " असें म्हणून " प्रेम-स्वातंत्र्याचा " व त्याकरितां होणाऱ्या अनेक विवाहांचा तिने पुरस्कार करावा ही गोष्ट अत्यंत विसंगत दिसते. सभेंत विचारलेल्या प्रश्नांना उत्तरें देतांना तरी, विवाहाचें निःश्रेयस हेंहि एक ध्येय आहे ही गोष्ट ती विसरली असावी असें तिच्या उत्तरावरून वाटतें. ग्रंथकारांनी ही विसंगति टाळली असती, भौतिक सुखवादावर उभारलेल्या वैवाहिक स्वातंत्र्याचे दुष्परिणाम दाखवून दिले असते व प्रेम आणि सुख यांच्या उच्चतर कल्पना विशद केल्या असत्या तर आजच्या अनेक तरुण मुलांमुलींची समजूत पटून, त्यांच्या शरीराचें व मनाचें मातेरें होण्याचा संभव कमी झाला असता. दुःखांत सुख एवढेंच कीं सुशीलेचीं मतें कशींहि असलीं तरी आरंभापासून अखेरपर्यंतचें तिचें वर्तन तिच्या नांवाला साजणारें असेंच आहे; मग ग्रंथकारांनी लिहिल्याप्रमाणे तिच्याविषयीं लोकापवाद कितीहि असोत

सुशीलेच्या आत्मचरित्रांत स्त्रीस्वभावनिदर्शक अशा एक दोन मजेदार गोष्टी दिल्या आहेत. बाराव्या प्रकरणांत बाळु व सुनंदा यांच्या संवादावर दिलेल्या टीपेंत सुशीला म्हणतेः-" माझ्या मनांत प्रेम आहे असें आतापर्यंतच्या माझ्या आयुष्यांत तीन चार पुरुषांना तरी वाटलें आहे; आणि माझ्या मनांत तर त्यांच्याविषयीं प्रेम केव्हांहि नव्हतें. माझ्या कांही मैत्रिणींचा असाच अनुभव आहे. पुरुषांना असें कां वाटतें कोणास ठाऊक ? " तिच्या पतीला तिचें आपल्यावर प्रेम आहे असें वाटे; पण हें प्रेम फार पुढे जडलें. तें इतकें कीं, तिला पति हा देवच वाटूं लागला. नंतर पतीहि मातीच असें आढळून





अनुक्रमणिका

पण हा प्रकार अगदींच सौम्य आहे. मत "याचना" पुष्कळ वेळां कशी सक्तीची असते, तिच्याकरितां पैसा कशा रीतीने खर्च केला जातो, मत न दिल्यामुळे मित्रांमित्रांमध्येंहि कशीं वैमनस्यें उत्पन्न होतात, मतें मिळविण्याच्या गडबडींत प्रतिपक्षाला वाटेल त्या सूक्तासूक्त उपायांनी हाणून पाडण्याचा मोह किती शनावर होतो या गोष्टी आता जगजाहीर झाल्या आहेत. किंबहुना ज्याने आपल्याला मत दिलें नाही त्याचा सूड उगविण्याची बुद्धीहि कशी जागृत होते हें गिरीधररावाच्या मनांत "या विश्वासरावाचा राष्ट्रीय पक्षाचा अभिमान चांगलाच जिरवून काढला पाहिजे, लेकाचा मला एकदम व्होट देणार नाही म्हणतो म्हणजे काय ? आणि त्याच्या पोराला आणि सुनंदालाहि चांगला हात दाखविला पाहिजे" असे विचार आले यावरून स्पष्ट दिसतें. प्रातिनिधिक संस्थांच्या बरोबरोबर 'व्होटिंग'चा हा एक शापच लोकांना मिळाला आहे व हा शाप किती प्रभावी आहे याचें प्रत्यंतर निवडणुकीच्या वेळीं चांगलें येतें. निवडणुकी सुरू झाल्या म्हणजे "इलेक्शन फिव्हर"ने फणफणून जाऊन सुशिक्षित लोकहि मतें देण्याघेण्याच्या गडबडींत शिष्टपणाला कित्येक वेळीं कसा फाटा देतात याचें वर्णन विस्तारभयास्तव ग्रंथकारांनी टाळलें असावें.

गिरिधरराव हेडमास्तर मवाळ, त्यांचे असिस्टंट विश्वनाथपंत जहाल व त्यांचे सुनन्दासारखे विद्यार्थी ज्वलत्-जहाल अशा क्रमाने प्रत्येक पिढींत राजकीय मतांची प्रगति कशी होत गेली तें सूचित केलें आहे. पुढे "धर्माकरिता अधर्म" या प्रकरणांत स्वीटपतिपत्नींवर झालेल्या हल्ल्याच्या रूपाने देशाकरितां दरवडे घालण्याची जी लाट पुढे उसळली ती चित्रित करून "धर्मा आणि देशाभिमाना ! तुमच्या नावानें कितीतरी पापें घडत आहेत" असा शेरा सुशीलेकडून त्यावर दिला आहे. यानंतर हिंदुमुसलमानांच्या दंग्यांचा उल्लेख करून "औटघटकेचें राज्य" व "सगळीकडून मार" या प्रकरणांत लोकप्रीती किती क्षणिक असते व खऱ्या देशभक्तांना आज फुलांच्या तर उद्या जोड्यांच्या माळा स्वीकारण्याची नेहमीच कशी तयारी ठेवावी लागते याचें ग्रंथकारांनी काढलेलें सुंदर चित्र हातकरू देशभक्तांनी लक्षांत ठेवण्यासारखें आहे. समाजाचें खरें कल्याण व्हावें म्हणून झटणाऱ्या व्यक्ति व लोक यांचा अनेक वेळीं मतभेद होतो. किंबहुना मतैक्यापेक्षा मतभेदाचेच प्रसंग जास्त असतात. अशा वेळीं या व्यक्तींनी पूर्वी केलेला स्वार्थत्याग लोक विसरून जातात व एकंदर लोकमतांत सूर न मिसळल्याबद्दल लोक त्यांचा धिक्कार करूं लागतात. अशा प्रसंगीं हा धिक्कारहि सहन करून आपल्याला जी गोष्ट लोकांच्या हिताची वाटत आहे ती शांतपणें करीत रहाण्याची ज्यांची तयारी असेल त्यांनीच देशसेवेचें व्रत पत्करावें. याच दृष्टीने राजा आणि प्रजा या दोघांचीही मर्जी संपादणारापेक्षा योग्य प्रसंगीं दोघांचीहि अप्रियता सहन करून कीर्तीची चाड न बाळगतां लोकसेवा करणाऱ्या तत्त्वनिष्ठ व्यक्तींची महती जास्त समजली पाहिजे. बळवंतरावांची एका रविवारची डायरी ग्रंथकारांनी दिली आहे ती जशी मनोरंजक तशी बोधप्रदही आहे. बळवंतराव हे अस्पृश्यतेच्या विरुद्ध असल्यामुळे अचलेश्वरीला नमस्कार करण्याकरितां ते जेव्हा मंदिरांत गेले तेव्हा "तुम्ही नास्तिक बाटगे लोक देवळांत येऊन आम्हांला कां बाटवूं पहातां ?" असें अण्णंभटाने त्यांना म्हटलें. पुढे हिंदुमुसलमानांच्या दिलजमाईकरिता भरलेल्या सभेंत ते गेले तेथे मुसलमान पुढाऱ्यांनी त्यांच्या 'ढोंगी' व 'बामणी' काव्याची चांगलीच हजिरी घेतली. कारण बोहरीगल्लींतील मशिदीसमोर वाद्यें वाजवूं नयेत असा मुसलमानांतर्फेचा निकाल त्यांनी एकदा दिला असला तरी गुजर गल्लींतूनही गणपती नेऊं नये हा मुसलमानांचा आग्रह त्यांना पसंत नव्हता व त्याकरितां मुसलमानांकडून सोट्याचा प्रसादहि त्यांना पूर्वी मिळाला होता. या सभेनंतर ते ब्राह्मणेतरांच्या सभेला बोलावणें होतें म्हणून गेले. तेथे ब्राह्मणनिंदाप्रचुर अशीं भाषणें झाल्यावर मंडळीच्या आग्रहावरून ते बोलावयास उठले मात्र, तोंच 'बामन इथे कशाला' 'बसवा बामणिच्याला' असे उद्गार व त्याच्या पाठोपाठ बटाटे व कांदे यांचा

त्यांच्यावर वर्षाव होऊं लागला. बखेडा माजून मारामारी झाली. आणि चारपांच ' बामणांची ' डोचकीं चांगलीं शेकलीं गेलीं. पुढे मारामारीच्या चौकशीच्या निमित्ताने पोलिस अमलदारांनी जखमी लोकांना चावडीवर नेलें व तेथें पाचकळपणा करून त्यांचें मन दुःखित केलें. हा सर्व प्रकार वाचला म्हणजे क्षणभर हसूं येईलच. पण देशसेवा म्हणजे सुळावरची पोळी आहे, लोकांच्या सुरांत सूर मिसळून एक दोन दिवसांत करण्याची हुल्लडबाजी नव्हे ही गोष्टहि वाचकांच्या मनावर चांगली ठसेल.

मवाळ, जहाल, व ज्वलज्जहाल यांच्या राजकारणानंतर हिंदुस्थानांत सुरू झालेलें महात्मा गांधींचें राजकारण कादंबरींत फारसें चित्रित कां झालें नाही तें समजत नाही. हिंदी राजकारणाच्या विकासांतील महात्मा गांधींचें राजकारण ही एक महत्त्वाची पायरी आहे. देशांत सध्या प्रचलित असलेल्या सत्तेचें अंतःस्वरूप लोकांना या राजकारणामुळे दिसून येणार असून जशास तसें या न्यायाने अधर्मयुद्धालाहि तोंड देण्याची तयारी केली पाहिजे हें या राजकारणामुळे पुनः एकदा सिद्ध होणार आहे; किंबहुना महात्मा गांधींचें राजकारणहि पुढे येणाऱ्या रौद्र राजकारणाची सौम्य भूमिकाच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. राजकारणांतील चिरंतन तत्त्वांचें ज्ञान लोकांना होणार असल्यामुळे व लोकांमध्यें जी अभूतपूर्व जागृति व निर्भयता उत्पन्न झाली आहे तीमुळेहि गांधींचें राजकारण महत्त्वाचें ठरतें. कदाचित् तें वर्तमानकालीन असल्यामुळे ग्रंथकारांनी तिकडे दुर्लक्ष केलें असावें. शिवाय गांधींच्या राजकारणाचा दुसरा अध्याय, कादंबरी लिहून झाल्यावर सुरू झाला असल्यामुळे त्याचा समावेश करितां आला नसावा.

ग्रंथकाराच्या मतें विश्वकुटुंबवाद वा समाजसत्तावाद हें राजकारणाचें आजच्या घटकेचें स्वरूप असून भविष्यकाळांत या तत्त्वाची कशी प्रगति होणार आहे तेंहि कित्येक प्रकरणांतून त्यांनी दाखविलें आहे. किंबहुना देवाच्या खालोखाल विश्वकुटुंबवादाच्या या कल्पनेला प्रस्तुत कादंबरींत महत्त्व देण्यांत आलें आहे; कारण विश्वकुटुंबवादाचें ध्येय हेंच पुढे सुशिलेचा देव बनलें आहे. सध्याची स्थिति पाहिली तर आर्थिक विषमता झपाट्याने वाढत आहे. श्रमजीवी आणि बुद्धिजीवी लोक दारिद्र्याच्या चरकांत भरडले जात असून त्यांना व त्यांच्या मुलाबाळांना पाहिजे तसें व पाहिजे तितकें अन्नवस्त्र आणि हवापाणीहि मिळत नाही. याच्या उलट पिढ्यान्‌पिढ्या पुरून उरेल इतकी संपत्ति सत्तेच्या सहाय्याने कित्येक गोळा करीत आहेत. एकीकडे टोलेजंग हवेल्या, विस्तीर्ण बागबगीचे दिसत असले तर त्यांच्याच शेजारीं गरिबांच्या चंद्रमौळी झोंपड्या दिसत आहेत. या चंद्रमौळी घरांत आणि खेड्यापाड्यांत रहाणारे व पोटाकरितां रात्रंदिवस कष्ट करून दमून गेलेले मजूर आणि शेतकरी जेव्हा जास्त सज्ञान होतील, दिवसभर कष्ट करूनही, आपल्याला व आपल्या पोरांबाळांना पोटभर खायाला मिळत नाही याची कारणें, झपाट्याने वाढत जाणारे सुशिक्षित बेकार जेव्हा त्यांना समजावून सांगतील तेव्हा, ज्या शक्तीच्या व सत्तेच्या साहाय्याने एक वर्ग संपत्तीचें एकत्रीकरण करीत आहे तीच सत्ता शक्तीच्या साहाय्याने आपल्या हातीं घेऊन एकत्र साठलेल्या संपत्तीची सर्वत्र सारखी खैरात करण्याचा प्रयत्न दीन व दरिद्री झालेले लोक केल्यावाचून रहाणार नाहीत. त्यावेळीं पक्षोपपक्षांची गळत होऊन एक दरिद्र्यांचा व एक श्रीमंतांचा असे दोनच पक्ष शिल्लक राहतील व ज्याला पुढारी व्हावयाचें असेल त्याला आधी आपली संपत्ती व वतनदारी लोकांच्या स्वाधीन करावी लागेल. आजच्या घटकेला " एकंदर समाजाची रचना स्वार्थावर व लोभावर उभारली आहे. स्वार्थ व विशेषेंकरून द्रव्यलोभ हाच समाजाचा पाया. ह्याच देवतांचे जे अनन्यभक्त त्यांनाच बहुतेक लोक वंदनीय व सन्मान्य समजतात " ( २०४ ) तशी स्थिति पुढे रहाणार नाही. प्लेगच्या दिवसांत आपल्या बंगल्याला कुलूप लावून, निदान गोठ्यांतली जागा तरी आमच्या आजारी पोरांबाळांना राहूला द्या असें विनवणाऱ्या लोकांनाहि धुडकावून लावणाऱ्या सावकारांची लोक पुढे गय करणार नाहीत. स्वार्थांतील स्व चा अर्थ व्यापक करण्याचा, स्वमध्यें समाजाचा समावेश करण्याचा प्रयत्न पुढील चळवळींत खात्रीने होईल. खाजगी मालमत्तेच्या पद्धतीमुळे

मनुष्य पैशाच्या लोभाला बळी पडून माणुसकीला मुकतो. त्यामुळे ही पद्धति बंद करून सर्व मालमत्ता राष्ट्राच्या मालकीची करण्याचें ध्येय या चळवळीपुढे राहील यांतहि शंका नाही. पण तें कितपत यशस्वी होईल एवढाच प्रश्न आहे. कारण श्रेष्ठ किंवा कनिष्ठ स्वार्थाच्या प्रेरणेशिवाय मनुष्य मनःपूर्वक प्रयत्न करण्याला तयार होत नाही. स्वमध्यें प्रत्येक मनुष्य विश्वाचा समावेश करील व सर्वांचे ज्यांत हित त्यांतच माझें हित असें जर विश्वांतील मनुष्यमात्र मानतील तरच ही गोष्ट शक्य आहे. आणि 'हें विश्वचि माझें घर' अशी प्रत्येकाची वृत्ति होऊन सत्ययुग केव्हांतरी अवतरावें म्हणूनच आपले प्रयत्न नेहमी चालले पाहिजेत यांतहि वाद नाही. पण विश्वकुटुंबी समाजव्यवस्थेवा हा सगळा डोलारा मनुष्य-स्वभावाच्या आणि सहजप्रवृत्तींच्या विरुद्ध आहे; आणि इतिहासाचीहि साक्ष अशीच आहे. (२१५) या विनायकरावांच्या आक्षेपाला बळवंतरावांना समाधानकारक असें उत्तर देतां आलें नाही. मनुष्य-स्वभाव कसा आहे हें निश्चित ठरविण्याला आज पुरेसें साधन नाही. आजपर्यंतच्या इतिहासावरून भविष्यकाळाबद्दलची अनुमानें करणें चुकीचें आहे. पूर्वीचा काळ आजच्या काळाहून फार भिन्न होता आणि भविष्यकाळ आजच्याहून फार भिन्न होणार आहे" अशा अर्थाचें बळवंतरावाचें उत्तर आहे. नवा व अपूर्व इतिहास निर्माण करण्याची आकांक्षा केव्हाहि अभिनंदनीय आहे. पण इतिहासाची पुनरावृत्ती होते ही जी अनुभवसिद्ध म्हण आहे ती मनुष्याच्या स्वभावांत बदल झालेला नाही. याच गोष्टीची निदर्शक आहे. त्यामुळे भूतकाळ आणि वर्तमानकाल यांमध्यें " बाह्य फरक पुष्कळ झाला आहे हें कबूल; पण मनुष्याच्या मूलभूत प्रवृत्तीमध्यें फरक झाला काय? मनुष्याची स्वार्थबुद्धि नष्ट झाली आहे का? कामवासना गेली आहे का? क्रोध थंडावला आहे का? असूया मरून गेली आहे का? खरी गोष्ट अशी आहे कीं, मनोविकार सगळे तत्त्वतः पूर्वीसारखेच आहेत. ते व्यक्त करण्याची पद्धति मात्र बद-लली आहे. मनोविकार सगळे तेच. फक्त पोषाक बदलला आहे. प्रवृत्ति त्याच. ज्ञान म्हणजे माहिती अधिक आहे. पण 'स्वभाव' बदलला आहे असें म्हणता येणार नाही" (२१६) हें विनायकरावांचेंच म्हणणें वाचकांना अधिक पटेल. पांच हजार वर्षांपूर्वीच्या आणि आताच्या मनुष्याच्या स्वभावांत फरक पडला आहे हें बळवंतरावांचें म्हणणें, त्यांच्याच पक्षाच्या सुनंदरावांनी हल्लीच्या स्थितीचें जें भेसूर पण यथार्थ चित्र काढलें आहे त्यानें खंडित झालें आहे. "आतांपर्यंतचा इतिहास म्हणजे कलह, मारामाऱ्या, खून यांचाच बराचसा इतिहास. लढायांत आणि युद्धांत शत्रूचा जीव घेणें, म्हणजे वास्तविक खून करणें होय. पण हे खून प्रतिष्ठितपणाचे, कायदेशीर आणि मोठ्या प्रमाणावर आणि पुष्कळ वेळां अप्रत्यक्ष अस-तात म्हणून त्यांना खून म्हणावयाचें नाहीं इतकेंच." (२२०) हल्लीच्या समाज व्यवस्थेंत पैशा-करितां मुलगे बापाचा खून करितांना आढळतात. बायको नवऱ्याचा खून करिते. लहान मुलांच्या अंगावरचे दागिने मिळावेत म्हणून त्यांचा अमानुषपणें जीव घेणारे काय थोडेथोडके गुन्हेगार आहेत? आजच्या समाजांत गरिबांना अन्न नाही आणि श्रीमंत अजीर्णानें आजारी पडत आहेत. वयाच्या साठ-सत्तर वर्षांपर्यंत घाम येईतों रोज काम करून समाजाची सेवा केली तरी म्हातारपणीं अन्नाशिवाय, औषधपाण्याशिवाय कांहींना मरण्याची पाळी येते, तर कांही गर्भश्रीमंत असून कांहीएक काम नाही म्हणून जगभर उगीच भटक्या मारीत असतात. हल्लीच्या समाजाच्या कोशांत 'गरिबी' म्हणजे 'पाप', श्रीमंत' म्हणजे 'सर्वगुणसंपन्न', 'बळी तो कानपिळी' हा 'न्याय', सरकारच्या चुका सडेतोड-पणें दाखविणें म्हणजे 'राजद्रोह', निरपराधी लाखो लोकांचे राजरोस खून पाडणें म्हणजे युद्ध चाल-विणें, लोकांना फसविणें म्हणजे मुत्सद्देगिरी; ढोंगें करून बाह्य शिष्टाचार पाळणें म्हणजे सभ्यता आणि देव, स्वर्ग, श्रुतिस्मृति इत्यादि शब्द उच्चारणें, टिळेमाळा करणें म्हणजे धार्मिकता". (२२१) बाह्य स्वरूपांत फरक झाला असला तरी मनुष्याचा मूळस्वभाव बदललेला नाही, या विनायकरावांच्या म्हण-ण्याचेंच समर्थन सुनन्दरावाच्या वरील भाषणाने झालें आहे. एवढेंच नव्हे तर खुद्द सुशीलेच्या मताची

धारहि बोथट झाली. " मनुष्य हा स्वार्थपर आहे पण तो समाजघटना बदलली तर परार्थतत्पर होऊं शकेल, बऱ्याच सुलमतेने होऊं शकेल असें तिला वाटत असे. आता तिला असें पूर्णपणें कळून चुकलें कीं, मनुष्य हा त्रिगुणात्मक आहे. त्याच्यांत सात्त्विक, राजस, व तामस वृत्ति व प्रवृत्ति आहेत. अर्थात् समाजसुधारणा आपल्याला जितकी सुलभ वाटत होती तितकी नाही अशी तिची खात्री झाली. (२४१) जगांतील विषमता आणि अन्याय दूर करण्याचीं साधनें योजतांना मनुष्यास मूलभूत प्रवृत्तींकडे दुर्लक्ष करून चालणार नाही हा या सर्व विवेचनातून निष्कर्ष निघतो.

तात्त्विक, सामाजिक व राजकीय बाबतींत अशा रीतीचे उद्बोधक विचार वामनरावजींनी या कादंबरींत गुंफिले आहेत. प्रत्येक विषयाच्या दोन्ही बाजू मांडून वाचकांना स्वतःस विचार करण्यास लावण्याची त्यांची इच्छा असल्यामुळेच कीं काय शेवटचा निर्णय त्यांनी बहुधा कोठेंच दिला नाही एवढेंच एक वैगुण्य त्यांत भासतें. कदाचित् सुशीलेप्रमाणेंच " सौम्यता, निश्चयाचा डळमळीतपणा, अपवादांची शक्यता, विशिष्ट परिस्थिति असली तरच तें विधान सत्य आहे हें मान्य करण्याची प्रवृत्ति हे गुण " त्यांच्यातही डोकावूं लागले असावे. वामनरावांची प्रतिभा, बहुवेषी आणि बहुभाषी असली तरी निर्दोष आहे. वैवाहिक स्वातंत्र्याचें समर्थन करीत असतांनासुद्धा तिच्या भोंवतालचें पावित्र्याचें वलय नाहीसें होत नाही; आणि जगांतील अन्यायाचें व सामाजिक विषमतेचें तिरस्कारपूर्ण वर्णन ती करूं लागली म्हणजे तिच्या तेजस्वितेंत भर पडते. ती आता प्रौढ परिणत झाली असल्यामुळे सर्वच बाबतींत निश्चित आणि उत्तम मतें तिने बोलूं लागावें अशी अपेक्षा, वामनरावजींची विद्वत्ता आणि सौजन्य यांबद्दल आदर बाळगणाऱ्या तरुणांनी कां करूं नये ?

---

# पोच.

**अनासक्तियोग** :—अनुवादक विष्णु प्रभाकर लिमये. मूल्य तीन आणे. अभिप्राय पुढच्या अंकांत.

**कोंकणी भाषेचें जैत**:—संग्राहक—का. श्री. नायक मोल १ रु. अभिप्राय सवडीप्रमाणे.

**संघव्यायाम और बोधकपत्र** :— योजक राजरत्न प्रो. माणिकराव, बडोदा. मूल्य ३ आणे.

**हिंदुसमाज समर्थ कसा होईल**:—( द्वितीयावृत्ति ) ले. महादेवशास्त्री दिवेकर मूल्य १ रु. अभिप्राय सवडीप्रो.

**विश्वरूपदर्शन**:—ले. श्री. कृष्णरावजी खरे जहागिरदार गुरसराई किं. २ आणे.

गीतेच्या ११ व्या अध्यायांतील विश्वरूपदर्शन हें खरें असून श्रीकृष्णानें अर्जुनास दिव्य चक्षु दिल्याने त्याला घेतां आलें. चर्मचक्षु, ज्ञानचक्षु व दिव्यचक्षु हे निरनिराळे आहेत असें यांत प्रतिपादन केलें आहे.

**अभिनव काव्यप्रकाश** :—प्रो. रा. श्री. जोग, एम्. ए. किं. ३ रु. अभिप्राय पुढच्या अंकांत.

**नवयुगधर्ममाला** :—नमुना अंक—संपादक—स. कृ. फडके.

**दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड १**:—ले. गणेश हरि खरे, भा. इ. सं. मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ३४ किं. २ रु.

---

## परत भेटींत मासिकें येतात तीं.

वैदिक कर्मयोग; वागीश्वरी; महाराष्ट्र कृषीवल; हंस ( हिन्दी ); परशुरामीयन; नागरी प्रचारिणी पत्रिका ( हिंदी ); भारत मित्र; लोकमित्र; लोकशिक्षण; श्री ज्ञानदेवी; खेळगडी; भारतकुमार; माळव साहित्य. भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक; सहविचार.

# लावण्या

( सं. प्र. धो. कानिटकर )

[ या खाली दिलेल्या दोन लावण्या धोम येथील बाळा गंगाराम झरपळे याने सांगितल्या आहेत. पहिली लावणी पिंडाच्या रचनेसंबंधीं आहे. रजोरेतःसंयोगापासून देहाची उत्पत्ति होते. त्यांत दोन भाग रजस् व दीड भाग रेत असतें असें लावणीकार म्हणतो. गर्भाशयांत गर्भ कसा वाढतो त्याचा खुलासा ५ व्या कडव्यांत केला आहे. मानवी देहांत साडेतीनशें हाडें असून, सांधे सोळा आहेत व नऊ नाड्यांनी पिंड बांधला आहे. देहांत सात ऋषी आहेत असें ९ व्या कडव्यांत सांगितलें आहे. म. सा. पत्रिकेच्या ३ ऱ्या वर्षाच्या ३ ऱ्या अंकांत वे. पं. कृष्णशास्त्री कवडे यांचा लेख आला आहे. त्यांत ७ ऋषी कोठें आहेत तें त्यांनी सांगितलें आहे. ( पहा पृ० २८२ " हे सात प्राण हेच सात ऋषी होत,...... दोन कान, दोन डोळे, दोन नाकपुड्या व मुख हे सात ऋषी."). आठव्या कडव्यांत ७२ कोटऱ्यांत जीवाची वस्ती कोठें असते असा पार्वतीचा प्रश्न आहे. याचाहि उल्लेख वे. पं. कवडेशास्त्री यांच्या लेखांत आला आहे ( पहा पृ० २८४ "हिता नाम नाड्यः द्वासप्ततिसहस्राणि..." ) बृहदा० उपनिषदांत बहात्तर हजार नाड्या सांगितल्या आहेत; तथापि बहात्तर ही संख्या विचारणीय दिसते. आत्म्याचें दर्शन कोठें होतें तें दहाव्या कडव्यांत सांगितलें आहे. तिरकुट म्हणजे त्रिकूट. बम्हगिरी म्हणजे ब्रह्मगिरी किंवा ब्रह्मरंध्र. बीडकर विठ्ठलानें याचें वर्णन खालीलप्रमाणें दिलें आहे.

"भ्रुमध्यामि गोल्हाट टाकूनि यावें। सुषुम्नासवें ब्रह्मरंध्राप्रति जावें।
कपाटासि पाठा पडे जैं स्वभावें। म यावें पुन्हा त्याच डोहीं बुडावें॥

विद्वज्जीवन उ० ४ श्लो० ५

ज्ञानेश्वरींत ६ व्या अध्यायाच्या १४ व्या श्लोकावरील टीका पाहिली असतां दहाव्या कडव्यांतील कल्पना पूर्वसंप्रदायास धरून असल्याचें दिसून येईल. एकंदरींत या लावणींत ग्रथित केलेली माहिती शास्त्रशुद्ध आहे असें वाटतें.

दुसरी लावणी गर्भावळीची आहे. यांत गर्भावस्थेपासून मृत्यूपर्यंत हकिकत सांगितली आहे. मानवी आयुष्य १०० वर्षांचें धरलें आहे व ही मर्यादा "शतायुर्वै पुरुषः" या वाक्यास धरून आहे. प्रत्येक महिन्यांत गर्भाची वाढ कसकशी होते तें तपशीलवार सांगितलें असून पांच वर्षें बाळपण सांगितलें आहे व ही गोष्ट " लालयेत् पंचवर्षाणि" या मर्यादेस धरूनच आहे, २५ ते ६० वर्षें तरुणपण व ६० ते १०० वर्षें म्हातारपण असे वयोवस्थेचे भाग पाडले आहेत, आङ्ग्ल कवि शेक्सपीयर याने पाश्चात्य धर्तीप्रमाणे आयुष्याचे वयोवस्थेप्रमाणे सात भाग कल्पिले आहेत, ( the seven stages of life). लावणींतील हें वर्णन अगदी थोडक्या शब्दांत पण सरस आहे. प्रत्येकाचें शरीर ज्याच्या त्याच्या हाताने साडेतीन हात उंच भरतें ही

गोष्ट सर्वश्रुत आहे, परंतु रुंदी सवा हात असते हें नवीन तत्त्व या लावणीवरून समजतें. शरीराची उंची साडेतीन हातच कां असते याचा उलगडा पहिल्या लावणीवरून होतो. पिंडाला अस्तुरीचे दोन टाक व पुरुषाचा दीड टाक मिळून साडेतीन टाक लागलें आहेत, ( २ भाग रज व दीड भाग रेत). सहाव्या महिन्यांत "बारा सोळा घातल्या त्यान" असें सांगितलें आहे, ह्या बारा सोळांचा उल्लेख एकनाथांनी आपल्या हरिपाठांत केला आहे, तो येणेंप्रमाणें:—

"बारा सोळाजणी हरींसि नेणती । म्हणोनी शिणती रात्रंदिवस"

त्याच कडव्यांत सत्रावीच्या विकट वाटेचा उल्लेख आहे. सत्रावी म्हणजे जीवनकळा, सत्रावीचें पाणी प्रसिद्ध आहे,

अशा प्रकारच्या ह्या दोन्ही लावण्या आहेत; व त्यांतील माहिती शास्त्रशुद्ध व परंपराशुद्ध आहे. अशा प्रश्नोत्तररूपी लावण्यांना कलगीतुऱ्याच्या लावण्या म्हणतात.]

## देहीवरची.

पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
कशी पिंडाची रचना स्वामी सांगुन द्यावी तुम्ही मजला ॥
रेत सुना रेत बाई चित दे माझ्या जाबाला ।
मागुन रेत जमवला आकार पिंडाचा मी केला ॥१॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
रेत रहातो कोण्या जाग्याला ।
कोण्या वाटन सोडुन दीला ।
कुट राहिला वस्तीला ॥
बर्मस्थानीं रेत रहातो चित दे माझ्या जाबाला ।
कुळमार्गासी सोडून दीला, कमळात राहिला वस्तीला ॥२॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
कमळामंदे रेत ठरीला कितिक टाक आल गणतीला ।
किती लागले पिंडाला कितिक गेल्यात वायाला ॥
शंकर बोले पार्वतीला साडेदहा टाक आले गणतीला ।
साडेतीन लागले पिंडाला सात गेले वायाला ।
नाहीं ते आले कामाला चित दे माझ्या जाबाला ॥३॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
किति टाक लागल अस्तुरिच व किती पुरुषाचा लागला ।
दोन टाक लागल अस्तुरिच दिड पुरुषाचा लागला ॥४॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
कमळामंदे रेत राहिला वाट नाहीं तय मुंगीला ।
कोण्या वाटन चारा जातो सांगा कविराज गर्भाला ॥

तिरकुटा पासून चवसट कळा दार लावल मुशीला ।
अमृताची सुत्र पडली गर्भ वाढाया लागला ॥५॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
- कितिक हाडकं हैत देहीला ।
सांद्यासांद्याची गणती बोला ।
किती नाड्यान पिंड बांधला ॥
शंकर बोले पार्वतीला चित दे माझ्या सब्दाला।
साडेतीनशे हाड या देहीला सोळा सांदे आले बेरजेला ।
नऊ नाड्यानी पिंड बांधिला कुटवर शंगु बुला ॥६॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
देहीमंदे कितिक बायका चतुरा लावा गणतीला ॥
शंकर बोले पार्वतीला चित दे माझ्या जाबाला ।
चवदा चक्रावर चवदा सक्त्या बावन मातृका गणतीला ।
अणशा मनशा दीष्ट कल्पना याच बायका देहीला ॥७॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
बहात्तर कोट्यामध्ये वस्ति है कुट हो या जीवाला ॥
अष्ट पाकळुका छत्तिस रोग लुद्र गिलावा वर केला ।
पंचविस गुण मिळवुनशानी पंचतत्वावर देव बसला ॥८॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
देहीमंदे कितिक रूषी चतुरा लावा गणतीला ।
किती बसले जगाला व कितिक बसले तपाला ॥
अष्ट पाकळुका छत्तीस रोग सप्त धातुचा झरा पडला ।
देहीमंदे सात रूषी अवघे बसले तपाला ॥९॥
पार्वती म्हणे शंकरा माझी विनंती तुम्हाला ।
इकत्यामंदे सरस रूपी तो रहातो कोण्या जाग्याला ।
कोण्या वाटन महाराज जाव सांगा तेच्या दर्शनाला ॥
तिरकुटदारी तीन वाटा तंतु येक टांगला ।
ब्रम्हगिरीवर रहातो दत्तात्रय भस्म चर्चिले अंगाला ।
ब्रम्हगिरीवर उभा जाऊन पहातो सहस्त्र दळाला ।
तेच्या जवळी नीज वस्तुका वोट लावा त्या वस्तूला ॥१०॥
गुरुमारुती सद्गुरु माझे झाले परसन्न ।
सवारणाची कलगी डफावर भगव नीशान ॥

---

## ( २ ) गर्भावळीची

कवीसरानी कस बोलाव मोठ्या मर्जीन ।
सबमंदे बसुन करु नये भलत भाषन ।
तुझा माझा पींड घडला धन त्या कर्त्यांन ।
नरदेहेसि आपण आलो बहुत सायासान ।
पाण्याच मेळवन रगत गोळा संगेन ।
कुळमार्गासि उतरला म्हणी बोलत जन ॥
पहिल्यामासी केली करणी घे कवि ऐकून ।
येळ घटका पाहुन पाया टाकला त्यान ॥
दुसऱ्या मासी जडे भिनाकार घे कवि ऐकून ।
निर्गुणचे भगवान् सुतार झाले आपुण ॥
तिसऱ्यामासी तीनशे साठ हडाची केली जडण ।
सवा हाताची रुंदी साडेतीन हात उच पूर्ण ॥
चवथ्या मासी चवसट कळा घे कवि ऐकून ।
येक दोन चाराच्या गवसण्या घातल्या त्यान ॥
पाचव्या मासी लिंग तत्वाच केल मेळवण ।
बंदोबंदी खिळे मारिले धन त्या कर्त्यांन ॥
साव्या मासी बारा सोळा घातल्या त्यान ।
सत्रावीची वेगटवाट घे कवि ऐकून ॥
सातव्या मासी सत धातु केल मेळवण ।
देहीमंदे उरफाटी पाझार वळखावी खूण ॥
आठव्या मासी अष्ट पाकळुका केल मेळवण ।
आत्मयाची बैठक वरती बसवली त्यान ॥
नवव्या मासी नउद्द दार दिल्यात खोलून ।
पिंड झाला तयार तयासी दार मुक्तदान ॥
उभा राहिला रुद्र देवाला हात जोडून ।
या मला सोडुन तुमीच भगवान ।
नित आठवीन तुमचे गुण ॥
होंग सोंग करता त्यान त्याला दिला ढकलून ।
दारावाहिर पडल्यावर विसरला मागल सुमरण ॥
कवा कवा म्हणून रडतो मोठ्या मोठ्यान ।
कलियोगाच वार तेव्हा त्याला लागल समून ॥
पाच वर्स ऐक पंडिता गेली खेळून ।
पंचवीस वर्सामदे नवती गेली खूलून ।

टेवि कानावर पगडी करतो वाकडीच मान ॥
साठ वर्स झाली चालतो काठी टेकून ।
खोकल्याची बाधा खोकुन खोकुन केली घाण ।
लेक सूना शिव्या देती जाइना उलथून ।
ह्याचा आला कटाळा वेजार जिव केला यान ।
शंभर वर्स झाली त्येला औक्ष गेल सरून ।
जुन यवगाच खात तवा ते काढल यमाजीन् ॥
यमाजीच चवघ शिपाई आल्यात चालून ।
धरा धरा म्हणून फासात टाकला अवळून ॥
कवीसराला माझ बोलण हात जोडून ।
नका करू गलबला ऐका चीत देऊन ।
फासामंदी धरून काय नेल यमाजीन ।
आत्मा म्हणाल तर कुठला बोलून दीन ॥
गुरु मारुती सद्गुरु माझे झाले परसन्न ।
सवारणाची कलगी डफावर भगव नीशाण ॥

---

# कोंकणस्थांचीं आडनांवें

(सं. प्र. धों. कानिटकर)

कोकणस्थांच्या आडनांवांची श्लोकबद्ध यादी खाली दिली आहे. हींत अठरा श्लोक आहेत. शेवटच्या श्लोकांत आडनांवें २०२ (नेला अधिक शतद्वय) असल्याचें लिहिलें आहे, पण भरतात २०० च. लहान पोथीचीं पाठपोट लिहिलेलीं दोन पृष्ठे आहेत. शक, मिति अगर लेखकाचें नांव नाही. रहाळकरांचा निर्देश ळह्याळकर असा केला आहे. खालील शब्दांचे अर्थ नीट लागत नाहीत उ. १ रविसमये (श्लो.६) २ विसवधू (श्लो. १०) ३ तिस नव द्वितीयो (श्लो. १७)

ज्या आडनांवांच्या शेवटीं कर असतें तें वृत्तसुखार्थ कार केल्याचें दिसतें.

## अपरिचित आडनांवें

कोझरेकर, लावणेकर, मेटकर, दामोदर, दोणकर, पाउक, कारतरणे, सुतार, खंगले, टेणे, कण्याचे आंखवे,

फडके बद्दल फट्के लिहिलें आहे.

जाणा जे आठवेले चिपळुणकरहि चित्तले आणि मोने ।
चांपे वांचोळ ऐसे करसह वदती युक्त जे याभिधाने ॥
फट्केही भाडभोंके परिमित असती वाडदेकार कांहीं ।
या सर्वा गोत्र अत्री दशसह परिसा जोगळेकार तेही ॥ १ ॥
कुंटे आणी पेंडसे भागवत्त । वन्ही संख्या जामदग्नी सुगोत्र ॥
बाभ्रव्याचे बेहरे बाळ जाणा । दोंहीं गोत्रीं जाणिजे मान बाणा ॥२॥
वैशंपायन भाडभोंक हि भिडे साहस्त्रबुध्ये तथा ।
जाणा पांच सयुक्त पिंपळखरे नित्युंदनी सर्वथा ॥
आचारी पटवर्धनानि फणसे हे वन्हि संख्या पुरे ।
जाणा निश्चय चित्तपावन असे कौंडिण्य गोत्रीं बरे ॥ ३ ॥
ठाकिड्वे तथा गांगलेकार जे कां । तसे मालशे आणि जोशी ह ऐका ॥
गोरे सोवनी युक्त कालिस जाणा । ऋर्षीभेद हे वत्स गोत्राशि जाणा४
नेने आणिक मंडलीक परिसा पाराजप्ये (ते) तथा ।
तैसे मेहदळे तथा किणमिडे कां देवही सर्वथा ॥
तैसे ओळकरांसहीत अवघे हे सप्तसंख्या पुरे ।
जाणा निश्चयरूप सर्व समते हे विष्णुवृद्धिं वरे ॥ ५ ॥
काळे विद्वांस कर्दीकर लिमये आणि जे कां मराठे ।
खांभेटे मांइदेवां सहित परिशिजे आणि सान्ये रटाटे ॥
बांठे जाईल जे कां तदुपरि परिसा भागवत्ताभिधानें ।
संख्या जाणा दलालां सह रविसमये युक्त गोत्रा कपींनें ॥ ६ ॥
गोळे वैद्य मनोहरांदिक तथा घांघाळ घैसासहि ।
दर्वे सोहानि रानडये तदुपरी टेणे कण्याचेसहि ॥
जोशी घांघरडे व आंचवलहि जे आंखवे हो तथा ।
भारद्वाज कुळींस ळांहळकरां संख्या तिथीं सर्वथा ॥ ७ ॥
जोशी थोराथ घाणेकर सह करवे खंगले केतकार ।
गोरे लोंढे वझेही सहित भुसुकुटे आणि माठे सुतार ॥
ऐसे हे वैद्य वेडेकर भट परिसा दाबके भागवत्त ।
ऐसे हे युक्त गाडेगिळ म्हसकरही यांशि गार्ग्यगोत्र ॥ ८ ॥
गद्रे बर्वे बापये भावयेच । आगाशेही गोडबोले तथाच ॥
तैसे जे कां पाळ्ये वाड साचे । जाणा ऐसे भेद हे कौशिकांचे॥९॥
जाणा देवदरां तथा सटकरां कानेटकारांसहि ।
तैसे देवल वर्तकां सह खरे जे आपुटे बामहि ॥
शेंड्ये कोल्टकार फाटक खुळे कां लावण्येकार जे ।
ऐसे कौशिक गोत्रिं जे विसवधु श्लोकद्वयी जाणिजे ॥ १० ॥

दातार कर्मरकरांसह भट्ट छित्र्ये। जोशीह वेलणकरांसह भानु छत्रे ॥
खाडीलकार सह कारतरणेहि साचे।पाळीकरांदिक तथा अजि काश्यपाचे
गानू ठोंसर गोड्खले सह तथा जे ओगुले जोगहि।
तैसे बीवलकार आणि वडये लेले ल्वाटये सहि ॥
कान्हेरे सह मेटकार सुकुले दामोदरां फाळुके।
जाणा पंचिस काश्यपी परिशिजे श्लोकद्वयीं सर्वथा ॥ १२ ॥
साठे बोडस कारलेकर तथा दातार दांडेकर ॥
पेंठये धारपुऱ्ये तसे परवंत्ये बागूल अभ्यंकर।
दांत्ये मोडक सांबरेकर तथा जे भातखंडये तसे।
जाणा दोणकरां व कोपरकरां वासिष्ट गोत्रीं असे ॥ १३ ॥
भामे वैद्य विनोद बापट तथा जे गोवडये ओकहि।
धारू आणि दिवेकरांसह खरे विंझे व नातूसहि ॥
तैसे पोंकशिये महाबळ तथा जे गोगटे साठये।
वासिष्ठाप्रति भेद तीस परिसा श्लोकद्वयीं निश्चये ॥ १४ ॥
घय्ये तांबनकार आणि टकल्ये कां आंबडेकार जे।
तैसे धामणकार ही तुळपुळे तिवेकरां जाणिजे ॥
मांटे पाउक डोंगरे तदुपरी कां केळकारां तसे।
जाणा निश्चये भेद हे सकळही शांडिल्य गोत्रीं असे ॥ १५ ॥
जोशी सोमण दामले परचुरे आणीक विद्वांस हि।
काळे जाईल भोगले सह तथा साहस्त्रबुध्येसहि ॥
काणे टीळक कानडये निजसुरे जे कां तसे गोडिसे।
ऐसे पाटणकार युक्त परिसा शांडिल्य गोत्रीं असे ॥ १६ ॥
जाणा जे व्यास छित्र्ये घणवटकरही लावणेकार पद्ये।
मर्ये वा बेहरे जे रिसबुड शिधये आणि जे कां उपाध्ये ॥
तैसे होकां राजवडकर शिधोरे सहित गणपुले कोझरकार साचे।
तिश्लोकीं सर्व संख्या तिसनव द्विनीयो भेद हे शांडिलाचे ॥ १७ ॥
गोत्रें चतुर्दश कुळें मुळ साठि होती।
त्याचेचि संततिमुळें बहु भेद होती ॥
नेत्रां अधीक सकळही शत दोन साचे।
यांते अधीक असती तरि भेद याचे ॥ १८ ॥

———

# अभिप्राय

**नाशिक सार्वजनिक वाचनालयाचा ८९व्या वर्षाचा संक्षिप्त वृत्तांतः--** नव्वद वर्षांचीं जुनी वाचनालयें फारच थोडीं असतील. नाशीक येथील सार्वजनिक वाचनालय आज नव्वद वर्षे चालले असून तें भरभराटीच्या स्थितींत आहे ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. नव्वद वर्षांत आठ हजार पुस्तकांचा संग्रह हा जरी फारसा अभिमानास्पद नसला तरी पण ही आठ हजार पुस्तकें निवडक असतील तर वाचनालयाच्या कालमर्यादेला अनुरूप असाच हा ग्रंथसंग्रह आहे असें म्हणावें लागेल. संस्थेजवळ सुमारें चार हजार रुपये शिल्लक आहेत परंतु आयापेक्षां खर्च जास्त होत नसल्यानेच ही शिल्लक राहूं शकली. वस्तुतः पाहतां शाळांचा बोजा ज्याप्रमाणे लोकलबोर्ड पत्करतें त्याप्रमाणे शिक्षणप्रसाराचें एक मुख्य अंग या दृष्टीने प्रत्येक लोकलबोर्डाने जिल्ह्यांत मोठमोठ्या ठिकाणीं आपल्या खर्चाने पुस्तकालयें स्थापन केलीं पाहिजेत. असलीं संग्रहालयें म्युनिसिपालट्या, लोकल बोर्डें व सरकार यांनीच चालविण्याची जबाबदारी पत्करणें अवश्य आहे. तथापि सरकाराकरितां अडून न राहतां म्युनिसिपालिटी व लोकलबोर्ड मिळून जिल्ह्याच्या ठिकाणीं एकादें संग्रहालय चालविणें हे त्यांचें कर्तव्य आहे. पण दुःखाची गोष्ट इतकीच कीं, या संस्थांचा आम्ही दुरुपयोगच करतों. कारण कादंबऱ्या व नाटकें यांच्या वाचनाला उत्तेजन देण्याच्या कामींच ग्रंथसंग्रहालयांचा उपयोग होत असतो. प्रस्तुत अहवालावरून असें दिसतें कीं अहवालाच्या सालीं प्रत्येक नाटक पांच वेळां व प्रत्येक कादंवरी दहा वेळां वाचली गेली. असो. पान सहा वरील बेरजेचे आंकडे चुकले आहेत. तिकडे चिटणिसांचें लक्ष गेलेंच असेल.

**लोकशिक्षणः--** उत्तम प्रकारचीं मासिकें मराठींत एका हाताच्या बोटांहून अधिक नाहींत; आणि आहेत तीं गोष्टी व चित्रें यांच्या गुटिका घेऊन प्राणरक्षण करण्याचा अट्टहास करीत आहेत. अशा बिकट स्थितींत श्री. जांभेकर यांनीं श्री. ना. दा. बनहट्टी, प्रो. गोडबोले, प्रो. पटवर्धन, प्रो. जावडेकर, प्रो. पेंडसे अशांसारख्या विद्वानांच्या साहाय्याने प्रगल्भ वाङ्मयाचा खुराक लोकांना देऊन त्यांना ज्ञानपुष्ट करण्याचा निश्चय केला आहे तो सदभिरुचीला पोषक असल्याकारणाने महाराष्ट्राला मान्य होईल असा आमचा भरंवसा आहे. "लोकशिक्षण" मासिक अर्थात् सुशिक्षितांकरितां आहे. तेव्हा आमचे सुशिक्षित 'लोकशिक्षणा'च्या प्रसाराच्या मापाने कोणी मोजल्यास त्यांत कांही गैर नाही. 'लोकशिक्षण'कर्त्यांची लोकाश्रयाची तक्रार लवकर नाहींशी होवो असें आम्ही इच्छितों. आज तीन वर्षे श्री. जांभेकर यांनी स्वतः झीज सोसून चालविलेलें हें नमुनेदार मासिक बंद पडणें हें आम्हांला लांछनास्पद आहे.

४ १२

# शंका, चर्चा इ.

## हस्तामलक.

व. ३ अं. ३ पृ. २४१ मध्यें 'हस्तामलक' शब्दाबद्दल हा 'संस्कृतांत प्रतिष्ठित नाही असें म्हटलें आहे. परंतु तो शब्द संस्कृतांत प्रतिष्ठित आहे. शंकरदिग्विजयांत ( सर्ग १२ श्लोक ५७ ). 'प्रकाशयन्ते परमात्मतत्त्वं करस्थधात्री फलवद् यदेकम्। श्लोकास्तु हस्तामलकाः प्रसिद्धास्तत्कर्तुराख्यापि तथैव वृता॥' असा श्लोक आहे. एका गृहस्थाने वेडा म्हणून मानलेला आपला मुलगा श्रीशंकराचार्यांस दाखविला आणि हा १३ वर्षांचा मुलगा आहे हा कशामुळे वेडा झाला असें विचारलें. आचार्यांनी त्या मुलास 'कस्त्वं, किमेवं जडवत् प्रवृत्तः' असें विचारलें. त्यावर त्या मुलाने आत्मतत्त्वप्रतिपादक १२ श्लोक उच्चारून दाखविले. त्या बारा श्लोकांच्या समुदायाला 'हस्तामलक' असें म्हणतात; कारण ते श्लोक हातांतील आवळ्याप्रमाणे आत्मतत्त्व स्पष्ट रितीने प्रकाशित करतात. त्याप्रमाणे हे श्लोक करणाऱ्या त्या मुलालाहि 'हस्तामलक' हें नांव पडलें, असें वरील श्लोकांत म्हटलें आहे. पद्मपाद, हस्तामलक, त्रोटक, व सुरेश्वर असे श्रीशंकराचार्यांचे चार शिष्य प्रसिद्ध आहेत.

३–५–१५६ मध्ये गवताचें नांव 'मोळ' व याचें संस्कृत नांव बल्वजा असें दिलें आहे. तें बरोबर नव्हे. मनुस्मृतीमध्यें ( २।४२ ) 'मौञ्जी त्रिवृत्–समा श्लक्ष्णा कार्या विप्रस्य मेखला'–मुञ्जाची–मोळाची तिपेढी सारख्या जाडीची गुळगुळीत अशी मेखला ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याकरतां करावी असें सांगून 'मुञ्जालाभे तु कर्तव्याः कुशाश्मन्तकबल्वजैः' ( २–४३ ) असें म्हटलें आहे. मोळ वगैरे नच मिळाल्यास कुश, अश्मन्तक व बल्वज यांच्या मेखला ब्राह्मणादिकांकरतां कराव्या असें म्हटलें आहे. 'बल्वज' हें निराळेंच गवत असून जेथे गुरांचें शेण विशेषतः गोमूत्र फार पडतें तेथे हें गवत उगवतें.

'गौर्यत्राधिष्कन्ना ( अधिकं पुरीषं प्राप्ता–सायण ) व्यमेहत् ( मूत्रमकरोत् ) ततो बल्वजा उदतिष्ठन्' तैत्ति.–संहिता २।२।८.

नारायणशास्त्री मराठे, वाई.

## गणपतिच विद्याधिपति कां ?

( १ ) गणपति हें आकाशाचें प्रतीक आहे आणि शब्द हा आकाशाचा गुण आहे. म्हणून शब्दांचा–विद्येचा राजा गणपती होय.

( २ ) गणादिं पूर्वमुच्चार्य वर्णादिं तदनंतरम् अनुस्वारः परतरः ( गणपति अथर्वशीर्ष ) ॐ गं गणपतयेनमः

गं=गम्=ग्+अ+म् वरील मंत्रांत ग्‌चा उच्चार प्रथम, नंतर वर्णांचा आदि जो अ त्याचा उच्चार आणि शेवटीं म् म्हणजे अनुस्वाराचा उच्चार असा क्रम दिला आहे. आता अकारादि स्वर व गादिमांत व्यंजनें हींच अखिल वाङ्मयाचे बीजरूप आहेत. या स्वरव्यंजनात्मक वर्णसमुच्चयाचा गं हें अक्षर संक्षेप अथवा समाहार आहे.

अंत्यस्पर्श म् हा ‘ अमोऽनुस्वारः ’ या सूत्राप्रमाणे अनुनासिक असतांहि अनुस्वारच समजावयाचा. वर्णादिः म्हणजे अर्थात् अकारः । स्वरांस जरि वर्णमालेंत प्रथम स्थान असलें तरी अक्षरसिद्धीला व्यंजनोत्तरच स्वर योजावा लागतो. गण म्हणजे ‘ कादयोमांताः ये पंच पंच स्पर्शाः तेषां समुदायः ’ स्पर्शांचा आदि क् समजला जातो; तथापि खरें पाहतां ग् च आदि मानला पाहिजे. कारण ग् हें क् चें मृदु-कोमल स्वरूप आहे. कोणत्याहि वस्तूचें कोमल स्वरूप प्रथम व कठोर नंतर असा नियम आहे. शिवाय ग् चें उगमस्थान कंठांत क् च्या खालीं आहे. ग् चा टप्पा टाकून वर यावें तेव्हा क् पूर्ण होतो. यावरून गणपति ही विद्येची देवता ठरली.

## बक्मन्.

ना. गो. चापेकर यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या “वैदिक निबंधां”त तक्मन् वर एक लेख आहे. त्यांत (पृ. ३३) ‘तक्मन् शब्द संस्कृत अथवा वैदिक नसावा. तो मुळचा कोणत्या भाषेंतील असावा हें ठरविण्यास सध्या साधन उपलब्ध नाही. तक्मज्वर वन्य आहे असें त्याचें वर्णन आहे; तेव्हा वन्य लोकांच्या भाषेंतील तर हा शब्द नसेल ?’ असें म्हटलें आहे. शोधाअंतीं असें समजतें कीं तक्मन् शब्द लॅटिन भाषेंतला आहे. हा क्षयाचाच एक प्रकार आहे. त्याचें प्रधान स्वरूप ज्वर हेंच आहे. त्यावर खात्रीचा उपचार म्हणजे वर्ण-जलचिकित्साशास्त्राप्रमाणे क्लोरायिड आफ गोल्ड घालून ओतलेल्या उत्तम ताम्रवर्ण बाट-लींत तयार केलेलें किरणजल होय.

## गीतेंतील शेवटला श्लोक.

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥

यांतील ध्रुवा नीतिः हा पाठ असमंजसपणाचा वाटतो. येथे नीतीचा संबंध येण्याचे कारण दिसत नाहीं. संजयाच्या मुखांतील शब्द ध्रुवाणि + इति = ध्रुवाणीति असे असावे. जेथे कृष्ण आणि पार्थ असतात तेथे श्री, विजय आणि अभ्युदय हीं कायमचीं असतात. असा या श्लोकाचा अर्थ आहे. ध्रुवानीतिः (शाश्वत नीति) हे निरर्थक व असंबद्ध शब्द आहेत. म्हणून ध्रुवानीतिर्मतिर्मम या जागीं ध्रुवाणीतिमतिर्मम असें वाचणेंच योग्य होईल.

म. द. मोडक.

---

## व्युत्पत्ति.

## पाप्याचें पितर.

पाप्याचें पितरः—सदर शब्दाचा अत्यंत अशक्त असा अर्थ रूढ आहे, मुलाचे सत्क-र्मानें पितरांस स्वर्ग आणि पापाचरणाने अधोगतिरूप नरक-प्राप्ति होते अशी आमची धर्म समजूत आहे आणि तदनुरोधाने सदर अर्थ रूढ झाला आहे. कीं दुराचरणी पाप्याचे पितर जसे संततिचे पापाने पतनोन्मुख झालेले असतात त्याप्रमाणे शक्तिक्षयाने पतनोन्मुख झालेला.

रामचंद्र वासुदेव सोमण.

## विटाळ शब्दाची व्युत्पत्ति व तत्संबंधीं कांही नियम.

मराठी भाषेंतील ' विटाळ ' आणि विटाळशी यांची व्युत्पत्ति खाली लिहिल्याप्रमाणे असावी असें वाटतें. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांत हा शब्द आढळतो. त्यावरून सुचलेले कांही विचारहि प्रदर्शित करीत आहें.

वृषल–वृषाल–व्रिषाल–विटाळ––

वृषाशीला–व्रिषाशीला–विटाळशी; किंवा वृषालशील=विटाळशी ' ऋ ' चा ' रि ' होत असतो. उ. वृश्चिक–विंचू ' श ' किंवा ' ष ' चा ' ट ' होणें हा नियम पुष्कळ शब्दांत दिसून येतो उ. विट् ( विश् ), प्रावृट् ( प्रावृष् ) अक्षरांचा व्युत्क्रम करणें हा प्राकृतांचा स्वभाव अनेक शब्दांत दिसून येतो. व्युत्क्रम न मानला तर वृषालशील=विटाळशीला किंवा विटाळशी असें समजावें. यास्काचार्य वृषलो वृषशीलो भवति वृषशीले वा ॥ ३-१७-१०-१६ असे शब्द देतातच. वृषालशील यांतील अखेरचा ' ल ' गळला असें समजण्यास हरकत नाही.

२ अर्थात् हे दोनहि शब्द वृषल आणि वृषाशील किंवा वृषालशील या शब्दांपासून बनले आहेत हें उघड होतें. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलाच्या ३४ व्या म्हणजे कितव (जुगारी) निंदासूक्तांतील ११ व्या ऋचेंत हा शब्द येतो.

सो अग्नेरन्ते वृषलः पपाद ॥ ऋ. १०–३४–११.

येथे चित्रावशास्त्री तो वृषल श्रांत होत्साता सायंकाळीं ( कोठेतरी एका बाजूला ) पडतो ( अपृश्याप्रमाणे बाजूस पडून राहतो ). पश्चात्तापाची लहर मावळली (?) कीं हा गरीब बिचारा ( ? ) पुनः मोहवश ( ? ) होतो ' असा अर्थ करतात. परंतु तो संदर्भाला जुळत नाही. वैदिक इंडेक्सकार या ' वृषल ' शब्दासंबंधाने म्हणतात कीं वृषल In the dieing hymn of the ऋग्वेद *denotes an outcast.* the same sense appears in the बृहदारण्यकोपनिषद् where the touch of either a वृषल or a वृषली is to be avoided. पद् या धातूचा अर्थ ( वेदांत ) to fall down with fatigue किंवा to perish आपटे यांचे कोशांत सांपडतो. 'कितवा'ला एथे '' वृषल ' किंवा अस्पृश्य, पापी अधर्मी ( a sinneer, an irreligious man आपटे ) असें म्हटलें आहे बृहदारण्यकोपनिषदांत वृषल, वृषली हे अस्पृश्य वाचक शब्द आहेत यांत शंकाच नाही. तेव्हा वैदिक वाक्यांत अस्पृश्यत्वाची कल्पनाच नव्हती असें कोणाला कसें म्हणतां येईल ? भाषांतरकार–किंबहुना भाष्यकारहि–आपल्या स्वतःच्या कल्पना भाष्यांत वा भाषांतरांत घुसडीत असतात याचें हें एक उदाहरण आहे. त्यामुळे त्यांची किंमत तर कमी होतेच. परंतु एवढ्याने भागत नाही. ते केव्हा केव्हा विपर्यास करतात हें पाहून अत्यंत वाईट वाटतें. उ. भाषांतरकारांचा ' अर्भग' म्हणजे ' तरुण पुरुष ' आणि ' अर्भा ' म्हणजे ' तरुण स्त्री ' असे अर्थ करून प्रौढ विवाहाचीच चाल वैदिक समाजांत होती असें दाखविण्याचा हेतु उघड उघड दिसतो. असें करण्याने वाचकांना किंवा अभ्यासकांना चकविण्याचें किंवा चुकविण्याचें पाप केलें गेलें आहे असें आम्हांस वाटतें. त्याप्रमाणेच येथे ' वृषल ' म्हणजे ' गरीब बिचारा ' असा अर्थ सहेतुक करण्यांत आला असावा अशी शंका येते. आर्य हे गौर वर्णाचे अशी वृथा समजूत करून



अनुक्रमणिका

घेतल्यामुळेच 'श्वित्यंच' या शब्दाचा 'गौर वर्णाचे' आणि श्याम किंवा कृष्ण म्हणजे 'काळा रंग धारण' करून (ऋग्. १०-३१-२१ भाषांतर पहा) असे अर्थ किंवा भाष्य करण्याचा प्रसंग येतो! या पेक्षा 'शब्दास शब्द' देण्यांत आला तरी बरा असें म्हणावें लागतें! सगळयाच गोष्टींचीं मूळें वेदांत आहेत असें निष्कारण म्हणणें दोषार्ह असेल. पण वेदांत असतील त्या गोष्टी नाहीत असें म्हणण्याचा मोह त्यापेक्षा कमी दोषार्ह आहे असें म्हणतां येईल काय? वेदांत प्रौढ विवाह मुळींच नाहीत असें आम्ही म्हणत नाही. पण वेदांत बालविवाह नव्हताच, अस्पृश्यता नव्हतीच, जन्मता जाती नव्हत्याच, किंवा चातुर्वर्ण्य नव्हतेंच अशी चुकीची किंवा खोडसाळ विधानें करण्याने वाचकांची फसगत किती होते याचीं उदाहरणें पहावयाची असल्यास श्री. काशिनाथपंत केळकर यांचे 'नव्या स्मृतीची अवश्यकता' किंवा त्यांनी व कु. बाळुताई खरे यांनी प्रसिद्ध केलेले 'स्त्रियांचे हक्क' हीं पुस्तकें अवश्य पहावीं. त्यांनी आपल्या निबंधांची सजावट, पूर्वीच्या कित्येक मोठ्या म्हणून नाणावलेल्या ग्रंथकारांच्या विधानांवर अंधपणाने अवलंबून केलेली आहे. पण 'अंधेनैव नीयमाना यथांधाः' अंधळयांनी अंधळयाचें पुढारीपण पत्करून सर्वांनीच खड्यांत पडावें त्याप्रमाणे त्यांची स्थिति झालेली आहे!

द. वा. तळवलकर.

## श्रीदासबोधांतील 'न वचे' व 'वाव' शब्द.

### 'न वचे' = जात नाहीं.

'श्रीदासबोध' मासिकाच्या गेल्या कार्तिक वद्य ९ च्या अंकांत श्रीयुत बा. दा. तळवळकर यांनीं श्रीदासबोधांतील 'न वचे' व 'वाव' या शब्दांच्या निश्चित अर्थाविषयीं पृच्छा केली आहे. ती पृच्छा करतांना त्यांनी तत्संबंधींचा स्वतःचाहि अभिप्राय प्रकट केला आहे. पैकीं पहिल्या 'न वचे' शब्दांविषयींच्या त्यांच्या सूचनेचा सारांश असा कीं—"हें मात्राव्यत्यासाचें उदाहरण असून त्याचें मूळ स्वरूप 'नवेच' असें असावें व त्याचा अर्थ आजच्या भाषेंत 'नव्हेच' असा पण असावा. बहुतेक स्थळीं हा अर्थ घेतां येतो; कित्येक ठिकाणीं मात्र 'न शके' असा अर्थ वाटतो." यावरून 'न वचे' शब्दाचा 'नव्हेच' हा अर्थच बहुतेक ठिकाणीं लागू पडणारा म्हणून श्री. तळवळकरांनी सुचविला आहे. पण खरोखर पाहतां तो अर्थ समर्पक रीतीने असा एकहि ठिकाणीं लागू पडत नाहीं, हें त्यांनीच अंक देऊन निर्देशिलेल्या ओव्यांतील —

तयाचेनी ब्रह्मकटाव। निर्मिला न वचे॥ ८-१-२२
तें अवघेंचि अनुवादलें। न वचे किं कदा॥ १-१-१३
तरी हें निरोपिलें न वचे॥ ९-५-३६
स्वानुभव तो अलक्ष। लक्षिला न वचे॥ ६-१०-२६
चर्मचक्षीं लक्षिलें। न वचे कदा॥ १५-५-२३
न कळे लीळा परिक्षिली। न वचे कोणा॥ १५-९-२६
इतरां न वचे अनुमानलें। १६-१-६

या चरणांवरूनच कळून येण्यासारखें आहे.

पण ह्या ' न वचे ' शब्दाचें विवरण मीं यापूर्वीच केलेलें आहे. मीं लिहीत असलेला ' श्रीमत् दासबोध–विशदीकरण ' हा ग्रंथ ' श्रीदासबोध ' मासिकांतच जो लेखमालेच्या स्वरूपानें मीं क्रमशः चालू केला होता त्यांत प्रथम दशकाच्या 'संतस्तवन नाम' पांचव्या समासाच्या १५ व्या ओवींत ' वस्तूसी वर्णिलें न वचे । ' ह्या चरणांत ' न वचे ' हा शब्द आला असतांना, त्यावर मीं पुढीलप्रमाणें विवरणात्मक टीप दिलेली आहे ( श्रीदास० मासिक वर्ष २ अंक ४ )—

" न वचे = जात नाहीं. ' न वचे ' हा शब्दप्रयोग जुन्या मराठी सारस्वतांत सर्वत्र योजिलेला आढळतो. त्यांतील मूळ संस्कृत धातु ' वंच् = जाणें ' हा असून तो मराठींत येतांना त्यांतील अनुस्वार लोप पावला आहे. मात्र मराठींत तो नित्य नकार-युक्तच म्हणजे ' न वचे ' अशा स्वरूपांतच आढळतो. दासबोधांतहि हा शब्दप्रयोग वरचेवर आलेला आहे. "

ह्या टीपेवरून सर्व प्रकारचें स्पष्टीकरण होण्यासारखें आहे. दासबोधांत जेथें जेथें ' न वचे ' हा शब्द येतो तेथें तेथें त्याचा ' जात नाहीं ' हाच अर्थ सर्वत्र निश्चयानें होतो. गमनार्थीं ' वच् ' ( वंच् ) ह्या क्रियापदाचा ' वचिजे ' असा प्रयोग—

" कां समोर आणि देखौनि ।
जरि न वचिजे चि ॐ संडुनि । "

( १-२४० ) ह्या ओवींत ज्ञानेश्वरींतहि आलेला आहे. गोमांतक व कारवारकडील भागांत ' जाणें ' ह्या अर्थी ' वच् ' क्रियापदाचा उपयोग आजमितीसहि नित्याच्या बोलण्यांत होत असतो. पण दासबोधांत प्रत्येक ठिकाणीं हा शब्द कोणत्या तरी क्रियापदाच्या भूतकृदंताला जोडूनच आलेला असून प्रत्येक ठिकाणीं इंग्रजींतल्या किंवा संस्कृतांतल्यासारखा कर्मकर्तरि प्रयोगच त्यानें साधिलेला आहे. दासबोधाच्या द. १ स. १ मधील १३ व्या ओवींत प्रस्तुत शब्द आलेला आहे; पण त्या समासा-प्रमाणें त्यावरील 'विशदीकरणा'चें स्वरूपहि ग्रंथोपक्रमात्मकच ठेविलेलें असून भाषिक विवरणें त्यांत हेतुतःच द्यावयाचीं नसल्यामुळें वरील विवरणहि साहजिकच तेथें देण्यांत आलेलें नाहीं.

**' वाव ' शब्दाचें मूळ ' व्यर्थ 'च.**

दासबोधांतील 'वाव' शब्दाचा कै. वा. गो. आपटे 'व्यर्थ' असा अर्थ देतात तोच यथार्थ आहे. 'वाव' शब्दाचें मूळहि ' व्यर्थ ' हेंच असण्याला कांहीं आडकाठी दिसत नाहीं. ' वाव ' हें रूप संस्कृत ' व्यर्थ ' शब्दापासून महाराष्ट्रीच्या द्वारा मराठींत निष्पन्न होण्यासारखें आहे. ' व्यर्थ ' म्हणजे निरर्थक, निष्फळ, पोंचट, फोल, वृथा, खोटें, इ. हा अर्थ ' वाव ' शब्दाचा दासबोधांत सर्वत्र लागू पडतो. उदाहरणार्थ पुढील कांहीं स्थळें पहाः—

जेथें प्रकृतीचें पिसें । समूळ वाव ।। ५-५-३३

बोलणें तितुकें होतें वाव । ६-१०-५२
जयास बांधावें तें वाव । ७-६-५५
पाहों जातां सकळ वाव । गुणवार्ता ॥ ७-६-५५
शुद्ध ज्ञानें मुक्तपण । समूळ वाव ॥ ७-६-६३
तयास म्हणावें देव । येर हें अवघेंचि वाव । ८-१-४५
विवेक पाहतां वाव । बंधन होये ॥८-७-६४
येक म्हणती कारण भाव । भावेंचि पाविजे देव ।
येर हें अवघेंचि वाव । गथागोवी ॥ ८-१०-९

श्री. तळवळकर यांनी 'येर हें अवघेंचि वाव' हें उदाहरण घेऊन त्यांत 'वाव' शब्दाचा- "'व्याप्य' असाहि अर्थ वाटतो" -असें लिहिलें आहे. वरील आम्हीं अवतरिलेल्या उदाहरणांत श्री. तळवळकरांचें उदाहरण दोन स्थळीं ( ८-१-४५ व ८-१०-९ ) आलेलें आहे. पण त्या दोनहि स्थळीं 'वाव' शब्दाचा 'व्याप्य' हा अर्थ वेदांतिक ओढाताणीवांचून सुखाने लागू पडत नाही. संस्कृत 'व्याप्' धातू-पासून मराठींत आलेला 'वाव' शब्द आजमितीसहि 'जागा, अवकाश,' इ. अर्थाने रूढ आहे. उदा०— "सिंहस्थाच्या यात्रेमुळे आगगाडींत इतकी दाटी होती की कोणाला चिडविडावयालासुद्धा वाव नव्हता." पण ह्या अर्थाने दासबोधांत तो शब्द कोठेच योजिलेला नाहीं. दासबोधांत एकसारखा वेळोवेळां येणारा कोणताहि शब्द प्रायः एकाच अर्थाचा वाचक असतो हा सामान्य नियम समजावा.

'वाव' शब्दाचा अर्थ समर्थांना कोणता अभिप्रेत आहे त्याचें एक निःसंदिग्ध गमक द. ९ स. २ मधील पुढील लागोपाठच्या दोन ओंव्यांत उपलब्ध होतें:—

"मी लटिका माझें बोलणें लटिकें । मी लटिका माझें चालणें लटिकें ।
मी माझें अवघेंचि लटिकें । काल्पनिक ॥ ३७ ॥
मज मुळींच नाहीं ठाव । माझें बोलणें अवघेंचि वाव ।
हा प्रकृतीचा स्वभाव । प्रकृती लटिकी ॥ ३८ ॥"

ह्या दोनहि ओंव्यांत 'मी मी-माझें माझें' अर्थात् 'ममत्व' किंवा 'अहंभाव' हा सर्व 'लटिका' म्हणजे मिथ्या-फोल असल्याचें समर्थांना सांगावयाचें आहे. त्या-करितां वरील पहिल्या ओंवींत सर्वत्र 'लटिका' हा शब्द योजिलेला असून दुसऱ्या ओंवीच्या शेवटच्या चरणांतहि त्याच शब्दाची योजना केलेली आहे. दुसऱ्या ओंवीच्या पहिल्या तीन चरणांत तो शब्द प्रासानिमित्त सोडावा लागल्यामुळें 'वाव' शब्दानें इष्ट तें अर्थद्योतन केलेलें आहे. यायोगानें बीजगणितपद्धतीने अनायासेंच 'वाव' शब्दाचा समर्थांना अभिप्रेत असलेला अर्थ आपल्याला उपलब्ध होतो. वरीलपैकी पहिल्या ओंवीचा १ ला चरण व दुसऱ्या ओंवीचा २ रा चरण यांच्यायोगानें—

'माझें बोलणें लटिकें' = 'माझें बोलणें अवघेंचि वाव'

असें समीकरण ( equation ) सहजच आपल्या हातीं येतें. ह्या समकिरणांतील 'माझें बोलणें' हा दोन्ही अंगचा 'सामान्य गुणक' ( Common factor ) काढून टाकिला असतां ' वाव = लटिकें ' हा अर्थ आपोआपच लब्ध होतो. हा अर्थ 'व्यर्थ' ह्या मूळ शब्दाच्या अर्थपरंपरेंतच कसा समाविष्ट आहे तें वर दाखविलेंच आहे.

'वेवसाई' कीं अव्यवसायीं ?

'वाव' शब्दाच्या मूळाविषयींची शंका विवरितांना श्री. तळवळकरांनी अक्षरें गळल्याच्या उदाहरणांपैकीं एक म्हणून 'वेवसाई जो मळिण।' हा चरण उद्धृत करून त्याविषयीं–'एथें अव्यवसायी किंवा अवेवसाईं असे शब्द मूळ असले पाहिजेत यांत शंका नाहीं– ' असें निःशंक प्रतिपादिलें आहे. मूळ ठिकाण पाहतां—

"मायाजाळें दुश्चीत होये। तें निरूपणीं कामा नये।
संसारिका कळे काये। अर्थ येथींचा ॥ ४९ ॥
व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ १ ॥
वेवसाई जो मळिण। त्यासि न कळे निरूपण।
येथें पाहिजे सावधपण। अतिशयेंसीं ॥ ५० ॥"

( द. ७ स. १ ) अशा क्रमांत तो चरण आलेला आढळतो. हा येथील क्रम पाहिला कीं आपल्या प्रतिपादनास निव्वळ पुष्टि म्हणूनच समर्थांनीं येथें गीतेंतील श्लोक नुसता अवतरिला असून त्याचें शब्दशः भाषांतर करून सांगण्याचा त्यांचा येथे रोखच नाही हें लागलेच ध्यानांत येतें. पुढील ओवींत त्या श्लोकाचा मुख्य सारांश तेवढा आपल्या ओघाला अनुसरून समर्थांनी सांगितला आहे. श्री. तळवळकर श्लोकांतल्या 'व्यवसायात्मिका बुद्धिः' ह्या पहिल्या पदांशीं उपरोक्त चरण जुळवावयाला गेल्यानेच चकलें आहेत. 'वेवसाई जो मळिण।' या चरणाचें ठिकाणीं 'अवेवसाई जो मळिण' असे शब्द असले पाहिजेत हें श्री. तळवळकरांचें म्हणणें मुळींच बरोबर नाही. त्या सबंध चरणाचाच त्यांतील तीनहि शब्द मिळून 'अवेवसाई' ( प्रथमा विभक्त्यंत ) हा अर्थ आहे. तो चरण गीताश्लोकांतील 'अव्यवसायिनाम्' ह्या अंतिम पदाच्या संदर्भाने योजलेला असून तेथे तो यथार्थ लागूहि पडत आहे. अतएव अक्षर गळल्याचा प्रकार येथे मुळींच झालेला नाही.

रा. म. आठवले.

———

# भोजराज प्राइझ

**रुपये २००**

**सन १९२९ चा निकाल**

| ग्रंथ | ग्रंथकार | एकूण गुण | शेरा |
|---|---|---|---|
| भारतीय अर्थशास्त्र. | प्रो. वा. गो. काळे, पुणें | ८५ | दहा परीक्षकांनी प्रत्येकीं ५, चौघांनी ४, पांचांनी ३, दोघांनी २, |
| आर्य–संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष. | श्री. महादेवशास्त्री दिवेकर, वाई | ६० | एकाने ५, सातांनी ४, सातांनी ३, दोघांनी २, दोघांनी १. |
| कौटिलीय अर्थशास्त्र. | श्री.ज स. करंदीकर,पुणें. | ४५ | तिघांनी ५, पांचांनी ४, एकाने ३, तिघांनी २, एकाने १ |
| माझी व्यायामपद्धति | श्री. ल. व. भोपटकर, पुणें. | ३५ | चौघांनी ५, दोघांनी ४, एकाने २, दोघांनी १. |
| यशोधन | श्री. य. दि. पेंढारकर, पुणें. | ३१ | तिघांनी ५, दोघांनी ३, दोघांनी २, सहांनी १. |
| गोविंदाग्रज | प्रो. रा. ग. हर्षे, पुणें. | २८ | |
| वासुदेवशास्त्री खरे यांचें चरित्र | श्री. दा.मो. भट, मिरज. | २७ | |
| भारतीय-ज्योतिषशास्त्र-निरीक्षण | श्री. के. ल. दप्तरी, नागपूर. | २३ | |
| मराठीची सजावट | श्री. गो. गो. मुजुमदार, सांगली. | १९ | |
| लग्नाचा बाजार | सौ. शांताबाई नाशिककर, पुणें. | १७ | |
| सुशीलेचा देव | प्रो. वा. म. जोशी, पुणें. | १४ | |
| सचित्र इंद्रियविज्ञान | श्री.य.न.भट,सावंतवाडी | ९ | |
| मराठी रियासत, उत्तरार्ध भाग १।२ | श्री. गो, स. सरदेसाई बडोदें. | ८ | |

| | | |
|---|---|---|
| लोककथा | श्री. शं. ग. दाते, पुणें. | ८ |
| न्या० का. त्रि. तेलंग चरित्र | श्री. श्री. ना. कर्नाटकी, पुणें. | ८ |
| अल्बेरुणीची गीता | श्री. वि. प्र. लिमये पुणें. | ८ |
| भावतरंग | प्रो. वा. गो. मायदेव, पुणें. | ७ |
| उमर खय्यामकृत रुबाया | प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, कोल्हापूर. | ७ |
| अशोकचरित्र | कै. वा. गो. आपटे, पुणें. | ३ |
| कऱ्हाड | श्री. य. रा. गुप्ते, पुणें. | ३ |
| हिंदुलग्नसंस्था | श्री. द. वा. निमकर, नाशिक. | २ |
| मोगरा | श्री. खं. भि. कुळकर्णी, अमळनेर. | २ |
| महाराष्ट्राचा स्मृतिकार | श्री. ह. के. आपटे, नागपूर. | २ |
| कलंकरहस्य | श्री. श्री. म. वर्दे मुंबई. | २ |
| चाळिशी उलटल्यावर | डॉ. भा. म. टेंभे, यवतमाळ | २ |
| अमृतानुभवभावार्थमंजिरी | श्री. दासगणु, नांदेड. | १ |
| मुरारबाजी देशपांडे चरित्र | श्री. वा. स. कुळकर्णी मुंबई. | १ |
| पोपटपंची | श्री. ज. के उपाध्ये, नागपूर. | १ |
| प्रेमचंदाच्या गोष्टी | श्री. आ. ल. जोशी नागपूर | १ |
| षट्पाद | श्री. के. स. केळकर, पुणें. | १ |
| कादंबरीकथा | श्री. नवरे, सोलापूर. | १ |

दहा परीक्षकांनी 'भारतीय अर्थशास्त्र' ग्रंथास पहिला नंबर दिला आहे. तर, चौघांनी 'माझी व्यायाम पद्धति', तिघांनी 'कौटिलीय अर्थशास्त्र', तिघांनी 'यशोधन', दोघांनी 'भारतीय ज्योतिषशास्त्रनिरीक्षण', दोघांनी 'सुशीलेचा देव', दोघांनी 'मराठीची सजावट', एकाने 'आर्य-

संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' एकाने 'गोविंदाग्रज', एकाने 'सचित्र इंद्रियविज्ञान' यांस पहिला नंबर दिला आहे. तिघांनी स्वतःच्याच ग्रंथास पहिला नंबर दिला आहे. परंतु परीक्षकाचा स्वतःच्या ग्रंथाविषयीं कांहींच अभिप्राय जमेस धरला जाणार नाहीं असा योजनेचा नियम आहे. परीक्षक मात्र एक ग्रंथ सुचविण्याच्या आपल्या हक्कास अशा रीतीने मुकतात हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**टीपः—** प्रत्येक परीक्षकानें सुचविलेल्या पांच ग्रंथांपैकी पहिल्या नंबरास पांच गुण, अशा उलट क्रमानें पांचव्यास एक गुण समजून सर्व अभिप्रायांतील ग्रंथांची यादी करून त्यांच्या गुणांची बेरीज दिली आहे. उदाहरणार्थ 'षट्पद' या ग्रंथास १ गुण मिळाल्याचें वरील यादींत दिलें आहे; याचा अर्थ असा, कीं कोणा तरी एका परीक्षकाने पांच ग्रंथ सुचवितांना सदर ग्रंथास पांचवा नंबर दिला आहे.

# अभिप्राय

**राजगुरू समर्थ रामदास आणि त्यांचे आक्षेपकः—** ( लेखक प्रो. शं. दा. पेंडसे, एम्. ए., एम्. ओ. एल्. ) किंमत ८ आणे. निंदकाचा शेजार हा आपल्या उत्कर्षालाच कारणीभूत असल्यामुळे इष्टच आहे या तुकारामाच्या उक्तींतील सत्य आज लोकांच्या निदर्शनास पूर्णपणें येण्यासारखें आहे. टीकेच्या पडद्याआड सांप्रत रामदासाची महाराष्ट्रांत होत असलेली निंदा मराठीमध्यें चर्चात्मक अशा उत्तम वाङ्मयाची भर पडण्यास कारण झालेली पाहून कोणासहि आनंद होईल. रा. करंदीकर, पेंडसे, भट, आळतेकर इत्यादि सत्यप्रेमी लोकांनी रामदासांवर होत असलेल्या हल्ल्यांचें निवारण करण्याकरितां लिहिलेलें वाङ्मय इतकें तर्कशुद्ध आहे की वरील सर्व विद्वानांनी आजपर्यंत एतद्विषयक प्रसिद्ध केलेले लेख एकाद्या प्रकाशकाने एकत्र करून पुस्तकरूपाने प्रसिद्ध करावे अशी आमची आग्रहाची सूचना आहे.

वरवर पहाणाऱ्यांसहि रामदास आणि इतर संत यांतील भेद ओळखतां येण्यासारखा आहे. प्रत्यक्ष क्रिया करण्याचे पूर्वी देशभर पर्यटन करणारा दुसरा संत क्वचितच आढळेल. प्रवासापूर्वी एक तप केलेली तपश्चर्यासुद्धा इतर संतांच्या चरित्रांत वाचावयास मिळेल असें आम्हांस वाटत नाही. रामदासांचा प्रवास म्हणजे नुसतें तीर्थाटन नव्हतें; तो समाजस्थितीचा अभ्यास होता हें आपण विसरतां कामा नये. नुसत्या साधूला कुराण वाचण्याची कधी इच्छा झाली असती का? पण 'धर्म जयाचा त्यासी प्रमाण। दूषण कराया नाहीं कारण' हें कुराणांतलें वचन काढून व तें मुसलमानांच्या तोंडावर टाकून त्यांना निःशब्द करणारा रामदास याला नुसता साधु कोण म्हणेल? रामोपासनेसारखा योग्य वेळीं योग्य उपाय नुसत्या साधूला सुचला असता काय? रामाची उपासना व मारुतीची भक्ति हीं प्रचलित करण्यांत रामदासांची सूक्ष्म व व्यापक बुद्धि दिसून येते. या सर्व गोष्टी रामदासांना कराव्या

लागल्या याचें कारण हेंच कीं त्यांना धर्मस्थापना करावयाची होती. 'दास तो उठिला बळें ' इत्यादि वचनांवरून धर्मस्थापनेकरतांच रामदासांचा अवतार होता ही लौकिक समजूत खरी ठरते. आता धर्म म्हणजे वर्णाश्रमधर्म हें सांगणें नकोच. वर्णाश्रमधर्मामध्ये राजकारणाचा समावेश होतो इकडे दुर्लक्ष झाल्यामुळे चालू वादाला तोंड फुटलें गेलें असें आम्हांस वाटतें. राजाच्या साहाय्याशिवाय धर्माची स्थापना होत नसते; किंबहुना स्वराजाशिवाय धर्मस्थापनेला सुरवातहि करतां येत नाही व वर्णाश्रमधर्माप्रमाणे धर्मसंरक्षणाचा भार अखेर राजाच्याच शिरावर पडतो. म्हणजे स्वराजस्थापनेची खटपट केल्याशिवाय धर्मस्थापना होणेंच अशक्य ही गोष्ट. जर रामदास अप्रिय असणारांना पटवून देतां आली तर रामदास हा राजकारणी पुरुष होता किंवा नाही तसेंच त्याची आणि शिवाजीची भेट अखेरअखेरपर्यंत तरी झाली होती कीं नाही इत्यादि भ्रामक शंका मनांतसुद्धा कोणाच्या उद्भवणार नाहीत. स्वराज्याची स्थापना झाल्यानंतर रामदासांचें राजकारण लोप पावलें हें अगदीं साहजिक असूनहि कित्येकांनी याच गोष्टीवर आपल्या आक्षेपांची उभारणी केली आहे. परंतु शिवाजी राज्यारूढ झाल्यावर धर्माची अंमलबजावणी,– धर्माचीं सर्व सूत्रें– शिवाजीच्या हातीं गेलीं हें समजण्यास कठीण कां जावें हें आम्हांस समजत नाही. रामदासांच्या मठांतून शिवाजीच्या वाड्यांत राजकारण जाणें हाच जेथे उद्देश तो का एकदा सिद्धीस गेला म्हणजे मग मठामध्ये राजकारण कोणाला कसें दिसावें ? आणि शिवाय 'राजकारण बहुत करावें परंतु कळोंच नेदावें ' हाच जेथे संकल्प तेथे राजकारणाचे पुरावे सापडत नाहीत म्हणून हळहळ करण्यांत तात्पर्य तें कोणतें ? सारांश, वर्णाश्रधर्मस्थापना करण्याचा रामदासांचा उद्देश होता किंवा नाही हीच बाब फार महत्त्वाची आहे. याचें उत्तर होकारार्थी देणाऱ्याला रामदास हे राजकारणी पुरुष होते हें मान्य करणें भाग आहे अशी आमची समजूत आहे. रामदासांना एक संप्रदायच सुरू करावयाचा असता तर गोकुळांतल्या कृष्णाची किंवा अशीच दुसरी उपासना त्यांना सुरू करतां आली नसती काय ? मुसलमानांचे ऐषाराम व त्यांचीं व्यसनें यांचें अनुकरण करणाऱ्या त्या वेळच्या हिंदूंपुढे रामचंद्रासारख्या देवाचीच उपासना ठेवणें अवश्य होते. रामदासांचें सर्व चरित्र अगदीं आंखल्यासारखें आहे. मी धर्मस्थापना करीन असा त्यांनी आधी संकल्प केला व तो तडीस नेण्याकरतां त्यांनी अनेक युक्त्या केल्या व आपल्या आयुष्याला व विचारांना तदनुसार वळण दिलें. दुसऱ्या कोणत्याहि संतासंबंधाने असें म्हणतां येईल किंवा नाही याची आम्हांस शंकाच वाटते. असो. प्रो. पेंडसे यांनी प्रस्तुत निबंधांत फारच मुद्देसुद विवरण करून रामदासावरील आक्षेप निराधार ठरविले आहेत. निबंधकारांनी दिलेलीं प्रमाणें कोणत्याहि निर्विकार बुद्धीच्या माणसाला पटतील असा आमचा भरंवसा आहे. म्हणून रामदासावरील चालू चर्चा जे वाचीत असतील त्यांनी प्रो. पेंडसे यांचा निबंध एकदा तरी अवश्य वाचून पहावा अशी त्यांना आमची अगत्याची सूचना आहे.

---

## चुकीची दुरुस्ती.

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका ३।३ पृष्ट १४५ मध्यें 'हत्थकङ्कणं किं दप्पणेण पेक्खीअदि। छाया हस्तकङ्कणं किं दर्पणेन दृश्यते' असें आहे. 'पेक्खीअदि' चा ऐवजीं 'प्रेक्ष्यते' असें पाहिजे 'दृश्यते' असें नव्हे.

## नाटककार व कादंबरीकार यांस.

स. १९३० सालांत मराठींत प्रसिद्ध झालेल्या सर्व नाटक-कादंबऱ्यांचें साकल्याने परीक्षण करण्याचें आम्ही योजिलें आहे. करतां आपआपलीं नाटकें व कादंबऱ्या व लघुकथा ग्रंथकारांनीं आमच्याकडे पाठवून देण्याची कृपा करावी अशी त्यांस विनंती आहे. याप्रमाणें घडल्यास पुढच्या पाडव्याच्या अंकांतच हें परीक्षण देण्याचा विचार आहे. तरी या कामीं सर्व नाटककार व कादंबरीकार आम्हांला मदत करतील अशी आशा आहे.

## वर्गणीदारांस विज्ञप्ति.

मनिआर्डरीचा व व्ही. पी. चा खर्च वाचवण्याकरतां ठिकठिकाणीं सभासदांची वर्गणी वसूल करून ती एकदम पाठवितां यावी म्हणून आम्हीं कित्येक सभासदांस ही जबाबदारी पतकरण्याविषयीं विनंती केली ती त्यांनी मान्य केली. सबब खालील गृहस्थांकडे त्या त्या ठिकाणच्या सभासदांनी वर्गणी द्यावी अशी विनंती आहे.

| | |
|---|---|
| सोलापूर—श्री. नी. शं. नवरे | अंमळनेर—श्री. वि. का. भागवत |
| इंदूर — " वि. ह. आपटे | भोर — " ना. म. भिडे |
| मुंबई — " सुं. भा. वैद्य | बेळगांव —डॉ. के. बा. साठे |

पुणें येथील वर्गणीदारांना साहित्य-पत्रिकेचे अंक पुणें येथील परिषदेच्या शाखेचे चिटणीस रा. बा. सि. बेन्द्रे, १४०२, कसबा पेठ, यांचेकडून मिळतील.

## साहित्यसंमेलन

येतें साहित्यसंमेलन हैद्राबाद (दक्षिण) येथें मे महिन्यांत दुसऱ्या आठवड्यांत डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरणार आहे.

---

## परिषदेची हानि.

अत्यंत वाईट वाटतें कीं पत्रिकेचे एक तहाहयात सभासद व उत्साही लेखक महादेव विनायक डोंगरे गेल्या कार्तिक शु. २ रोजीं अकालीं कालवश झाले. हे मुंबई विश्वविद्यालयाचे पदवीधर असून मृत्युसमयीं त्यांचे वय अवघें २५ वर्षांचें होतें. संपन्न स्थिति असूनसुद्धां इतक्या लहान वयांत त्यांना वाङ्मयव्यासंग लागून लेखनव्यवसायहि त्यांनी सुरू केला होता हें खरोखर त्यांस भूषणास्पद होतें. मराठी-भाषावृक्षाची एक कळी उमलण्यापूर्वीच गळून पडल्यामुळें मराठी भाषेचें फार नुकसान झालें आहे.